लागतात. 'विचारवंतास' आपले समाजांत व वाङ्मयांत 'ऋषि, मुनी' ही संज्ञा दिली गेली. क्रियावंत व्यक्ति रोजच्या तात्कालिक कार्यात मग्न, तर विचारवंत नित्याच्या तत्त्वाच्या विवेचनांत व तद्नुसार व्यवहारांत जागृत. हा प्रागतिक मानीव स्वभावाचा साहजिक परिपोष होय.

आर्यावर्ताच्या स्वामीत्वासाठीं कुरुक्षेत्राच्या रणांगणावर कौरव-पांडव समवेत ''छप्पन्न देशींचे भूपती' झुंज देत होते. तर त्याच सुमारास आगेमागे आर्यावर्तांतील महानद्यांच्या काठीं, डोंगरपर्वताच्या, दऱ्याखोऱ्यांच्या व शिखरीं ''शुक शौनकादिक'' ऋषींस कथा निवेदित होते. हे शौनकादिक ऋषी वेदांतून, उपनिषदांमधून व पुराणांतरी समाजांतील विचारवंतांचे कार्य करीत आले होते.

**श्रीअगस्ती मुनींचे कथेतून निघणारा ऐतिहासिक निष्कर्ष**

३. आर्यावर्तांतून विंध्याचलाचे बाजूनें व मधून हे विचारवंत खालीं उतरलें हें ऐतिहासिक सत्य, प्रारंभीं उद्धृत केलेल्या अलंकारिक कथेंतून तथ्यरूपानें दिसतें. विंध्याचलाच्या उत्तरेस आर्य संस्कृती ठळक रूपाने नांदत असतां त्या पर्वताच्या दक्षिणेस अंधार (अज्ञान) होता. त्यांनीं तो सोडून परिव्राट्कार्य (मिशनरी कार्य) करावें म्हणून त्यांचे सहकारी व सहयोगी त्यास विनवूं लागले. इतका मथितार्थ स्वीकारला म्हणजे आणखीही ऐतिहासिक सत्यें अनुमानित प्रमाणदिकांच्या साह्याने बाहेर पडतात. तीं अशीं :

(१) अगस्ती मुनींबरोबर त्यांचेच विचाराची कांहीं मंडळी बाहेर पडली असणार. (२) हे ऋषिमुनी आर्यावर्तात आश्रमादिंतून अध्ययन-अध्यापनाचे जसें कार्य चालवीत होते तेंच कार्य या नव्या जागी म्हणजे विंध्याचलाचे दक्षिणेस कालांतराने त्यांनीं चालू केलें असणार. (३) निरनिराळ्या स्थानी मठस्थापना झाली. तिच्या द्वारे आर्य संस्कृतीचा व्याप वाढला, म्हणजे पर्यायाने अंधार नाहीसा झाला. (४) श्रीअगस्तीमुनी श्रीक्षेत्र काशींत राहत. विंध्याचल उतरून दक्षिणेंत आले ते दक्षिणेंतच स्थायिक राहिलें असें दिसत नाही. द्रविड देशांत व जावा बेटांत त्यांचे नांवावर अनेक ग्रंथ मोडतात. (५) त्यांनीं समुद्र प्राशन केला याचा अर्थ असा दिसतों कीं समुद्र उल्लंघन करून आर्य संस्कृतीचा संदेश त्यांनीं दूरवर जावादि बेटात पोहोचविला असावा. तिकडील श्रीरामाचीं मंदिरें व रामायणाचा प्रसार, यावरून असा निष्कर्ष काढावयास हरकत दिसत नाहीं.

सारांश, श्रीअगस्ती ऋषी आर्यावर्त सोडून आर्य संस्कृतीचा संदेश दक्षिणेंत पोहोंचविणारे प्रथमचे प्रख्यात संदेशवाहक होते असें धरून आता चालूंया.

**महाराष्ट्राच्या सीमा**

४. विंध्याच्या दक्षिण भागापासून आजचा महाराष्ट्र सुरू होतो. आजचा महाराष्ट्र हा पूर्वापार तसाच चालत आलेला नाहीं. ''राजा कालस्य कारणम्'' हे जितके सत्य तितकेच 'राजा राजस्य कारणम्' हेंहीं सत्य होय. एक वेळ उत्तरेस उज्जेनी, दक्षिणेस तुंगभद्रा, पूर्वेस व पश्चिमेस समुद्र ही महाराष्ट्राची सीमा होती. आज ती आकुंचित झाली आहे. ज्या

कालासंबंधी आतां आपण विचार करीत आहोंत त्या काळीं विंध्यांद्री ही उत्तर दिशा, द्रविडभूमी ही दक्षिण दिशा, पूर्वेस बंगालचा उपसागर व पश्चिमेस अरबी समुद्र, असा हा महाराष्ट्र होता.

**व्रत–वैकल्यांत इतिहास**

या भूमींत उत्तरेकडील संदेशकार 'मिशनरी' उतरले आणि त्यांनीं आपले ज्ञानसत्र सुरू केलें. आज 'ऋषिपंचमी' व्रतानें त्या ऋषींची 'हातची भाजी' जिवंत ठेवली आहे. पण त्यांचें ज्ञानदान व साधी राहणी आणि उच्च विचारसरणी स्मृतिमात्र झाली आहे.

**वसाहत व तिच्या वाढीच्या तीन कला**

५. या वसाहतीचा प्रारंभ तीन हजार वर्षांपूर्वी झाला असे इतिहासाचार्य राजवाडे प्रस्थापितात. या वसाहतींचा इतिहास, इतर वसाहतींप्रमाणेंच सर्वसाधारण नियमानुसार दिसतो.

ह्याचा अर्थ नवीन दमाची मंडळी विजय मिळवते व विस्कळीत प्रांतांची जमवाजमव होते आणि जेते व जित थोडे दम खावून, जुन्या नव्याची पुनर्घटना करीतात, हा सर्वसाधारण नियम. अपवाद असले तरी ते अपवादच.

**महाराष्ट्र शब्दशः व अर्थशः**

६. श्रीअगस्ती मुनींनीं वसाहतीची मुहूर्तमेढ रोविली. ती कालांतरानें वाढत वाढत गेली. राज्यें, गणराज्यें, साम्राज्यें उदय पावलीं. पैठणास शालिवाहन, बदामीचा चालुक्य वंश, मालखेडास राष्ट्रकूट वंश, देवगिरीचे यादव अशी कालक्रमानें घराणीं नांदली. ''चौदा विद्या व चौसष्ट कला'' गुण्यागोविंदानें नांदल्या आणि 'महाराष्ट्र' खरोखरच महाराष्ट्र या पदवीस पात्र झाला.



**प्रकरण २ रें**

# तेरावें व सतरावें शतकांतील महाराष्ट्र

**तीन–चार हजार वर्षांची महाराष्ट्र संस्कृती**

मागील प्रकरणांत श्रीअगत्स्यादि मुनींनी स्थापिलेला व शालिवाहनापासून तो यादवांपर्यंतच्या राजांनीं वाढविलेला महाराष्ट्र आपण पाहिला. राष्ट्राचे अंतरंगांतूनच झालेली व केलेली अशी ही वाढ (प्रगती) होती. राज्यकर्ते येथलेच, लोकांच्या सहवासातले. राजा व प्रजा मिळून सर्वांगपरिपूर्ण असे एक शरीरच होतें असे म्हटले तरी शोभेल. या तीन चार हजार वर्षांत समाजाची संस्कृतीही झपाट्यानें वाढली होती. ''या दीर्घकालीन अमदानीत विद्या, स्वातंत्र्य, ऐश्वर्य यांचा उपभोग भारतीय आर्यांनी स्वतः घेऊन तो दुसऱ्यांसही करून दिला. एवढा दीर्घकाल स्वराज्याचा, स्वातंत्र्याचा व भरभराटीचा, भूतलावर दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राच्या वाट्यास आलेला सापडणार नाही. **(सरदेसाई, हिं. सं. इ. पृ. ५९)**

**कलांची वाढ**

वरील सर्वसाधारण विधानांत 'कलां'चाही समावेश आपण करून अधिक नामनिर्देश केल्यास संस्कृतीची कल्पना ठसठसीत उठेल. पैठणचें विद्यापीठ – (विद्वान धर्माधिकाऱ्यांची परंपरा)– श्रीज्ञानेश्वर महारांजाचे कालापर्यंत अधिकृत लोकमान्य होते ही गोष्ट, ज्ञानेश्वरादि भावंडांचे शुद्धिपत्र येथून मागण्यांत आले यावरून लक्षांत येईलच. ''पैठणी पागोटें व पैठणी'' (स्त्रियांची) या वाक्प्रचारावरून वस्तूंची कला अवगत होईल. भाजे, कार्ले, नाशिक व कान्हेरी येथील लेणीं या देशी राजवटींतील आहेत. ''शालिवाहन शकाच्या उच्चाराशिवाय

कोणाचाही नित्यनैमित्तिक धार्मिक विधी सुरू होत नाहीं.'' इतकी ही राजवट लोक समाजाच्या जीवनांत एकजीव होऊन गेली आहे.

**यावनी सत्ता तेरा ते सोळा शतकापर्यंत**

यादवांनंतर लौकरच म्हणजे तेरा चौदावें शतकांत मुसलमानी राजसत्ता आस्ते आस्ते दक्षिणेत पसरूं लागली. दिल्लीच्या अल्लाउद्दिन खिलजीनें हिंदु धर्माचा अतिशय उच्छेद केला. हिंदूंवर जिझियासारखे कर बसविलें. पुढें बहामनी राज्य होऊन त्याचे कालांतरानें पांच विभाग झाले. हे सर्व विभाग उर्फ शाह्या महाराष्ट्रांत पसरल्या होत्या. लहान लहान हिंदू राज्ये जिंकून बहामनी वाढले होते. बहामनी राजे हिंदूंस मोठाल्या जागा देत नसत. परदेशी हबशी, तुर्की, इराणी वगैरे असंख्य लोक या राज्यांत नेहमी येत व त्यांना राजाश्रय व इनामें मिळत. यामुळे हिंदूंचें महत्त्व कमी कमी होत गेले. मुसलमानांची सत्ता पंजाब व दिल्ली या प्रांतांच्या पुढें पसरली नव्हती तोपर्यंत त्यांच्याच निश्चयी व कडव्या मुसलमानांची मध्य व पश्चिम आशिया खंडांतून भरती होऊन त्यांच्या अंगचे प्रखर तेज जागृत रहात होते. दक्षिणेत त्यांचाच प्रवेश झाला. तेव्हांपासून त्यांच्या धर्मांचे व राज्यकारभाराचें स्वरूप बदलत चालले. हिंदूंच्या धार्मिक संस्थांचा परिणाम त्यांच्यावर होऊं लागला. भक्तिविजय ग्रंथांत याची उदाहरणे पाहण्यास मिळतात. (श्रीक्षेत्र गाणगापुरी, संगमावर असणाऱ्या श्रीनृसिंहसरस्वती स्वामींच्या मंदिरापासून एक दोन फर्लांगाच्या अंतरावर ''म्लेंच्छराजा येउनि लागे तवचरणीं'' ही ओळ सार्थ करणारी कबर आजही पाहावयास मिळते.)

या स्थितीतही दोन बाबींनीं हिंदु संस्कृतीचें मूळ राखिलें. (१) ग्रामपंचायत संस्था (२) संतांचे मठ व संतकवींचें वाङ्मय. ग्रामपंचायतीसंबंधांत परकीय प्रवाशांनी काढिलेले प्रशंसोद्गार मननीय आहेत.

ग्रामसंस्था (बारा बलुते व सोळा अलुते) प्रपंच व परमार्थ यांच्या भरभक्कम पायावर उभारलेली होती. सारांश, परकीय सत्तेखाली तीन चार शतकें राहूनही, आर्य संस्कृतीचीं पाळेंमुळें उखडली गेलीं नाहीत. याचे श्रेय (१) ग्रामपंचायती, (२) संतवाणी व (३) संतवागणूक यांस देणें योग्य होईल.



### प्रकरण ३ रें

## सतरावें शतकांतील महाराष्ट्र

**'शतक' माप केवळ गणितावर अवलंबून नाही**

१७ वे शतक म्हणजे इ. स. १६०० ते १६९९ असा सर्वसाधारण समज आहे आणि तो समज नियमानुसारही आहे. सोयीसाठी दोनचार वर्षे अलीकडे पलीकडे गेल्यास नियमास बाधा येत नाही. इग्लंडचे इतिहासकार अठरावें शतक म्हणजे इ. स.१६८८ ते १८१५ असा सुमारे सव्वाशें वर्षाचा काळ गणतात आणि विषयाच्या सोयीसाठी त्यांचे गणित मान्यही झालें आहे. इ. स. १६८८ च्या क्रांतीनें ''इंग्लडच्या स्वरूपांत'' जी विचाराची लाट उसळली ती इ. स. १८१५ पर्यंत सतत वाढत राहिली. अभ्यासास हा कालखंड सोयीचा पडला आणि शतकाचे गणतीस फारसा बाधही आला नाही. अतएव ''विचारसरणीचा अभ्यास व कालगणतीचा प्रघात या दोन्ही दृष्टीनीं इंग्लंडचे इतिहासाचें अठरावें शतक म्हणजे इ. स.१६८८ ते इ. स.१८१५ हा कालखंड मुक्रर होऊन मान्यही झाला''.

**महाराष्ट्र इतिहासाचें १७ वें शतक**
**अंतर्बाह्य अकल्पित बाबींची घटना**
**१७ वें शतक महाराष्ट्राचे इतिहासापुरतें इ. स. १६०३ ते १७०८**

ही विचारसरणी मान्य झाल्यास महाराष्ट्राच्या इतिहासाचें १७ वें शतक म्हणजे इ. स. १६०३ ते इ. स. १७०८ हा कालखंड सोयीस्कर पडेल असे दिसते. इ. स. १६०३ यांत जाधवांची जिजाबाई व भोसल्यांचे शहाजीराजे यांचा विवाह झाला. इ. स. १७०८

मध्यें औरंगजेबाचा मृत्यु व शाहू महाराजांची दिल्लीहून सुटका व ''संयुक्त ईस्ट इंडिया कंपनीची प्राणप्रतिष्ठा'' या गोष्टी घडून आल्या. या दोन टोकांमध्यें श्रीसमर्थ कालखंड, छत्रपती शिवाजी महाराजांची कारकीर्द, छत्रपती संभांजी महाराजांचा अमानुष अंत, इत्यादि महाराष्ट्र समाजांत आंदोलन करणाऱ्या ऐतिहासिक महत्वाच्या अनेक बाबींचा अंतर्भाव होतो. या प्रत्येक बाबीचे धागेदोरे दूरवर स्थलावर व कालावर पसरले आहेत; आणि आपआपले परी इतिहास संशोधनाचे विषय होऊन राहिले आहेत. तेव्हां इतिहास लेखनाचे दृष्टीनें कालमानाचे दृष्टीनें महाराष्ट्राचें १७ वें शतक म्हणजे इ. स. १६०३ ते इ. स. १७०८ हा कालखंड मान्य होईल अशी उमेद आहे.

### जुनी व नवी क्षात्र पिढी; जिजाबाई जाधवांचा शहाजीराजे भोसले यांशी विवाह

महाराष्ट्रातील हें सतरावें शतक १६०३ ते १७०८ एकशे पांच वर्षांचे आहे हे धरल्यास ज्या घडामोडी झाल्या त्यांचा नामत: वरती उल्लेख आला आहे. आतां त्या घडामोडीचें विवरण करूं या :

१. जिजाबाई जाधव ह्यांचा विवाह शहाजीराजे भोसले यांशीं इ. स.१६०३ त झाला. जाधव हा 'यादव' या शब्दाचा अपभ्रंश धरण्यास हरकत दिसत नाहीं. यादवांनी महाराष्ट्रांत देवगिरीस राज्य होते. कालचक्रानें ते त्यांचे हातून गेलें. सुंभ जळला तरी पीळ राहतो. राज्य गेलें पण क्षात्रवृत्ती राहिली. मुसलमानी अंमलांत मनसबी मिळवावी, परक्यांच्या लढायांत लढावें आणि मानमरातबाने राहवें, असे वळण क्षात्रवृत्तीस लागलें. अनेक पिढ्यांत हेंच वळण राहून क्षात्रवृत्ती आकुंचित रूपांत वावरूं लागली. जाधव, मोरे, घोरपडे, सुर्वे, इत्यादि घराणीं या वृत्तीतच वाढलीं होतीं व पोसलीं होतीं. ''आपण जगद्‌गुरु पातशाहापाशीं गेलो. (**शिवकालीन पत्रसारसंग्रह** खंड १, ले. ५०)'' या वाणींत क्षात्रवृत्ती विरून गेली. जुन्या क्षात्र घराण्यांची ही वृत्ती तर शहाजीराजे म्हणतात, ''अमा अकार्तुकाचे बोलेकरून आपले जागिरींत नाहक गैरहिसाबी पातशहा खलेल करविताती. **(शि.का.प.सा.सं. खंड १, ले. ७१०)** तरी आपण रजपूत लोक''. या दोन वृत्ती पाहिल्या म्हणजे क्षात्रतेज उजाळा घेत चालले होतें असें स्पष्ट दिसतें. जुन्या व नव्या क्षात्रवृत्तीच्या घराण्यांत विवाह होऊन जी फलनिष्पत्ति झाली ती श्री शिवाजी महाराजांचे मुखें ''आपल्या भूमीचे संरक्षण करणें माझें कर्तव्य आहे.'' **(श.का.प.सा.सं. खंड १, ले. ९८२)** इतक्या व्यापक वृत्तीस प्रसवली. ही क्षात्रवृत्ती व यातील उत्क्रांती हिशेबांत घ्यावी.

### जुनी व नवी ब्राम्हवृत्ती

इ. स.१६०९ त नारायण ठोसर (पुढें श्रीसमर्थ रामदास स्वामी या नांवानें प्रसिद्धी पावले) जन्मले. तत्कालीन ब्राह्मणवृत्तीचे निदर्शक भट जुनारदार मुक्काम नाशिक यांनीं मलिक अंबर यांस विनविलें कीं, ''आपण गोदातीरी स्नानसंध्या करून साहेबांसी दुवा देऊन असतो.'' **(शि. का. प. सा. सं. खंड १, ले, १६५)** यांत दिसून येतें. ती तीच ब्राम्हवृत्ती ''प्रथम क्षत्रिय बनल्याशिवाय शिवाजी मुकुट धारणाला योग्य होणार नाहीं, असा विचार

करून आणि पूर्वीसारखें जुलमानें राज्य न करण्याचें त्यानें वचन दिल्याचें लक्षांत घेऊन, गेल्या २९ मे रोजीं दुसरें पक्षाचे मंडळीनें त्याला मोठ्या समारंभानें क्षत्रिय करून घेतले.'' या रसात संचरू लागली. **(खंड २, ले. १६८४)**

### श्रीसमर्थ सांप्रदायाची कामगिरी

रामदासी पंथानें एकंदर महाराष्ट्रांत जी विचार व आचार क्रांती घडवून आणिली ती 'समर्थप्रताप' या ग्रंथातून येणेंप्रमाणें दिसते.

(अ) नाना देश भाषा मतें, भूमंडळी असंख्यातें, नाना पंथ नाना मतेंहि असंख्यातें हीं समर्थानें शोधिलीं, गीतार्थ शोधितां शोधितां शिष्यसृष्टी बोधिली.

(आ) समर्थे कित्येक गुप्त शिष्य केले, ते ते समर्थांसी विदित भले भरतखंडीं प्रगट जे झाले ते ते निवेदन करूं ग्रंथार्थी.

(इ) वेणूबाईपासून कित्येक महंत झाले. उत्तर भूमीसी बहुधा गेले त्रिवेणी अंतरवेदीं राहिले अयोध्यासमीप करूनियां.

### एकंदर रामदासी पंथाचे अवलोकन करितां :

(ई) राजस, तामस, सत्त्व शक्ती, शुद्ध सत्त्वीं प्रवेशल्या मति, समर्थ सद्गुरू अवतार मूर्ति, उद्धार केला सकळांचा.

थोडक्यांत सांगांवयाचे तर अधिकारी पुरुषांपुढें श्रीरामचंद्राचे व बहुजन प्रजाजनापुढें श्रीमारुतिरायांचे ध्येय ठेवून समाजांतील सर्व थरांत चैतन्य उत्पन्न करून ठेविलें. त्याचे चीज कार्यकर्त्या पुरुषांनी (शिवाजी महाराज, जयसिंग, छत्रसाल, बाजीराव, चिमाजी अप्पा व मल्हारजी होळकर इत्यादिकांनी) पुढें केलें.

### शाहू महाराजांची मोगलांकडून सुटका
### मराठेशाहीवर इष्ट–अनिष्ट परिणाम

शाहू महाराजांचे दक्षिणेंत आगमन : औरंगजेबाचे मृत्युनंतर एकट्या शाहू महाराजांची दिल्लीहून सुटका झाली. आई वगैरे दिल्लीतच नजरकैदेत होती. दिल्लीहून दक्षिणेत उतरत असतां, वाटेवर कांहीं सरदार त्यांस मिळाले. यापैकीं बहुतेक स्थिर व्हावयाचे होते. पण दक्षिणेंत जसजसे शाहू महाराजांचे पाऊल पडूं लागले तसतसे त्यांस विरोधक भेटूं लागलें. या विरोधकांपैकीं बहुतेक स्थिर झाले होते. स्वातंत्र्याच्या लढ्यांत (इ. स. १६८९ ते १७०८) यांनी तलवार गाजविली असल्यामुळें एकतर स्वतःची मिळकत होती, अगर छत्रपती राजारामांकडून प्राप्त झाली होती. या मंडळीस दहशत पडली आणि ते विरोधक बनले. एका सिंहासनाचे दोन तुकडे पडले. साताऱ्यास एक व दुसरे कोल्हापुरास. सरदारांत, मुत्सद्यांत विभाग पडून दुही माजली. ती इ. स. १७१४ त थोडीबहुत शमली आणि पुढील चार–पांच वर्षात बाळाजी विश्वनाथ 'सेनाकर्ते' 'पेशवे' यांनी जमवाजमव करून, दिल्लीकडे

मोर्चा फिरविला. सारांश, शाहूंचे येणें प्रथम भेदकारक झाले, पण परिणामीं भयहारक झाले.

**बाह्य घटना, व्यापारानिमित्त युरोपियनांचे आगमन**

ज्या शतकांत आपण विचार करीत आहोत त्या शतकाचे अगदीं प्रारंभास म्हणजे इ. स. १६०० तच ईस्ट इंडिया कंपनी इंग्लंडमध्यें बनून तिचे व्यापारानिमित्त हिंदुस्थानांत येणें झालें. डच व पोर्तुगीज व्यापारीही आधींच येऊन ठेपले होते. हिंदुस्थानाचा व पॅसिफिक महासागराचा (एशियातील) किनारा यांनीं व्यापून टाकिला होता.

ईस्ट इंडिया कंपनीस कधी राजाश्रय असे, कधीं नसे. तरीपण इ. स. १६३३ चे सुमारास हिंदुस्थानांतील सर्व वखारींत मिळून १९० व्यापारी काम करीत होते. गरीबांस अन्न व भिक्षा देणें, रुग्णालये (हास्पिटले) सारख्या संस्थांस वर्गण्यांची मदत देणें अशा कामी कंपनीचा खर्च सढळ असे.

विल्यम मेथोल्ड (इ. स. १६१५–३७) याने व्यापाराची शिस्त लावली. इंग्लडांत कंपनी टेंकीस आली असतां या गृहस्थानें हिंदुस्थानातील बाजू चांगली सांभाळली.

**कंपनीच्या कारभारांत इ. स. १६५८, १७५८, १८५८ या वर्षांची महती**

सुरतेस वखारी घालून इंग्रजांनीं पोर्तुगिजांचा पश्चिमेकडील सर्व व्यापार आपलेकडे वळविला. कंपनीच्या मच्छलीपट्टनच्या वखारीनें पोर्तुगीजांचा पूर्वेकडील व्यापार बसविला. क्रॉमवेलनें युरोपास डचांस जिंकिले आणि इ. स. १६५७ त मद्रास वखारीची नीट व्यवस्था लावून कंपनीच्या कारभाराची व्यवस्था लाविली. तेणेंकरून त्यांच्या उद्योगास निराळे वळण लागले. हिंदुस्थानांतील इंग्रज व्यापारी हे कंपनीच्या फायद्याकडे दुर्लक्ष करून स्वतःच्याच तुंबड्या भरीत. क्रॉमवेलनें प्रत्येक वखारीचे नियम बांधून दिले. येथून शंभर वर्षेपावेतों ही कंपनी केवळ व्यापाराकडे लक्ष देऊन होती. इ. स. १७५८ त राज्य संपादनास प्रारंभ करून इ. स. १८५८ त कंपनी सम्राट बनली.

**भटाला दिली ओसरी; तो हातपाय पसरी**

पश्चिम किनाऱ्यावर मुसलमान यात्रेकरूंची जहाजे कंपनीनें पकडलीं तेव्हां कंपनीनें इ. स. १६८९ चे सुमारास एक नवीन उपक्रम सुरू केला. ज्या ठिकाणीं तटबंदी करावयाची असेल तेथील लोकांवर व रयतेवर कर बसवून पैसा काढावा आणि तो तेथच्या मजबुतीस लावावा.

इकडील व्यापारात कंपनीस कल्पनातीत प्राप्ती होऊं लागली. त्याबद्दल विलायतेंतील लोकांच्या मनांत हेवा उत्पन्न झाला. तिकडे अनेक शत्रु उत्पन्न झाले. इकडे खुद्द कंपनीच्या व्यवस्थापकांतही दुफळी झाली. 'व्यापार मर्यादित असावा कीं खुला असावा' हा वाद उत्पन्न होऊन मजल कोर्टापर्यंत गेली. कोर्टाचा निकाल जुन्या कंपनीचे बाजूचा झाला. पण त्यामुळें चाचेगिरीस प्रारंभ होऊन ती पुढें फारच बळावली. ही बाब इंग्लंडच्या पार्लमेंटकडे गेली. इ. स. १६९१ त नवीन कंपनी निघाली. जुन्या कंपनीनें काढून टाकिलेल्या

लबाड व नालायक लोकांस या नव्या कंपनीनें हाती धरलें. त्यामुळें अग्नीत तेल ओतल्यासारखें होऊन दोन कंपनीत जुन्या-नव्या कंपनीचा समेट होऊन एकरूपी एकच कंपनी नांदू लागली ही 'एकीच पुढें शक्ती झाली'.

**इ. स. १७०८ त जुनी राजशक्ती खिळखिळी**

**तर नव्या शक्तीचा प्रादुर्भाव झाला**

सारांश, औरंगजेबाच्या मृत्यूनें, जुनें राज्यकारभाराचें यंत्र खिळखिळें होऊन गेलें होतें, तर महाराष्ट्रांत सर्वत्र नवचैतन्य उत्पन्न होऊन कार्यक्षेत्राची वाट पहात होते आणि हिंदुस्थानाचे पश्चिम किनाऱ्यावर ईस्ट इंडिया कंपनी शक्तिमान झाली होती. अशा या तीन बाबी अठराव्या शतकांत आपल्या दृष्टीसमोर उभ्या राहतात.



**प्रकरण ४ थें**

# तत्कालीन भारताची अंतःस्थिती

**राज्यकारभाराचे धोरण**

सर जदुनाथ सरकार औरंगजेबाचे कारकीर्दीचे वर्णन खालीलप्रमाणें करितात.

(१) जिझिया कर हिंदूंवर बसविला गेला. (२) राजाज्ञेनें देवळे व मूर्ती यांचा राजरोस प्रत्यही भंग होऊं लागला. (३) दिल्ली व आग्रा येथील मशीदींच्या पायथ्याखालीं या भंगलेल्या मूर्तींची स्थापना होऊं लागली. (४) सरकारी नोकरी व विशेषतः जमाबंदीचे खातें हिंदूंस बंद. (५) हिंदूंच्या यात्रा व धार्मिक विधी यांस प्रतिबंध सुरू झाला. (६) मुसलमान व्यापाऱ्यांस जकात माफ, तर हिंदूंस ती भरावी लागे. (७) नानाविध आमिषें दाखवून हिंदू धर्म त्याग करण्यास मोह पाडीत.

**कांहीं सरकारी अधिकाऱ्यांचे वर्तन**

याच सुमारास मुथेरस मुर्शीद कुलीखान नांवाचा फौजदार नेमला गेला. हा फौजदार हिंदूप्रमाणें गंध लावून धोतर नेसून यात्रेंत फिरे आणि हिंदू स्त्रियांस पकडी व हाताखालचे लोकांचे ताब्यांत देई आणि ते त्या बायांस होडीत घालून आगऱ्यास घेऊन जात. अबदुलनामी यास औरंगजेबानें सुभेदार नेमिलें होतें आणि त्याचा तर पण असा होता कीं मूर्तीपूजा हा शब्द ऐकूंच येऊं नये. या वेळेस गोकळ नांवाचे जाटानें या परिस्थितीस तोंड दिले. पण त्याचे बल तें किती? गोकळची तीन हजार माणसें कामास आली पण त्यांनीं मोंगलांचे चार हजारांची हजेरी घेतली. शेवटीं गोकळ पकडला गेला आणि भरदिवसां भर रस्त्यांत

त्याचा एकेक अवयव छेदला गेला. अशा तऱ्हेचा सतराव्या शतकांतला हिंदुस्थानाचा इतिहास रक्तानें व धर्मच्छलानें रंगलेला आहे.

तळकोकणांत पुंडावे होऊन प्रांत वैराण पडला. महाराष्ट्र धर्म ऐसें नव्हते. त्यावेळेस फिरंगी व हबशी हेंहीं प्रांतात धर्मउच्छेद करावयास आले होते. तेव्हां सरखेलसाहेबांचे पुण्यप्रतापें स्वरक्षणार्थ मातबर सरदार जमा होऊन शामलाची क्षिती केली. संक्राजी मोहिते, गोळे, खंडोजी माणकर, सद्राजीराव खराडे, कृष्णाजी मोड, हसनखान जमादार यांनीं सरखेलसाहेबांचे समागमें यद्धप्रसंग करून अंमलाची क्षिती केली आणि श्रमें पावून कोकणांत धर्म रक्षिला. **(आंडिवरेकर दीक्षित यांचे कागदपत्र, इ. स. १६९८)**

याच काळाचे आंतबाहेर भरतखंडातील अंत:स्थिती कशी होती हें खालील लेखांवरून लक्षांत येईल.

(अ) उदाजीराव पवारांनीं इ. स. १७२९चे जुलाईत माळव्यांतील मांडका येथील चौधऱ्यापासून त्याचें चौधरात देशमुखीचें निम्मे वतन व पांच हजार रुपयांस खरीद केलें होतें. या खरीदखतांत वतनदार लिहितो :

''आपला हाल अहवाल बसबब नादारी व शिकस्त अहवालीमुळें परागंदा व्हावे, यास्तव वतन मजकुर बमोजिब तपशीलजेल. तुम्हास विक्रीत निमेवर ताआवद रु.५००० पांच हजार तुम्हांजवळून घेऊन वतन निमे तुम्हांस विक्रीत करून दिले आहे.'' **(धार इतिहास २ पृ. ५६).**

(आ) छ माा अनाम देशमुख व देशपांडे प्रांत पुणें यासीं : बाळाजी पंडित प्रधान. सुाा तिसाअशर मया व अल्लफ. दिलें अभयपत्र. तुम्ही हुजूर येऊन विदीत केलें कीं, दुतर्फा दिवाणाचे कसालियाकरितां तमाम मुलूख खराब पडला. तो आबाद करावयाविषयीं आज्ञा केली व त्यास तुम्ही अर्ज केला कीं, पूर्वी मोगलांचे धामधुमीमुळें मुलूख पडला. अलीकडे थोरात, ढमढेरे, निंबाळकर व किरकोळ यांचे धामधुमीमुळें मुलुखाचा सत्यानाश जहाला. रयत देशांतरास गेली. मुलुखांत काठवण झालें. याउपरी साहेबी मोगलाचा तह केला, ते प्रसंगी प्रांत मजकूर घेतला. मुलुख महामूर करावयासी आज्ञा केली. तरी सातसाला लागले. ढैपस उगवणी असा कौल दिला. रयत देशांतरास गेली. तेथें कौल पाठवून रयत आणवून, महामुरीवर नजर देऊन सातसाला लागले ढैपस व इस्ताव कौल दिल्हा असे. तरी तुम्ही रयतेचा दिलदिलासा करून, मुलूख महामूर करणें आणि लागले ढैपस सातसाला तनखा उगवणें, बाबती देखील. जास्ती आकार लागणार नाही. अभय असे. जाणिजे छ १७ जिल्हेज. आज्ञा प्रमाण. लेखनसीमा (शिक्का) (श्रीशाहूनरपति हर्षनिधान. बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान) (पेशवे शकावली पृ.३६) अशी अभयपत्रें अनेकवेळां अनेक स्थळीं दिल्हीं गेली: त्यावरून तत्कालीन स्थिती अजमावतां येते व मराठ्यांनी पुनर्घटना कशी केली याचेही ज्ञान होते.

(इ) कर्नाटकांतील पत्र **(पेशवे दप्तर पृ. २८ ले. १६१)**

## श्रीराम

श्रीमंत महाराज राजश्री राऊसाहेब स्वामींचे सेवेसी :

आज्ञाधारक कासीराव अंभाजी देशपांडे सरकार सिरा. कृ.सा.न. विनवाया प्रार्थना ऐसीजे. प्रकृत विद्यमान धातुनाम संवत्सर माघ शु. ७ सौम्यवासरे वास्तव्य प्रांत मजकूर श्रीमंत पुण्यश्लोकियाचे कासव दृष्टीकडून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. सांप्रत प्रकृत मन्वंतरीं जैसे कांहीं पूर्वी युगांतरीं रामकृष्णादि अवतारचरित्र धर्मशास्त्र संस्थापनार्थ, तैसेच याही प्रकृत मन्वंतरी देवब्राह्मण संरक्षणार्थ अवतार प्रसिद्ध श्रीमंत नामना विश्वतोमुख कीर्तिविस्तार तेथें हाही देश कर्नाटक केवळ काटकजन म्लेंछादिकरून अतिप्रबळ, त्यामुळें देव, ब्राह्मण, साधु, सज्जन इत्यादि प्रजाक्षोभ सर्वज्ञ जेथें तेथें समस्तहि श्रुत असोन, अद्यापी पुराकृत विच्छेदन होत आहे. सेवेसी रा. अप्पाजी बाळाजी हे आपले आप्त आणि सेवकही पुरातन तीर्थरूप वडिलांचे स्थापित कारकर्दे श्रीमंताचे मनोगतांकित जाणून विनंतिपत्र देऊन पाठविलें आहे. कितेक इकडील प्रसंग स्वामी संनिध विज्ञापना करतील तेच सेवकाचे स्ववचन आहे.

सारांश, महाराष्ट्रांत श्रीसमर्थांनीं टाहो फोडला, माळव्यांतील जमीदारांनीं साह्यास बोलविलें, छत्रसालांनीं ''गजेंद्रकथेची'' आठवण दिली, कर्नाटकांतील सेवकांनीं मन्वंतर ओळखिलें, श्रीब्रम्हेंद्रस्वामींनीं सिद्धी यावर हबसाणांत व फिरंग्यांवर वसईत मोहीम घडवून आणिली. या सर्व बाबी एकसर्रहा डोळ्यांपुढें आणिल्या म्हणजे डॉ. फ्रेझर यांनीं श्री तुकाराम महाराजांचे चरित्राचे प्रस्तावनेंत लिहिलेला अभिप्राय मनास पटतो.

"With Akbar the Mogul system culmintes, and with him it disappears. His principles and visions vanish. His narrow-minded successor sweeps all away, and creating nothing to replace what he destroys, leaves chaos behind him after two generations of power. The reconstructing force comes from a quarter where no one looks for it - ''The Deccan''.

(Frazer — ''Life and Teaching of Tukaram''.)

याचा मथितार्थ येणेंप्रमाणें : ''मोगलांची राजनीति अकबराचे कारकीर्दीत शिखरास जाऊन पोहचली आणि त्याच्याच बरोबर विलयासही गेली. त्याची तत्त्वें आणि धोरण त्याच्याच बरोबर नष्टप्राय झालीं. आकुंचित दृष्टीचा त्याचा वंशज गादीवर आला. त्यानें सर्व उद्ध्वस्त केले आणि उद्ध्वस्त केले त्याचे जागी कांहीं नवीन उभारलेंही नाही. दोन पिढ्या त्यानें राज्यकारभार केला, पण आपले पश्चात् सर्वच गोंधळ होईल अशी घटना त्याचे हातून झाली. झालेल्या अवस्थेंतून व्यवस्था घडवून आणण्याचें कार्य, अगदीच अटकळ नसलेल्या दिशेकडून घडून आलें.'' ज्या दिशेकडून ही पुनर्घटना झाली ती दिशा दुसरी कोठचीही नसोन दक्षिण दिशा होय आणि याच स्वराज्यांतून श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे आणि त्यांचे अनुयायी यांनीं साम्राज्याची स्थापना केली. एवंच हे स्वराज्य आणि

साम्राज्य म्हणजेच डॉक्टर फ्रेझरसाहेबांचे मतें 'पुनर्घटना' होय आणि ही पुनर्घटना कशी घडवून आणिली हें सर जदुनाथ सरकार यांचे शब्दांत आम्हीं खाली देतो.

"The Maharathas have a historical advantage of unique importance in the India of today. Their near ancestors had faced death on a hundred battlefields, had led armies and debated in the chamber of displomacy, had managed the finances of kingdoms and grappled with the problems of Empire. They had helped to make Indian History."

मथितार्थ येणेंप्रमाणें : *''आजच्या हिंदुस्थानांत मराठ्यांनीं एक विशिष्ट असें ऐतिहासिक स्थान संपादिले आहे. त्यांच्या पूर्वजांनी शेंकडोशा रणभूमीवर प्राण अर्पिले आहेत, सैन्ये नाचविली आहेत, राज्यकारभारासंबंधीं वादविवाद केले आहेत; अनेक राज्यांची जमाबंदी त्यानीं जमविली आहे आणि साम्राज्याचे अनेक प्रश्न सोडविलें आहेत. सारांश, हिंदुस्थानचा व आजचा इतिहास घडविण्यांत त्यांचा हात बराच कारणीभूत झाला आहे.''*

सांगांवयाचे तें हेंच कीं मराठ्यांचा सतराव्या व अठराव्या शतकांचा इतिहास म्हणजे ''हिंदुस्थानच्या पुनर्घटनेचा इतिहास.'' आणि या पुनर्घटनेचे प्रत्यंतर म्हणजे (अ) लष्कर, (आ) जमाबंदी, (इ) राज्य व (ई) साम्राज्य, यांत त्यांनीं घडवून आणिलेले रूपांतर. इतके हें मान्य झाल्यावर ''होळकरशाहीचा इतिहास'' म्हणजे उपरीं निर्दिष्ट केलेल्या हिंदुस्थानच्या पुनर्घटनेंत होळकरांनीं केलेले कार्य. पण त्यातही एक विशेष आहे : स्वराज्यांत (महाराष्ट्रांत) स्वधर्म व भाषा एकाच नमुन्याची होती; आणि त्याबाहेरील प्रांतांतील संस्कृतीत, भाषेत व प्रदेशांत अंतर; त्यामुळें अडचणीही विशेष. अशा स्थितीत जे प्रयत्न होळकरांकडून झाले ते प्रकरणा प्रकरणांनीं, हातीं असलेल्या साधनांच्या द्वारें विशद करूं म्हणजे होळकरशाहीचा इतिहास जनतेचे नजरेस पडेल.



# होळकरशाहीचा इतिहास

## विजयकाळ

## सुभेदार मल्हाराव होळकर

## इ. स. १७१८ ते १७६६



**मनसुबियाचे कार्यास त्वरेस मोल आहे**

### प्रकरण ५ वें

---

# मल्हारराव होळकर यांचा जन्म व बाल्यावस्था दक्षिण हिंदुस्थानांतील परिस्थिती व इ. स. १७१८–१९ चे पेशव्यांचे उत्तरेंतील स्वारीबरोबर मल्हारजींचें प्रयाण

*स जातो येन जातेन याति वंश:समुन्नतिम् ।।*

अर्थ : ज्याचे पुरुषार्थानें वंश उन्नतीस जातो तोच जन्मला म्हणावयाचा.

**होळकर घराणें व त्यांच्या शाखा**

मल्हारराव होळकर यांचे हातून होळकरशाहीचा प्रारंभ झाला. यांचा जन्म इ. स. १६९३ सालीं ता. १६ माहे मार्च रोजीं झाला. याबद्दल पाहिलेल्या सर्व पूर्व लेखकांत एकवाक्यता आहे. हे होळास राहात म्हणून होळकर नांवानें प्रसिद्ध आहेत. तत्पूर्वी वीरकर नांवानें ओळखले जात. वीर हे खेडें सासवड तालुक्यांत, पुणें जिल्ह्यांत आहे. होळ हे गांव नीरा नदीचे कांठीं जेजूरीजवळ आहे. होळकरांचे कुलदैवत श्रीमल्हारी मार्तंड श्रीक्षेत्र जेजूरी येथें आहे. होळास आल्यानंतरच हे दैवत होळकरांनीं मानिलें असावे. वीर येथील दैवत म्हाळोबा नांवानें प्रसिद्ध आहे. होळकरांचे वंशवृक्ष अनेक ठिकाणांतून आलेले आहेत. त्यावरून यांचे वंशापैकीं अनेक शाखा दूरवर पसरलेल्या दिसतात. यांच्या वसाहती मथुरा, राजपूताना, खानदेश, नाशिक, अहमदनगर येथें स्थायिक होत होत आज राजघराणें इंदुरास नांदत आहे.

### कुलधर्म व कुलाचार पंचभैयांकडे सोपविले आहेत

होळकरांच्या वंशावळीत अनेक देव-देवतांचा उल्लेख केलेला दिसतो. ही सर्व दैवतें निरनिराळ्या ठिकाणीं 'होळकरांनीं' पूजिली असली तरी एकंदरीत हे स्मार्त आहेत. होळकरांचे सरकारी कागदांवर मोडीत श्रीशंकर असें लिहिण्याचा प्रघात आहे. राजघराण्यांत सर्व हिंदुधर्माचे उत्सव पाळले जातात. कैलासवासी श्रीमंत महाराजा तुकोजीराव द्वितीय यांनीं आपल्या यशस्वी दीर्घकालीन कारकीर्दीत राज्याची घडी जशी सुव्यवस्थित बसवून दिली तशीच आपल्या कुलधर्म व कुलाचार यांचीही व्यवस्था दूरदृष्टीने लावून दिली. आपल्या घराण्याच्या दूर-दूर पसरलेल्या शाखांतून व्यक्तिशः निवड करून पांच बंधूंस त्यांनीं इंदुरांत स्थापित केले. ही मंडळी पंचभैया होळकर या नांवानें ओळखिली जाते. जहागिरीचा उपभोग घेऊन त्यांनीं राजघराण्याचे सर्व कुलधर्म कुलाचार यथासांग पाळावे अशी व्यवस्था लावून ठेवली आहे.

### मल्हारजींचे वडील

मल्हारजींच्या वडिलांचे नांव खंडूजी. खंडोबा हे श्रीमल्हारी मार्तंडाचे दुसरें नांव होय. तेव्हां कुलदैवतेचें नांव यांस दिलें होतें हें स्पष्ट आहे. हे खंडूजी आपल्या गांवांत चौघुले होते, म्हणजे एका लहानशा अधिकारावर पाटलाचे दुय्यम होते. त्यांस खानदेशांतील तळोदे तालुक्यांतील सुलतानपूर येथील भोजराजजी बारगळ यांची बहीण जिवाई दिली होती. लहानपणींच वडील निवर्तल्यामुळें मल्हारजी मामाच्या घरीं राहण्यास आले. मामाच्या घरीं राहत असतां जो चमत्कार घडून आला तो होळकरांच्या कैफियतीत दिलेला आहे. या दंतकथेचा सारांश, आम्ही खालीं देतों.

### मल्हाररावजींचे बाळपणची एक दंतकथा

मामाच्या घरीं मेंढरें राखण्याचे काम मल्हारजींस सांगण्यांत आले. सकाळीं मेंढ्या घेऊन रानांत जावें, बरोबर शिदोरी असल्यास दोन प्रहरीं एखादे झाडाचे सावलीखाली ती खावी, आणि सायंकाळी मेंढ्यांसह घरी परत यावे असाच क्रम बहुश: असणार. मल्हारजी पुढें कर्तृत्ववान् निघाल्यावर त्यांचे संबधाने 'अजपाल' असा टोचून केलेला उल्लेख कांहीं पत्रांतून दिसतो, त्या उल्लेखावरून बाळपणाचा व्यवसाय निश्चित ठरतो. एके दिवशीं असा प्रकार घडला कीं, मल्हारजी दोन प्रहरीं एका वृक्षाखालीं झोपी गेले होते. त्यांची मातुश्री भाजीभाकर घेऊन येत होती, तो लांबून तिला असें दिसलें कीं एका नागानें आपली फडा मल्हारजींचे डोक्यावर उभारलेली आहे. तिची गाळण उडाली व ती तशीच गांवांत गेली. थोड्या वेळानें ती परतून येते आणि पाहते तों तो नाग तेथें दिसेना. मुलास कांहीं एक इजा झाली नाही, हे पाहून तिचे जिवांत जीव आला, हे सांगांवयास नकोच. ही गोष्ट मल्हराजींच्या वयाच्या कोणत्या वर्षी घडली हे सांगण्यास कांहीं आधार नाही. त्यांच्या आयुष्यातील यापुढील पायरीचे वर्णन 'संशोधक' या त्रैमासिकाच्या वर्ष १ अंक १ मध्यें आलेल्या तोरखेडेकर कदमबांडे यांचे कैफियतीवरून खालीं देतों.

**बांडे यांचे पदरीं**

''दिल्लीस पातशाही अंमल होता, त्याजपाशीं मोंगल नबाब निजामउलमुल्क यांनीं दक्षिण सुभ्याचे वजिरीचे खिल्लत घेऊन भागानगरास आले तेव्हां साताऱ्यास शाहुछत्रपती होते. राजे गंगातीरपर्यंत स्वारी करीत होते. नंतर श्रीमंत पेशवे यांनीं मुलखांचा बंदोबस्त करण्यास फौजा ठेविल्या. त्या फौजेचे आधिपत्य राव दाभाडे सेनापती तळेगांवकर यांजकडे झाले. त्यांनीं फौज ठेवून मोगलाई ठाणें उठवून शाहुराजाचे ठाणें बसवीत गेले. ते समयीं कदमराव बांडे वडगांवकर दक्षिणेसी भीमातीरकर यांचे घरची घोडीं होती. आणिक ठेवून रोजगारनिमित्य वडगांवाहून बाहेर निघाले. स्वार २०० याप्रमाणें चाकरी करूं लागले आणि पेंढार पण खानदेशप्रांतीं परभारे पाठवून मुलूख उजाड केला. तेव्हां मोगलाईत खबर गेली. त्यांनीं येविसींचे मनांत आणून कदमराव बांडे यांसी मोकासा परगणे, नंदूरबार महाल निम्मे व परगणे सुलतानपूर महाल दरोबस्त नेमून दिला. त्या उपर मुलखांत वस्ती होऊन आबादी झाली. नंतर राजांचे फौजेचा जोर पडला. तमाम मुलखांतील मोगलाईत ठाणें उठवून गनीमी ठाणें बसवीत चालले. त्यानंतर तापीकाठ, विंध्याद्री पर्वत, सातपुडा डोंगर पूर्व-पश्चिम आहेत तेथें राऊळाचा व भिल्लाचा उपद्रव बहुत झाला. गांववस्तीत न होय. त्यांत तोरखेडेजागा राऊळाची. राऊळ मवासा करून वाटा पाडोन तोरखेड्याचे हणमंतापुढें माणसाचा शिरच्छेद करीत होता. राऊळ माजला असा उपद्रव खानदेशप्रांतीं झाला. त्याजकरितां निजामउलमुल्क यांनीं कदमरावांस आज्ञा केली. मवास, राऊळ, कोळी, भिल्ल आहे त्यांचे पारिपत्य करावें, म्हणजे तुम्हांस सरकारांतून गांव इनायत होईल. ऐसियावरून कदम यांनीं स्वारी तापी उत्तरतीरास केली. झाडी तोडून काढली, राऊळाच्या व भिल्लाच्या चोरवाटा ठिकाण लावून भिल्ल मारिले. व राऊळ तोरखेड्यातचे गढीत होता, त्याच्या मुलामाणसांसुद्धा कट केला व कांहींएक पळून गेले व मारून काढिलें; कित्येक शरण आले त्यांस जीवदान देऊन वस्तीस ठेविलें. तमाम डोंगरकाठचे भिल्ल, कोळी यांसी त्रास पडला. हात जोडून शरण आले तेव्हां गांववस्तीस आले. ते समयीं फौज तीन हजार ३००० कदमराव यांजपासी होती. निजामउलमुल्क यांचे इनायत नामे इनामी वतन राऊळांचे तोरखेडे कदम यांस दिले. यापुढें गुजराथ प्रांतीं मवास बहुत झाला. अंमल चालत नाही ऐसी मसलत पडली. तेव्हां त्या प्रांतींची मोहीम करावी ऐसी आज्ञा झाली. त्याजवरून फौज ठेऊं लागले. ते समयीं मल्हारराव होळकर चाकरीस आले. ते बहुमाने करून चाकरीस ठेविले व आणिकही सरदार बारगळ तळोदेकर चाकरीस ठेऊन फौजेचा जमाव वीस हजार २०,००० धरून स्वारी गुजराथ प्रांतीं केली. तमाम मवास भिल्ल कोळी मारीत मारीत नर्मदा, रेवा उतरून उत्तर तीरास आले. तिकडे आमदाबाद तहत द्वारकापर्यंत मुलखांत कोळी व गिरासे व मही काठांचे मवासी यानें गुजराथ प्रांत उद्ध्वस्त केला. जागा बिलंद, खोचर झाडवन बहुत झालें. अडचणीची जागा, मनुष्याचा रिघाव न होय ऐसे दुर्घट; तेथें झाडी तोडून लढाई घेत गेले आणि मवासांचे पारिपत्य करून ठाणें बसवीत चालले. तंव गुजराथ प्रांतांत धाक पडला. मवासा तुटला ऊपरचा पानेर किल्ला पाहडी पावागड येथें लढाई मातब्बर करून किल्ला

घेतला. शहर वडनगर द्वारकेजवळ आहे. तेथें ब्राह्मणांची अग्निहोत्रे होती ती विच्छिन्न झाली होती; ती घरोघर चालती केली. गुजराथ प्रांत सर झाला. गांवें रयती लोकांस व सावकारांस आनंदाचा दिवस उगवला. त्या प्रांतींचा बंदोबस्त करून कदमराव बांडे देशी आले. ते समयीं मल्हारराव होळकर स्वारीसमागमें होते. लढाई प्रसंग मोठा होता. पागा सरंजाम झाला. निशाण बांडेशाही लाविलें. मग श्रीमंतांकडे गेले. श्रीमंतांनीं सन्माने करून ठेविले. तेथून दौलत बडेजाव वाढतां बहुत वाढला. ते बांडेशाही निशाण अद्याप चालवीत आहे.''
वरील उतारा संपूर्ण दिला आहे, त्याजवरून :

(अ) मल्हारजींच्या आयुष्यक्रमांतील पहिली शाळा बांडे यांचे हाताखालीं सुरूं झालीं.

(आ) होळकरांच्या निशाणाचा उगम.

(इ) तत्कालीन गुजराथ व खानदेश इकडील समाजस्थितीचे चित्र, यांचें यथार्थ दर्शन आपल्यास घडेल.

**महाराष्ट्राची तत्कालीन स्थिती**

**दक्षिणेंतील मुत्सद्देगिरी**

यावेळीं महाराष्ट्राकडे नजर फेकूं या. छत्रपती श्री संभाजी महाराजांचे निधनानें स्वराज्याचा पाया ढासळूं लागला होता व त्यांच्या वधानें ही सर्व इमारत कोसळून पडते कीं काय असे वरवर पहाणाऱ्यास भासूं लागले होते. सुदैवाने श्रीसमर्थ स्वामीमहाराज व छत्रपती शिवाजीमहाराज यांचे तालमीत वाढलेले रामचंद्रपंत अमात्य बावडेकर हे ऐनवेळीं पुढें आले आणि इ. स. १६८९ इ. ते इ. स. १७०७ इ. पर्यंतच्या मोगलांशीं झालेल्या झटापटींत मराठेशाहीचा पाया यांनीं मजबूत करून दिला. छत्रपतींनीं ज्याप्रमाणें (१) मावळ्यांस पुढें आणिलें त्याप्रमाणें अमात्यांनीं (२) धनगर मंडळीस पुढें आणिलें व (३) हेटकरी, भंडारी यांस आणिलें. हे जे अठरा वर्षांचे युद्ध चालू होते ते दिल्लीपासून दक्षिणेत जिंजीपर्यंतचे क्षेत्र व्यापून होते. सर्व प्रांतांत लहानथोरांच्या डोळ्यांपुढें हे कार्य चालले होते. थोडा हुरूप व कर्तबगारी अंगीं असली कीं या क्षेत्रात प्रवेश मिळे. लहानथोर एकमेकांस सांभाळून घेत. सारांश, एकंदरींत एकी व कर्तबगारी, यांची एकच लाट महाराष्ट्रांत उसळली होती. अशा या वृत्तीच्या वातावरणांत मल्हारजी होळकरांचा जन्म झाला होता व त्यांच्या बाल्यावस्थेत हाच प्रकार सगळीकडे आजूबाजूस दिसत होता. उत्साह, उल्हास व उद्योग, हे सगळीकडे आजूबाजूस नांदत होते. इसवी इ. स. १७०८ त शाहू महाराज मोगलांचे कैदेतून सुटून दक्षिणेत आले. ताराबाई (कै. राजाराम महाराजांच्या पत्नी) आपल्या मुलासह साताऱ्यास राज्यकारभार चालवीत होत्या. शाहू महाराज खालीं येतांच मराठे सरदार व मुत्सदी यांत दोन पक्ष झाले. तरी पण रामचंद्रपंत अमात्य व बाळाजी विश्वनाथ भट या दोघांच्या चतुरस्त्रतेने पक्षभेद विकोपास न जातां इ. स. १७१४ इ. त सातारा व कोल्हापूर अशा दोन गाद्या प्रस्थापित झाल्या.

### इ. स. १७१४ चे पूर्वी व पश्चात

या काळांतही मराठ्यांच्या तुटक तुटक टोळ्या नर्मदेपार जाऊन तेथें पराक्रम दाखवीत असत. पण हे प्रसंग तुटक, व्यक्तिनिष्ठ व अल्पकालजीवी असत. इ. स. १७१४ नंतर दिल्लीचा बादशाहा दुर्बल, आणि त्याच्याभोंवतीं दोन तट. असा प्रकार घडून मराठ्यांचे साहाय्य प्रत्येक पक्ष मागूं लागला. आपलें घर स्थिरस्थावर व मजबूत करून बाळाजी विश्वनाथांनीं उत्तरेत मोर्चा फिरवला. ती हकीगत येणेंप्रमाणें :

### स. १७१८ चा तह :
### छत्रपती व मोगल सुभेदार यांमध्यें

बादशहानें इ. स. १७१५ त हुसेनअल्ली सैय्यदास दक्षिणचा सुभेदार नेमलें. असें असूनही बादशहानें हुसेनाविरुद्ध बोलावल्यानें दाभाडे, निंबाळकर यांनीं खानदेश, गुजराथेंत स्वाऱ्या केल्या. तेव्हां हुसेनअलीनें मराठ्यांशीं साताऱ्यास इ. स. १७१८ त तह केला. या तहानें (अ) शिवाजीचे स्वराज्य व आतापर्यंत मोगलांनी जिंकलेला सर्व मुलूख मराठ्यांना परत मिळाला.

### दिल्लीवर स्वारी व तीपासून फायदे

(आ) चौथाई सरदेशमुखी सर्व दक्षिणेंत वसूल करण्यात मोकळीक झाली. या तहानें मराठ्यांच्या चढत्या उल्हासास नवीन कार्यक्षेत्र मिळालें. पुढें सैय्यदाचा व बादशहाचा तंटा विकोपास जाऊन सैय्यदानें मराठ्यांची मदत मागितली. बाळाजी विश्वनाथांनीं उपरोक्त साताऱ्याचा तह पुरा करून घेण्याचे करारावर दिल्लीस प्रयाण केलें. (इ. स. १७१८ नोव्हेंबर). तेव्हां बादशहा घाबरला, आणि मराठे व हुसेन माळव्यांत असताना त्यानें मराठ्यांच्या मागण्या कबूल केल्या. परंतु तहात ठरल्याप्रमाणें शाहू महाराजांची बायकामाणसें परत मिळाल्याशिवाय मराठे मागे जाईनात. तेव्हां हुसेन व मराठे दिल्लीस गेले. (फेब्रुवारी इ. स. १७१९). पेशव्यांच्या साहाय्यानें सैय्यदबंधूंनीं बादशहा फरुखसेयरास पदच्युत करून रफीउदीराजद याजला तक्तावर बसविलें. त्यानंतर शाहूची मातुश्री व बायकामुलें यांना पेशव्यांच्या हवाली केलें. तसेच ठरल्याप्रमाणें चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्य यांच्या सनदाही बादशाही शिक्कामोर्तबासह पेशव्यांच्या हवाली झाल्या. (ता. २०.३.१७१९). यावेळीं दक्षिणेतील सहा सुभ्यांचे उत्पन्न सालिना अठरा कोट होते. याचें शेकडा पस्तीस मराठ्यांस या सनदेने मिळावयाचे. सैय्यदापासोन रोज ५०,००० पन्नास हजार रुपये खर्चास मिळत. त्यापैकीं निम्मे शिल्लक टाकून पेशव्यांनीं ती सर्व शिल्लक सरकारच्या खजिन्यांत टाकिली व फौजेच्या देण्याचा बोभाटाही राहूं दिला नाहीं. दिल्लीच्या या पहिल्या स्वारीनें मराठ्यांस आर्थिक फायदा तर झालाच, पण त्याहूनही अधिक फायदा झाला तो हा कीं मोगल साम्राज्याचे अंतर्बाह्य स्वरूप त्यांस यथार्थ कळलें.

या मोहिमेत बाजीरावसाहेब पेशवे व मल्हारजी होळकर अधिकारपरत्वें होते.

मिळालेल्या अनुभवावरून व अवलोकनानें दोघांनींही आपआपलेपरी फायदा करून घेतला हें पुढें दिसून येईल.

**छत्रपतींनी करून दिलेली कार्यक्षेत्राची वाटणी**

सैय्यदबंधू कांहीं कालपर्यंत 'राज्यकर्ते होते. पण पुढें ते घसरले. त्यांचा पाडाव झाल्यावर इ. स. १७२१ त बाजीरावसाहेबांनीं बादशाह महम्मदशहाकडून या सनदा पुनःश्च कायम करून घेतल्या. यावर खानदेश व बागलाण पेशव्यांकडे; गुजराथ दाभाड्यांकडे, नागपूर, बंगाल, बिहार भोसल्यांकडे; याप्रमाणें चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचें काम छत्रपतींनीं वाटून दिलें.

**मल्हाररावांची प्रथम शाळा**

या इ. स. १७१७-१९ च्या दिल्लीत स्वारीत खानदेश, माळवा या प्रांतांतून बाळाजी विश्वनाथ पेशवे लष्कर जमवीत गेले. खानदेशांतून ही स्वारी जात असतां कदमबांडे यांच्या तुकडीत जे बारगीर व शिलेदार होते त्यातच मल्हारराव होळकर समाविष्ट होऊन गेले होते. सारांश, इ. स. १७१८ चे सुमारास जे मराठी लष्कर दिल्लीस गेलें त्यात खंडेराव दाभाडे, संताजी भोसले अशी प्रस्थें होती व मल्हारराव होळकरही होते. ही मंडळी दिल्लीस येऊं नये म्हणून बादशहाने सामदामादि प्रकार योजिले; पण मराठे सरसावले. यावेळीं एकंदर जमाव तीस हजार ३०,००० होता. ता. २८ फेब्रुवारी इ. स. १७१९ रोजीं बादशहाच्या वाड्यास मराठ्यांनीं घेरा दिला व ता. २० मार्च रोजीं बाळाजी तिन्ही सनदा घेऊन दिल्लीहून निघाले. प्रवासानें आजूबाजूची स्थिती त्यांचे लक्षांत आली असणार. मल्हररावांच्या दरबारी व लष्करी अशा दोन्ही शाळा येथून सुरू झाल्या आणि या दोन्ही शाळांतून त्यांत जे व्यावहारिक शिक्षण मिळालें ते आपल्या आंगच्या उपजत बुद्धीने त्यांनीं वाढविलें. होळकरशाहीची स्थापना केली व मराठी स्वराज्याचे साम्राज्यात रूपांतर करण्यांत मदत केली. याच गोष्टी होळकरशाहीच्या इतिहासांत नमूद करावयाच्या आहेत. त्या आतां यथावकाश नमूद करूं.



**प्रकरण ६ वें**

# मल्हारजींचा नोकरींत प्रवेश

**दिल्लीचे स्वारीतील एक प्रसंग**

शाहू महाराजांचे अनुज्ञेनें बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीस गेले हें मागच्या प्रकरणांत सांगितले आहेच. त्यांजबरोबर त्यांचे चिरंजीव पाहिले बाजीरावसाहेब हेही होते. प्रांतांतून जेव्हां यांच्या स्वाऱ्या जात तेव्हां शिपाईगडी त्यांस येऊन मिळत. मल्हारजी या सैन्याबरोबर गेले. ''चाकरीत तैनात कांहींयेक नाही.'' हुकूम पेशवे यांचा. दिल्लीचे आसपास पोंहचल्यावर एक्या महालाचे खंडणीचा जाब ठरला. तेथें शेतें बिघडूं नये असा करार. मल्हारजी होळकर यांनीं आपल्या स्वारानिशीं शेत कापून आणून घोड्यांपुढें टाकिले. याचा बोभाट पेशवे यांजपर्यंत गेला. एका बारगिरावर बाजीराव यांनीं काठी टाकिली. तो मल्हारजी होळकर राहुटीचे तोंडीं चऱ्हाट वळीत बसले होते. तेथून शिव्या देवून मातीचे ढेंकूळ बाजीरावसाहेब यांस मारिलें. ''आम्हांस काय रोजमुरे देऊन भागलास म्हणून काठ्या मारतोस, असें म्हटले. दुसरें दिवशीं बाळाजींनीं मल्हारजींस लुटून घ्यावे असा विचार केला. मल्हारजींस हे कळतांच त्यांनीं आपले बारगिरांस बोलावून कट केला. घोडीं होती ती लष्करांत सोडून दिली. खोगिरे राहुट्या वगैरे जाळून, अंगास राख लावून, ढाल, तलवारीनिशीं, मागे टेकडी होती त्या टेकडीवर जाऊन बसले. पांढरे सरदार यांच्या मध्यस्थीनें पेशव्यांनीं, जे जे अंगास राख लावून बसले होते तितक्यांस वस्त्रें देऊन घोडीं ज्या ज्या गोटांत गेली होती, तेथून जमा करून मल्हारजींचे स्वाधीन केली. (**होळकरांची कैफियत** पृष्ठ ३).

हा संबंध उतारा पाहिला म्हणजे मल्हारजींचा स्वभाव प्रारंभी कसा होता हे स्पष्ट दिसते. दरबारी उजाळा त्याजवर मुळींच नसोन मूळचा देहसंस्कार जशाचा तशाच त्यांत उमटलेला दिसतो. खोल पाहणाऱ्यास त्यांतील अंतरंग स्पष्ट दिसून आलें. गुणग्राही यजमानानें ती वृत्ती ताडली आणि त्यांच्या गुणांचें चीज केलें.

**बडवाणीत नोकरी**

उत्तर हिंदुस्थानांत इ. स. १७१८-१९ इ. च्या सुमारास बाळाजी विश्वनाथांबरोबर दिल्लीपर्यंत मल्हारजी गेले होते, हे वर आलेच आहे. साहजिक उत्तर हिंदुस्थानांतील स्थिती त्यांनीं डोळ्यांनीं पाहिली व कानांनीं ऐकिली. स्वारींतून जातां येतानांच्या प्रवासांत पेशव्यांचे, सरदारांचे व इतर सेनानायकांचे, भविष्यकाळांतील बेतांसंबंधीच वाटाघाट चालली असणार. पुढें उत्तर हिंदुस्थानांतच नशीब काढण्यास अनुकूल काळ आहे, असें जाणून मल्हराजींसारख्या धोरणी माणसांनीं उत्तरेकडे डोळे लावले असणार. बडवाणी संस्थानच्या नोकरींत ते होते असे कैफियतकार व पेशवे दप्तरांतील उताऱ्यांवरून दिसतें. यांस सबळ पुरावा इकडील दप्तरांत आहे. तो येणेंप्रमाणें -

**नोकरीनिमित्त मिळालेली जहागीर व तिचे रूपांतर**

''बडवाणी आणि होळकर यांचा सेव्यसेवक संबंध आतां अज्जीबात उलटला आहे.'' बडवाणीच्या राण्यानें त्या वेळचा संबंध विचारांत घेऊन मल्हारजींस वंशपरंपरा नेमणूक करून दिली होती. ती सध्याच्या स्थितींत तशीच चालू ठेवणें अनेक दृष्ट्या इष्ट न वाटून तिचे रूपांतर इ. स. १९०८ सालीं येणेंप्रमाणें झाले, दतवाडा हा गांव होळकरांस बडवाणीवाल्यांकडून जहागीर होता. त्याची किंमत ५०,००० पन्नास हजार रूपये इंग्रज सरकारच्या मार्फत ठरून, तो गांव बडवाणीकडे माघार गेला. **(फॉरिन ऑ. फाईल नंबर ३५९८.७४;१६)**

या सर्व गोष्टींवरून मल्हारजी बडवाणीकराकडे नोकरीस होते हें स्पष्ट दिसते. बडवाणीस पेशव्यांनीं वेढा दिला असतां मल्हारजींमुळे लढाईचा शेवट लौकर होईना. तेव्हां दोनही पक्षांनी मल्हारजींवरच वकिलातीचे काम सोपविले. मल्हारजींनीं पेशव्यांचे वर्चस्व राखून दोन्ही पक्षास मान्य होईल असा तह घडवून आणला. या युद्धानें मल्हारजींची कर्तबगारी पेशव्यांचे नजरेस भरली आणि पेशव्यांनीं बहुमानानें त्यांस आपलेकडेस वळविले. यापुढें ते पेशव्यांचे दिंमतींत राहून सुभेदारीपर्यंत वाढले, हें पुढील इतिहासावरून स्पष्ट होईलच. सारांश, चमत्काराशिवाय नमस्कार नाही हेंच खरें, बडवाणीचे प्रसंगानें म्हणजे विरोधी भक्तीनें त्याचें खरें तेज बाहेर आलें व त्यांचे नशीब उघडलें. कदमबांडे यांची कैफियत व ही हकीगत यांचा काळ आजमितीस उपलब्ध नाहीं. प्रथम स्वरूपांचे दिग्दर्शन म्हणून त्यांचा उपयोग करावयाचा.

**इ. स. १७१९ चे सनदेच्या स्वरूपांचे विवेचन**

बाळाजी विश्वनाथ दिल्लीस जाऊन आपला शह बादशहावर त्यांनीं बसविला व जी सनद त्यांनीं इ. स. १७१९ चे फेब्रुवारी, मार्चमध्यें संपादिली. तींत खालीत गोष्टी प्रामुख्यानें येतात.

**एका दगडानें दोन पक्षी मारले.**

''दक्षिणचे सुभ्याची सर्व काळ कुमक राखून, लिहिलें जाईल तेव्हां फौज कुमकेस पाठवीत जावी. तळघाट, कोंकण व वरघाट, बालघाट, दुतर्फा देखील बंदोबस्त किल्ले आणि सरदेशमुखी वतनी अंमल शिवाजींनीं बसविला त्याप्रमाणें सहा सुभ्यांत चालावें. स्वराज्यांत पूर्वी शिवाजींनी अंमल बसविला त्याचे फरमान करून दिलें. तोफा मोगलाईत येतील त्याची चौथाई घ्यावी. स्वराज्य अमलाबद्दल फरमान कान्होजी भोसले यांनीं गोंडवण व वऱ्हाड व कटक, अंमल बसविला त्याप्रमाणें चालावा. बल्लोलखान यांसी ताकीद, कर्नाटक सुभा फत्तेसिंग भोसले यांना देणें. येणेंप्रमाणें कागदपत्र घेऊन प्रधान व सेनापती व साहेब सुभा निघून येतांना जयपूर, जोधपूर, उदेपूर यांची कामे करून महाराजांशीं तहाप्रमाणें चालावयाचे कबूल करविलें. **(पेशवे शकावली पृ. ३४)**. हा तह सबंध उतरला आहे. त्यांतील कांहीं बाबी स्पष्ट करणें जरूर आहे. सहा सुभे म्हटले, हें समजण्यासाठीं औरंगजेबाच्या कारकीर्दीकडे वळलें पाहिजे. त्यांनीं आपल्या राज्याचे एकंदर वीस सुभे केले होते ते येणेंप्रमाणें :

**वीस सुभे**

१. काबूल, २. काश्मीर, ३. लाहोर, ४. मुलतान, ५. दिल्ली, ६. आग्रा, ७. अयोध्या, ८. अलाहाबाद, ९. बहार, १०. बंगाल, ११. ओरिसा, १२. अजमीर, १३. माळवा, १४. गुजरात, १५. खानदेश, १६. वऱ्हाड, १७. अहमदनगर, १८. बेदर, १९. हैदराबाद, २०. विजापूर. यापैकीं खानदेशापासून पुढील सुभे हे तहांत नमूद केलेले सहा सुभे होत.

**चौथाई, सरदेशमुखी, मोकासा म्हणजे काय?**

तहांत सरदेशमुखी वगैरे शब्द आले आहेत त्यांचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें: सरदेशमुखी म्हणजे कोठें शेकडा १० रूपये व कोठें १२।। रुपये, अशी वहिवाट आहे ती राजाचे वतन. बाकी राहिलेलें बेरजेपैकीं चौथाई बाबतीत राजाचा हक्क. बाकी तीन हिस्से राहिले त्यांस मोकासा असें नांव ठेविलें होते.

**राजपुतान्यांत घडलेली विचारक्रांती**

तसेंच वरील उल्लेखांत जयपूर, जोधपूर, उदेपूर यांची कामें करून महाराजांशीं तहाप्रमाणें चालावयाचें कबूल करविलें असें आलें आहे. त्याचें विवरण केले पाहिजे. औरंगजेबाच्या कारकीर्दीत रजपूत राजे, इतर हिंदूप्रमाणेंच बादशाही अंमलास कंटाळले होते.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर जयपूरच्या सवाई जयसिंगांवर मोठाच प्रसंग गुदरला. त्यांचें संस्थान खालसा करण्यापर्यंत बादशाहीची मजल गेली. जयसिंग या प्रसंगांतून जय घेऊन बाहेर पडला. मात्र यापुढें त्याच्यानें स्वस्थ बसवेना, त्याने जोधपूर व उदेपूर या दोन पुरातन घराण्यांशी संगनमत करून मोगलांशीं इत:पर संबंध ठेवावयाचा नाहीं असे ठरविलें होतें. हा त्यांचा ठराव इ. स. १७०९-१० चे सुमारास घडला असावा. बाळाजी विश्वनाथांनीं दिल्लीहून परततांना या संस्थानिकांची भेट घेण्यांत मुत्सद्दीपणाच दाखविला. एकंदर या स्वारीचा विचार करितां बाळाजीपंतांनीं (१) पूर्वींचें स्वराज्य सनदशीर रीतीने कायम करून घेतलें. (२) दक्षिणेतील सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखी संपादिली. (३) बादशाहीशीं स्नेहभाव जोडला; व (४) रजपुतांशीं मैत्री जोडली, म्हणजे पर्यायानें मोगलाई सत्ता कमजोर केली. (५) आणि सर्वांत विचार करण्यासारखी गोष्ट म्हणजे आर्थिक लाभ संपादून हुजूर तिजोरी भरून तर काढलीच, पण पुढील गंगाजळीचीही तरतूद करून ठेविली. स्वराज्याचा पाया मजबूत करून साम्राज्याच्या उभारणीची तैयारी करून दिली. (यातील पहिल्या चार कलमांवर पुढील मराठेशाहीचा राजकीय इतिहास उभारलेला आहे.)

**इ. स. १७१९-२० मध्ये मराठ्यांनी काय संपादिलें?**

बाळाजी विश्वनाथांनी इतकी कामगिरी केली. यजमानांची माणसें दिल्लीहून आणून त्यांच्या भेटी करून दिल्या आणि लौकिक मिळवून लौकरच पुढें ता. २ एप्रिल १७२० रोजीं बाळाजी विश्वनाथ मृत्यु पावले. **(पेशवे शकावली पृ. ३७)**

तदनंतर त्याच सालीं म्हणजे इ. स. १७२० त मे महिन्याचे सुमारास मराठ्यांचा प्रवेश माळव्यांत होऊन नंदलाल मंडलोईशीं पत्रव्यवहार सुरू झाला. त्या संबंध वर्षात मल्हारजींची जी चार पत्रें मंडलोईस गेली आहेत. (होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें पत्र नं. २, ३, ४, ५). यावरून मल्हारजींचा जम चांगलाच बसलेला दिसतो. बडवाईचा राणा नमला असावा व मंडलोई चांगलाच अंकित झालेला दिसतो. नारोशंकर स्थिर झालेले दिसतात, तर दासोजी वाघ मल्हारजींचे सहकारी म्हणून वावरतात. मल्हारजींचा स्वत:चा शिक्का अजून तयार नसून, बारगळांच्या शिक्क्यावर ते काम भागवितात. अस्तु.

इ. स. १७२० त मल्हारजीं माळव्यांत आले आणि ते आपला जम बसवित चालले इतकें आतां स्पष्ट झाले. पुढची प्रगती पुढें बघूं या.



**प्रकरण ७ वें**

---

# माळव्यांत प्रवेश–माळव्याचें प्रभुत्व

## इ. स. १७२१–१७३२

*''उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि''*

**अर्थ** : उद्योगाचे घरी ऋषि सिद्धि पाणी भरी.

### वडिलांचे नजरेखाली बाजीरावाचें शिक्षण

बाळाजींच्या मृत्यूनंतर थोडी वाटाघाट होऊन त्यांचे चिरंजीव बाजीरावसाहेब यांस ता. १६ एप्रिल इ. स. १७२० रोजीं पेशवेपदाचीं वस्त्रें मिळालीं. लहानपणापासूनच वडिलांबरोबर त्यांचा दरबारांत प्रवेश झाला होता आणि लढायांवरही ते जात. इ. स. १७१६ व १७१७ त दमाजी थोरातावर ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांत बाजीराव होते. इ. स. १७१८ त वडिलांबरोबर ते दिल्लीपर्यंत गेले होते. ज्या ज्या प्रांतांतून ते गेले होते त्या त्या प्रांतांतील लोकांची हलाखी त्यांनीं पाहिली होती व ऐकिली होती; आणि दिल्लीस पोहचल्यावर तेथील यजमान व दरबार यांमधील फाटाफूट रोज त्यांच्या नजरेस पडत होती.

### बाजीरावांचें ध्येय

### सरदार व सरकार यांचे विचार

अंगांवर प्रधानकीची वस्त्रें पडतांच, पाहिलेल्या सर्व गोष्टींचा मनांत विचार करून त्यांनीं आपले विचार भर दरबारांत यजमानांपुढें मांडिले. छत्रपती शिवाजी महाराजांचे वेळची कर्तृत्ववान माणसें बहुतेक दिवंगत झाली होती. या कर्तृत्ववानांचे पुत्र व प्रप्रौत्र बहुतेक

सुखांत वाढलेले. मिळालेल्या जहागिरी उपभोगून स्वस्थपणे रहावें अशीच त्यांची साधारणपणें मनाची ठेवण. शाहू महाराजही दिल्लीच्या वातावरणांत व ऐषआरामांत वाढलेले असल्यामुळें स्वारी शिकारीची मेहनत व दगदग याची त्यास फारशी आवड नव्हती. अशा प्रतिकूल स्थितीतही बाजीरावसाहेबांनीं भर दरबारांत आपला विचार प्रगट केला. ''महाराज, आपण ज्या सिंहासनावर आरूढला आहांत त्या सिंहासनाकडे बघा. स्वधर्म व स्वराज्य यांच्या पायावर हे सिंहासन उभारलेलें आहे. थोरल्या महाराजांची मनीषा सर्व भरतखंडावर हिंदूपद पादशाही करण्याची तशीच अपूर्ण राहिलेली आहे. ती पूर्ण करणें आपणा सर्वांचें कर्तव्य आहे. काळही कार्यास अनुकूल आहे. मोगल सत्तेचा वृक्ष जीर्ण झालेला आहे. मुळावरच घाव घातला तर फांद्या आपोआपच पडतील.'' अशा अर्थाच्या वक्तृत्वपूर्ण व ओजस्वी भाषणानें महाराजांचे मन वळले. ''दिल्लीवरच काय, पण हिमालयावर देखील तुम्ही भगवा झेंडा फडकवाल'' असें शाहू महाराज ते वेळीं उद्गारले.

**च्याथ्याम व बाजीरावसाहेब यांचें साम्य**

इंग्लंडच्या इतिहासांत इ. स. १७५६, ५७ चे सुमारास अशाच प्रकारचा एक प्रसंग उद्‌भवला होता. तिकडील अमीर उमराव पलंगांवर लोळत होते. इंग्लंडचा चार खंडात कोंडमारा झाला होता आणि या दुःस्थितीतून बाहेर पडण्याचा मार्ग कोणासच सुचेना. अशा स्थितीत थोरले विल्यम पिट (पुढें झालेले लार्ड च्याथ्याम) यांनी पार्लमेंटमध्यें जे वक्तृत्वपूर्ण व ओजस्वी भाषण केलें ते सर्व विश्रुत आहे. दोघांची वृत्ती तीच, कृतीही तीच, पण भाषेची शैली भिन्न. तुलनेसाठीं येथें नमूद केलें आहे येवढेंच.

**हिंदुस्थानचे सुभे**

याप्रमाणें नवे चैतन्य उत्पन्न करून बाजीरावसाहेब आपलें कार्यास्तव उत्तराभिमुख झाले. खानदेश, बागलान, माळवा, राजपुताना, बुंदेलखंड, अंतरवेद, पंजाब व पूर्वेकडे बंगाल, बहार व ओरिसा हे प्रांत त्यांच्या डोळ्यांसमोर होते. सम्राट अकबराच्या कारकीर्दीत व त्यानंतरही हे प्रांत निरनिराळ्या सुभ्यांच्या अंमलाखाली असत. सारांश, अकबराच्या उत्कर्षाच्या काळीं हे सुभे सोळा होते. पुढें ही संख्या विसावर गेली. त्यांची नांवें मागें आली आहेतच.

**दिल्ली दरबारची हलाखी**
**निजामाची चलाखी**

इ. स. १७२० चे सुमारास दिल्लीचा पातशहा निर्माल्यवत झाला होता. सुभेदार आपआपलें ठायीं स्थिर होऊन सुभायत वंशपरंपरेची करूं पाहत होते. दिल्लीचा बादशहा महंमदशाहा हा व्यसनी असून शरीरानें व मनानें दुबळा झाला होता. त्याच्यावर सैयदबंधू आणि निजामउल्मुल्क हे एकमेकांचे प्रतिस्पर्धी आपआपले डाव टाकीत होते. निजाम हा औरंगजेबाचे तालमीत वाढलेला होता. मार्गातून निजामांचा हा कांटा काढून टाकण्यासाठीं

सैयद बंधूंनी बादशहाकडून त्याला माळव्याच्या सुभेदारीवर इ. स. १७२० त पाठविलें आणि दुसरीकडून त्यांनीं अशी खटपट चालविलीं कीं औरंगाबादेस अधिकारावर असलेला दिलावरखान आणि आपला नातलग अल्लमअलीखान या दोघांनी निजामाविरूद्ध युद्ध पुकारावें. पण दिलावरखान आणि अल्लमअलीखान यांची एकत्र गांठ पडण्यापूर्वीच बऱ्हाणपूर येथें इ. स. १७२० च्या जूनमध्यें दिलावरखान लढाईत मारला गेला. एका महिन्यानंतर बालापूर येथील लढाईत अल्लमअलीखानाची हीच गत झाली. मराठ्यांचे यापुढील धोरण वस्तुस्थितीप्रमाणें बदलत गेले. केव्हां निजामाशी सख्य तर केव्हां शत्रुत्व, असा हा प्रकार पुढें दिसेलच.

**मराठ्यांचा माळव्यांत प्रवेश : इ. स. १७२१**

**इ. स. १७२१ ते १७३२ : प्रवेश व प्रभुत्व**

माळवा प्रांत हा अकबराच्या वेळेपासून मोंगल सुभा होता. मोंगल आपलें सैन्य दिल्लीहून दक्षिणेत ज्या मार्गानें नेत असत तो मार्ग माळव्यांमधून असल्यामुळें माळव्याला लष्करी दृष्टीनें महत्त्व आले होते. नद्यांचे घाट बंदोबस्तानें राखिले होते. तसेंच खुष्कीचेही मार्ग टप्प्याटप्प्यानें मुक्रर झाले होते. गुजरात व खानदेश हे प्रांत मराठ्यांस पूर्वीच सरदेशमुखी व चौथाई यामुळें परिचित झाले होते. माळव्यांत त्यांचा सुसंघटित प्रवेश इ.स. १७२१ त झालेला, पेशवे दफ्तरावरून खालील रूपांत दिसतो. ''याद हिशेब वसुल परगणे इंदूर, ठाणें लष्कर नारोशंकर छ १७ रविलाखर व कुसाजी गणेश आणि गोपाळ नारायण, आंबेकर व बापूजी प्रभू. फौज खर्च रु. ६०००.'' तेथून मराठ्यांचा प्रवेश माळव्यांत होत होत इ. स. १७३२ चे ता. २२ जुलईला माळव्यांतील मुलखाची वाटणी होळकर, शिंदे व पवार यामध्यें होऊन सनदा देण्यात आल्या. इ. स. १७२१ व १७३२ या अकरा वर्षातील घडामोडी यथावकाश कागदपत्राचे आधारें खालीं नमूद करतों.

इ. स. १७२२, उदाजी पवार यांस ''प्रांत गुजरात व प्रांत माळवा निम्मे मोकासा हुजूरहून आम्हांकडे (पेशव्यांकडे) आहे, त्यापैकीं निम्मे तुम्हास मोकासा सरंजाम करून दिला आहे. **(धार इतिहास २ पृ. १०)**

इ. स. १७२३ ता. १९ फेब्रुवारी रोजीं पेशवे बदकशा प्रांत झाबवे येथें निजामउल्मुल्क याची भेट घेऊन दक्षिणेस परत निघाले. त्याच वर्षाच्या ता. ५ मार्च रोजीं नबाबाचा निरोप घेऊन बागेल खंडाकडे स्वारी केली. ता. ५ डिसेंबर रोजीं स्वारी हिंदुस्तानांत चालती झाली. तो माळव्यांत गेले. सैयद बहादूरशाह (बादशहाकडील सुभा) चालून आला. त्यासाठीं लढाई देऊन त्याचा मोड करून उज्जेनीस गेले. तेथें ठाणीं बसवून अंमल सर केला. तमाम राजे रजवाडे बुंदलखंड सुद्धां खंडणी घेतली. या लढाईत शिंदे, होळकर व पवार यांनीं बहुत शौर्य केले. माळव्यांत बंदोबस्त राहण्याकरीतां नेहमी वीस हजार फौज असावी असे ठरून मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे यास पाठविलें. ''माळवे प्रांतीं जो अंमल साधेल तो साधावा'' असें ठरवून पेशवे परत आले. **(पेशवे शकावली)**

इ. स. १७२४-२५ त पुरंधरे दक्षिणेंतून निघाले. या स्वारीत बाजी भिवराव व राणोजी शिंदे होते. या वेळीं खानदेश बऱ्हाणपूरच्या मार्गे माळव्यांत न शिरतां गुजरातेतून स्वारी निघाली. गुजरातेत सरबुलंदखान सुभेदार आणि त्याचा प्रतिस्पर्धी हमीदखान यांची चांगलीच जुंपली असून दोन्ही पक्ष मराठ्यास आपणाकडे ओढण्याचा प्रयत्न करीत होते. मराठ्यांच्या साहाय्यानें हमीदखाननें आपल्या प्रतिपक्षाला चोपून काढले. पुरंधरे नंतर माळव्याकडे वळले आणि त्यांनीं चौथाई, सरदेशमुखी वसूल केली. परगणे इन्दूर चिमणाजी बल्लाळांस पागेस मोकासा आला. (**होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें,** पत्र नं. ७, ८). हीच वसुली प्रतिवर्षी मराठ्यास देण्याचे सुभेदारानें अभिवचन दिल्यावरून माळव्यांत ठिकठिकाणीं मराठे अधिकारी नेमण्यांत आले. या वर्षी पंतप्रधान भूपाळगडास होते तेथें मल्हारजीस ठेवून ते पुढें गेले. **(पेशवे दफ्तर नं. १०, पत्र नं. २७)** उदेपुराकडे नाजूक संधान. (**खंड तीन, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें,** पत्र नं. ९).

इ. स. १७२६-२७ त केसो महादेव, कृष्णाजी हरी, यांचे मांडवगडचा घाट चढून वर येणें झालें. त्यांच्यावर सुभे दयाबहादूर चालून आले, ''निभाव न होय यास्तव त्याजकडे भला माणूस पाठवून सख्य संपादिलें.'' पुढें पुरंधरेनीं बहादूराची बही लुटली व बुंदीकोट्याच्या रोखे गेले. पुढें पेशवे स्वतः कर्नाटकाच्या स्वारीस गेल्यामुळें त्यांनीं माळव्यांतील चौथाई व सरदेशमुखीचा सर्व अखत्यार पवारास दिल्हा. ''पवारास सर्व तऱ्हेची मदत आपणाकडून देण्यांत यावी'' या मजकुरांची पत्रें माळव्याच्या सुभेदारास पेशव्यांकडून गेली. मल्हारजींस सरंजामात ११ महाल दिले. (**खंड तीन, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें,** पत्र क्र. १०)

झाबुवे प्रांताचे जुने वतनदार (१) विभूते दरखी अमीन, (२) थांदलेकर शिरस्तेदार व (३) पिथासा कारभारी झाबवे संस्थान, यांच्या घराण्यांच्या कैफियती फॉरेन डिपार्टमेंटांत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यातील सारांश - संवत १७७७ सालीं अंमल बादशाही परंतु संवत १७७८-७९ म्हणजे इ. स. १७२२-२३ मध्यें दक्षिणेंतून नर्मदा उतरून पेशवे व कंठाजी कदमबांडे दरोबस्त खंडण्या घेत निघाले. त्यासमयीं झाबवे प्रांतांत शिवगढ येथें फौजेचा मुक्काम झाला. त्यावेळीं झाबव्याचे राजे अनुपसिंग या नांवाचें होते. त्यांनी शरण येऊन खंडणी, नजराणा आपले कारभारी पिथासामार्फत ठरवून त्यांत मराठ्यांचे मांडलिकत्व कबूल केले. चौथाई राज्याची ठरवून मराठ्यांच्या अंमलाखालीं झाबवा संस्थान, थांदला पेटलावद हा प्रांत त्या वेळीं आला. पुढें जिंकलेल्या मुलुखाची वाटणी सुमारें संवत १७८३ त (इ. स. १७२६) केली. त्यावेळीं हा झाबवा पेटलावद प्रांत मल्हारजी होळकरांस मिळाला व मल्हारजींनीं आपल्या तर्फेनें आपले सरदार विठोजी बुळे यांस सरंजाम जहागीर दिल्हा. **(पेशवे रेकॉर्ड नंबर १०८)**

### आमझऱ्यांचें युद्ध

### मराठ्यांचा गनिमी कावा

इ.स.१७२८-२९, माळव्यालगत असलेले बादशाही सुभे राजपुताना व गुजराथ, यापैकीं गुजरातेतील सुभा सरबुलंदखान यांस जेरीस आणून त्याच्याकडून मराठ्यांनीं चौथाई,

सरदेशमुखीची कबूली मिळविली. रजपूत राजे बादशहाबद्दल उदासीनच नव्हे, तर जयसिंगाच्या मध्यस्थीनें मराठ्यांशीं सर्व रीतीनें अनुकूल. अशा परिस्थितींत चिमाजी अप्पा इ.स. १७२८ माळव्यांत आले. ही माळव्याची स्वारी म्हणजे इ. स. १७१९ त सुरू झालेल्या राजकारणाचा शेवटचा दुवा होय. ''माळवा साधेल तितका साधावा'' एवढेच पेशव्यांचे उद्दिष्ट असते तर पेशव्यांनीं इतक्या लवकर उठाव केला नसता. पण (अ) पेशव्यांची दृष्टी माळव्यापलीकडे आगरा, दिल्ली, या मुलुखांवर होती. (आ) याशिवाय दुसरीही एक बाब घरांतच उभी राहिली. दाभाडे सेनापती व बाजीरावसाहेब मुख्य प्रधान यांत चुरस उत्पन्न झाली. पेशवे निजामांशी लढण्यात गुंतले असतां दाभाड्याच्या सैन्यानें माळव्यांत शिरून डोंगरपूर, बांसवाडा, रतलाम या प्रांतांत धामधूम करून पांच लाख खंडणी वसूल केली. या दोन कारणांमुळें यापुढें माळव्यांत जुजबी स्वाऱ्या न करितां रगडून अंमल चालवावयाचा असेल तर स्वतः माळवा ताब्यांत घेऊन कारभार चालविला पाहिजे. सेनापती दाभाड्यांचे साहाय्य प्रतिपक्षास मिळाल्यास माळव्याच्या सुभेदाराच्या प्रतिकारास तोंड देणें जड जाईल; हे ओळखून बाजीरावांनीं मोठ्या प्रमाणात स्वारी करावयाचे ठरविलें. निजामावर संपादन केलेल्या जयामुळें दरबारांतील विरोधकांचा जोर कमी झाला होता. या अनुकूल परिस्थितीचा फायदा पेशव्यांनीं पूर्णपणे घेतला. चिमाजीची निवड या स्वारीवर झाली. चिमाजीच्या बरोबर बाजीरावांनीं आपल्या खांद्यास खांदा लावून अनेक लढायांत लढलेले बाजी भिवराव, राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर ही विश्वासाची माणसें दिली. या स्वारीनें ता. २४-१०-१७२८ ला कूच केले. चिमाजीच्या स्वभावाला ढिलाई ठाऊक नव्हती. त्याचें वैशिष्ट्य म्हणजे कामाचा उरक व तडफ. ता. २९-११-१७२८ रोजीं आमझरें येथें माळव्याचा सुभा दयाबहादुरानें आमझऱ्याच्या घाटांत मराठी फौजेस कोंडून निकाल लावावा या बेतानें आपल्या प्रचंड तोफखान्याची रचना केली होती. या जय्यत तयारीची बातमी कळतांच मराठ्यांनीं मांडवगडच्या घाटाचा मार्ग धरला. दयाबाहदुराच्या तोफखान्यास गप्प बसवील इतका तोफखाना त्यांच्याजवळ नव्हता. दयाबहादुराचा तोफखाना निरूपयोगी ठरला तरच मराठ्यांना जयाची आशा होती. चपळाईच्या दौडींत त्यांचे कसब साठविलेलें होतें. मांडवगडच्या वाटे मराठे वर चढले तेव्हां दयाबहादुरचे युद्धाचे बेत ढासळलें. मराठ्यांस लढाई देण्याकरितां त्याने तोंड फिरवलें, पण तोफांची हालचाल इतक्या तातडीनें करता येईना. चिमाजीनें लढाईचा हुकूम दिल्हा. मराठी शिलेदारांनीं चालून जाऊन सीमेपरता मार दिला. पवार मारामार करीत दयाबहादुराच्या हत्तीपर्यंत पोंहोंचला व वर चढून त्यानें खाशाचे डोकें कापिलें. खासा सरदार मारला गेला, सैन्यानें पळ काढला. मराठ्यांस अगणित लूट सापडली. पाडाव झालेले अठरा हत्ती चिमाजीनें शाहूस नजर केले. बाजीरावांनीं पवारांचा पत्रांत मोठा गौरवपर उल्लेख केला. ''पहिल्यापासून ऐसीच असाधारण कर्मे करून यश संपादित आले, पुढेंही सर्वविसी भरवसा त्यांचाच आहे. होळकरांस व उदबास रजाबंद राखणें.'' होळकराच्या कामगिरीबद्दल त्यांस स्वारींतच हत्ती देऊन गौरव करण्यांत आला. सारांश, इ. स. १७१८ चा बारगीर इ. स. १७२८ त हत्तीवर आरूढ झाला.

**उज्जैनीकडे**

इ. स. १७२९ इ. मराठी सैन्य कूच दरकूच करीत उज्जैनीनजीक पोहोचले. दयाबहादुराचा पुतण्या भवानीराम यानें मोठ्या तातडीनें सैन्याची जमवाजमव केली आणि उज्जैनीच्या भोवतालीं कामचलाऊ तटबंदी घालून मराठ्यांना तोंड देण्याची तयारी चालविली. बादशहानेही सैय्यद नजमुद्दीन, कोट्याचा महाराणा दुर्जनसाल व महंमद उम्मरखान यांस भवानीरामाच्या साहाय्यास जाण्याचे हुकूम सोडले.

**माळव्यांत वसुली**

दोन्हीं सैन्यांच्या वारंवार चकमकी होऊं लागल्या. भवानीरामाच्या सैन्यातील बंडाळीची बातमी मराठ्यांकडे पाहेचल्यामुळें वेढा निकरानें चालू राहिला. मराठ्यांचे पस्तीस दिवस गेले. बाजीरावांच्या दृष्टीनें 'एका ठिकाणीं गुंतून बसल्यास सैन्याचा खर्च कसा चालायचा.'' त्यांचे आज्ञेवरून वेढा उठवून कायथे, सुंदरशी, शहाजापूर, सारंगपूर या ठाण्यांतून वसुली करीत मराठे चालिले. माळव्यांचा सुभा शिपायांच्या कर्जाखाली रंजीस आलेला व बादशहाकडून साहाय्यास आलेल्या मदतनिसांनीं त्यास जास्तच पेचांत घातलें. कसालाच अडथळा न येतां स्वस्थपणानें रामपुरा, भानपुरा, जावद, बुंदी, कोट्यापर्यंत जाऊन ठिकठिकाणी चौथ सरदेशमुखी वसूल करीत चिमाजी गुजराथेंत उतरले.

**माळव्यांत चौथ सरदेशमुखीचे जागीं हुकमत**

**महंमदखान बंगश सुभा**

सारांश, या सहा महिन्याचे मोहिमेंत एक मोठें युद्ध व अनेक चकमकी झाल्या. मराठ्यांस द्रव्यप्राप्ती तर झाली, पण त्याबरोबर दोनशें मैल लांब व दोनशें मैल रुंद इतक्या विस्तृत प्रदेशावर मराठ्यांची हुकमत चालू लागली. याच वर्षी कंठाजीने नर्मदा उतरून धारच्या आसपास अंमल गाजविला. उदाजी पवार व मल्हारराव होळकर यांनी पावसाळ्यांत माळव्यांतच छावणी केली. बादशाही खजिना सैन्याच्या मागण्या पुरविण्यास असमर्थ झाला. पवार व होळकर यांनी मांडवगडचे सुप्रसिद्ध ठाणें काबीज केलें. ''या सालांत मराठ्यांचे पाऊल माळव्यांत चांगलेच रोविले गेले होते. बागोद परगण्याची खंडणी गुदस्त सालची मल्हारजींनी वसूल केली. (**होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें**, पत्र नं. ११) व परगणे इंदूरपैकीं स्वारांचा खर्च मंडलोईकडून रकम काढली.'' (**होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें**, पत्र नं. १३) इ. स. १७३० त भवानीराम यास माळव्यांतून बोलावून घेऊन बादशहानें महंमदखान बंगश यास माळव्याचा सुभेदार नेमिले. ''मल्हारराव आता मंडलोईस आज्ञा करीत, येथपर्यंत मराठ्यांची कमान चढली.'' (**होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें**, पत्र नं. १५)

**डभई युद्धाचे परिणाम १७३१**

इ. स. १७३१, मल्हारराव होळकरांची शहाजापूरनजीक बंगशाशीं गांठ पडून जुजबी

लढाई जहाली. प्रारंभीं प्रारंभीं मराठ्यांची पिछेहाट होते आहे असें दिसूं लागलें. पण दुसऱ्या एका प्रसंगानें हा सर्व रंग पालटला. पेशवे व सेनापती यामध्यें युद्धप्रसंग जुंपला. निजाम व बंगश यांनी पेशव्यांविरूद्ध दाभाड्यास मदत करण्याचें संकल्पिलें. पण निजाम व बंगशाची सैन्ये दाभाड्यांच्या मदतीस जाण्यापूर्वीच पेशव्यानें डभई येथें दाभाड्याची वाताहत लावून टाकली. या दाभाड्यांचे वाताहतीचे परिणाम फार दूरवर गेले. (१) बंगशाला माळव्यापासून दूर करण्यांत आले. (२) निजाम जागचे जागीं चकित होऊन स्तब्ध बसला. (३) बंगशाच्या जागी सवाई जयसिंग आले. त्यांचें येणें मराठ्यांच्या पथ्यावर पडले. (४) गुजराथ निष्कंटक होऊन तो सुभा पेशव्यांच्या कक्षेखालीं आला. उत्तरेंतील मार्ग सुकर झाला. (५) उदाजी पवार दाभाड्यांस मिळाल्यामुळे मल्हारजी पुढें सरकले. याच वर्षी बाजीरावसाहेबांनीं माळव्यांत व आसपासचे भागांत बरेच मोठे सैन्य पाठविले. फत्तेसिंग भोसले व दुसरें कांहीं सरदार आपल्या तीस हजार फौजेनिशीं सिरोंजचे पूर्वेस बत्तीस मैलांवर खेमसाला येथें होते. चिमाजी अप्पा व मल्हारजी होळकर वगैरे तितक्यांच जमावानें उमटवाड्यांत कालीसिंध व पार्वती या नद्यांचे दरम्यान राहिले होते.

**माळवा चारी बाजूने घेरला**

**स्थानिक अधिकारी अनुकूल : इ. स. १७३१–३२**

अशा रीतीनें येवढें मोठें मराठी सैन्य एकदम माळव्यांत दाखल झाल्याचे जाहीर होतांच माळव्यांतील सर्व ठाकूर, जमीदार व राजे इत्यादि एकत्र गोळा झाले. त्यांनीं बादशाही अधिकाऱ्यांस मुळीच साह्य करावयाचें नाहीं. असा ठराव करून मराठ्यांस एक प्रकारें आमंत्रणच केले. या वेळेस इंदूरकर मंडलोई व कुंवर निहालकर्ण हे पुढारी असोन यांजकडोन पूर्वीप्रमाणें बाजीराव पेशव्याकडे पत्रें व निरोप जात होते. प्रथम ते स्नेही असले तरी पुढें पुढें ते आज्ञांकित झाले. (**होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें**, पत्र नं. १६ ते १९ व २३).

होळकर व राणोजी शिंदे हे मंडलोई यांचा अगत्यवाद ठेवून त्यांचें चालवीत होते. मल्हारजी आपले अधिकारी नेमूं लागले व पेशवे त्यांचा सल्ला घेऊं लागले. याच संबंधांत मल्हारजी, पवारांची बाजू घेऊन चिमाजी अप्पास लिहितात, ''फौज भारी होईल, मुलुखगिरी लांबपावेतों जाऊन करूं. चार रूपये जास्ती मिळतील.'' मिळतें घेण्याच्या मल्हारजींच्या धोरणाचा चिमाजी अप्पांचे मनावर परिणाम झाला.

मराठ्यांचा मोठा जमाव पाहून आणि स्थानिक पुढारी त्यांस अनुकूल आहेत हे पाहून माळव्याच्या सुभ्यानें छत्रपती शाहूमहराजांकडे तहाचे अनुसंधान लाविले. छत्रपतींनीं पेशव्यांकडे बोट दाखविलें. तेव्हां युद्धाशिवाय मार्ग नाही असें समजून सुभ्याने सिरोंजहून खेमसाला येथें एकदम शत्रूवर जोरदार हल्ला करून जाण्याचा विचार केला. इतक्यांत मल्हारराव होळकर पन्नास हजार फौज घेऊन सिरोंजजवळ पंधरा सोळा मैलांवर येऊन दाखल झाल्याचें त्यास समजलें. आणखी दुसरें वीस हजार सैन्य दक्षिण व पश्चिम बाजूस पसरलें

असल्याचें त्यास कळलें. मराठी सैन्याशीं त्याच्या कांहीं चकमकीही झडल्या. शेवटीं मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, आनंदराव पवार, इत्यादि पुढाऱ्यांस बोलावून त्यांस नजरनजराणे देऊन कांहीं करार ठरविलें. त्याप्रमाणें नबाबास स्वस्थ बसविल्यावर मराठे सरदारांचा माळव्यांत अनिरुद्ध संचार सुरू झाला. इतकेंच नव्हे, तर मोगली अस्मलदारांस स्थानिक मंडलोईदिकांस ते आज्ञापूं शकले. (**हो.शा.इ.सा.** पत्र नं. २४, २५)

ता. १,२ जूनचे सुमारास मराठी सैन्याचा तळ इंदूरनजीक पडला असतां, इंदूरचे जमीदार राव तेजकर्ण यांनीं आपण भेटीस येत असल्याचें मल्हारजी होळकर-राणोजी शिंदे यांस पत्र लिहून कळविलें. त्यावरून ''तुमचे भेटीकरितां तळावरीं आम्ही वाट पाहतों. तरी पत्रदर्शनीं स्वार होऊन येणें. एक घडीचा विलंब न करणें,'' असें उत्तर गेलें. हे पत्र ता. २ जून इ. स. १७३२ सालचें आहे.

**माळवा पादाक्रांत झाला त्याची वाटणी इ. स. १७३२**

माळव्यांतील मुलूख मराठ्यांचे अंमलाखालीं आल्याची नोद मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे यांचे विद्यमानें पेशवे दफ्तरांत सुरुसन. सल्लास सलासीन सालच्या छ १० सफर (ता. २२ जुलई इसवी सन १७३२) रोजीं झाली. छत्रपती शाहू महाराजांचे आज्ञेनुसार बाजीराव पेशव यांनीं तो मुलूख सरदार पवार, होळकर, आणि शिंदे यांत वाटून देऊन सनदा दिल्या. या वाटणींतच आनंदराव पवार या धार, तुकोजी व जिवाजी पवार यांस देवास, मल्हारराव होळकर यांस इंदूर व राणोजी शिंदे यांस उज्जेन आणि त्याचे आसपासचा मुलूख मिळाला.

होळकरांची सनद सबंध येथें देतों : घडणी राजमंडळ स्वारी राजश्री पंतप्रधान सुरू सन सल्लास सलासीन मया व अल्लफ. खर्चाबद्दल मुख्य पथक दिम्मत (स्वाधीन) मल्हारजी होळकर दफते (घडलेल्या गोष्टीचें टांचण) यांतील उतारा :

छ १० सफर सरंजाम माळवा येथील वाटणीचे महाल वाटणी ५ पैकीं दोन तकसिमा मशारनिल्हेकडे .................

| **किता महाल.** | | **हल्लीं प्रचारांत नांव** | **किता महाल.** | | **प्रचारांत नांव** |
|---|---|---|---|---|---|
| १ | परगणा | इंदूर | १ | परगणा | देपालपूर (देपाळपूर) |
| १ | ,, | बुढा (नारायणगड) | १ | ,, | तराणे |
| १ | ,, | झाबवा | १ | ,, | रामपूर |
| १ | ,, | पाटण (नरसिंहगड) | १ | ,, | देवळे |
| १ | ,, | गांगुरणी, जीरापूर, माचलपूर | १ | ,, | महमदपूर (महत्पूर) |
| १ | ,, | जावरा | १ | ,, | लालगड |
| १ | ,, | पिढावा | १ | ,, | बेटमे |
| १ | ,, | करहई | १ | ,, | कायथे |
| $^{१}/_{२}$ | ,, | डोंगरपूर, चौथाई, निम्मे | १ | ,, | आबेर (सावेर असावें) |

| | |
|---|---|
| १/२ ,, खैराबाद सुद्धां डग निम्मे | १ ,, महेश्वर |
| १/२ ,, बकाणी निम्मे सुद्धां डग | १ ,, पंपलोद |
| १ ,, लवाणी नजीक मांडवगड | १ ,, बरडावद |
| १ ,, कोठडे, तळवटी (चिखलदे) | १/२ ,, डोंगरपूर पैकीं चौथाई |
| १ ,, काटाकुट | १ ,, संदराल |
| | १ ,, हसीलपूर |
| १२-१/२ | १ ,, भिलवडी सं. डग |
| | १ ,, पिंपळोदे तलाटीपैकीं |
| | नजीक डही, नेमाड : |
| | १६-१/२ |
| | येकुण २९ |

पेशवे दप्तरपैकीं सरंजामझाडे, रोजकीर्दी, वगैरेंत इ. स. १७२६ ते इ. स. १७३२ इ. पावेतोंचे पाहतां मल्हारजींनीं श्रीमंतांकडून मिळालेल्या प्रांतांची व्यवस्था केली. व व्यवस्थेकरितां मुत्सद्दी, कमाविसदार, मुजुमदार, फडणीस वगैर मुक्रर केले त्यांचा खुलासा खालीलप्रमाणें.

१. इ. स. १७२६ त माळवा, गुजराथ येथील सरंजामी महाल मिळाले, त्यांचे व्यवस्थेसाठीं खालील इसमांची मुक्ररी केली.

| | | |
|---|---|---|
| १ | मोरो गोपाळ मुजुमदारी तैनात सालिना | रु. ३००० |
| २ | गोविंद चिंतामण दिवाण, तैनात सालिना | रु. ५००० |
| ३ | बापूजी त्रिंबक प्रभु, तैनात | रु. ५००० |
| ४ | जिवाजी बापुजी जमेनवीस | रु. ४००० |
| ५ | गंगाधर यशवंत फडणीस | रु. ६००० |
| ६ | बजाजी पिलाजी सबनीस | रु. ४००० |
| ७ | गणेश निळकंठ चिटणीस | रु. १५०० |

१. इ. स. १७३० ते इ. स. १७३२ पावेतों प्रांतांचे व्यवस्थेत खालीलप्रमाणें जमीदार, ठाकूर, संस्थानिक, वगैरे लोकांस बहुमान पोशाख देऊन गौरविले. (पेशवे दफ्तरांत जीं नावें उपलब्ध झालीं तीं)

१ खरगोणकर जमीदार व परगणे पिंपलोद तलाटी जमीदार व प्रांतानिहाय सर्वत्र जमीदार लोकांस बहुमान पोशाख दिले.

२ गोपाळसिंग राजा देवळे प्रतापगडकर व राजे खिलचीपुरकरास बहुमान.

३ कर्णाजी राठोड उमरेकर व रामपुरेकर मिसर (पुढारी) यांस.

४ मोहनलाल वकील दिमत रोहिले यांस वस्त्रें.

२. परगणे इंदूर, सावेर, देपाळपूर, बेटमा, झाबवा, जावरा, देवळे, बुढा महतपूर,

राजगढ, पाटण, डोंगरपूर, तलाटी, याशिवाय सदरेंत कमाविसदार, मुजुमदार, फडणीस, मुत्सद्दी मुक्रर केले त्यांचे नामनिर्देश.

१ परगणे इंदूर. नारोशंकर, मल्हार गोपाळ, मोरोपंत.
२ ,, सावेर, राघोपंत कमाविसदार.
३ ,, देपाळपूर, बाजी गोविंद.
४ ,, बुढा, राघो हरी, कमाविसदार, गोविंद महादेव मुजुमदार, रामाजी कृष्ण.
५ ,, महतपूर, नागोअनंत, हरी केशव मुजुमदार.
६ ,, बेटमे, कमाविसदार, मुजुमदार, फडणीस (नांवें लागलीं नाहींत)
७ ,, डोंगरपूर, आबाजी शंकर कमाविसदार.
८ ,, शिवाजी नरसिंह कमाविसदार.
९ ,, तलाठी माधवराव, कमाविसदार, राघोपंत मुजुमदार, बापाजी जीवन.
१० ,, कायथे, बाळाजी मोरेश्वर.
११ ,, जावरा, नारो केशव कमाविसदार.
१२ ,, देवळे प्रतापगढ, मल्हारकृष्ण, खंडो मोरेश्वर व जगन्नाथ शामराज.
१३ ,, पाटण, लक्ष्मण नारायण कमाविसदार.
१४. याशिवाय सटवाजी बोराडे, रूपाजी होळकर, सोयराजी कोकाटे, अप्पाजी, येसाजी, देवाजी, कासी अनंत, नरहर केशव, बुवाजी नरसिंह, धुळाजी पारखे, अबाजी सखाजी, सेटचाजी थोरात, खंडोजी नलगे, संकरोबा चिटणीस, येसोबा बाबुराव बहिरव, अवधूतराव, अण्णाजी जिवाजी, भानजी कदम व सकंभट उपाध्ये.
१५. सरंजामी जहागीरदार विठोजी बुळे यांचे दिमतीतील मंडळी.
(१) मल्हारपंत प्रभू, (२) बुधगीर महंत, (३) गोपाळपंत विभूते, (४) रामचंद्रपंत कमाविसदार.
१६. सरंजामी जहागीरदार वाघ यांजकडील मंडळी.
(१) अंताजीपंत, (२) चिंतोपंत, (३) दादो महादेव (पाराशर दादाजींचे वडील) ह्याप्रमाणें प्रांतांचे व्यवस्थेंत बहुमान वस्त्रें, पोषाख, मुक्रऱ्या होऊन कामावर रुजूं केलें.



**प्रकरण ८ वें**

---

# राजपुताना, बुंदेलखंड व उत्तर हिंदुस्थान इकडील मोहिमा
## इ. स. १७२३ ते १७३६

*जो गत ग्राह गजेंद्र कीं सो गत भई है आज ।*
*बाजी जात बुंदेलनकी राखो बाजी लाज ।।*

**बुंदेलखंड–भूगोल व प्राचीन इतिहास**
**राजा छत्रसालचें कार्य**

बुंदेलखंड हा प्रांत उत्तरेस यमुना, पूर्वेस छोटा नागपूर दक्षिणेस मध्य हिंदुस्थान व पश्चिमेस ग्वाल्हेर संस्थान चारी बाजूच्या सीमेंत वसलेला आहे. याचा प्राचीन इतिहास इतर प्रांतांच्या इतिहासाप्रमाणें, मतमतांतराचे गलबल्यांत गुरफटलेला आहे. मराठे, रजपूत, यांच्या नांवाच्या उत्पत्तीत जसे अनेक प्रकार दृष्टोत्पत्तीस येतात, त्याप्रमाणें ''बुंदेलें या नांवाचें शोधांत निरनिराळीं मते बाहेर आली आहेत. एक पक्ष म्हणतो कीं तपश्चर्या करीत असतां देवी प्रसन्न होत नाही असे पाहून ''पंचम यानें तरवारीचा स्वशरीरावर घाव केला, तेव्हां बुंद (रक्तबिंदु) बाहेर पडले; त्यावरून बुंदेले हें नांव पडले. दुसरें मत असें आहे कीं दासीपासून उत्पत्ती म्हणून यांस बुंदेले म्हणतात. तें कसेंही असलें तरी आठव्या शतकापासून रजपुतांची जी चलती झाली व ते जे चारी दिशांत पसरले त्यांतच बुंदेलखंडाचे स्वामीत्व त्यांनीं संपादिलें. पुढें पठाणाच्या आणि मोगलांच्या अमदानीत, दिल्लीच्या अतिसान्निध्यामुळें या प्रांतास स्वस्थता अशी लाभलीच नाही. हिंदुस्थानांतील इतर प्रांतांप्रमाणें

याही प्रांतांत औरंगजेबाच्या राजनीतिची झळ लागलीच. पंजाबांत शीख, अंतरवेदींत जाट, राजपुतान्यांत रजपूत व दक्षिणेत मराठे आपआपलेपरी जूट करून मोगली सत्तेचे लचके शक्यतेनुसार तोडूं लागले. जयपूर, जोधपूर व उदेपूर या तीन संस्थानांचा आपआपसातील तह व त्यांनीं मराठ्यांस केलेली मदत व त्यामुळें सुकर झालेला मराठ्यांचा माळव्यांत प्रवेश, या सर्व गोष्टी मागें येऊन गेल्या आहेत. याच सुमारास बुंदेलखंडांत राजा छत्रसाल स्वपराक्रमानें राज्याचा विस्तार करून व्यवस्था लावीत होता. त्याने सर्व बुंदेल्यांची एकी घडवून आणिली. पण तो सापडला होता कात्रीचे दोन पात्यांमध्ये. एकीकडे दिल्लीचे सम्राट व रोहिले, तर दुसऱ्या बाजूला अयोध्येचा नबाब.

इ. स. १७२० पर्यंत छत्रसालच्या चळवळीकडे दिल्ली दरबारचें लक्ष गेलेले दिसत नाही. याच वर्षी महमंद बंगश बुंदेलखंडावर चालून आला. तेव्हांपासूनची हकीकत पाहूं या.

इ. स. १७२३ त मराठे बुंदेलखंडात आले. मल्हारजी होळकर या स्वारीत होते. त्यांनीं छत्रसालाची मैत्री संपादिली व खंडणी वसूल केली.

इ. स. १७४२ त बंगशनें सुरू केलेली मोहीम निजामाच्या दक्षिणेंतील दंगलीमुळें अर्धवट राहिली.

इ. स. १७२७ या सालापासून मात्र निकरानें लढाया करून बंगशने भिंड, मउहा, पैलानी, आगवासी, सिमानी, हे बुंदेल्यांचे परगणे काबीज केले. व त्यांना तसेच रेटत पुढें चाल केली. महोबा प्रगण्यांत इजोली येथें घोर युद्ध होऊन दोन्ही पक्षांचा अतोनात संहार झाला. छत्रसालानें माघार घेतली व आश्रयाकरीतां जैतपूरच्या दक्षिणेस अरण्यांत शिरला. तेथेंही शत्रूनें त्याचा पाठलाग केला. बारीगड, नौरीझुमा, कुलपहार ही बुंदेल्यांचीं अभेद्य समजली जाणारी ठाणीं सर करून बंगशनें इ. स. १७२८ जूनच्या सुमारास जैतपुरास वेढा दिला. पराक्रमाची शर्थ करून सहा महिन्यांवर छत्रसालनें जैतपूर लढविलें. पण बंगशच्या वाढत्या बळामुळे बुंदेल्यांचे सर्व उपाय थकले. किल्ला सोडून देऊन छत्रसाल बंगशला शरण गेला. तेव्हां पांच हजारापर्यंत सैन्य ठेवून इतरांस बंगशाने रजा दिली व मुलखाचा बंदोबस्त चालविला. माळव्यांतील मराठी फौजेच्या हालचालीवर बंगशाची नजर होती; पण दक्षिणेंतून चांदा, देवगड, गढा या मार्गे मराठे वर येत आहेत इकडे त्याचें दुर्लक्ष झाले.

### छत्रसालने मराठ्यांची मदत मागितली इ. स. १७२८-२९

### मराठ्यांचा विजय

यापूर्वी उत्तरेकडील स्वाऱ्यांत हा अरण्याचा आडमार्ग क्वचितच उपयोगांत आणला गेला होता आणि या मार्गाने मोठें सैन्य बुंदेलखंडात प्रवेश करील याचा अंदाज बंगशला नव्हता. होळीचा सण साजरा करण्याचा मिषानें छत्रसाल आपली मोडलेली फौज घेऊन महोब्यास येऊन मराठी फौजांची वाट पाहत राहिला व आपल्या साहाय्यास धावून येणाऱ्या

पेशव्यांच्या सन्मानार्थ त्यानें आपल्या मुलास पुढें रवाना केले. धामोरा मुक्कामीं राजा छत्रसाल पेशव्यांस येऊन भेटला. मराठे व बुंदेले यांच्या संयुक्त सैन्यानें ता. १९-३-१७२९ रोजीं महोबा सोडले. पुढें आठ दिवसांनीं जैतपूरनजीक दोन्ही सैन्यांची नजरानजर होऊन युद्धास प्रारंभ झाला. संभोवती खंदक खणून बंदोबस्तानें बसलेल्या बंगशावर तोफांच्या अभावानें मराठ्यांस चालून जातां येईना, तेव्हां चोहो बाजूंनीं वेढून सर्व मार्ग रोखून मराठे बसले. बंगशने दिल्लीहून मदतीची मागणी केली व आपल्या मुलासही तातडीने बोलविलें. मुलगा दहा हजार फौज घेऊन व धान्याचा साठा घेऊन जैतपुराकडे निघाला. जैतपुरानजीक बारा मैलांवर सुपे येथें तो पोहचतो तोंच मराठी फौजेने त्याला घेरले. तो मुलगा शंभर स्वारांनिशीं पळून गेला. तीन हजार घोडे व तेरा हत्ती मराठ्यांच्या हाती आले.

ही झाली हकीगत मुलाकडून अपेक्षिलेल्या मदतीची. दिल्लीहून मदत येईपर्यंत किल्ला निकरानें झुंझवावयाचा असा बंगशने निर्धार केला. किल्ल्यांत तर धान्याचा कण उरला नव्हता. बाहेरील सर्व मार्ग मराठे व बुंदेले यांनी अडविलेले. शरण येण्यावाचून गत्यंतर नाही. इतकी हलाखीची स्थिती मराठ्यांनीं बंगशची करून सोडिली.

**बंगश पळून जातो**

या युद्धांत विठ्ठल शिवदेव विंचुरकर हे श्रीमंतांच्या उजव्या बाजूस आणि मल्हारराव होळकर व पिलाजी जाधव डाव्या बाजूस होते. एकंदर प्रमुख सरदार बारा असून फौजेची संख्या सत्तर हजारांवर होती. जैतपूरचा किल्ला अतिशय बळकट असून त्याचा तट अभेद्य असल्यामुळें मराठ्यांस तो लवकर साध्य होईना. स्वतः पेशवे घोड्यावर स्वार होऊन सैन्यास उत्तेजन देत होते. होळकरादि सरदारांनी किल्ल्यावर एकसारखे मारे चालविले. किल्ल्यांवरून प्रचंड धोंडे खाली येत होते, तथापि मराठ्यांचे हल्ले थांबले नाहीत. महंमदखान किल्ल्यातून पळून गेल्यावर तो किल्ला मराठ्यांच्या हाती आला व त्यांनी तो छत्रसाल राजाच्या स्वाधीन केला. याप्रमाणें छत्रसालावरचे संकट दूर झाले.

**छत्रसालाची कृतज्ञता व मराठ्यांचा लाभ**

उपकाराची फेड म्हणून छत्रसालानें पेशव्यांस पुत्रवत् लेखून त्यास झांशीची जहागीर बहाल केली आणि आपल्या पाठीमागें राज्याचा तिसरा विभाग पेशव्यांस मिळावा अशी व्यवस्था केली. शत्रूनें चढाई केल्यास परस्परांस साहाय्य करावें असेंही ठरले. पुढील दहा वर्षांत चढाईच्या युद्धाचा पाया बुंदेलखंडात ठेवून पेशव्यांनीं दिल्लीपर्यंत मजल मारली, हें ध्यानांत घेतलें म्हणजे बुंदेलखंडाच्या स्वारीचें महत्त्व समजून येते. यानंतर इ. स. १७३२ त पेशव्यांनीं निजामाची भेट घेऊन त्याच्या मुलुखावर हल्ला न करण्याचें त्याला अभिवचन दिले व आपल्या उत्तरेतील चढाऊ धोरणाच्या आड तो न येईल अशी तजवीज केली.

इ. स. १७३२-३३ त चिमाजी बुंदेलखंडांत आले. आपल्या गोड भाषणानें व चातुर्यानें बुंदेल्यांचा स्नेह संपादून विशेष निकराचा प्रसंग न आणितां सव्वादोन लाखांची

जहागीर छत्रसालाच्या पश्चात त्याच्या मुलाकडून मिळविली. या वेळीं तह झाला तोः ''पुढें स्वामी ज्या मुलुखावर जातील त्या मुलुखावर समागमें चलावें. दिल्लीवर चाल केली जाईल तेव्हांही समागमें चलावे. प्रयागास स्वामी चालतील तेव्हांही समागमें चलावे. जो मुलुख जप्त करावयाचा त्यांत अर्धेअर्धे प्रमाण घ्यावें.''

**दतिया इत्यादि संस्थाने मांडलिकत्व मान्य करितात**

छत्रसालाच्या राज्यालगत असलेल्या दतिया, ओडसे, नरवर या संस्थानांकडे चिमाजीनें रीतसर चौथाईची मागणी केली. हीं संस्थानें बादशाही मांडलिक. त्यांनी सार्वभौम सत्तेकडे संरक्षणाची मागणी केली. शेवटीं मराठे यांस विरोध करणें आवाक्याबाहेर झाल्यामुळें चौथाई या संस्थानांनीं मान्य केली.

**शिंदे होळकरांचा जयसिंगांवर जय इ. स. १७३३–१७३४**

बुंदेलखंडात चिमाजी आपलें कार्य उरकीत असतां मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे यांच्या निशाणाखालीं दुसरी एक फौज जमा झाली. रेवातीरी येतांच या सैन्याचे दोन विभाग करण्यांत येऊन आनंदराव पवार व विठुजी बुळे यांच्याबरोबर एक तुकडी माळव्यांत रवाना झाली. दुसरी तुकडी घेऊन होळकर व शिंदे यांनी चंपानेर सर केलें. उमरेठ वगैरे शहरें घेऊन हेंही सैन्य माळव्यांत शिरलें. कारण सवाई जयसिंग माळव्यांत आला असून त्याची व चिमाजीची खटखट होणार अशी वार्ता होती. होळकरांकडील माणसांनीं सवाई जयसिंगास बहुत तंग केलें. दाणापाणी बंद झालें. शेवटी सवाई जयसिंगानें सल्यावर घातलें. सहा लक्ष रुपये रोख व सुरत अठ्ठाविसीची खंडणी या अटीवर शिंदे होळकर तहास कबूल झाले.

**उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांचा विजय**

इ. स. १७३४ त शिंदे होळकरांनीं बढवाईस मोरचे लावून ठाणें जेर करून खंडणी घेतली. पिलाजीच्या फौजेनें आगऱ्याच्या पूर्वेस असलेल्या भदावराकडे मोर्चा फिरविला. भदावरकरानें तीन लक्ष खंडणी देऊन कसाबसा मुलखाचा बचाव केला. सारांश, ग्वाल्हेरपासून अजमेरपर्यंत दोनअडीचशें मैल टापूत मराठ्यांची सत्ता रोविली गेली.

**दोन मराठी फौजा विरुद्ध दोन मोंगली फौजा १७३४–३५**
**मराठ्यांचा गनिमी कावा**
**होळकर–शिंद्यांचा पुण्यास यजमानानें केलेला सन्मान**

या वर्षाच्या शेवटीं मराठ्यांची दोन सैन्यें उत्तरेच्या मार्ग चालू लागली. पिलाजी जाधवाचे सैन्य बुंदले राजेरजवाड्यांकडे गेलें, तर शिंदे–होळकरांचे माळवा राजपुतान्यांकडे वळले. दिल्लीहून दोन प्रचंड फौजा तयार होऊन वजीर कमरुद्दिनखान व मीरबक्षी खानडौरान यांच्या नेतृत्वाखाली पूर्वेकडे व पश्चिमेकडे मराठ्यांच्या तोंडावर रवाना झाल्या. मोंगल फौजेची भिस्त तोफखान्यावर, तर मराठ्यांची चपळाईच्या दौडीवर. कमरुद्दिनखान ओछी नजीक तळ्यावर येऊन उतरला. मराठ्यांच्या वायुगतीपुढें मोंगलांचा तोफखाना निरुपयोगी

ठरला. सर्व लोकांनीं मेहनत करून कमरुद्दिनखान वजीरास खट्टू केलें. ह्या बुंदेलखंडाच्या मोहिमेंत दोन तीन युद्धें झाली. पण एकंदर मोहीम विशेष फलदायक झाली नाहीं. याचा वचपा शिंदे-होळकरांच्या मोहिमेनें काढला. ते अजमेराजवळ आहेत असें समजल्यावरून खानडौराननें सवाई जयसिंग, मारवाडचा अभयसिंग, महाराव कोटेवाला वगैरे राजे यांस सामील करून घेतलें. दोन लाख स्वार व तोफखाना अशी प्रचंड मोंगल सेना जमा झाली. मुकंदरा उतरून रामपुरा प्रांतें मराठ्यांच्या रोखाने मोगलांचें कूच झालें. मोगलांस चौगीर्द वेढा देऊन बुडवावें हा मराठ्यांचा पहिला बेत. त्याप्रमाणें आठ रोज लष्कराचे चौगीर्द कहीकाबाड दाणाघास बंद केला. खानडौरान हा साम्राज्याचा मीरबक्ष (मुख्य सेनापती). त्याच्या निशाणाखालीं बहुतेक रजपूत रजवाड्यांच्या फौजा जमा झालेल्या. अशा प्रचंड सैन्याशीं मुकाबला करण्यापेक्षां जयपूर, बुंदी, कोटा, येथील तुकड्या आघाडीवर गेल्यामुळें, या उघड्या पडलेल्या प्रदेशांत आपल्याला अडथळा होणार नाहीं हे शिंदे होळकरांच्या ध्यानांत येऊन त्यांनीं वेढा उठविला. बुंदी कोट्यावरून त्यांनीं जयसिंगाचा मुलूख गाठला. तेव्हां आपल्या मुलखाचा बंदोबस्त करण्यासाठी जयसिंग जयनाराकडे वळला व तोच मार्ग इतर संस्थानिकांनीं स्वीकारला. जयसिंगाच्या मध्यस्थीनें होळकर व मीरबक्ष ह्यांच्या ता. २२-३-१७३५ ला भेटी होऊन तह ठरला. माळव्याच्या चौथाईदाखल दरसाल बावीस लक्ष रुपये देण्याचें खानडौराननें कबूल केले. या नंतर होळकर-शिंदे पुण्यास गेले तेव्हां त्यांच्या सन्मानार्थ पेशवे होळकरांस संगमापावेतों व शिंद्यांस घोरपडीपावेतों सामोरें गेले.

### ''राजश्री मल्हारजी'' चे ''सुभा मल्हारजी''

याच सालीं सवाई जयसिंगाचें व बाजीरावसाहेबांचें बोलणे होऊन जयसिंगानें महंमदशाह बादशहाची समजूत घातली. या सालचा पेशवे दफ्तरचा जमाखर्च पाहतां एक मोठा फरक प्रथम दिसतो. या वर्षापर्यंत ''राजश्री मल्हारजी होळकर दिम्मत चिमाजी बल्लाळ'' असे जे शीर्षक असे, त्याऐवजीं ''सुभा मल्हारराव होळकर दिम्मत पंतप्रधान'' असा मायना दृष्टीस पडतो. मल्हारजींस, त्यांचे कुटुंबाचे माणसांस व पदरचे सरदार, शिलेदार व अश्रितांस भरपूर बहुमान देणग्या दिलेल्या दिसतात. स्वतः मल्हारजींस भरजरी पोशाख दिला असून सोन्याचे कडे, मोत्यांचा तुरा, शिरपेंच वगैरे बहुमान दिला आहे. सारांश, मल्हारजी या वेळेपासून सुभेदार झाले व त्यांचे भोवतालीं प्रभावळ स्थिरावली हे निश्चित होतें. हें वर्ष इ. स. १७३५ होय. याच वर्षीं होळकरशाहीचा पाया घातला गेला असें धरण्यास हरकत नसावी. येथूनच होळकरशाहीचा प्रारंभ झाला असे मानल्यास पूर्वीची पंधरा वर्षें ''पूर्व तयारी'' असें धरून चालावयाचे.

### दिल्लीच्या तुराणी पक्षाची मराठ्यांविरुद्ध मोहीम १७३५-३६

### मराठ्यांची तयारी

याच सालीं होळकर-शिंद्यांनी मिळविलेल्या विजयानें दिल्ली दरबारमध्यें मोठी खळबळ उडवून दिली. बक्षी व जयसिंग यांजविरुद्ध तुराणी पक्षानें बादशहाकडे तक्रार केली.

तेव्हां सादतखान, मारवाडचा अभयसिंग व कमरुद्दिनखान यांस बादशहानें मराठ्यांवर स्वारी करण्यासाठीं योजिलें. अशा मोठ्या प्रस्थांस तोंड देण्यासाठीं पेशवे इ. स. १७३५ च्या नोव्हेंबरात दक्षिणेतून निघाले. उत्तरेच्या कारभारांत अनुभवलेले शिंदे-होळकर यांस पेशव्यांनीं बरोबर घेतले. बुंदेलखंडावर सटवोजी जाधवाबरोबर बाजी भिवराव यांची नेमणूक करण्यांत आली. परस्परांस एकमेकांच्या हालचाली कळवून पेशव्यांच्या सल्ल्यानें दोन्ही सैन्यांनीं चालावयाचें असें ठरलें.

**सादतखान नाउमेद झाला**

बादशहाच्या हुकुमाप्रमाणें सादतखान लखनौहून निघाला. मार्गातच अडारूचे जमीदाराबरोबर झुंझ मोठें झाले. सादतखानाच्या उमेदीत तफावत पडली. बादशाहीची या खानावर भिस्त आणि त्यास तर आरंभींच बुंदेल्यांनीं दमविलें.

**पेशव्यांचा विजय व राजपुतान्यांत सन्मान**

**मारवाडचा अभयसिंग ह्याची खोडी मोडली**

पेशवे चांदवडच्या घाटानें जाऊन नवापुरास पोहचले. तेथून नंदुरबार, सुलतानपूरच्या रोखे तापी उतरून खानदेशांतून कुकशीच्या मार्गे माळवा गुजराथच्या सरहद्दीवर ते दाखल झाले. कुकशी फत्ते करून लुणवाडा, बासवाडा, डोंगरपूर या प्रांतांतून राण्यांच्या भेटीस चालले. उदेपूरच्या राण्यानें त्यांचा बहुमान केला. याच सुमारास बादशहाच्या विचारांत फेरफार होऊन जयसिंगाकडे मध्यस्थीचें काम सोपविण्यांत आले. जयसिंगानें पेशव्यांस मेजवानी दाखल पांच हजार रुपये, मूल्यवान अलंकारांनी सजविलेला आपल्या संग्रहातील एक नामांकित हत्ती, पस्तीस उंट, श्रृंगारलेल्या दोन पालख्या नजर केल्या. त्या वर्षाच्या चौथाई दाखल वीस लाख नक्त रुपये पेशव्यांनीं पदरांत पाडून घेतले. माळव्याच्या सुभेदारीचे फर्मान बादशहाकडून मिळवून देण्याचे जयसिंगाने कबूल केलें. एवंच खुद्द उदेपूर व जयपूर या संस्थानिकांनी पेशव्यांचा सन्मान केला. मोंगल दरबारनें पेशव्यांशीं संधी करण्याचें धोरण स्वीकारलें, तर मग छोट्या राजेरजवाड्यांनीं पेशव्यांस संतुष्ट राखण्याकरितां नजराणे पाठविले यांत नवल नाहीं. राहतां राहिला मारवाडचा अभयसिंग. हा दिल्ली दरबारांतील पेशव्यांचे विरुद्ध पक्षांत सामील झाला होता. जयपूरचे कछवे व मारवाडचे राठोड यांचे कित्येक पिढ्यांचे वैर होते. या स्थितीचा पेशव्यांनीं पूर्ण फायदा घेतला. शिंदे-होळकरांचे हाताखालीं एक फौज मारवाडांत रवाना केली. इ. स. १७३६ च्या एप्रिलांत अभयसिंगाची एकेक ठाणीं घेत ही फौज मेंडत्यावर चालून गेली. पहिल्याच हल्ल्याबरोबर शहर खालीं आलें. खंड भरून मेडत्यानें आपली सुटका करून घेतली, नागोर, अजमीर यांची तीच स्थिती झाली. याप्रमाणें राजपुतान्यांतील मोहिमेचा पूर्ण फायदा मराठ्यांच्या पदरीं पडला.

**बुंदेलखंडची मोहीम : वसुली वाढली**

या सालची दुसरी मोहीम बुंदेलखंडालडे वळली होती हें वर आलेच आहे. दतिया,

ओडसे या दोन्हीं स्थळांतून बोलाचाली करावयास भले माणूस लष्करांत आले. दोन्ही संस्थानांनीं सलोख्यानें बाकीचा निर्गम करून देतांच भदावराकडे बाजी भिवरावाने मोर्चा फिरवला. भदावराशीं बोलणें चाललें असतां सुकलोरा, गुजरोला, पछोर, उचाट व जाटवाडा यांसीं खंडणीचे करार झाले. भदावरकरानें नमतें घेतलें.

### पुढें पाऊल

### पुन्हा बंगशशीं गांठ

इ. स. १७३५ चे नोव्हेंबरात दक्षिणेतून निघालेल्या दोन्ही फौजा आपआपल्यापरीनें कशा व किती विजयी झाल्या हें आतापर्यंत आपण पाहिलें आहे. यापुढें रेटरेकरांनीं बुंदेल्यांशीं राजकरण केलें कीं दोन्ही फौजांनीं मिळून यमुना उतरावी, दुआबांत शिरावे व काल्पी पलीकडील मुलूख मारावा. बुंदेल्यांस ही सूचना पसंत पडली. गाझीपूरचा जमीदार बापांचे मृत्युचा सूड उगवण्याकरितां उत्सुक झालेला होता. तेव्हां बुंदेले पांच हजार, गाझीपूरचा जमीदार व बाजी भिवराव या त्रिवर्गांनीं आगऱ्याच्या रोखें कूच केले. ग्वाल्हेरीचा किल्ला अभेद्य जाणोन बाजी भिवराव वर सरकले. मराठे दुआबांत उतरण्यापूर्वी त्यांना शह देण्याकरितां बंगशची दिल्लीहून रवानगी झाली. बंगश धोलपूरास पोहचला व चमेली उतरून मराठ्यांची वाट अडवून बसला. त्याला बाहेर काढावा म्हणून त्याच्याभोवतीं मराठे राऊत घिरट्या घालूं लागले. दोन तीन तुकड्या यमुनापार होऊन त्यांनीं इटावा, कानपूर इकडे शह बसविला. मोंगल दरबारानें तहाची भाषा सुरू केली तेव्हां अंतर्वेदीतील ही मोहीम तशीच थांबली आणि पेशव्यांच्या अतिलोभामुळें तहाची भाषा बिनसली.

सारांश, इ. स. १७३५-३६ च्या माळव्यांतील, राजपुतान्यांतील व बुंदेलखंडांतील मोहिमा चांगल्याच यशस्वी झाल्या आणि अंतर्वेदींत चंचुप्रवेश झाला. यापुढील प्रगती पुढील प्रकरणांत पाहूं.

### आधार ग्रंथ

पेशवे दप्तर, ग्रंथ १३ व १४
पारसनीसांचा ग्रंथ



**प्रकरण ९ वें**

# दिल्लीवर चढाई व भोपाळची लढाई
## इ. स. १७३७–१७३८

**तुराणी पक्षाची चढ, पेशव्यांची ओढ**

मागील प्रकरणांत मराठ्यांनी माळव्यांत, बुंदेलखंडात जे पराक्रम केले ते आपण पाहिले आहेतच. दिल्ली दरबार समेटास उत्सुक आहे असें पाहून बाजीरावसाहेबांनीं आपल्या अटी कळविल्या. पहिल्या अटी मान्य होण्याच्या अगदीं बेतांत असता एका बाजूनें तुराणी पक्षानें ओढून धरले तर दुसऱ्या बाजूनें अटी क्षणोक्षणीं चढत गेल्या. शेवटीं तहाकडील कल बाजूस पडून दोन्ही पक्षांस युद्धाची जय्यत तयारी करण्याची आवश्यकता भासूं लागली. ही तयारी खालीं लिहिल्याप्रमाणें झाली.

**लढाईस तोंड फुटलें**

राणोजी शिंदे यांनीं ता.२२–६–१७३६ रोजीं दिल्ली येथील वकिलास लिहिलें, ''दोन महिने झाले. खर्च तर अनिवार. तहांत पूर्वी ठरल्याप्रमाणें तमाम गिरासियांचा बंदोबस्त केला. पठारीस ठाणें बसविलें, रयतीस कौल दिला. कराराप्रमाणें सनदा व खर्च व सुभ्याची सनद सर्व गोष्टी करून पाठविणें. येथील बंदोबस्ताचें काम चालीला लावावें लागतें.'' कांहीं उत्तर आलें नाहीं. मोंगलांनीं याप्रमाणें लढाईचा रस्ता दाखविला, तेव्हां त्या सालच्या नोव्हेंबरांत पेशवे उत्तरेची वाट चालूं लागले. शिंदे, होळकर, पवार, माळव्यांत छावणी करून होते. त्यांच्या भेलसा येथें भेट होऊन मोहिमेचा कार्यक्रम निश्चित करण्यांत आला.

### इ. स. १७३७ ची मोहीम

### भदावरचा राजा मोंगलाच्या आशेवर उभा राहतो; पण शेवटीं फसतो

इ. स.१७३७ त पहिला हल्ला भेलशावर झाला. भेलशाच्या पाठोपाठ चंदेरी वगैरे रोहिल्यांच्या जिल्ह्यांतील ठाणीं एकामागून एक सर करीत, पेशवे बुंदेलखंडात उतरले. ओडशा, दतिया, नरवर येथील मामला उरकून भदावरच्या मुलखावर पेशव्यांनीं चाल केली. अलाहाबाद सुभा सादतखान आपणास मदत करील अशी त्या राजास खात्री होती. म्हणून तो लढाईस उभा राहिला. पेशव्यांनीं आपल्या सैन्याचे दोन विभाग केले. एक विभाग राजाच्या मुख्य सैन्याच्या तोंडावर ठेवून दुसऱ्या फौजेनें वळसा घेऊन गोहदच्या बाजूनें अटेर शहरांत प्रवेश केला. शहराचें संरक्षण करण्याकरितां राजा मागें हटला व किल्ल्याच्या आश्रयास गेला. किल्ल्यास वेढा देऊन पेशव्यांनीं येथवर तंग केले कीं राजा सहकुटुंब शरण आला. वीस लाख खंडणी व दहा हत्ती देण्याचें कबूल केल्यावरून राजास जीवदान देण्यांत आलें.

### मोगली फौजा एकत्र जुळण्यापूर्वी त्यांस मराठे तोंड देतात

### अंतर्वेदींतील मराठ्यांचा डाव फिसकटला

मराठ्यांच्या सर्व विजयाच्या बातम्या दिल्ली दरबारास कळल्यावर प्रतिकारार्थ हातपाय हालविणें भाग झाले. अभयसिंग, जयसिंग व सादतखान यांस फौजा घेऊन दिल्लीस येण्याबद्दल फर्मानें सुटलीं. या सर्व फौजांस एक होण्यास संधी न मिळावी म्हणून पेशव्यांनीं जाधव, रेटरेकर व होळकर या सरदारांना पांच-सात हजारानिशीं यमुनापार केले. फिरोजाबाद व इतिमादपूर ही ताब्यांत घेऊन जेलसर येथें मराठे पोहोचले असतां सादतखानाचे फौजेनें त्यांस गाठले. आघाडीस त्याचा पुतण्या मनसूरअलीखान चालत असून त्याजपाशीं बारा हजारांची तुकडी होती. हीच मोगलांची सारी फौज अशा गैरसमजुतीनें मराठ्यांनीं हल्ला चढविला. सादतखानाचे पन्नास हजारावर सैन्य पिछाडीस होते. त्या बाजूस मनसूरखानअली लढाई देत हटला. शत्रुसैन्य आपल्या पांचपट आहे हे लक्षात येतांच मराठे राऊतांनीं यमुनेत घोडीं घातलीं. नदीत कित्येक माणसें व घोडीं बुडालीं. वरकड फौज सुरक्षित पेशव्यांजवळ येऊन पोहोचली.

### सादतखान आगऱ्यास उतरतो

### बाजीरावांचा नवा पेंच

मराठे नदी उतरून पेशव्यांस येऊन मिळाले. त्यांच्या पाठोपाठ नावांचा पूल बांधून आगऱ्यानजीक सादतखान उतरला. वजीर मीरबक्षी यांची फौज आली कीं, मराठ्यांच्या पाठलागास सुरुवात करावयाची असा बेत करून तो आगऱ्यावर राहिला. दुआबांतील बेत विस्कळित झाला. तेव्हां नवीन डावपेंच आखणें पेशव्यांस जरूर झालें. सैन्य सावरून पेशवे आगऱ्याच्या मुलखांतून अलीकडे सरले. त्यांनीं जड सामान बुंदेलखंडांत रवाना केले. त्याचें मर्म लक्षांत न आल्यामुळें मराठ्यांचा शह मोंगली फौजांवर बसत नाहीं अशा भूमिका उठल्या.

**दिल्लीवर मोहीम ठरली**
**पेशव्यांचा पोक्त व दूरवर विचार**
**पेशवे 'साम' अंगिकारतात**

सादतखानास मदत करण्यासाठी वजीर व मीरबक्षी ससैन्य निघाल्याची बातमी बाजीरावांस कळली. सैन्यें एकत्र होण्यापूर्वीच सादतखानाचा समाचार घेतला पाहिजे. पण तो आगऱ्याचा आसरा धरून बसलेला. मोडेल न मोडेल असा संशय. ''यमुना संगमीं दिल धरून राहावे तरी ते जागा जंबून; कोतरखळ्या फार. खानडौरान व बंगश दिल्लीहून आगऱ्यास येत होते, ते एक झाल्यास मनसबा भारी पडेल याकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. तेव्हां सादतखानास बुडवावें किंवा दिल्लीस जाऊन पुरें जाळावें. सादतखान आग्रा सोडीनासे देखोन पेशव्यानें दिल्लीस जावयाचा निश्चय केला.''

मोगलांचीं दोन मोठालीं सैन्यें दिल्लीहून निघून आगऱ्याचे दिशेने कूच करीत होती. दिल्लीच्या आसपास या फौजा फिरकत असतां राजधानीवर चालून जाणें म्हणणे अचाट साहस होतें. हे धाडस उत्तम रितीनें पार पाडण्याकरिता शत्रुसैन्यांच्या हालचालीची बित्तंबातमी ठेवून स्वत:च्या हालचाली अत्यंत गुप्त ठेवणें जरूर होते. बहिरबुणगे (सैन्याबरोबरचे गैरलढाऊ लोक) व तोफांचे लटांबर बरोबर असल्यास वेगाने कूच करण्याच्या मार्गात अडथळा होईल म्हणून त्यांची रवानगी करण्यांत आली. दिल्ली गांठण्याकरितां राजरस्ता सोडून मेवातच्या डोंगरी मुलखांतून मोंगल सैन्यास सुगांवा न देतां झपाट्यानें मराठ्यांनीं दोनशें मैलांचें कूच आरंभिले. वीस-वीस कोसांच्या मजला मारून ता. २८-३-१७३७ रोजीं दिल्लीस बारापुला व कालिकेचें देऊळ उजवे टाकून कुशबंदीनजीक मुक्काम केला. पुरें जाळून खाक करावें तर दिल्ली महास्थळ. पातशहा, बरबाद झाल्यास फायदा नाहीं. दुसरें, पातशहाचे व खानडौरानचे चित्तांत सलूख राखावयाचा आहे. अमर्यादा केल्यास राजकारणाचा दौरा तुटतो. याकरितां आगी लावावयाचे तहकूब करून पातशहास पत्रें पाठविलीं. शहरानजीक राहिल्यानें शहरास उपसर्ग लागेल याकरितां कूच करून पेशवे झस्लच्या तळावर गेले. इतका पोक्त विचार विजयी बाजीरावांनीं केला. आतां दिल्ली दरबाराकडे काय प्रकार चालला होता हें पाहू या.

**मोंगली दरबार; करावे थोडें, बोलावें फार**
**पेशवे दिल्लीहून परतले**

दोन प्रचंड फौजा पाठविल्या असूनही मराठे दिल्लीनजीक येऊन पोंहचले यावरून मराठ्यांनीं आपल्या सैन्याचा फन्ना उडविला. आतां दिल्ली सोडून यमुनापार तरी व्हावें किंवा पेशवे सांगतील त्या अटी कबूल करून तह करावा, हे दोनच मार्ग बादशहास उरले. दरबारांत अनुभव श्रेष्ठांपेक्षां ऐदी कुलश्रेष्ठांचाच भरणा विशेष होता. लढा द्यावयाचा त्या दरबारचा बेत ठरला. मराठ्यांच्या तोंडावर शहरानजीक तलकटोरिया लगत खंदक खणून भोवतीं अराबा मांडून मोगल सैन्य मराठ्यांचा हल्ला येण्याची वाट पाहत बसले. मराठे

अंगांवर चालून येत नाहीत, त्यांनीं दहशत खाल्ली आहे, अशा वेळीं जोरानें हल्ला चढवावा म्हणोन कोका व त्यांचे बरोबरीचे दुसरे उमराव आपल्या फौजांनिशीं मराठ्यांवर चालून गेले. त्यांना तोफांच्या माऱ्यापलीकडे ओढण्याकरितां सटवोजी जाधव मागें सरले. तसा मोगली स्वारांना जास्तच चेव चढला. त्यांना तिन्हीं बाजूंनीं घेरून मोंगल पूर्णपणें आपल्या तावडीत आले आहेत असे दिसतांच बाजीरावांनीं चाल केली. सटवोजी पुढें गेले त्यांजबरोबर मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे, पवार बंधू पुढें सरसावले. त्यांचे यांचे झुंज होऊन मोंगल मोडले. बडे बडे खान शहरांत पळून गेले. दोन हजार घोडा पाडाव झाला. निम्म्याहून अधिक लोक गारद झाले. ही बातमी कळतांच शहरवासियांचा तर थरकांपच उडाला. मालछा टेकडीजवळ छावणी असलेल्या गनिमाच्या सैन्यास आतां शहरांत प्रवेश करण्यास कोणताच प्रतिबंध राहिला नाही. बालिश बोल बडबडणारा सादतखान गप्प बसला. तुराणी पक्षाचें बलाबल बादशहास कळून चुकलें. बाजीरावसाहेब मात्र आपल्या बलाची चुणूक दाखवून लागलेच मागें फिरले. आगऱ्याचे रोखे जाणारा वजीर रस्त्यांतच मागें फिरला. वजीराच्या आघाडीच्या तुकडीशीं झटापट होऊन एक हत्ती व कांहीं घोडीं मराठ्यांच्या लष्करांत आली. नंतर डावीकडे सरकून पेशव्यांनीं चार कोसांवर मुक्काम केला.

**दोन्ही पक्षांचे बलाबल**

दुआबांतील मराठ्यांची फौज आपण बुडविली. पेशव्यांनी तोफखाना बुंदेलखंडांत पाठविला. या गोष्टीवर सादतखान फुशारून बसला असतां त्यांस कळलें कीं पेशव्यांचें लष्कर दिल्लीला जाऊन पोहचलें. तेव्हां खानडौरान, सादतखान वजीर व बंगश सारेच दिल्लीकडे निघाले. पण ते एक होण्यापूर्वीच पेशवे त्यांच्या टप्प्याबाहेर गेले होते. सारांश, बादशाही फरमानानें एकत्र झालेले वजीर, मीरबक्षी, जयसिंग, सादतखान यांच्या व्यक्तिश: अगर सामायिक बलास तोंड देऊन बादशहास, त्या दरबारास, मावळ्यास व बुंदेलखंडास पेशव्यांनीं आपलें तेज दाखविलें. मोगल सैन्य लाखावर जमा झाले होते. या सैन्याजवळ उत्कृष्ट तोफखाना व भरपूर खजिना होता. कुशल डावपेंच खेळून केवळ साऱ्या दहा दिवसांत मेवातच्या डोंगराळ मुलखांतून दोनशें मैलांची दौड मारून पेशव्यांनीं मोगलांवर मात केली. मोगलांच्या दांडग्या फौजेशी युद्धाची वेळ न आणितां केवळ चपळाईच्या धावपळीने त्यास हैराणगत करून सोडिले. इ. स. १७३७ ची ही मोहीम म्हणजे पेशव्यांच्या युद्धकौशल्याची अजब करामत होय.

**इ. स. १७३७ चे मोहिमेचे परिणाम**

तुराणीपक्ष फुटला आणि पेशव्यांस खर्चादाखल तेरा लाखांची रक्कम मिळाली. सारांश, दिल्ली दरबारांतील वातावरण निवळत जाऊन ते पेशव्यांच्या माळव्याचे मागणीस अत्यंत अनुकूल बनत चालले. पण हा बनाव जमत असताच त्यास एक विघ्न उपस्थित झाले आणि तेही अनेक वर्षे फुगत फुगत जाऊन वाढीस लागलेल्या निजामाकडून पुढें आले. ते कसें हें पाहू या.

### भोपाळच्या युद्धापूर्वी

### इ. स. १७१५–२० पर्यंत मराठ्यांचे व निजामाचे संबंध

या विघ्नाचा धागादोरा इसवी इ. स. १७१५ पासून आपणांस लावितां येईल. इ. स. १७१५ त निजामास दक्षिणचा सुभा मिळाला. त्या सुभ्यासमोरच डोळ्यासमोर व आजूबाजूस मराठे होते. पुढें सैयद तेथें आले. बादशहावर आपले वजन पडावे म्हणोन वाढत्या बळाच्या मराठ्यांचें त्यानें साह्य घेतले. इ. स. १७१८–१९ ची बाळाजी विश्वनाथाची दिल्लीची मोहीम व तदनुषंगानें प्राप्त झालेल्या स्वराज्याच्या व चौथाईच्या सनदा हे त्या स्नेहाचेंच फल होय. इतकें काम होतें तों सैयद दक्षिणेंतून गेले आणि इ. स. १७२० त निजाम दक्षिण सुभ्याचे जागेवर आला. थोड्याच वेळांत त्यानें आपल्या मुसलमान प्रतिस्पर्ध्यांस पाडिले, कर्नाटकांत स्वारी नेली आणि परत राजधानीस येतो तों त्याची दिल्लीस वजीराचे जागेवर नेमणूक झाली.

### मराठ्यांचे साह्यानें इ. स. १७२४ त निजाम स्वतंत्र होतो

### निजामाचे डावपेंच सुरू होतात

पण दिल्लीचे वातावरण त्यास मानवेना, आजूबाजूची स्थिती अवलोकून त्याचेही मनांत स्वातंत्र्यप्राप्तीची इच्छा उद्‌भवली. शिकारीचें निमित्य काढून त्यानें दिल्ली सोडली ती कायमचीच सोडिली, आणि दक्षिणेची वाट धरली. थोड्याच अवधींत पेशव्यांस त्यानें मिळवून घेतले आणि इ. स. १७२४ त मुंबरीजखानाचा पाडाव करून स्वातंत्र्य पुकारिलें. याप्रमाणें निजामशाहीचा जन्म मराठ्यांचे साहाय्यानें झाला हे ध्यानांत धरण्यासारखें आहे. पुढें चौथाई सरदेशमुखीचा प्रश्न उद्‌भवला असतां मराठ्यांचा खरा अधिपती शाहू कीं संभाजी असा वाद उपस्थित करून मराठे सरदारांचा बुद्धिभेद करण्याचा निजामानें प्रयत्न केला. इ. स. १७२८ त पालखेड येथें निजामास कोंडून मुंगी शेवगांवच्या तहानें त्याच्याकडून दक्षिणच्या चौथ सरदेशमुखीची कबुली पेशव्यांनीं वदविली.

### निजामाचे डावपेंचाची दुसरी कला

### डावपेंचांतील तिसरी कला

यापुढें उघड वैर न दाखवितां साधेल त्या मार्गानें मराठ्यांचे सामर्थ्य खच्ची करावयाचे धोरण त्यानें ठेविले. इ. स. १७३१ त सेनापती दाभाडे यांस उचलून धरलें. पण निजामाचा हा प्रयत्न फसला. इ. स. १७३२ त बाजीरावास भेटीस बोलावून उत्तरेकडे लक्ष द्यावें, प्रांत व द्रव्य तिकडे अपरंपार मिळेल असा सल्ला दिला व दक्षिणेंत आपण कोणताही तंटा उपस्थित करणार नाहीं अशी हमी दिली. पण यातीलही त्याचे धोरण फसले. इ. स. १७३३ ते १७३५ या वर्षांत मराठे माळवा व बुंदेलखंड इकडे गुंतले असतां प्रतिपक्षास स्वार, जेजाला व बाणाचे उंट पाठवून मदत केली. इ. स. १७३५ त खुद्द पेशवे उत्तरेस आले. इ. स. १७३६ त दिल्ली दरबाराशीं तहाच्या गोष्टी सुरू झाल्या. पेशव्यांनीं चढाईचें

धोरण धरून काल्पी गाठली व  दिल्लीवर झडप घालून बादशहास भेडसाविलें. पेशव्यांचे सामर्थ्य खच्ची होण्याऐवजीं उलट बादशाही भक्षण करून पेशवा आपलेही जीवित साशंक करणार असे निजामास दिसतांच निजामानें फौजेची कलमजारी सुरू केली. पेशव्यांचे प्रगतीस वेळींच पायबंद बसला नाही तर मोंगली सत्ता रसातळाला जाऊन स्वत:वर तोच प्रसंग ओढवणार हे बादशहाशी संगनमत करून एकजूटीनें पेशव्यांचा प्रतिकार करण्याचें निजामानें ठरविलें. सारांश, निजामाचा रंग वेळोवेळीं कसा पालटत गेला हे आतांपर्यंत आपण पाहिलें. इ. स. १७१५ त उघड शत्रू, १७२४ त ''हातात हात आणि गळ्यांत मिठी, १७३० त'' जिव्हेवर मधु आणि ह्रदयांत हलाहल आणि हे सर्व पेंच फसल्यावर दिल्ली दरबारांत स्वत:बद्दल झालेला गैरसमज दूर करण्याचे सोंग घेऊन आतां इ. स. १७३७ त निजाम उत्तरेकडे निघाला. असा हा मागचा संबंध व्यवस्थित समजल्यानें, पुढील भागांवर चांगला प्रकाश  पडेल.

**निजाम उत्तरेकडे चालला, दक्षिणेंत त्यानें केलेला बंदोबस्त**

बऱ्हाणपुरास मार्च, ता. ३१ रोजीं निजामाचा मुक्काम होता. तत्पूर्वी मराठ्यांपासून उपद्रव होऊं नये म्हणून (अ) खानदेशांत अब्दुल रहिमानखान व अनरुलखान पांच हजार स्वारांनिशीं, (आ) पुत्र नसरतजंग औरंगाबादेस पांच हजार स्वारांनिशीं, (इ) विजापूर, बीड, पाथरीच्या प्रदेशावर जाधव चंद्रसेन, (ई) वऱ्हाडात रघुजी भोसल्याच्या तोंडावर सुजायतखान, असा कडेकोट बंदोबस्त करून निजामानें दक्षिण सोडली. छत्रपतीस व पेशव्यांस लिहिलें, ''आपले शिरी बंडखोरीचा शह आहे. तो खावंदाजवळ फेडावा म्हणून बादशहाचे भेटीस जात आहोंत. तुमचा आमचा भाऊपणा आहे त्यांत खता नाहीं.''

**मराठ्यांनीं दक्षिणेंत योजिलेले प्रतिबंध**

**निजाम दिल्लीस पोहचला**

निजाम १९ एप्रिलला बऱ्हाणपुरापासून ३५ मैलांवर पोंहचला. सादतखान व आपण एकत्र होऊन मराठ्यांस नर्मदापार लावावे. असा निजामाचा बेत. दुसऱ्या बाजूनें पेशवे जागरूक होते. चिमाजींनीं निजामास दक्षिणेंतच रोखून ठेवावें. अशी बाजीरावांची आज्ञा. पण चिमाजी आधीच पोर्तुगीजांविरुद्ध गुंतले गेले होते. ती हकीगत पुढील प्रकरणांत साग्र येईलच. खानदेशांत आवजी कवडे तोंडावर उभे होते. पण निजामाच्या सरदारानें त्यांस हुसकावून लाविल्यामुळें दक्षिणेंत कोणताही प्रतिबंध न होतां निजाम उत्तरेंत सरकला. तो सिरोंजपर्यंत मे महिन्यांत येऊन पोहचला व भोपाळकर यारमहमद त्यास सामील झाला.

निजामाच्या गोड वाणीस न भुलण्याइतकें शहाणपण बाजीरावसाहेबांस खात्रीनें होतें. एका बाजूस निजाम व भोपाळकर एकत्र झाले होते. दिल्ली दोनअडीचशें मैल दूर असा एके बाजूचा प्रकार, तर दुसऱ्या बाजूस सर्वत्र विजय संपादून भदावरकडून ससैन्य बाजीरावसाहेब आलेले. त्यांच्या एकंदर मागील चालचलणुकीवरून पाहतां निजाम दिल्लीस

जाण्यापूर्वी एकाकी सांपडला असतां त्यास त्यांनीं जेरीस आणावयाचे. पण यावेळीं अगदीच अनपेक्षित प्रकार घडला. पेशव्यांनीं निजामाचे मतलब समजून घेण्याकरितां त्याचे भेटीस जाधवांस रवाना केले, त्यांची व निजामाची भेट झाली. पूर्वीप्रमाणें स्नेहवादाच्या कित्येक गोष्टी सांगून निजामानें सिरोंजचा मुक्काम हलवून काळापाणी, शहाडौरा, बुढाडोंगर यामार्गे तो दिल्लीकडे रवाना झाला.

### निजामाचा दिल्लीत बडेजाव, युद्धाची तयारी

निजाम दिल्लीनजीक पोहचतांच, मोठ्या सन्मानानें त्याचें स्वागत करण्यांत आलें. त्याच्या कोणत्याही सुखसोईत कमतरता न पडूं देण्याविषयीं खुद्द बादशहानें दक्षता राखिली. दरबारांत निजामानें कुलअख्त्यार आपले नांवें करून घेतला व बादशहाशीं करार केला कीं, ''पांच सुभे देणें व करोड रुपये देणें.'' पातशहांनीं निजामाच्या म्हणण्यास मान्यता दर्शवून माळवा, आग्रा या प्रांतांच्या सुभेदारीवर निजामाचा पुत्र गाजीउद्दीन याची नेमणूक केली. नायब सुभे म्हणून माळव्याचा कारभार गेल्या वर्षापासून बाजीरावसाहेब पाहात होते. निजामानें आपल्या पुत्राच्या नांवें माळवा करून घेतला. म्हणजे पर्यायेंकरून पेशव्यांस निजामानें युद्धाचे आव्हानच दिले आणि युद्धाची तयारी केली.

### निजामाचे दक्षिणेकडे कूच; वाटेत सहकारी संपादिले

तीस हजार उत्कृष्ट सैन्य व तोलदार तोफखाना घेऊन निजाम माळव्याच्या रोखें परत वाट चालूं लागला. आगऱ्यानजीक यमुना उतरून नदीच्या डाव्या किनाऱ्यानें कूच करून काल्पीच्या उतारास परत ती नदी ओलांडली व बुंदेलखंडातून माळव्यावर चढाई केली. बुंदेलखंडांतून कूच करण्यात मार्गाची सुगमता हा तर निजामाचा एक उद्देश होताच, त्याबरोबर मराठ्यांस सामील होऊन बादशाही मुलखावर हल्ला चढविणाऱ्या बुंदेल्यांचा भेद करून त्यांचे साहाय्य पेशव्यांस मिळूं नये हाही तितकाच महत्त्वाचा हेतू होता. दतियेकर, ओडसेकर, छत्रसालाचा मुलगा सोभानसिंग हे निजामास येऊन मिळाले. फौज सत्तर हजार तमाम भारी चांगली, सव्वाशें हातनाला आणि जेजालांचे व बाणांचे व सुतरनाल्यांचे उंट तीन हजार, इतकी फौज जमा झाली. धामोणीवरून सिरोंज, तेथून भोपाळ येथें डिसेंबरांत निजाम पोहचला.

### पेशवे खरगोणवरून कूच करतात<br>दक्षिण बाजू धरून ठेवितात

आतां दुसऱ्या पक्षाची तयारी पाहूं या. बाजीरावसाहेब खरगोणावरून पुनाशाजवळ ऐशीं हजार फौजेनिशीं नर्मदा पार होऊन त्यांनीं माळव्याचा मार्ग धरला. दक्षिणेंत निजामाच्या मुलांनी फौज उभारण्यास सुरुवात केली होती. दक्षिणेतील सैन्य निजामास सामील झाल्यास शत्रू पक्ष आपणास भारी होईल, हे जाणून बाजीरावांनीं आपले पिछाडीचे रक्षणाचे काम चिमाजी अप्पावर सोपविलें.

**दोन्ही पक्ष भोपाळ मुक्कामीं समोरासमोर येतात**

**मराठ्यांचा गनिमी कावा**

**निजामास येणारी बाहेरील मदत मराठे अडवून धरतात**

दक्षिणेतील सैन्य सामील झाल्यावर मराठ्यांशीं लढाई घ्यावयाची असा निजामाचा संकल्प असतां, धाऊन जाऊन पेशव्यानें निजामास गांठलें, निजाम भोपाळच्या किल्ल्याच्या आश्रयास गेला व ''तळें पाठीशीं नाला पुढें करून राहिला. निजामाकडे सवाईचे पुत्र व बुंदेले सोभागसिंग व जाट व रजवाड्यांच्या फौजा व तोफखाना ऐसी एकतोंडी झुंझाची जागा होती ती वाट बांधून पुढें राहिले. आपण खासा पाठीवर उभा राहिला. मराठी फौजा राणोजी शिंदे, जाधव, गुजर व किरकोळ पथकें रजपुतांचे फौजेवर उठलीं. तोफांची एक रंजक खाऊन मराठे राऊत शत्रूशीं जाऊन भिडले. तोफांच्या माऱ्यामुळें व नाला आडवा आल्यामुळें मराठ्यांस निजामाच्या सैन्याशीं लगट करता येईना. तेव्हां शत्रूच्या गोटापासून दोन बाणाच्या टप्प्यावर बसून मराठ्यांनी शत्रुसैन्यास वेढण्यास सुरुवात केली. बाहेरून सर्व मार्ग रोखून कहीकाबाड बंद केली. रुपयाचे पीठ चार सेर झालें. हत्ती, घोड्यांस एक दिवस झाडांच्या साली व लव्हाळे चारिले. रजपूत बुंदेले निजामाबरोबर येऊन पस्ताव्यांत पडले. नुसत्या उपासमारीनें शत्रूस हैराणगत करून मराठे स्वस्थ बसले नाहींत. त्यांनीं रात्रीचे दारूचे बाण चालविण्यास सुरुवात केली. आकाशांतून हे अग्निलोळ वेढलेल्या शत्रुसैन्यांत येऊन पडले कीं माणसांची व जनावरांची एकच दाणादाण होऊन जाई. याप्रमाणें शिंदे, जाधव, शत्रूस जेर करीत होते, तर मीरमानीखानसारखे निजामास कुमक पोंहचविण्याचा प्रयत्न करीत होते. त्यावर होळकर मल्हारराव व पवार यांनीं धावून जाऊन त्यास जिवंत पकडून ठार केलें. निजामानें बादशहाकडे मदत मागितली. आधीच बादशहा सर्वस्व देऊन बसला होता. ही अर्जी आल्यावर त्याने वजीरास व सेनापतीस फरमाविलें कीं तुम्ही जातां कोठें, आम्ही निघूं तेव्हां समागमें असावें.

**दक्षिण मराठ्यांनीं अडविली**

निजामास आतां येऊन जाऊन आशा राहिली मुलाच्या कुमकेची. त्यावर मराठ्यांनीं उपाययोजना करून ठेविली होती. बाजीरावसाहेबांनीं चिमाजीस सूचना केली कीं, दाभाडे, गायकवाड, बांडे, यांस बोलावून घ्यावें. छत्रपतींनी फत्तेसिंग भोसले, शंभूसिंग जाधवराव, सरलष्कर व रघुजी भोसले यांस आज्ञा केली कीं ''दक्षिणची फौज निजामास सामील होऊं न द्यावी यास्तव चिमाजी बल्लाळ खानदेश प्रांतीं राहिले आहेत, त्यांस टाकोटाक फौजेनिशीं जाऊन सामील होणें.''

**निजामाची दक्षिणेंतील बाजू**

**रघूजीचा पराक्रम**

नासिरजंगानें सुलतानजी निंबाळकर, जानोजी निंबाळकर. चंद्रसेन, अनरुलाखान, मुल्लादुदाखान इत्यादिकांची मिळून बारा पंधरा हजारपर्यंत फौजा जमा केली. पेशव्यांस

मिळावयाच्या उद्देशाने रघुजी भोसले निघाले असतां सालबर्डीनजीक घाटतोंडे पोक्त फौजबंदी करून एलिचपुराचा सुभा सुजायतखान आडवा चालून आला. युद्ध मोठें झालें. सुजायतखान वगैरे सरदार धरले गेले. फौज तमाम लुटली गेली. रघुजीच्या धास्तीनें शेवटपर्यंत नासीरजंग फुलंब्रीवर राहिल्यामुळें दक्षिणेंतील कुमक निजामास पोंहचली नाहीं. सारांश, उत्तरेकडील मदत बादशहाच्या कमकुवतपणामुळें पोंहचली नाही, तर दक्षिणेतील मदत मराठ्यांच्या पराक्रमानें वर येऊं शकली नाहीं.

**निजामाची दुर्दशा**

**मूळ स्वभाव जाईना**

**दुराईचा तह : इ. स. १७३८**

इकडे निजामाला मराठ्यांची मिठी दिवसेंदिवस जास्तच घट्ट बसत चालली. भोपाळभोंवतीं चौकीबंदी झाली. ता. २६-१२-३७ रोजीं निजामानें पेशव्यांकडे वकीलास पाठविलें. ''निजामाची बेअब्रू होऊं नये. अब्रू राखिली तर तुमचे सर्व मतलब मान्य करतील. ही अट मान्य करून तळ मागें हटवून कोसांचे अंतरें पेशवे राहिले. दुसऱ्या दिवशीं वेगळाच प्रकार मराठ्यांच्या नजरेस पडला. तहाचीं बोलणीं अर्धवट सोडून एकाएकीच कूचाचा नगारा करून निजामाचे सैन्य भोपाळचा रस्ता चालूं लागले. आबाजी कवडे व पवार यांनीं निजामाचें दूमदारीस (म्ह. मागे घेणे) घाव घातला. जाटाच्या व कवड्यांच्या फौजेची एकच सरमिसळ झाली. फाटकाआंत पाहिलें बुणगें ठेविलें होतें त्याजवळ निजाम जाऊन अडचणींत राहिला. मराठ्यांनीं पूर्वीपेक्षांही जास्त कसोसीनें बंदोबस्त करून दाणागवत सर्व बंद केले. याप्रमाणें केवळ तेवीस दिवसांत पेशव्यांनीं निजामास नामोहरम केलें. बाजीरावसाहेब ब्रम्हेंद्रस्वामींस लिहितात, ''तमाम राजे भेटींस (निजामानें) पाठविले, मोठा समारंभ झाला. ता. ७-१-३८ रोजीं दुराईसराई येथें ठराव झाला, माळवा दरोबस्त द्यावा. पातशाही सनद दिल्लीस गेल्यावर करून द्यावी. द्रव्याची बोली पहिली राजश्री धोंडो गोविंद यांचे विद्यमानेची आहे त्याची रदबदल करून जे साधेल तें करून द्यावें. नर्मदा व चंबल यामधीं राजेरजवाड्यांपासून पैका कमपेस घेणें तो घ्यावा.'' माळवा दरोबस्त जहागीर सुभेदारीचे यादीवर दसकत (सही) करून निजामानें दिली व ''द्रव्यही साधेल ते पातशहापासून करून देऊं'' असें लिहून दिलें.

**उरल्या सुरल्याचें पारिपत्य**

**निष्कर्ष**

वेढा चालू असतां ज्या राजेरजवाड्यांनीं निजामास साह्य केले त्यांना शिक्षा देणें आतां क्रमप्राप्तच होतें. म्हणून प्रथम मराठ्यांनीं कोट्यावर चाल केली. ''कुली परगणा लुटून नेस्तनाबूत केला. कोटेकर महाराव पळून गढगांगुर्णीस गेला व तेथून त्यानें सलूखाची याचना केली. खंडणी रुपये दहा लक्ष द्यावे असा करार झाला.'' कोट्याकडून अहीराचे

मुलखांत मराठे उतरले. अहीर बाहेर काढून ठाणीं घेतली. कुरवाई सर करून पेशवे दक्षिणेंत निघून गेले व पुण्यास जुलाईच्या ता.१५ रोजीं पोंहचले.

सारांश, इ. स. १७१५ ते १७३८ या अवधींतील निजामाचे सर्व डावपेंच फशीं पडले. उत्तरेंत तहत दिल्लीपर्यंत मराठ्यांचा रुबाब वाढला. छत्रपतींचे दरबारांत पेशव्यांचे वर्चस्व कायमचें बसलें.

**आधार ग्रंथ**


पेशवे दप्तर निवडक कागद, ग्रंथ नं. १४

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र नं. ३४




## प्रकरण १० वें

# वसईची मोहीम उर्फ वसईचें धर्मयुद्ध
## इ. स. १७३७ ते मे १७३९ अखेर

*''मरावें परी कीर्तिरूपे उरावें''*

**इ. स. १७२० ते १७३८, मराठे व मोंगल यांची उत्तरेंत चढउतर**

आतांपर्यंत मराठ्यांचे जे पराक्रम आपण वर्णिले ते बहुश: स्वराज्याबाहेरील खानदेश, गुजरात, माळवा, बुंदेलखंड व अंतर्वेद या प्रांतांतील होत. या प्रांतांतील मुख्य वस्ती हिंदुंचीच होती. औरंगजेबाचे कारकीर्दीत, पूर्वीचे सर्व उदार धोरण सुटून, सर्व यावनी करण्याचे प्रयत्न चालू झाले. ही गोष्ट हिंदुमात्रांच्या हृदयास झोंबली. या संकटातून कसें सुटावे याचा विचार सर्वत्र चालू असतांच छत्रपती शिवाजी महाराजांची व त्यांचे पश्चात त्यांच्या अनुयायी मराठे गड्यांची कृती व कीर्ति समोर आली. अठरावें शतकाचें प्रारंभीं जयपूर, जोधपूर, उदेपूर एकदिल झाले. माळव्यांतील जमीदार, बुंदेलखंडातील छत्रसाल व अंतर्वेदींतील जाट यांस श्रीमंत बाजीरावसाहेब आपले सगेसोयरे वाटू लागले. याचा परिणाम असा झाला कीं इ. स. १७२० ते १७३८ या अठरा वर्षांत मराठ्यांचे पाऊल उत्तर हिंदुस्तानांत उत्तरोत्तर झपाट्यानें पुढेंच पडूं लागलें. दिल्ली दरबार, भोपाळचे नबाब, भागानगरचे निजाम हे वांकून वागूं लागले व तितक्याच मानानें होळकर, शिंदे, पवार, इत्यादि फौजबंद मराठे सरदारांनी कमान चढती होऊन ते प्रांताधिपति बनून गेले, हें आपण वर पाहिलें आहे.

हा झाला मराठ्यांचा उत्तरेकडील कार्यभाग. आतां याच सुमारास दक्षिणेंत काय चाललें होतें हें आपण पाहूं या.

### जंजिऱ्याचा सिद्दी

छत्रपतींनीं जे स्वराज्य स्थापिले त्यास एका बाजूनें समुद्राचें सानिध्य आहे. ती बाजू चांगली रक्षिली पाहिजे म्हणोन वसई व मालवण ही दोन बंदरें करून त्यांनीं तेथें आपलें आरमार स्थापिलें. या दोन बंदरांच्या मध्येंच जंजिऱ्याच्या हबशांचा प्रांत लागतो. हें एक मोठे हृदयशल्यच होते. दिल्लीपतींचे तें एक छोटेसें प्रतीक होतें. हा हबशी हिंदुधर्मीय प्रजेस काळासारखा झाला होता. तो काढून टाकावा असें छत्रपतींपासून तो तहत लहानसहान सरदारांपर्यंत सर्वांस वाटू लागले होते आणि श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे, चिमाजी अप्पा, यांस अधूनमधून उत्तरेचे काम अपुरे टाकून खालीं यावे लागे. येथें धर्मच्छलाचाच प्रश्न प्रामुख्यानें पुढें आला होता. श्रीब्रम्हेंद्रस्वामींस स्वत:लाही झळ लागली. तेव्हां तर हा प्रश्न जोरानें पुढें आला. आंग्रे सज्जच होते. युरोपियनांचें हबशांस आंतून साह्य होतें. या युद्धांत मल्हाररावांचा संबंध विशेष नसल्यामुळें केवळ दिग्दर्शन करून आपण दुसरीकडे वळूं या.

### वसईकडील हकीगत

पण याहीपेक्षां धर्मच्छल अधिक विकोपास चढून सर्व हिंदू समाजाची एकजूट झाली तो प्रश्न वसई प्रांतीं उद्‌भवला. आपल्या इतिहासाचें कार्य या युद्धाशीं बरेच निगडीत आहे, तेव्हां तिकडे वळूं या.

### थोडासा पूर्व इतिहास परिचय

वसई हा शब्द संस्कृत 'वस' या धातूपासून निघाला, असे राजवाडे सांगतात. या धातूचा अर्थ 'राहणे', 'वसाहत करणें' असा स्पष्ट होतो. तेव्हां उत्तरेतून आलेल्या आर्यांनीं येथें वसाहत करून हें नांव दिले असावें. उत्तम हवा, सुपीक जमीन व समुद्राचें सानिध्य, या तीन नैसर्गिक देणग्यांपेक्षां वसाहतीस आणखी ते काय हवे? ते सर्व येथें लाभल्यामुळें वसाहत चांगली उत्कर्षली असणारच. जवळ असलेलें 'सोपारे' हा गांव सध्या पडित असला तरी ग्रीक लोकांचे स्वारीचे वेळीं व अशोक कालांत त्याची प्रख्याती होती. बुद्धाचे कांहीं अवशेष येथें गेले शतकांत आढळले आहेत.

कांहीं काळ एतद्देशीय राजांच्या ताब्यांत, नंतर मुसलमानांच्या अंमलाखालीं वसई राहून, पंधराव्या सोळाव्या शतकांत पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांत गेली. पोर्तुगीज राष्ट्र त्या काळीं आपले आरमारी शक्तीवर जगांत पहिल्या प्रतीचें बनून राहिलें होतें.

### पोर्तुगीजांची सत्ता व लोकांचा धर्मच्छल

शक्तीबरोबर संपत्तीही वाढली आणि संपत्तीच्या वाढीबरोबर ही नीतिबंधनें शिथिल होऊं लागली. ''ठाणें म्हणजे बिंबस्थान'' हें राज्य फिरंगीयांनीं घेऊन कुबुद्धी धरिली. जमीनदारांचीं वतनें बुडविलीं. गांवचे गांव घेऊन बाटविले, किरिस्तांव केले. घरांत कोणी

नसेल तर पोरे नेऊन बाटवावीं. प्रांतांतील तीर्थक्षेत्रे सर्व लोपली. देवालयें फोडून साफ केली. फिरंग्यांनीं आपली देवळे बांधलीं. लोक कष्टी जाहले. पळोन कोणी कोणी दक्षिण प्रांतीं जाऊन राहिले. क्रियाकर्मे लोप जाहलीं. लोकांस धरून न्यावें, बंदी कष्टी करावे, बंदीखान्यांत कुजवावें, असा अनर्थ मांडिला. (**साष्टीची बखर पृ. २**) पाठारे प्रभु ज्ञातीचे हिंदू लोक या उपद्रवामुळें त्रासुन जाऊन केळव्यास येऊन राहिले. नंतर तेथून अनंजुरास आले. त्यांचे पुढारी गंगाजी नाईक व बुवाजी नाईक यांनीं देहूकर साधु तुकाराम यांचे चिरंजीव नारायणबुवा गोसावी यांचे मार्फत खंडेराव दाभाडे सेनापती यांचेकडे संधान बांधिलें. ''कान्होजी आंग्रे यांचेकडे गंगाजी नाईक गेले. त्याचे मनांत मुलूख काबीज करावा ऐसें नाही; मग तो विचार टाकून घरीं आले.'' **(साष्टीची बखर)**

### लोकांनीं केलेली उचल

मराठ्यांचा सुभा खुद्द कल्याणास स्थापन झाल्यामुळें गंगाजी नाईक वगैरे मंडळीस सेनापती दाभाडे यांच्या फौजेची मदत घेण्याची आवश्यकता राहिली नाहीं. त्यांनीं चिंचवडचे श्रीदेव गोसावी यांच्यामार्फत कल्याणचे सुभेदार यांच्याशीं फिरंगी लोकांसंबंधी राजकारण सुरू केले. नंतर गंगाजी नाईकांनीं आपले साथीदार लोक कल्याणचे सुभेदारास भेटवून ठाणें, वांद्रे, वेसावें, वसई, अरनाळा, तारापूर व डहाणू असा सलगचा सलग समुद्र प्रांत व्यापून घेतला.

### ठाण्यास मल्हारजींचा समुद्रावरील विजय

गोव्याच्या गव्हर्नरांनीं अंटोनियास मुद्दाम पाठविलें होतें. पोर्तुगाल देशातून नवे उमेद माणूस आणिले होते. त्यावर मल्हारराव होळकरांनीं विजय संपादिला. (डिसेंबर इ. स. १७३८) तारापूरचें वृत्त चिमाजी अप्पाच्याच शब्दांत खाली देतों. ता. २४ जानेवारी इ. स. १७३९ ''रात्रीं चार पांच सुरुंग मल्हारजी होळकरांकडून तयार झाले. तैसेच हुजूरातच्या सुरुंगाचे तीन फाटे एकाचे करून कुसाखालीं नेले. तसेंच यशवंतराव पवार यांजकडीलही एक तयार झाला. तयार झाले त्यास आज दोन घटका दिवसास बत्ती दिली. सुरुंग एकामागून एक अंतर करून उडाले. सरकारच्या सुरुंगानें खिंडार पडले. तैसेच मल्हारबाचा खासा सुरुंग बुरजाखालीं. तेथेंही खिंडार मोठें पडलें. हुजरातचे निशाणाजवळ राजश्री बाजी भिवराव व रामचंद्र हरी होते व सारे नामांकित लोक तितके होते. हुजरातच्या निशाणच्या उजवेकडे मल्हारबाची निशाणें सारीं होतीं.तैसीच राणोजी भोसले यांचीं होतीं. त्यांनींही शर्थ करावयाची तैशी केली.''

### वसईचें युद्ध

पुढें ता. २९ जानेवारी इ. स. १७३९ रोजीं अप्पा स्वामींस लिहितात, ''माहीम, केळवे, सीरगांव, तारापूर, डहाणू, नारबोळे व खत्तलवाडा इतक्या जागा स्वामींच्या आशीर्वादे फत्ते झाल्या. वांदरे व धारावी हीं स्थळें राहिली आहेत.'' पुढें ता. १३ मेला पत्रांत लिहितात, ''वसईस आज अडीच तीन महिने मोर्चे लाविले. त्या दारभ्य मोर्चेच लाविले व धमधमे

चार-पांच बांधिले, सुरुंग चालविलें. जे जे उपाय स्थळ हस्तगत करावयाचे ते केले. फिरंगीयांनीं सुरुंगांवर व धमधम्यावर गरनाळा (विशिष्ट तोफा) टाकिल्या, सुरुंग विच्छिन्न केले. पनाळे लावून पाणी सोडिलें, आगीचे ओंडे टाकून त्यावर तेल, दारू, राळ टाकून चार-चार रोज डोंबराही सारखा करी. बरकंदाजी (तोडेदार बंदुकीचा मारा) व तोफजी फिरंगीयांची निस्सीम म्हणावी तैसी. आम्ही तोफा लागू करून फिरंगीयांच्या तोफा मना केल्या. वसई जागा बांकी, बुलंद (म्हणजे श्रेष्ठ). सुरुंगाचा उपाय नाही. परंतु सुरुंग चालवून दोन्हीं बाजूंनीं खांबावरती तक्तपोशी, त्यावर दोन अडीच हात रेती टाकून, सुरुंग १० नेऊन पोहचवून, दोनशें पाथरवट लावून मोठमोठे चीरे फोडून, सुरुंगाचे बुडलियांत (म्हणजे तळाशी) जागा करून, ता. १ मे रोजीं सकळ सिद्धता करून, लोकांस बाजू वाटून देऊन, नगाऱ्यांची इशारत करून, सुरुंग उडतांच सर्वांनीं एलगारास (म्हणजे हल्ला) उठावें, बुरुजावर शिड्या देऊन चढावें, ऐसा करार करून दुसरें दिवशीं दोन घटिका दिवसास प्रातःकाळाचा समय येतांच सुरूंगास बत्त्या दिल्या. डावे बाजूचे सुरुंग कांहीं उडणें होते तोंच लोकांनीं उतावळी करून कोटावर चालोन घेतले. तो दुसरें सुरुंग तेच बाजूनें उडाले. यांनीं लोक गडबडले व जाया व ठार झाले. तसेच उजवे बाजूचे सुरुंग उडाले. एक-दोन उडतांच बुरजास वाट झालीसी देखून लोक वरती चढले. तों दुसरें सुरुंग उडाले. त्यांनीं वरती चढले. होते ते उडोन गेले. हिरमोड होऊन काम थंड पडले. फिरंगीयांनीं गरनाळा व रेजगिरीचा मार 'न भूतो न भविष्यति' केला. त्यानें लष्करचे लोकांत व हशमांत (नोकर-चाकर) अवसान राहिलें नव्हतें. उजवे बाजूचा मातब्बर सुरुंग राजश्री मल्हारजी होळकर यांजकडील उडणें होता. त्याचा शोध करून पुन्हा त्यांत बुधले घालून रंजक दुरुस्त करून लोकांची निवड केली आणि सुरुंग उडतांच खामखा निशाणें चढवावीं असा करार करून ता. ३ रोजीं उजवे बाजूचा सुरंग उडविला. तेच समयीं लोक जाऊन बुरूज अर्धा उडाला त्याजवरी लढले. फिरंगीयाने सफेलीच्या आंतून मेंढा घालून, पोटीं भरून, तोफ जोडून, तयार होतांच तेथें फिरंगी बोलावून हाके गरनाळ्याच्या दारूच्या बत्त्यांस आग लावून मारा केला व रेजगिरीचा मार सीमेपरता केला. लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढलें. फिरंगीयांनीं मर्दुमी शिपाईगिरी म्हणावी तैसी केली. त्याचप्रमाणें युद्ध केलें. लोक बुरूज सोडिनातसे झाले. तेव्हां फिरंगी धर्मद्वेष्टे बेहिम्मत होऊन ता. ४ मे रोजीं प्रहर दिवसास कौलास आले. कौल घेतला. आठा दिवसांत कबिल्यासह झाडून जातों असें करार केले. त्यावरून मार तहकूब केला. फिरंगीयांनीं कबिले वस्तभाव गलबतांत भरली व ता. १२ मे रोजीं फिरंगी झाडून गेला. जागा फत्ते झाली. लष्करचे व हमशाचे लोक सुरुंगानें उडाले व जाया ठार अजमासें ५००० पांच हजार किंबहुना विशेष होतील. तैसेच फिरंगीयांचे सातआठशें माणूस यानिराळे ठार व जखमी झाले.'' मल्हारजींनीं वसईतून वसुली रु. ८८,३४४ केली. **(पुणें रेकार्ड जमाखर्च झाडा)**

सविस्तर ग्रंथ राजश्री यशवंत नरसिंह केळकर यांचे हस्तें सुमारें पांचसहाशें पृष्ठांचा प्रसिद्ध झाला आहे. तो ग्रंथ जिज्ञासूंनीं अवलोकन करावा. आम्ही होळकरशाहीच्या इतिहासास

जरूर तितका भाग येथें दिला आहे. मल्हारजी होळकरांची युद्धकलेंतील दृष्टी व कुशलता या वर्णनांत दिसून येणार आहे. आतांपर्यंत म्हणजे इ. स. १७३९ पर्यंत व यापुढेंही मैदानांतील लढायांत ते यशस्वी झाले; पण समुद्रावरील युद्धांतही ते तितकेच यशस्वी झाले, हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

**इतिहासाचें एक नवीन दालन**

येथे जातांजातां एक विशेष गोष्ट नमूद करावयाची आहे, ती अखिल महाराष्ट्राचे इतिहासाला लागू पडण्यासारखी आहे असें वाटतें. ग्रांट डफ पासून रियासतकारांच्या ग्रंथांकडे पाहिल्यास इतिहास विवेचनाची प्रगती, व्याप्ती, विस्तृतता व खोली ही सर्व वाढल्याचे पाहून आनंद वाटतो. कालानुसार हे कार्य पुढें चालू राहावयाचेंच. तेव्हां जर एखादी नवीन बाजू कोणाच्याही नजरेस आली तर ती जनतेपुढें त्यानें मांडावी; आणि याच भावनेनें पुढील उपक्रम आम्ही करीत आहोंत.

मुसलमांनीं व पोर्तुगीजांनीं हिंदूंचा धर्मच्छल केला म्हणोन स्वधर्मरक्षणार्थ हिंदूंनीं शस्त्र हाती धरिलें असें आज आमचे इतिहासकार म्हणतात. ज्यांनीं स्वतः शस्त्र धरिले व धारातीर्थी देह ठेविले त्यांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत या संबंधात काय सापडतें तें पाहूं या.

वेदशास्त्रसंपन्न राजश्री चिमणभट टकले, गोत्र शांडिल्य, वास्तव्य जनस्थान स्वामींचे सेवेसी.

''सेवक पिलाजी जाधवराव दंडवत. सु।। इहिदेसलासीन मयाअलफ. तुमचेविसीं सरदेसाई व देशमुख व देशपांडे प्रांत वसई व बहादुरपुरा व दवण यांनीं येऊन विदित केलें कीं प्रांत मजकूर बहुत दिवस फिरंगीयांखालीं होता. यामुळें हिंदुधर्माचा लोप जाहला होता. सांप्रत राजश्री पंतप्रधान यांनी तुम्हास या प्रांतें रवाना केले. फिरंगीयांस मारून काढिलें. देश हस्तगत जाला. तेथें धर्मस्थापना जालीं पाहिजे, याजकरितां वेदमूर्तीस गांवगन्ना दर गांवास रुपया धर्मादाय करून द्यावा, त्याप्रमाणें पावत करून म्हणून विदित केलें. त्यावरून धर्मादाय दर गांवास रुपया एक करार केला असे. त्याप्रमाणें घेऊन स्नानसंध्या करून राजश्रीस कल्याण इच्छून सुखरूप राहाणें. जाणिजे, छ १० सफर.'' **(पेशवे दप्तर सिलेक्शन नं. १६ ले. १)**

**जित व जेत्याचे संबंध**

**तीर्थक्षेत्रांसंबंधीं इतिहासाचा दृष्टिकोन**

शत्रूस जिंकल्यावर हिंदूंनीं त्यांचा बीमोड केला नाही. किंवा त्यांस हद्दपारही केले नाही. त्यांस प्रजाजनांचे सर्व हक्क देऊन राजकर्ते या दृष्टीने त्यांनीं त्यांचे पूर्वीचे सर्व हक्क पाळले. या गोष्टीचा आताशा कोठें कोठें आमचे ग्रंथकार उल्लेख करितात. पण मराठ्यांनीं याही पुढील एक विशिष्ट गोष्ट केली. तिकडे आमचे लक्ष जावयास पाहिजे. श्रीसमर्थांनी छत्रपतीस उपदेशिलेल्या चार गोष्टीत ''धर्मक्षेत्रें अवघी बुडालीं, कांहीं राहिलीं तुम्हाकारणें,'' यांत राज्यस्थापनेच्या अनेक हेतूंपैकीं एक विशिष्ट हेतू अगदी स्पष्ट मांडला

आहे. पण ही तीर्थे आणि क्षेत्रे काय होत, याचा अर्वाचीन दृष्टीनेंही विचार व्हावयास पाहिजे. कोणाही विशिष्ट व्यक्तीनें आपल्या अलौकिक तपश्चर्येनें, सात्त्विकतेनें, कर्तृत्वानें व ज्ञान संपादनानें सहस्त्रावधी लोकांची अंतःकरणें आपणाकडे सहज ओढून घेतलीं तर त्यानंतर अशा नरश्रेष्ठांचें जन्मस्थान, तपोभूमी, कर्मभूमी व निधनस्थान यांस तीर्थक्षेत्रांचे पद प्राप्त होते. अगदी मानिलेल्या ऐतिहासिक काळाचेच बोलावयाचे तर भगवान गौतम बुद्ध, महावीर, श्रीशंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर अशा अगणित विभूती या भारत भूमीला भूषवित आहेत. त्यांचीं स्थानें व लिखाणें दमल्या, श्रमल्या, रंजल्या, गांजल्या प्राण्यांस विश्रांती स्थानें झालीं आहेत. त्यांतील कांहीं स्थानांनीं विद्यापीठाची पायरी गाठली आहे. सारांश, हिंदूभूमीस हे महात्मे व त्यांची स्थाने तीर्थे, सामान्यपणें विभूतिपूजनें झाली आहेत. ही प्रमाणें समाजाचे स्थैर्यास व प्रगतीस आवश्यक आहेत हे कोणीही कबूल करील. मुसलमानी अंमलांत, हिंदू धर्मांतील शाखा उपशाखांवर सरसहा शस्त्र उपसल्यामुळें हिंदू संस्कृतीच्या या मर्मस्थानावरच म्हणजे विभूतिपूजेवर हल्ला झाला होता. ही विवेचनाची दृष्टी मान्य झाल्यावर काय निष्कर्ष निघतो ते आतां पाहू या.

**मराठ्यांनीं भविष्यकाळचे आक्रमणास पायबंद तर घातलाच**

मर्मस्थानावर चालू झालेला हल्ला पुढें तरी बंद रहावा म्हणून हिंदूंनीं शस्त्र हाती धरले आणि थोड्याच कालावधीत परकीय संस्कृतीच्या आक्रमणास आळा घातला. हें कार्य त्यांनीं हिंदुस्थानच्या, शक्यतोंपर्यंत, सर्व भागांत यथावकाश केलें हे मराठ्यांच्या समग्र इतिहासानें सिद्ध होईल. पण मागें जें अतिक्रमण होऊन गेलें त्याचें निराकरण त्यांनीं केलें किंवा नाहीं, आणि केलें असेल तर कोणत्या प्रकारें केले, हा एक इतिहासाचा मननीय प्रश्न आहे. तो आपण सोडविला पाहिजे; आणि म्हणून या प्रश्नाला तोंड येथेंच फोडूं या.

वसई घेतली, फत्ते झाली, जयजयकार झाला, अभिनंदनाची व स्तुतींची पत्रें यांचा वर्षाव झाला. यांनीं डोकें फिरून जाऊन आणखी प्रांत जिंकावे अशी जेत्यांची जी सहज मनोवृत्ती त्याप्रमाणेंच मराठे वागलें कीं कसें ? याही प्रश्नाचे उत्तर साधारण आपण देऊं या.

**विजयानंतर होऊन गेलेल्या अतिक्रमणाचें निराकरणही केलें**

अप्पांनी स्वामींस जे पत्र लिहिलें त्यांत डहाणूपासून वसईपर्यंत जी मुलुखाची पट्टी त्यांनीं जिंकली त्यात वसईनजीक असणारे श्रीक्षेत्र निर्मळेश्वर हे प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. त्या क्षेत्राचा पौराणिक इतिहास काय असेल तो असो. पण तेथें एका श्रीशंकराचार्यांची समाधी आहे. ती समाधी त्यावेळीं उद्ध्वस्त झाली होती. पूजाअर्चेचा कांहीं धरबंद राहिला नव्हता. जो अनुभव सर्व हिंदुस्थानावर तोच तेथेंही झाला. वसई काबीज केल्यानंतर या प्रकरणांत अथपासून इतिपर्यंत तनमनधनानें कष्टणारे अनेक वीर व मुत्सद्दी होते. त्यांतच शंकरजी केशव फडके होते. त्यांच्या पत्रव्यवहारानें पेशवे दफ्तरांतील एकाहून अधिक भाग

व्यापिले आहेत. त्यांची व्यापकदृष्टी, किल्ले बांधण्याचे व दुरुस्तीचे ज्ञान, माणसास सांभाळून घेण्याचें धोरण त्या पत्रव्यवहारांत प्रतीत होते. वसई काबीज झाल्यावर त्या प्रांताची सुभेदारी त्यांसच मिळाली हे क्रमप्राप्तच होय. आपल्या आठ-दहा वर्षांच्या सुभेदारींत मंदिराचा पुन्हा बंदोबस्त, जीर्णोद्धार व नवीन माणसांची वसाहत या तिन्ही गोष्टींकडे लक्ष दिल्याचे दिसते. यातील एक एक बात हातात घेऊन विचार करूं. (अ) श्रीमत्शंकराचार्यांचे समाधीकडे नित्यनैमित्तिक पूजा, उत्सव, अन्नसंतर्पण यांचा बेहडा तयार करून तो पुणें दरबारकडून मान्य करून घेतला. निर्मळास गेल्यावर स्थानाची नैसर्गिक रमणीयता व पावित्र्य कोणासही उत्साहित करील. पेशव्यांचा बेहडा ब्रिटिश सरकारांनीं चालू ठेविला आहे, हे त्यांस भूषणावह आहे. (आ) धर्मच्छलामुळें सबंध प्रांत उजाड पडला होता. जी कांहीं थोडी वस्ती होती ती बाटग्यांची. हिंदू संस्कृतीचा दर्शक असा कोणीच राहिला नव्हता. तेव्हां ब्राम्हण, प्रभु आणि मराठे इतर प्रांतांतून आणून तेथें वसविले. सर्वांस श्रीमत्शंकराचार्य हे मान्यच. तेव्हां त्यांचे महोत्सवास कार्तिक वद्य ११ स सर्वांनी जमावे असा त्या प्रांतीं प्रघात पडून गेला आणि त्यातही कित्येक घराण्यांस असा दंडक घातला गेला कीं पालखीचे महोत्सवास त्यांनीं घरामागे एक पुरुष अशी हजेरी दिलीच पाहिजे. कालमानानें हा दंडक शिथील झाला आहे हे खरें, तरी त्यांच्या तत्त्वाची उमज करून घ्यावी. हीं घराणीं अशींच होतीं कीं त्यांस पेशवे सरकारांतून विशेष सवलती मिळाल्या होत्या. याप्रमाणें परक्या संस्कृतीचें आक्रमण मराठ्यांनी थांबविलें, इतकेंच नव्हे तर मागील विकृत झालेला भाग धुवून काढून संस्कृतीच्या संरक्षणाचा व संवर्धनाचा पुढील मार्ग आखून दिला हें यावरून स्पष्ट होईल. (इ) मराठ्यांनी यावेळीं डहाणू, तारापूर व वसई येथील किल्ल्यांची डागडुजी करून केळवें येथें नवीन किल्ला बांधिला. येथून फिरंग्यांची उत्तर कोकणातील सर्व सत्ता मावळली. पुढें सरदार माणकरानें चौल घेतलें तेव्हां सारा फिरंगी गोव्यास पळून गेला. बहुतेक सारें कोकण मराठ्यांच्या ताब्यांत आले. मराठ्यांनीं प्रजेच्या संरक्षणाची चांगली व्यवस्था ठेवली होती. यामुळें पुढील काळ शांततेचा व भरभराटीचा आला. **(बांबे ग्याझेटियर पृ. ९७ व्हा.१ भाग २)**. (ई) एक प्रश्न राहतो तो हा कीं जीं माणसे बळजबरीनें फिरंग्यानीं बाटविली त्यांचे संबंधात संशोधन व्हावयास पाहिजे. पण जें थोडेबहूत उपलब्ध होते त्याजकडे त्या काळाचे दृष्टीने अवलोकावें. आतां येथें असेंही नमूद केलें पाहिजे कीं हा जो प्रकार पेशवे सरकारांनी वसई येथें केला म्हणजे मंदिराचा जीर्णोद्वार व नवीन वसाहती करणें, तसा प्रकार त्यांनीं इतरत्र म्हणजे माळवा, बुंदेलखंड, इत्यादि ठिकाणीं केला किंवा करविला ही माहिती मिळाल्यास मराठ्यांविरुद्ध असलेल्या आक्षेपांचें निरसन होईल.

मल्हाररावांनीं या संबंधात जे उदाहरण घालून दिलें व श्रीक्षेत्र महेश्वर येथील श्रीराजराजेश्वर मंदिर व इंदूर येथील श्रीखेडापती मारुतीचे मंदिर यांची जी सेवा केली, ती पाहिली म्हणजे त्यांचे धोरण वरीलप्रमाणें होते हे दिसून येईल. सारांश, *युद्धकालांत मल्हारजी जसे शूरवीर म्हणून पुढें आले तसे शांतता काळातही राजा या नात्यानें आपले*

*कर्तव्य त्यांनीं उत्तम बजाविलें असे पुढील विवेचनावरून दिसेल. ''गोब्राह्मण प्रतिपालक, निराधारियास आधार'' हे शब्द त्यांनीं सार्थ केले. गो हा शब्द ''आधिभौतिक अभ्युदय'' याचा निदर्शक समजावयाचा, ब्राह्मण ''आध्यात्मिक निःश्रेयस'' या अर्थाने धरावयाचा, म्हणजे मराठ्यांची मोहीम आपले स्वरूपात प्रकाशेल.* ''विजयाबरोबरच पुनःस्थापिलेली घटना'' इतिहासांत दाखल व्हावी या इच्छेनें वरील विवेचन दिग्दर्शनार्थ केलें आहे.



प्रकरण ११ वें

# श्रीमंत बाजीरावसाहेब यांचा मृत्यु
# व
# मल्हारजींच्या आयुष्यक्रमांतील पहिला टप्पा
## इ. स. १७४०

**दिल्लीकडील राजकारण; नवा बादशहा बसवावा**

वसईस मराठ्यांनीं मिळविलेला विजय दिल्ली दरबारांतील अमीर उमरावांस स्वस्थ बसू देईना. माळवा, बुंदेलखंड पदरांत पाडून दिल्लीपर्यंत बाजीरावसाहेब स्वाऱ्या करितात, बंगाल बहारचे बाजूनें भोसल्यांची मुलूखगिरी चालूच आहे, तेव्हां इराणी बादशहासीं राजकारण करून दुसरा बादशहा दिल्लीस स्थापावा असा विचार करून महंमद कुलीखान ऐंशी हजार घोडा व पंचवीस हजार गाडद तोफखाना सुद्धां तयार झाला. तेव्हां बादशहानें हिंगण्यांचे (मराठ्यांचे दिल्लीचे वकील) विचारानें बाजीराव पेशवे यांजकडे दोन लाख फौज मागितली. निम्मे अंमल हिंदुस्थान सुभा घ्यावा असा करार ठरून पत्रें आलीं. वसईचें धर्मयुद्ध आटपल्यावर बाजीरावसाहेब दसऱ्याचे मुहूर्तानें हिंदुस्थानास निघाले.

**इ. स. १७४० त बाजीरावसाहेब नेमाडचे बाजूस सरकतात**

श्रीमंत पेशव्यांची स्वारी इ. स. १७४० जानेवारीत औरंगाबादेस होती. ता. २७ फेब्रुवारी रोजीं निजामासीं सल्ला केला. बाजीरावसाहेब व नासीरजंगाची भेट वरखेड मुक्कामीं

ता. ५ मार्च इ. स. १७४० रोजीं झाली. या वेळेस तह होऊन नेमाड प्रांत (माळव्यांत) पेशव्यांस मिळाला. या सुमारास मल्हारजी होळकर यांनीं नासीरजंगासीं मसलत करून वसुली रुपये १३८५७ केली. **(पेशवे रेकार्ड, जमाखर्च)**

**दिल्लीस उडालेला हाहाकार**

**बाजीराव सा़ो. रावेरखेडीस येतात**

तिकडेच इराणी फौज मोठ्या मजला करीत दिल्लींत येऊन तिनें बादशहास कैद केले. दिल्लीत मोठी लूट झाली. लक्षावधी मनुष्यें मेलीं. इतक्यांत मराठ्याची फौज जवळ आली असें ऐकून बादशहास कैदेतून मुक्त करून गादीवर बसविले आणि नादिरशहा भली मोठी दौलत घेऊन इराणास निघून गेला. नादिरशहाची बातमी समजतांच दिल्लीच्या रोखें श्रीमंत बाजीरावसाहेब ससैन्य निघाले. ते नेहमीच्या रस्त्यानें म्हणजे श्रीनर्मदा नदी रावेरखेडीस पायउतार करून मुक्कामास आले. श्रीनर्मदेचा प्रवाह मैल ८०० आठशेंचा आहे. इंग्रेजी इंजिनीअरचे मत आहे कीं रावेरखेडीसारखा सुलभ पायउतार दुसरा कोठेंही नाहीं.

**भोवरा भोवला**

हा रस्ता नेहमीच लागणार म्हणोन पेशव्यांनीं तेथें स्वत:चा वाडा बांधिला होता. आज त्याचा दिल्ली दरवाजा अवशेष राहिला आहे. तेथें मुक्काम असतांना बाजीरावसाहेबांस ज्वर येत होता. सरदार मंडळीत गोष्टी निघतां निघतां तेथेंच असलेल्या नर्मदा नदीतील पाण्याची ओढ व भोवऱ्याच्या गोष्टी निघाल्या. तो भोवरा फार खोल असून फसवा आहे, असेंही त्या संभाषणांत बाहेर पडलें. श्रीमंतांचे कानावर हा शब्द गेला. तेव्हां आपण स्वत: त्या भोवऱ्यांत उतरणार असा आग्रह धरला. भोंवतीं असलेल्या मंडळींत निग्रह करणारा कोणी नसेल अगर कोणाचाच इलाज चालला नसेल. सारांश, श्रीमंत भोवऱ्यांत उतरले. बहुत श्रमीं झाले व अगदी बुडण्याच्या बेतांत होते तो अक्कलकोटकर भोसल्यांनीं त्यांस वरती खेचून काढिलें. श्रम शक्तिबाहेर झाले व वैशाख शुद्ध १३ रोजीं (ता. २८ एप्रिल इसवी सन १७४०) स्वर्गवासी झाले.

**रायगड महाराष्ट्रास; रावेरखेडी बृहन्महाराष्ट्रास**

रावेरखेडी, रावेर नव्हे; ते रावेर खानदेशांत आहे. खांडवा अजमीर लाईनवर सनावद, होळकर स्टेटपैकीं स्टेशन आहे. तेथून बेडिया गांवापर्यंत मोटर जाते व तेथून पुढें नर्मदातीरापर्यंत बैलगाडीचा रस्ता आहे. रावेरखेडीस श्रीमंतांचे निधनस्थानावर तुळशीवृदांवनवजा देवळी बांधून आत शालुंका स्थापिली आहे. या मंदिराकडे श्रीमंत होळकर सरकारांकडून पूजाअर्चेनिमित्य वार्षिक नेमणूक रु.१२५ एकशें पंचवीसची आहे. जवळच राणोजी शिंद्यांजी बांधलेली धर्मशाळा आहे. खुद्द नर्मदानदीचे पोटात दहनस्थानावर ओटा बांधलेला आहे. सन्निधच श्रीमंताचा हत्ती व घोडा भूमीपोटी विसावा घेत पडले आहेत. श्रीमंत काशीबाईसाहेब (श्रीमंत बाजीरावसाहेबांचे कुटुंब) यानीं बांधिलेलें श्रीरामेश्वराचे मंदिर नर्मदातीरी टेकडीवर

आहे. रावेरखेडीस दर वैशाख शुद्ध १३ रोजीं 'मल्हारराव-बाजीराव-उत्सव-मंडळा'कडून पुण्यतिथी पाळली जाते.

होळकर सरकार खांडवा येथीळ ब्रिटिश अधिकारी यांच्या साहाय्यानें हा कार्यक्रम आजपर्यंत पाळला जात आहे. यंदा द्विशतसांवत्सरिक समारंभ थाटानें पाळला गेला.

श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं रावेरखेडीस अग्निहोत्री व दहा ब्राह्मण बसवून हा संबंध गांव तुळशी-वृंदावनचे पूजेअर्चेकडे लावून दिला होता, असें राजवाड्यांनीं प्रसिद्ध केलेल्या रोजनिशीवरून दिसतें. हल्लीं मात्र गांव ब्रिटिश सरकारचे ताब्यांत असून नानासाहेबांनीं घालून दिलेली व्यवस्था बंद पडली आहे.

श्रीमंत पहिले बाजीरावसाहेबांचें मृत्यूनें सुभेदार मल्हाररावांचे चरित्रांतील पहिला भाग येथें संपतो. चिमाजी अप्पा व बाजीरावसाहेब यांचे दिमतींत जें वळण सुभेदारांनीं गिरविलें तें पुढें त्यांनीं वाढविलें हे पुढील प्रकरणांत दिसून येईलच. येथें पहिला पाया बसला. इमारत पुढें आहे. इ. स. १७२० ते १७४० या वीस वर्षांचे अवधींत दक्षिणोत्तर जें मराठ्यांचें पाऊल जोराने पुढें पडलें ते श्रीमंत बाजीरावसाहेबांचे प्रोत्साहनानें तर खरेंच, पण त्यांतही ''प्राप्तीचा कांहीं वाटा'' मल्हारजींचा आहे यात संशय नाही. माळव्यांत, बुंदेलखंडांत, अंतर्वेदीत व वसईत मल्हाररावांनीं आपली समशेर गाजविली तर खरीच, पण ती ''शक्तीयुक्तीच्या जुक्तींत'' गाजविली. *''मनसुबीयाचे कार्यास त्वरेस मोल आहे''* हें ब्रीदवाक्य कृतींत आणून गाजविली. सूर्यप्रकाशांत इतर ग्रहांचें तेज हिशेबात येत नाहीं. पण तोच सूर्य अस्ताचलीं गेला कीं तें तेज स्वस्वरूपांत खुलतें. तोच प्रकार पुढें बाजीराव व मल्हारजींचा झाला. यापुढें मल्हारजी स्वतेजानें पुढें पुढें चमकत गेले, ते पुढील प्रकरणांवरून दिसेल.



प्रकरण १२ वें

# मल्हारजींनीं केलेली राज्यांतील अंतर्व्यवस्था
## इ. स. १७२९ ते १७४५

**बाजीरावसाहेबांच्या कर्तृत्वाचे सिंहावलोकन**

वीस वर्षांच्या (म्हणजे इ. स. १७२० ते १७४०) अवधींत बाजीरावसाहेब नर्मदा उल्लंघून जे बाहेर पडले ते उत्तरेस दिल्लीस जाऊन तर पोहोंचलेच, पण दक्षिणेकडेसही त्यांनीं दुर्लक्ष केले नव्हतें, म्हणजे प्रतिनिधी वगैरे जी मंडळी ''दक्षिणेकडेच आपण लक्ष देऊं या.'' असें जे म्हणत होते त्यांचेंही म्हणणें अव्हेरलें नाहीं. आपले धोरण व प्रतिपक्षाचेही म्हणणें ध्यानीं आणून त्यांनीं आपला मार्ग रेखिला व आक्रमूनही दाखविला. कर्तृत्ववान माणसाचे हें मुख्य लक्षणच होय.

प्रसिद्ध राजकारण-तत्त्ववेत्ता एडमंड बर्क यांनीं कर्तृत्ववान माणसांची व्याख्या येणेंप्रमाणें केली आहे.

**कर्तृत्ववानाचे लक्षण, बर्क सांगतात;**
**(१) अवलोकन, (२) अनुसंधान व (३) अनुस्थापन या तऱ्हेचे मधुरमीलन**

याचा मथितार्थ येणेंप्रमाणें : *''काय आहे आणि काय नाहीं हें अवलोकनांत घेऊन, असलेल्या स्थितींत काय निष्पन्न करावयाचे हे अजमावयाचें आणि अजमावलेलें कार्य कृतीत उतरून दाखवावयाचें.''* सारांश, अवलोकन, अनुसंधान आणि अनुस्थापन हे तिन्ही गुण एकत्र झाले म्हणजे कार्यधुरंधरता आलीच.

बाजीरावसाहेबांनीं वीस वर्षांच्या अमदानीत आपल्या अप्रतिम शौर्याने शत्रूंस चीत केले आणि चातुर्याने प्रतिपक्षियांस आश्चर्यचकित करून सोडिलें. उत्तरेस माळवा, बुंदेलखंड व अंतर्वेदीत ठाणीं बसविलीं, रजपुतांस मिळवून घेतले आणि दिल्ली दरबारांत आपले वकिलांचीं ठाणीं दिलीं.

**बाजी हे नांव सार्थ केले**

त्रस्त झालेल्या उत्तर हिंदुस्तानवासियांस येणेंप्रमाणें धीर देऊन त्यांचा दिलदिलासा केला. दक्षिणेंत फिरंग्यानीं साष्टी, ठाणें बेटांत ''त्राहि भगवान्'' करून सोडिलें होतें. त्रिखंडांत नांवाजलेल्या दर्यावर्दी पोर्तुगिजांस डहाणूपासून वसईपर्यंत नामोहरम करून टाकिलें आणि हिंदु धर्माची ध्वजा फडकाविली. दक्षिणेंत जंजिऱ्याचे सिद्दीवर सिद्धी मिळविली. दक्षिणेकडील इतर प्रांतांतील खंडणी वेळेवर वसूल केली जाईल असा दरारा त्या मुलखीं बसविला व शिस्त लावून दिली. येवढें सगळे कार्य वीस वर्षात ज्या व्यक्तीनें घर सांभाळून व दारच्या शत्रूस चीत करून संपादिले त्यांस ''बाजी'' हे नांव सार्थकतेनेंच शोभतें.

**नानासाहेब पेशवे, शिक्षण व वस्त्रप्राप्ती २६–६–१७४०**

त्यांच्या मृत्युनंतर नानासाहेबांस म्हणजे चिरंजीव बाळाजी बाजीराव यांस वस्त्रें मिळाली. वडिलांबरोबर व चुलता चिमाजी अप्पा यांजबरोबर लहानपणापासून राजदरबार व स्वारीशिकारी जेथें सूत्र सोडिले तेथेंच त्यांनीं उचलून ते जेथवर नेतां येईल तेथपावेतों आपले एकवीस वर्षाचे (इ. स.१७४० ते १७६१) कारकीर्दीत नेऊन ठेविलें. यांतील पहिलीं नऊ वर्षे छत्रपती शाहू महाराज यांच्या थोड्याबहुत हुकमतीखालींच गेलीं. इ. स. १७४९ च्या ता. १५ डिसेंबर रोजीं छत्रपती स्वर्गवासी झाले आणि मराठेशाहीची सर्व सूत्रें बाळाजी बाजीराव पेशवे यांचे हातीं आली.

वरती उल्लेखिलेल्या घडामोडीकडे होळकर राजवटीचा इतिहास या दृष्टीनें आपणास पहावयाचे आहे. या राजवटीचे प्रस्थापक मल्हारजी होळकर हे शिलेदार, पथके व शेवटीं सुभेदार याप्रमाणें श्रीमंत बाजीरावसाहेबांच्या तालमीत व कारकार्दीत वाढले. इ. स. १७२० ते १७४० या ऐन घडामोडीच्या व विजयाच्या काळांत बाजीरावसाहेबांबरोबर ते सदासर्वदा सज्ज असत. या वीस वर्षाच्या स्वारीशिकारींत जेथें जेथें त्यांचा उल्लेख कागदोपत्रीं सांपडतो तेथें तेथें तो मागे आम्ही उल्लेखिला आहेच. याहूनही तो अधिक तपशीलवार उल्लेखितां आला नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते.

या वीस वर्षाच्या अवधींत बाजीरावसाहेबांसारख्या कुशल गुरूच्या शिक्षेंत जे युद्धविषयक व राजकारणविषयक शिक्षण मिळाले असणार ते खरोखरच बहुमोल असणार. ते मल्हारजींच्या पुढील कामगिरीवरून व त्यांनीं आपल्या सुनबाईस (देवी श्री अहिल्याबाईस) जें शिक्षण दिलें त्यावरून स्पष्ट होईल.

**चिमाजीची योग्यता**

यावेळीं हेंही स्पष्ट नमूद केलें पाहिजे कीं बाजीरावसाहेबांस चिमाजी अप्पांची मदत फारच झालेली आहे. माळवा सर करण्यांत, वसई काबीज करण्यांत व सिद्दीस नामोहरम करण्यांत चिमाजी अप्पांचा कामकाजाचा आटोप प्रशंसनीय झाला. त्यांच्या कामगिरीचा उल्लेख आमच्या व परकियांच्या इतिहासांतून जितका गौरवयुक्त व्हावयास पाहिजे तितका झालेला नाही. सारांश, या दोघा बंधूंस पाहिले म्हणजे श्रीराम व लक्ष्मण यांचे स्मरण होते. या दोघा बंधूच्या (बाजी व चिमाजी) दिमतीत वीस वर्षे मल्हारजी वाढले होते. म्हणजे त्यांनीं किती व कोणते शिक्षण मिळविलें असावें याची कल्पना होईलच.

**मल्हारजींची योग्यता तत्कालीन लेखकांस कळली होती**

मल्हारजी हे माळव्यांत आल्यापासून बाजीरावसाहेब व चिमाजी अप्पा यांचे दिमतीनें काम करीत होते हे वरती स्पष्ट झालेच आहे. साधारणपणें पुढाऱ्यांचे नांव सर्वतोमुखीं होतें असें सर्वत्र दिसण्यांत येतें. खालील माणसें वरिष्ठांचें तेजांतच गडप होऊन जातात. विशेष अलौकिक नजरेंत भरण्यासारखें काम जेव्हां घडतें तेव्हांच हाताखालील माणसांचा उल्लेख होत असतो. मल्हारजींच्या संबंधानें बखरकार व शकावलीकर्ते, तसेच मुसलमान तवारीखकार वारंवार शूरत्वाबद्दल व धोरणाबद्दल आतांपर्यंत उल्लेख करीत आलेले आहेत. मिळाले तितके पूर्वीच्या प्रकरणांत उल्लेखिले आहेतच. त्यावरून दुय्यम अधिकारावर असताही त्यांचे गुण चमकू लागले होते हें स्पष्ट दिसतें. युद्धांतील त्यांचे शौर्य आतांपर्यंत आपण पाहिलें. त्यांच्या राज्यकारभारादि अंतर्व्यवस्थेकडे आतां नजर टाकूं या.

**इ. स. १७२९**

सौभाग्यवती गौतमाबाई होळकर यांनीं वेरूळ येथील श्रीघृष्णेश्वर या ज्योतिर्लिंगाचे मंदिराचा जीर्णोद्धार केला.

**इ. स. १७३१**

विठूजी बुळे (दिमत मल्हारजी होळकर) यांचे पथकाचा खर्च रुपये ५९३४, परगणे तलाटी, चंदेरी, आगर बुंदी व कोटे, पिंपराई वगैरे ठिकाणीं कामगिरी असताना झाला.

**इ. स. १७३१**

श्रीमंताकडून बहुमान पोषाख विठूजी बुळे यांस मिळाला.

**इ. स. १७३३**

स्वारी चिमणाजी बल्लाळ बहुमान पोषाख राजश्री मल्हारजींस दिला त्यावेळीं त्यांचे सरदार विठूजी बुळे यांस मंदील, शेला, वस्त्रें रु. ११३ ची व मोत्यांची जोडी रु. ३५० व सोन्याचे कडे रु. २८४, याप्रमाणें देऊन बुळे यांचे कामगार बुधगीरबाबा व गोपाळपंत (दरखदार विभूते) या उभयतांस बहुमान वस्त्रें मिळाली.

**इ. स. १७३४**

**खासगीची सनद मल्हारजींनीं संपादिली**

**फडणीसीकडून विशेष माहिती**

पेशव्यांकडून स्नेहभाव आणि घरोब्याच्या नात्यानें ज्या देगण्या होळकर स्त्रियांस मिळाल्या त्या सर्व गौतमाबाईंस वंशपरंपरा सनदी मिळाल्या. त्यांचे उत्पन्न ७ लाख रुपये आहे. इ. स. १७५९ सालीं सौभाग्यवती गौतमाबाईंनीं ही सर्व जायदाद आपले हयातींत अहिल्याबाईंच्या नांवें केली.

**इ. स. १७३७**

मल्हारजींनीं आपल्या हाताखालील माणसांची जी व्यवस्था केली ती खालीलप्रमाणें :

१. विठुजी बुळे सरंजामी महाल पाटण आकारी रुपये ४०००० चाळीस हजार व मोसम बिन आकारी महाल (१) झाबवा, (२) लवाणी, (३) पिंपलोदा तलाटीपैकीं, (४) हिंदोले (मांडव नजीक), (५) कोठडे निम्मे (चिखलदे). येकुण महाल बिनआकारी साडेचार.

२. संताजी वाघ, परगणे महदपूर आकार रुपये २१०००

३. मावजी वाघ, परगणे बेटमा आकार रुपये १००००

४. उदाजी लाभांते, अंबे आकार रु. ८०० व मोघम जिरापूर, माचलपूर.

५. शिवजीशंकर निसबत रायाजी बिंगले, खैदाबाद बकाणी आकार रुपये ४३५०

६. मालजी चितालकर, डोंगरपूर आकार रु. ६०००

७. तुकोजी म्हसके व केरोजी कापडी, परगणे हसलपूर व संधारा आकार रु. २५००

८. भोजराव बारगळ, परगणे पिढावे आकार रु. १०००० व बुढे आकार रुपये १५०००

९. खंडूजी ढमढेरे, बुढे पैकीं हिस्सा रु. १००००

१०. गंगाजी भागवत, परगणे जावरा रु. ११०००

११. भवानजी कदम, परगणे बरडावदा रु. ३०००

१२. केरोजी सितोळे, परगणे करही रु. २०००

१३. महादोबा पुरंधरे, परगणे पिपलोदा रु. २०००

१४. खंडूजी कडू, परगणे काटकूट मोघम महाल.

१५. कासीबा, परगणे आवेर मोघम महाल.

यावरून स्पष्ट दिसेल कीं मल्हारजींच्या हाताखालीं व त्यांच्याच आश्रयाखालीं पंधरा सरंजामी सरदार यावेळीं वावरत होते व त्यांस २४ चोवीस परगणे सरंजामासाठी तोडून दिले होते. म्हणजे मल्हारजींचा व्याप यावेळीं किती मोठा होता व त्यांनीं व्यवस्था कशी केली होती हें दिसून येईल.

**इ. स. १७३८**

मल्हारराव होळकर यांचें चिरंजीव खंडेराव होळकर यांचा विवाह झाला ता. २१ मार्च इ. स. १७३३ रोजीं झाबव्याचे कारभारी कोठारी देवीसा तिलोकचंद यांस सुभेदार मल्हारजी होळकरांनीं दिल्ली मुक्कामीं विठूजी बुळे यांचे शिफारसीवरून सनद करून दिली. नवीन वस्ती गोविंद्पुरा येथें वसविली, त्याजबद्दल व इतर उमराव संस्थान झाबवा यांजवर हक्क दस्तूर वगैरेंची व्यवस्था करून दिली.

**इ. स. १७४०**

परगणे तराणा येथें खास कसब्यांत प्राचीन श्रीतिलभांडेश्वर महादेवाचे देवालयाचा जीर्णोद्धार श्रीमंत सुभेदार मल्हारजींनीं केला.

**सदर**

इंदूर येथील खेडापती मारुतीची पूजाअर्चा अविंधाकडे होती ती काढून मल्हारजींनीं महंताकडे दिली.

**इ. स. १७४१**

इंदूर येथें राजवाडा बांधला.

**इ. स. १७४३ : इंदूर शहराची वाढ**

उज्जैनी वगैरेकडून ५० साहुकार आणून वसविले.

**इ. स. १७४५ : महेश्वर कौलनामा**

मल्हारजींची इतरांकडून काम करविण्याची हातोटी, शहरें आबाद करणेची पद्धत व साहुकारांचा एकंदर राज्ययंत्रातील दुवा, ही लक्षांत घेण्यासारखीं आहेत.

ह्या प्रकरणांत दिलेल्या माहितीवर प्रकाश पाडणारी पत्रें स्थानिक व बाहेरील दप्तरांतून मिळाली ती इतिहास-साधनांत (पत्र नं. ४१-४५) प्रसिद्ध झालीं आहेंत. मल्हारजींचा चौकसपणा, मनाचा दिलदारपणा व आत्मविश्वास त्यांचे पत्रव्यवहारावरून प्रगट होतात. ''कोणीही लबाडी करतील तेही आपल्या गुणेंच फजीत पावतील'' या अर्थाचे उद्‌गार अनेक वेळां बाहेर पडले आहेत. समजणाऱ्यानें समजावेत हा कीं मानवदृष्टीला जे दिसत नाही ते त्या शक्तीस दिसते आणि त्या शक्तीच्या दरबारांत न्याय पुराव्यावरती अवलंबून नसून तो सृष्टिशक्तीनेंच चालतो. असा दृढविश्वास असेल तेथेंच अशी वाणी बाहेर पडते. मल्हारजींनीं मंडलोई कायम ठेविले पण त्याबरोबर आपले कामविसदारही योजिले. सारांश, जुनें न मोडतां त्यास नव्याची पुस्ती जोडली. मंडलोईकडून कांहीं आगळीक झाली तर मल्हारजी त्यावर दया करितात आणि हाताखालील माणसासही तशी समजूत देतात.

बरोबरीच्या संबंधानें आपण स्वतः पडते घेवून मालकांचें मन वळविण्यांत मल्हारजी

जितके तरबेज तितकेच पदरच्यांचे साहित्य पुरविण्यांत ते सावधान असत. यावेळीं म्हणजे आपल्या चालत्या काळांत कोणताही भेद मनांत न बाळगितां दक्षिणेंतील अनेक कुटुंबांचा सांभाळ व परामर्ष हस्ते-परहस्ते त्यांनीं केला. शिस्तीसंबंधातही कडक होते. ''जमीदारांस जोर पोंहचवून आपले हातीं घेऊन राजश्री लक्षुमण शंकर यांजपाशीं पोंहचवून देणें. येविशीं गई न करितां परगणे मजकुरच्या जमीदारास सजा पावून गढ्या खालीं करून येत, तें करणें.'' ही शिस्त राज्यकारभारांत एक-दोन वेळां त्यांनीं अवलंबिल्यामुळें ''दबावानें काम न घेणें'', पुढें पुढें सहज घडलें.



प्रकरण १३ वें

# श्रीमंत नानासाहेब पेशव्यांबरोबर
## इ. स. १७४० ते १७५०

**मल्हारजींचा सन्मान**

इसवी सन १७४० मध्यें बाळाजी बाजीराव पेशवे यांस पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. तद्नंतर याच वर्षी नानासाहेबांनीं बहुमान पोशाख, भरजरी शाल, मंदील, पैठणी, शालू वगैरे खासा मल्हारराव पुत्र खंडेराव, पत्नी सौ. गौतमाबाई व सून सौ. अहिल्याबाई याशिवाय भोजराव बारगळ व गोविंदराव बुळे यांस देवून गौरव केला. **(पुणें रेकॉर्ड, राजमंडळ स्वारी)**

**पेशव्यांचे कार्य व उपक्रम**

वडिलांचे हयातींत चुलते चिमाजी अप्पा यांच्या हाताखालीं दरबारी व स्वारी शिकारीचे शिक्षण नानासाहेबांस मिळालें होतें. प्रथम प्रथम ते छत्रपतींपाशीच असत. इ.स. १७६६ त चिमाजी अप्पांचे बरोबर स्वारीत होते. स. १७३७ ते १७३९ मिरजेचे स्वारींत छत्रपतींबरोबर होते. इ. स. १७४० त कुलाब्याकडे गेले होते. यामुळें वडिलांनीं जेथें सूत्र सोडिलें तेथून तें उचलून धरून पुढें चालविणें त्यांस सुलभ झाले. नादिरशहा हिंदुस्थान सोडून गेल्यामुळें दिल्लीवरची स्वारी तहकूब झाली. तेव्हां नानासाहेबांनीं माळवा, बुंदेलखंड इत्यादि प्रांतांचा कब्जा हाच प्रश्न हातीं घेऊन आपल्या कारकीर्दीचा प्रारंभ केला. निजाम व त्याचा मुलगा नासिरजंग यात तंटा लागला होता. पेशव्यानें निजामाला साह्य केलें. हेतू हा कीं माळव्याचे सनदेचे प्राप्तीत त्याचा अडथळा उभा राहू नये.

**मल्हारजींचे सरदार**

बादशहानें अजिमुल्लाखानास माळव्याची सुभेदारी सांगून वस्त्रें देऊन रवाना केलें. ही बातमी दिल्लीस वकिलानें मल्हाररावांस कळविली तेव्हां मल्हाररावांनीं जबाब पाठविला तो : ''प्रस्तुत अजिमुल्लाखान येणार त्यास माळवा प्रांतीं आपली छावणी असती तरी या दिवसात ते इकडे यावयाचे नांव न घेते. तथापि आम्ही देशास आलों म्हणून काय झाले? याउपरी सेनेसह वर्तमान त्या प्रांतास सत्वरीच येऊं. अविंधास बरेवजेनें नतीजा पाठविला जाईल. कोणी लबाडी करतील तेही आपल्या गुणेच फजिती पावतील. चिंता काय आहे?''

**इ. स. १७४१**

**मल्हारजींचा गायकवाड व पवार यांशीं संबंध**

सन १७४० ते शिंदे, होळकर, पवार व पुरंदरे यास बरोबर घेऊन पेशवे उत्तरेस निघाले. नानासाहेबांची माळव्यांतील मजबुती पाहून गायकवाडानें विशेष लढाईचा प्रसंग न आणितां मागें पाय घेतला. बहुधा मल्हाररावांनीं त्यास रेटून मागें घालविलें असावें. त्रिंबकराव दाभाडे यास मदत केल्यापासून पवारांकडे धारचा अधिकार नव्हता.

जानेवारीत होळकरांनीं पेशव्यांचे हुकमानें धार काबीज केलें. तेव्हां पेशव्यांच्या हुकमतींत चालण्याचे पवारानें पत्करलें. पेशव्यानें त्यांस आपल्या तर्फेने धारेस कायम करून गुजराथेंतून गायकवाडानें पुन्हा माळव्यावर येऊं नये असा बंदोबस्त केला.

**इ. स. १७४२**

**मल्हारजींची कामगिरी : जैतापूर व माळवा**

सन १७४२ त गढे मंडळ (जिल्हा जबलपूर) हीं दोन्हीं स्थानें नाक्याचीं आहेत. येथें पेशव्यांनीं आपलें ठाणें बसविलें. त्रिंबक हरी यांनीं नेमाडांत विजय मिळविला आणि आवजी कवडे यांनीं देवरी काबीज केली. धवलपूर येथें सवाई जयसिंगाशीं बोलणें चालणें होऊन मेजवान्यांपलीकडे कांहीं मजल गेली नाहीं. जैतपुराहून एक हत्ती मल्हारजी होळकरांनीं पुण्यास श्रीमंतास नजर म्हणून पाठविला. परगणे ब्राम्हणगांव दरसाल रुपये ६००० इजारे राणा पहाडसिंग अनूपसिंग मोहनसिंग बडवाणीकराकडे मल्हारजींनीं दिला. **(पुणें पेशवे रेकॉर्ड)**

**बुंदेलखंडावर स्वारी**

**झांशीची प्राप्ती**

**मल्हारजींची मनिषा**

माळव्याचा बंदोबस्त करून नानासाहेबांस बुंदेलखंडाकडे लक्ष देणें जरूर झालें. बाजीरावांचे वेळेस छत्रसाल राजाशीं बुंदेलखंडाचे राज्यापैकीं एक विभाग ठराव झाला होता. परंतु प्रत्यक्ष विभाग झाला नाही. पेशव्यांचे वतीने कोणी सरदार येऊन सालिना खंडणी

वसूल करीत असे. यासाठीं मल्हारकृष्ण व दुसरे एक सरदार वसुलीस आले. झांशीस मुक्काम झाला. रात्रौ बुंदेले ओरछेकरांनी छापा घालून उभयतांची डोकी कापून नेली. हे वर्तमान पुण्यास जाहीर झाल्यावर तेथून नारोशंकर राजेबहादूर यांची रवानगी फौजेसुद्धा झाली. झांशीस येण्याचे अगोदर ओरछास येऊन कांहीं लढाई नमूद झाली. राजे ओरछेकर यास श्रृंखलाबंधन करून किल्ल्याचे बुरुजावर कैद करून ठेविले. राजाशी एक विभाग पूर्वी ठरला त्यात झाशीची जागा मराठ्यांस आली. नारोशंकरांनी बंदोबस्त चांगला ठेविला. याप्रमाणें झाशीच्या सुभ्याची प्रारंभीची हकीगत आहे. बुंदेलखंडात याप्रमाणें पेशवे आपला अंमल बसवीत असतां मल्हारजी अंतर्वेदींत छावणी करून होते. तेथून आलेले एक पत्र मननीय आहे. ''मल्हारजींने छावणी अंतर्वेदींत केली. त्याचे चित्तांत कीं, मशीद, विश्वेश्वराचे ज्ञानवापीजवळील, ते पाडून देवालय करावें. परंतु द्रविडी ब्राम्हण चिंता करितात कीं हे मशीद प्रसिद्ध आहे. यवन प्रबळ या प्रांतीं विशेष आहे. याजवर मशीद पाडूं लागतील तेव्हां सर्व ब्राम्हण मिळतील आणि श्रीमंतांस विनंतिपत्र पाठवतील.'' मल्हारजींचा बेत जेथल्या तेथेंच जिरला हे सांगांवयास नकोच.

**इ. स. १७४३**

**माळव्याची सनद, मराठी सरदारांची जामीनकी**

सन १७४३ त उत्तरेंत आल्याबरोबर सरदारांच्या मार्फत माळवा, बुंदेलखंड येथें प्रत्यक्ष मोगली व स्थानिक अधिकाऱ्यांशीं मराठ्यांचे दोन हात झाले. रघूजीशीं झालेल्या युद्धांत पेशवे विजयी झाले. कोठचीही आशा बादशहास न राहिल्यामुळें पेशव्यांचे मागणें त्यास कबूल करावें लागलें. देखावा राखण्यासाठी शहाजादा यास माळव्याची सुभेदारी आणि पेशव्यांस नायब सुभेदारी देण्यांत आली. या करारावर राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव यांनी जामीनदार म्हणून कबुलायत लिहून दिली कीं पेशवे बाळाजी बाजीरावांनी करार न पाळल्यास आम्ही त्यांची नोकरी सोडून देऊं.

नानासाहेबांच्या या तीन वर्षांच्या उत्तरेतील मोहिमेनें मराठ्यांचा दबाव कायमचा बसला आणि शिंदे-होळकरांस कार्यास उत्साह प्राप्त झाला.

**इ. स. १७४४**

इसवी सन १७४४ त भेलशे येथें मोठा विजय संपादून पेशवे दक्षिणेंत आले आणि तेथून पत्रव्यवहाराच्या द्वारे माळवा व बुंदेलखंड येथील कामाची आणि वसुलीची व्यवस्था शिंदे-होळकरांच्या द्वारें केली.

**इ. स. १७४५**

**मल्हारजी व त्यांचे मुत्सद्दी यांचा सन्मान**

इसवी सन १७४५, होळकर व शिंदे यांस इनाम व होळकरांस बहुमान वस्त्रें व दागिने दिले. (१) खासा मल्हारजी होळकर, पोशाख रु. ३८४ व कडे जडावाचे, शिरपेंच, मोत्यांचा

तुरा व पदक. (२) खंडेराव होळकर (मल्हारजींचे पुत्र) यांस पोशाख व मशारनिल्हेचे दोन्ही कन्यांस शालू, परकर, वगैरे. (३) मुत्सद्दी गंगाधर यशवंत, रामाजी यादव, राघव लक्ष्मण यांस वस्त्रें.

**सनदप्राप्ती बिजागड**

घडणीकडील अवर्जां राजमंडळीस्वारी मल्हारजी होळकर यांजकडे सरकार बिजागड येथील परगणे दरोबस्त व प्रगणे सेंधवेदेह १०४ व नागलवाडीदह ६६, याप्रमाणें नवीन मुलूख आला. मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे यांस सरंजाम दिल्याबद्दल सनद :

**नेमावर पंचमहाल सामायिक प्राप्ती**

(१) परगणे नेमावर पंचमहाल सरकार हांडे :

१ परगणे नेमावर, १ प्राो हरणगांव, १ प्राो काटाफोड, सत्वास १ प्राो राजोर, १ प्राो नीमणापूर .... येकुण ५ (पांच).

**दसऱ्याचा बहुमान**

याच वर्षी दसऱ्याच्या सरदारीचा बहुमान. खासा मल्हारजी होळकर उंची वस्त्रें, जडावाचे कडें, शिरपेंच, मोत्यांचा तुरा व पदक याशिवाय पुत्र खंडेराव व मशारनिल्हेच्या दोन्ही कन्यांस बहुमान वस्त्रें, मंदील, शेला, पैठणी, शालू वगैरे. **(पेशवे दप्तर, जमाखर्ची झाडा)**

**गृहशांती**

गृहशांतिप्रित्यर्थ रत्नदान, गजदान इत्यादि दाने शांतिप्रित्यर्थ करून रक्कम रुपये ९१७१५ खर्ची पडले आहेत.

**राणोजी शिंदे**

ता. १९-७-१७४५ रोजीं राणोजी शिंदे निवर्तले.

**इ. स. १७४६**

**बुंदेलखंडांत मल्हारजींचा विजय**

**बुंदेलखंडांत कामगार नेमिले गेले**

इ. स. १७४६ त मल्हारराव होळकर, जयाप्पा शिंदे बुंदेलखंडात कालिंजर, जैतपूर, अजयगढ वगैरे स्थळीं लढत होते. या लढाईत शौर्याबद्दल मल्हारजींची श्रीमंत नानासाहेबांनीं बहुत स्तुती केली. संबंध पत्र येणेंप्रमाणें : ''बुंदेल्यांनीं जैतापुरास तोफा जेजाला, बरकंदाज, दारूगोळा वगैरे सामान विपुल ठेविलें होतें. रेवणीतून हमेशा झुंझच. आपलेकडील हजार माणूस मेले, चार हजार जखमी झाले. तथापि सुरुंगांनीं भिंताड पडले, तेणेंकरून अजीच किल्ला फत्ते केला, म्हणोन विस्तारें लिहिलें ते श्रवण होऊन संतोष जहाला. जैतपुर बांकी जागा. बाजे सरदारांनीं व लोकांनीं श्रम साहस करून फत्ते केली. शाबास तुमची व शाबास

लोकांची. मोठी गोष्ट जहाली. तुम्हासारखे उमदे सरदार इरेस पडल्यावर जैतापुरची कथा काय? याहूनही बिकट जागा हस्तगत कराल. याउपरी तिकडील कर्तव्य मनसुबा उल्लेख पुरस्सर लिहित जाणें.'' पुढें बुंदेल्यांशीं तह होऊन जैतपूर जगतराय बुंदेल्याचे स्वाधीन करण्यांत आले आणि तेथील महालाची वाटणी व व्यवस्था गोविंद बल्लाळ व लक्षुमण शंकर यांजमध्ये पेशव्यांनीं करून दिली.

याच सालीं वरील युद्धांत खंडणी वसुल केली ती संस्थान दतिया, जैतपूर, खेची, रेवा, नरवर, हमीरपूर, ओरछा, काल्पी, कडाकुरा. खंडणी आकार रुपये ५४,२४,३४७ यास तपशील नक्त रु. ५३,८६,३३५ व हत्ती तीन किंमत रु. १३,७५०, उंट एकेचाळीस किंमत रु ६,४७०, कापड किंमत रु. १७,७९२. येणेंप्रमाणें हिशेब होळकर-शिंदेमार्फत पुणें दरबारांत भुक्तमान केला. **(पेशवे जमाखर्च झाडा)**

**सरदारांत माळव्याचा मक्ता ठराव**

प्रांत माळवा मक्ता ठराव होळकर, शिंदे, पवार खालीलप्रमाणें : ७७,००० मल्हारजी होळकर (दरसदे साडे अडतीस), ७७,००० जयाजी शिंदे (दरसदे साडे अडतीस) व ३२००० यशवंतराव पवार (दरसदे सोळा) व १४००० तुकोजी पवार (दरसदे सात), ह्याप्रमाणें दोन लक्ष रुपयांचा ठराव झाला. **(पेशवे दप्तर)** जमाखर्ची हिशेबावरून सदरहु मक्ता ठराव झाला. हा उल्लेख दप्तरमध्यें स. १७४६ सालीं स्पष्टपणे प्रथमच आला. पुढें इ. स. १७६५ चे जमाखर्च पाहतां येथे असा शेरा मारला आहे कीं ही व्यवस्था इ. स. १७४० पासून नानासाहेब पेशव्यांनीं सुरू केली.

**इ. स. १७४७ : जयपूर प्रकरण**

इ. स. १७४७ सवाई जयसिंगचा पुत्र माधवसिंग याच्या भेटी मुक्काम बगथडी परगणे तोडा येथें झाल्या. मुलूख घेऊन रवानगी केली आणि मराठे माघारें उलटले. ते अखेर सालीं उज्जेनीस आले. तेथें होळकर, शिंदे यांस निरोप झाला. निरोपासमयीं मल्हारजींस व गंगाधर यशवंत, रामजी यादव, बाबूराव वाघमारे, राघो लक्षुमण, दादोपंत यांस बहुमान वस्त्रें पेशव्यांनीं दिली.

याच सालीं सवाई माधवसिंगास ईश्वरसिंगाकडून चार महाल मल्हारजींनीं देवविले, म्हणून नजर रुपये दहा लक्ष चार हप्त्यांनीं करार केले. कावनई किल्ला सर केल्याचे होळकरांकडून वर्तमान आले. या कामगिरीबद्दल मल्हारजी व गोविंदपंतास बहुमानाची वस्त्रें देवून पेशव्यांनीं गौरव केला.

**इ. स. १७४८**

स. १७४८ त मल्हारजी व जयाजी यांजकडून करेरा घेतल्याचें वर्तमान आले व दतियासी करार झाले. यासाली खंडणी सुरजमल जाट रुपये पावणे अकरा लक्ष पुणें दरबारांत मल्हारजी मार्फत भुक्तमान. **(पेशवे रेकॉर्ड)**

## इ. स. १७४९–१७५०

सन १७४९ श्रीमंत नानासाहेब, होळकर–शिंदेसुद्धां साताऱ्याचे स्वारीस गेले. शाहू महाराज देवलोक होऊन सर्व सत्ता पेशवे नानासाहेबांचे हातीं आली. यावेळीं मल्हारजी साताऱ्यास नानासाहेबांस पाठिंबा करण्यास आले होते. छत्रपतींच्या मर्यादेमुळे जी थोडी आडकाठी व ''गुप्त नैमित्तिक शक्ती'' अस्तित्वांत होती ती अस्तित्वांतून गेली. पेशव्यांस सर्व मैदान मोकळे होऊन आपले बेत पूर्ण करण्यास त्यांस अवसर मिळाला हें खरें, पण दुसऱ्या बाजूनें पाहतां, आतापर्यंत जो एकछत्रीपणा होता तो नाहीसा होऊन ''मराठा मंडळ' हा शब्द मागें पडला. नानासाहेबांनीं येनकेन प्रकारेण असलेले प्रतिस्पर्धी एका मागून एक बसविले. रघूजी भोसले व बाबूजी नाईक हे आधीच हतप्रभ झाले होते. इ. स. १७५० त प्रतिनिधी व यमाजी शिवदेव यांस गप्प बसविले. सारांश, श्रीछत्रपती शिवाजी महाराजांनीं स्थापिलेले अष्ट–प्रधान–मंडळ'' या शब्दानें, दर्शविलेली ''राजसंस्था'' विलयास गेली असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागते.

## इ. स. १७५० : मल्हारजींस स्वतंत्र प्राप्ती

सन १७५० त मल्हारजींनीं रजपुतांस साहाय्य केल्यामुळें माधवसिंगाकडून दहा हजार व बुंदीकडून दरसाल रुपये पंधरा हजार खंडणी स्वत: मल्हारजींस देणें ठरले.

ह्याच सालीं मल्हारजींनीं उत्तम भाले ३५० साडेतीनशें तयार करवून योग्यतेप्रमाणें संताजी वाघ वैगरे सरदारांस आपले पथकांत वाटले. **(पेशवे रेकॉर्ड)**. ताराबाईंनीं मल्हारजींस आपले बाजूस ओढण्याचा प्रयत्न केला. परंतु पेशव्यांचा पक्ष त्यांनीं सोडिला नाही.

## मराठ्यांचे राजकारणात क्रांती

येथें एक प्रश्नाचा प्रसिद्ध झालेल्या कागदावरून विचार करणें प्राप्त झालें आहे आणि तो प्रश्न म्हणजे जयसिंगाच्या मृत्युनंतर जयपूरच्या गादीसंबंधांत उद्‌भवलेला दोघा बंधूंमध्यें तंटा. त्यांचे विवरण येणेंप्रमाणें करता येते.

जयसिंग हयात असतांच त्याचा धाकटा मुलगा माधवसिंग याचा (मेवाडच्या राजकन्येच्या पोटीं झालेला असल्यामुळें) पूर्वीच्या ठरावानुसार राज्यावर हक्क होता. पुढें ईश्वरसिंगास जयपूरची गादी मिळाली आणि माधवसिंगाचे पक्षानें ईश्वरसिंगाशीं युद्ध सुरू केले. तेव्हां जयाप्पा शिंदे व मल्हारराव होळकर माळव्यांत होते. त्यांस ईश्वरसिंगानें आपल्या मदतीस बोलविलें. त्यांनीं पेशव्यांशीं वाटाघाट करून ही कामगिरी अंगावर घेतली. 'सवाई जयसिंग कैलासवासी झाल्यावर राणोजींनीं पातशहास पैगाम केला जे, करोड रुपये आम्ही देतो, माधवसिंगास राज्य होय.' त्यावरून पातशहांनीं कबूल करून उमदे लोकांस मसलत पुसली. सर्वांस पसंत पडली. इतक्यांत पंतप्रधानांही ईश्वरसिंगासच राज्य द्यावे म्हणोन तजवीज लिहिली, त्यावरून पातशहांनीं मंजूर केले. या नंतर पेशवे लिहितात, ''राणोजीकडील वकील येथें आले आहेत, त्यांत मुख्यार्थ हाच कीं ईश्वरसिंगानें माधवसिंगास

चोवीस लक्षाची जागा द्यावयाचे करार केले, त्यावर सरदारांनीं कारभार बिघडून दिल्यामुळें माधवसिंगाचे काम खराब झाले. आमच्या विचारें ईश्वरसिंगानें कराप्रमाणें माधवसिंगास जागा द्यावी, आणि माधवसिंगापासून बारा, पंधरा, बल्की याहून विशेष जेथवर साधेल तेथवर साधावी.'' यावरून शिंदे-होळकरांनीं प्रथम ईश्वरसिंगाचा पक्ष घेऊन माधवसिंगाचा पराभव केला आणि आतां ईश्वरसिंगाचा पक्ष सोडून माधवसिंगास मदत करावी, असें पेशवे सरदारांस सुचवीत आहेत.

**ईश्वरसिंगास मल्हारजींनीं कैद केले**

**मल्हारजींस रामपुरा मिळाला**

या लढाईत कोटा व बुंदी येथील राजे माधवसिंगाचे बाजूने लढले. ईश्वरसिंगानें जयाप्पांची फौज मदतीस आणून कोट्यास वेढा घातला. कोटेवाल्यांनीं जयाप्पास मोठा दंड देऊन वाटेस लाविलें. यानंतर माधवसिंगानें पांसष्ट लक्ष रुपये देतों तुमची मदत साह्यास द्या, असे कळवितांच ती गोष्ट होळकरानें मान्य करून ईश्वरसिंगांवर चाल केली. असा एकंदर प्रकार झाला यावर खुद्द पेशवे जयपूरचे राज्यांत नेवाईस गेले. इ. स. १७४८ च्या एप्रिल महिन्यांत पेशव्यांची व माधवसिंगाची भेट झाली. माधवसिंगाचा पक्ष पेशव्यानें उचललेला पाहून ईश्वरसिंगाने तडतोड केली आणि त्यास नेवाईसुद्धां चार महाल देण्याचे कबूल केले. ''बाबत नजर माधवसिंग सवाई जयसिंगाचे कनिष्ठ पुत्र यांस ईश्वरसिंगाकडून चार महाल देवविले. भाऊपणाचा हिस्सा द्यावयाचा करार केला. नजर करार रु. दहा लक्ष. सदरहु रुपयांची निशा मल्हारजी होळकरांनीं करून पत्र लिहून दिले.'' परंतु पेशव्यानें केलेला वरील ठराव ईश्वरसिंगानें पाळला नाही, तेव्हां होळकरांनीं त्यास नरम केले व करार पुरा करून घेतला. राजश्री गंगाधरपंत चंद्रचूड याजबरोबर फौज देऊन मल्हारजींनीं जयपुरास रवाना केले. चार घटका युद्ध झालें. त्यांनीं संकट जाणून सलूख्याबद्दल निरोप पाठविला. बुंदी सोडून देतों, माधवसिंगाचे चारही परगणे निखालस खाली करून देतों, ऐसा करार कबूल केला. पुढें ईश्वरसिंग निवर्तले व माधवसिंगास राज्य मिळालें. मेवाडचे राज्यांतून रामपुरा परगणा माधवसिंगास मिळाला होता तो त्यानें आतां होळकरांस दिला. रामपुरा परगण्याची प्राप्ती येणेंप्रमाणें झालीं.

हें सर्व प्रकरण विशद करून मांडण्याचा हेतू हा कीं, येथें स्पष्टपणें मराठ्यांच्या काम करण्याच्या पद्धतींत फरक पडलेला दृष्टिगोचर होतो. यावनीं आक्रमणास तोंड देऊन हिंदुपदपातशाही स्थापन करण्यास बाहेर पडलेले मराठे पैशाच्या लालुचीनें आपल्या ब्रीदापासून ढळलें हे येथें कष्टानें नमूद करावे लागतें. तसेंच या प्रकरणापासून जी संघशक्तीत फूट पडलेली दिसते तिचा जन्म पूर्वींच झाला होता, येवढें मात्र खरें. दोन्ही हस्तांस सावरून धरणारे शीर्ष ह्यात होतें तोपर्यंत ही दुही बाहेर फुटली नाही. हस्त तेच पण शीर्ष बदलले. हें आमचें म्हणणें पुढील पत्रावरून सिद्ध होईल. (मल्हारजी होळकरांनीं श्रीमंतांस लिहिलेलें पत्र खालीलप्रमाणें) **(पेशवे सिलेक्शन भाग २१, ले. १५, इ. स. १७४५)**

**मल्हारजींचे पेशव्यांस पत्र**

शेवेसीं विज्ञापना, राजश्री त्रिंबक विनायक याजला जैतपूरच्या मुक्कामाहून पत्रें पाठविलीं. त्यासीं त्यांनीं पत्रार्थ स्वामींस श्रुत केला असेल. तद्नंतर आजतागाइत आपली स्थितरीत पूर्वी कैलासवासी यांजपासून स्वामींसेवा करितो. येकनिष्ठेचा विचार जो आहे तो स्वामींचे चित्तसाक्ष असे. सेवक लोकांनीं परिहार ल्याहावा ऐसें नाहीं. राणोजी शिंदे सोबती मातब्बर होते. परस्परें मर्जी रक्षून स्वामीकार्यास तत्पर होते. त्यामुळें कामेंही उमदी होऊन आली. मधें-मधें त्यांच्याही बुद्धीस कांहीं विपर्यास आला. त्यामुळें कितेक स्वामीकार्यास नाश होऊं लागले. ते केवळ आपलीच ओढ शेवटास न्यावी या विचारें वर्तणूक करूं लागले. आम्ही कांहीं दुसरी गोष्ट दिसों न दिली. एक स्वामींची मर्जी जाणून सेवा मात्र केली, कोणी ओढ दुसरी न दाखविली, हे सर्व हरिद्र स्वामींस निवेदन आहे. गतवर्षी संबळगडचे अनुसंधान आम्हाकडे आलें. त्याचा निश्चय सर्वांनी मिळोन केला. शेवटीं ते कार्य प्राप्त जालीयाऊपर ममता निर्माण होऊन कार्ये मोडून दुसरीकडे गेले. त्याचा परिणाम न जाहला. शेवटी सांप्रत अवंदा तेच करार केले. आमचा मात्र अपमान न करावा येवढी गोष्ट मात्र केली. तेच वेळेस सोबतीची पूर्ती झाली. त्यासीं विगतीनें राणबास देवआज्ञा झाली. तेव्हां मग तर बोलतां नयेसें झाले. लौकिक विरोध दिसोन येतो. त्यासीं आम्ही सर्वही टाकून दुसरा विचार तिळतुल्य न दाखविला. लग्न सिद्ध करून मुलुखगिरीस चालिलों. त्यासीं थोर कार्य सरकारचे बुंदेलखंडचे. त्याचे वर्तमान धारेचे मुक्कामीं आलें कीं कामकाज सुरळीत चालते. त्यासीं एकले राजश्री जयप्पा व बावा गेलिया कार्य होईल ऐसे जाणून डोंगरपूर प्रांते फौजा बहुत दिवस गेल्या नव्हत्या, बंदोबस्त करणें, यास्तव तिकडे गेलो. दुसरें, बावाच्या मनांत दुरभिमानाचा कारभार करावा, आमची हेकडता दर्शवावी या पश्चात्तापेकरूनही तिकडे गेलों. यामुळें स्वामींनीं पत्रीं शब्द लावून लिहिलें कीं पेरणी टाकून पलाटिया (म्ह. कापसाच्या काड्या) उपडावयासी गेलेत. बुंदेलखंडामध्यें पेरणी केलीच होती त्यांचे संरक्षण बावा येऊन करतील. आम्ही इकडे नवाच राणवा काहडून शेत पिकवावें येच निमित्यें मेवाड प्रांतीं आलो. त्यासीं कार्यही उत्तम योजून आले. कोणाचा नाश न होतां उत्तम लाभ व्हावा ऐसा इत्यर्थ केला होता. तो राजश्री जयाजी शिंदे यांची एक दोन पत्रें आलीं कीं बुंदेलखंडचे कामकाज मातबर आहे. बुंदेलियांनी बदल खाल्ला आहे. विना मातबर फौज असलिया खेरीज सिद्धीते पावणार नाही. यास्तव निकड जाणून अतिसत्वर आले पाहिजे. त्यावरून साहेब काम मातबर जाणून, जयाप्पांची ममता धरून, रातचा दिवस करून, लांब लांब मजलीनें येऊन, जैतपूरास सामील जाहलों. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

**आधार ग्रंथ**

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
पेशवे एलिनेशन रेकॉर्ड



प्रकरण १४ वें

# इ. स. १७५० ते १७६१ पावेतों

**इ. स. १७५० : मल्हारजींस प्राप्ती नगद व मुलखाची सनद**

सन १७५० ते १७६१ पर्यंत मल्हारराव होळकरांकडून जी कामगिरी झाली व त्याबद्दल त्यांचा जो बहुमान व जी प्राप्ती झाली ती माहिती सनवार दिली आहे.

सन १७५० राजा उमेदसिंग याजकडून खंडणी वसूल केल्याबद्दल बक्षीस श्रीमंतांकडून नगद रु. १५०००० दीड लक्ष मल्हारजी यांस व दीड लक्ष जयाजी शिंदे या उभयतांस मिळाले. याशिवाय मल्हारजींस व त्यांचे सहायकांस इनामी जमिनी, सरदेशमुखी, सनद उत्राण, मुंगठी वगैरेंची मिळाली.

**मल्हारजींचे सरदारांस प्राप्ती**

**मल्हारजींचा कुटुंब, सहपरिवार सन्मान**

१ इमानपट्टी, मिरासपट्टी : (१) मौजे बिबवी, तालुके खेड, प्रांत जुन्नर, (२) कसबे आळे प्रांत जुन्नर.

१ मौजे मुंगठी, परगणे ललिंग येथील सरदेशमुखी व मोकासा सालगुदस्तप्रमाणें.

१ खासा मल्हारजींकडे प्रांत जुन्नरपैकीं (१) लाखणगांव, (२) वाफगांव, तालुके खेड. (३) परगणे उत्राण, प्रांत खानदेश येथील सरदेशमुखीची कमावीस.

१ संताजी वाघ, मौजे काठापूर बुद्रक, तालुके अवसरी, प्रांत जुन्नर.

१ गोविंदराव बुळे, मौजे उडवडी, तालुके सांडस, प्रांत पुणें.

आरसे महालांत श्रीमंतांनीं मल्हारजी व त्यांचे पुत्र व प्रपौत्र व त्यांचे कुटुंबाचे मंडळीस बहुमान वस्त्रें, जडजवाहीर दागिने देऊन गौरव केला.

| | |
|---|---|
| १३३८७ | खासा मल्हारजींस चौकडा मोत्यांचा किंमत रु. ७८७६, शिरपेंच जडवाडाचा किंमत रु. ४४६५ (भाऊसाहेब पैकीं), पोशाख जरी, किनखाप मंदील, झगा पायजमा, शेला, रु. १०४६ |
| १८६९ | सौभाग्यवती गौतमाबाई व सौ. अहिल्याबाई व लेकी यांस वस्त्रें, पैठणी, शालू, चोळखण वगैरे. |
| १११५ | पुत्र खंडेराव होळकर यांस मंदील, पोशाख व कडी सोन्याची. |
| ३४१ | मालजी होळकर (विश्वासराव पेशवे यांचेपैकीं) पोशाख जरी. |
| २५५ | मल्हारजींचे अंगवस्त्र, बनाबाईस वस्त्रें, लुगडे, किनखाप. |
| ५२२ | मोहीबाई, मल्हारजींची सासू, पोशाख. |
| ४९८ | बाबूराव वाघमारे, जावई, यांस मंदील वगैरे. |
| ४९३ | गोविंदराव बुळे यांस मंदील, पोशाख. |
| ४८० | संताजी वाघ यांस मंदील, पोशाख. |
| ८४५ | गंगाधर यशवंत चंद्रचूड, पोशाख रु. २०६, रामाजी यादव पळसीकर, पोशाख रु.१८७, उदाजी लांभाते, पोशाख रु. १५०, राघो लक्ष्मण, रु. १२३, रावजी महादेव व्यास हु. फडणीस, पोशाख रु. ६४, मजमदार गोळे, रु. ११५ |

**इ. स. १७५१ मल्हारजींचे मार्फत खंडणी वसूल**

**खंडणीतून मल्हारजींस देणगी**

**रोहिल्यांवर मात**

जप्ती गंगाधर सादुल्लाखान रोहिल्यामार्फत मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे, खंडणी वसूल बदाऊ, शहाबाद, जेतागुजर, तिल्हार, संभळ, सिरसी, मुरादाबाद, अवरोह, एहमदपूर, नरोली, खंडणी रुपये ६१९०४० सहा लक्ष एकोणीस हजार चाळीस व दिल्ली खंडणी रुपये ३०००००० तीस लाख, मनसूरअली मार्फत व अंतर्वेद रु. ३६६९५४ व सुरजमल जाट रु. २१९३२६; ह्याशिवाय हत्ती तेरा. यापैकीं कांहीं चौथाई, कांहीं तिजाई हिस्सा उभयतां होळकर शिंदे यांस दिला. यासंबंधात पेशव्यांचे उद्गार मननीय आहेत ते : **(काव्येतिहाससंग्रह पृष्ठ ८६ चे पत्रांतील मजकूर.)** पेशवे लिहितात, ''अहमदशाखां बंगश, बहादुरखां रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहा-बारा हजार स्वार व प्यादे यांजसी कुमकेस आणिलें सरदारांची फौज व जाटाची फौज व नबाब वजीराची फौज गंगापार होऊन छ. ३ जमादिलाखरीं लढाई झाली. बहादुरखां रोहिला बुडविला. हजारों घोडीं पाडाव केली, हत्ती पाडाव केले. हे वर्तमान बंगसानें ऐकून घाबरा झाला. दुसरें दिवशीं पळून गंगापार गेला. लष्करच्या लोकांनीं घोडीं पाडाव फार आणिली. तोफखाना पाडाव केला.'' म्हणोन

लिहिलें ते श्रवण होऊन संतोषाच्या कोटी जाहल्या. शाबास तुमच्या हिंमतीची व दिलेरी रुस्तमीची व शाबास लोकांची. आमच्या दक्षिणच्या फौजांनीं यमुना, गंगापार होऊन रोहिले पठाणांसीं युद्ध करून आपण फत्ते पावावें हे कर्म लहान सामान्य न जालें: तुम्ही एकनिष्ठ: कृतकर्मे सेवक या दौलतीचे स्तंभ आहा. जे चित्तावर धरितां तें घडून येतांत. पहिली यशावह कर्मे संपादिलीत ततोद्यधिक हे यश संपादिलेंत. या यशास जोडाच नाहीं. परंतु केल्या मनसुबियाचा अर्थ किमपि लिहीत नाही ऐसें नसावे. सर्वदा आपलें कुशलवृत्त लिहीत जाणें. तेणेंकरून संतोष होत जाईल. मोठा मनसबा कठीण होता. नाना प्रकारचीं येथें वर्तमानें उठतात. तुमचें पत्र तो येत नाही. याजमुळें चित्त चिंतेंत होतें. इराण व तुराणपावेतों लौकिक झाला कीं, वजीर मोडला, पळाला असतां फिरोन फत्तेच्या मनसदीवर बसविला. याजहून यश कोणते अधिक आहे? या उपरी तेथील रंग भरून, स्वकार्य साधून आपले मुलुखांत येणें योग्य आहे. छ. ७ रजब बहुत काय लिहिणें.

**मल्हारजींची मोगलांवर मात**

मल्हारजींनीं मोगलाईंतील किल्ले सर केले. (१) किल्ले मार्कंड, (२) किल्ले इंद्राई, (३) किल्ले चांदवड, (४) किल्ले केनेरा, (५) किल्ले रोजोद खारवे, (६) व किल्ले धोडप. येणेंप्रमाणें किल्ले सहा. सदरहू किल्ले हस्तगत करण्यास खर्च रुपये ९२,२३४ जाहले असोन हस्तगत नंतर त्यांचे बंदोबस्तास खर्च रुपये ९१,३०७ एकूण आकार एक लक्ष त्र्याऐंशीहजार पांचशें एक्केचाळीस. पुणें दरबारानें हा खर्च अंगिकारिला.

**सन १७५२ मल्हारजींकडून धर्मादाय नेमणूक**

धर्मादाय देवस्थान खर्च मल्हारजी होळकर यांनीं श्री ओंकारेश्वर, मंडलेश्वर, बढवाई इत्यादि ठिकाणीं केला. नेमणूक नैवेद्याबाा. रु. ५१७ व ब्राह्मण अंकेश्वर रुपये २५ व चंद्रेश्वर पुरोहित रुपये २५ व चंद्रेश्वर शुक्ल रु. २५, याप्रमाणें नेमणूक करून दिली.

**कोटा, बुंदी व सिरसी येथीली खंडणी मल्हारजींस बहाल**

**मल्हारजींस सहकुटुंब बहुमान**

**तुकोजीराव प्रथम होळकर यांस पेशव्यांकडून नेमणूक**

स्वत: खंडणी कोटा संस्थान, रु.१४५२६ व पाटण केशवराय प्रांत बुंदी, खंडणी रु. ९४१२२, सिरसी, तिसाला खंडणी रुपये १३९५०. ही खंडणी रजवाडे लोकांस आणीबाणीचे वेळीं साहाय्य केल्यानें मल्हारजींस देणें करार झाले. सदरेत वस्त्रें, खासा मल्हारजी, सौ. गौतमाबाई, नातू मालबा व कन्या व सून अहिल्याबाई यांस वस्त्रें, सदरेंत पोशाख व शिलकेपैकीं दागिनें, मोत्यांच्या कंठ्या दोन व शिरपेंच जडावाचा एक याप्रमाणें बहुमान झाला. श्रीमंतांनीं तुकोजी होळकर निस्बत मल्हारजी यांस तनखेत खालील गांवे लावून दिली. (१) मुंगठी, तनखा रुपये २०३० व (२) वडजाई तनखा रु. १६०६, (३) न्याहळोद तनखा रु. ६५२६, (४) चंदनपुरी, निंबाइत तनखा रु. १४६५ व (५) डांगरी

तनखा रु. ५५०० व बिन आकारी तनखेची गांवें चार ४, थालनेर पैकीं २ व अंबेपैकीं २ दिलीं.

**इ. स. १७५३ मल्हारजींस सनदा**

सन १७५३ सालीं मल्हारजी होळकर यांचे नांवें सनदा जहागीर, इनामी वगैरे खालीं खुलासा केल्याप्रमाणें.

१ मौजे जांबगांव परगणे गांडापूरपैकीं देह तेथील वाडिया मजरेसुद्धां नूतन इनाम गांव मोगलाईत चालत आल्याप्रमाणें सुदामत.

१ परगणे गांडापूरपैकीं गांवे (१) धोंधलगांव (२) कसबे सिऊर तेथील वाडिया व मजरे, सरंजाम मोगलाईत चालत आल्याप्रमाणें.

१ किल्ले सोनगडची जहागीर इजारा राजश्री मल्हारजी होळकर यांजकडे दरोबस्त दिवाणी फौजदारी.

२ परगणे चांदवडपैकीं कस्बे निफाड व मौजे पिंपळ्या वसंत.

१ मौजे कोकमठाणे परगणे कुंभारी हिस्सा.

१ मौजे रोही तळेगांव परगणे पाटोदे.

१ मौजे हणवंतगांव परगणे वैजापूर.

---

५

एकूण गांवें पांच बेरीज रुपये ८००१ (आठ हजार एक) द्यावे साल दरसाल. सोनगडची जहागीर आहे ऐसियासी तेथील इजारा आठ हजार एक, करार केला आहे, साल दरसाल किल्ल्याकडे देत जाणें.

एक करारनामा मल्हारराव होळकर व जयाजी शिंदे व आजममीर महमदसफी बेगखां या दरम्यान झाला. तो खाली दिला आहे.

**करारनामा होळकर शिंदे व खान आजममीर महमदसफी बेगखां**

''करारनामा राजश्री मल्हारराव होळकर व राजश्री जयाजी शिंदे खान आजममीर महमदसफी बेगखां, प्रांत सरे नूर महाल चार तपशील.

१ परगणे मदलावद. १ परगणे केदरवाडा. १ परगणे खेलचीपूर २ परगणे आलणपूर

महाल चार येथील करार याप्रमाणें जाहला असे. तालुके दरोबस्त चार महालचा अंमल देखील भाल व सायर व फौजदारी व फरोई व नाकेदारी व जरीबाना व नजराणा व तलबाना वगैरे कुलबाबसुद्धां जो आकार होईल त्यापैकीं निम्मे सरकारांत कमाविसदाराकडे द्यावा व निम्मे तुम्ही घ्यावा, त्यात जहागीरदार वगैरे मोगलाईकडील अंमलदार असतील त्यांतला तुम्ही समजवावे. जे कोणी अंमलात खलेल करतील त्यांजला तुम्ही व आम्हांकडील कमाविसदार मिळून तंबी पोहचवावी. आपले हिश्याप्रमाणें जमावाचा खर्च आपापल्या हिश्यांतून समजावा. वाटणी याचा तपशील :

| सरकारांत ठाणीं | खान मशारनिल्हेकडे ठाणीं |
|---|---|
| १ मौजे सुरवल | १ कसबे खिलचीपूर |
| १ मौजे आवण | १ कसबे केदरवाडा |
| १ कसबे आलणपूर | १ कसबे सेरपूर |

तीन ठाणीं सरकारांत तीन ठाणीं खान मशारनिल्हेकडे करार केली असे. याशिवाय मौजे कुडेरा परगणे मदलावद येथील ठाणें समाईक. दोघांचे झेडे दोन उभे करावे. दरोबस्त चौमहालची ठाणीं देखील निमेनिम पडल्यानें घ्यावी. कसबे सेरपूर येथील दरोबस्त अंमल तुम्हांकडे दिला असे. हा करारनामा लिहिला. (ता. १९-११-१७५३)

**मल्हारजींमार्फत खंडणी वसूल**

सालमजकुरीं मल्हारजींमार्फत पुणें दरबारांत खालीलप्रमाणें खंडणी आली. सादुल्लाखान, २,१९,९४०; दिल्ली खंडणी, ५,८०,६२५; सुरजमल जाट १,५५,३८५; मेणपूरी खंडणी, ३९,७९५; सं. जयनगर, १५००; सं. उदेपूरनगर, २,५०,०००; प्रांत अंतर्वेद, ९०००.

**मल्हारजींस विजयादशमी दसऱ्याचा बहुमान : इ. स. १७५४**

शके १६७५ आश्विन शुद्ध विजयादशमीस दसऱ्याचा बहुमान पोशाख खासा मल्हारजींस व त्यांचे कुटुंबास वस्त्रें श्रीमंतांकडून मिळाली. (पे.रे.) प्रांत अंतर्वेदी येथील महाल फौजेचे बेगमीस मल्हारजींस सनदा करून दिल्या. तपशील येणेंप्रमाणें :

(१) परगणे कन्नोज आकार रु. ८२,३१५, (१) परगणे देवळाली रु. १,५०,००१, (१) परगणे सकीट आकार रु. १,७५,०००, (१) परगणे आलीपूरखेडा, रु. ६५,०००, (१) परगणे सोरा, गंगेरी, पंचकुणा रु. ६७,०००, (१) परगणे सिंकदरा रु. १,०३,६८५, येकुण महाल आठ आकारी रुपये सहा लक्ष त्रेचाळीस हजार येक. वंशपरंपरा जहागीर परगणा चांदवड गांवें १५३ आकार रुपये, २,३७,३८३ परगणे अकबराबाद अंतर्वेदपैकीं समाईक होळकर शिंदे सनद.

**सरकारची नेमाडची सत्ता व होळकर, शिंद्यादि सरदारांत वाटणी**

प्रांत नेमाड सरकार मांडवगड येथील देशमुखी व कानगोईपणाचे वतन सरकारे होतें ते राजश्री मल्हारजी होळकर व जनकोजी शिंदे यांस करार करून सनदा दिल्या. नजरबद्दल दहा हजार एक रुपये सरकारांत दिले.

संस्थान कोटे संवत १८११ ते संवत १८२६ पोटीं करार दरसाल खंडणी साडेचार लक्ष ४,५०,००० प्रमाणें सोळा सालीं आकार रु. ७२,००००० यांचे वाटणीचा तपशील.

२७,७२,००० होळकर दरसदे साडेअडतीस, २७,७२,००० शिंदे दरसदे साडेअडतीस व १६,५६,००० पवार दरसदे तेवीस.

### खंडेराव होळकरांचा मृत्यु व छत्री

खंडेराव होळकर कुंभेर रणक्षेत्रांत पडले. त्यांचे उत्तरक्रियेकरितां श्रीमंत पेशवे सरकारांनीं मंजूर केले रुपये १०,०००. मल्हारजी होळकर यांचा राग शांत व्हावा व आपल्यावर स्वारी करून त्रास देऊ नये म्हणून कुंभेर येथें खंडेरावांच्या छत्रीच्या खर्चाकरितां गांगरसोली, तमरेली, सहत, वगैरे १५,४२७ उत्पन्नाची गांवें व मिठागर ही खर्चाकरितां लावून देऊन त्यांच्या सनदा सुरजमल जाट भरतपूरकर यांनीं करून दिल्या व पेशव्यांनीं मान्य केल्या. त्या इसवी सन १८४८ पर्यंत चालत आल्या.

### पेशव्यांस नजर, होळकर–शिंद्यांकडून

श्रीमंतांस नजर होळकर व शिंदे यांजकडून संस्थान बुंदीपैकीं खंड वसूल केला त्यापैकीं मल्हारजींनीं अडीच लाख व शिंद्यांनीं अडीच लाख दिले.

### होळकर हे चांदवडचे देशमुख दुर्गेश

मल्हारराव होळकर आणि त्यांचे गादीवर येणारे वंशज स्वत:स 'देशमुख चांदवड' असे कांहीं प्रकरणीं म्हणवितात. ही देणगी त्यांस दिल्ली बादशहाकडून मिळाली आणि याचे दर्शक म्हणून त्यांची एक स्वतंत्र मुद्रा आहे. ती मुद्रा येणेंप्रमाणें :




### चांदवडास मल्हारजींची कामगिरी

चांदवड हें अगदी नाक्याचें ठिकाण आहे. उत्तरेकडून दक्षिणेकडे जाणारा खुशकीचा रस्ता येथून वाहत होता. मल्हाररावांनीं येथें बांधिलेला रंगमहाल अजून व्यवस्थित आहे. जयपूरचे कारागिरांकडून हा महाल बांधला होता. वाड्यांतील रंगाचें काम अजून शाबूत आहे. मल्हारजींनीं येथें व्यापारी पेठ बसविली व टाकसाळही स्थापिली. या टाकसाळींत रुपयांचे, तांब्याचे नाणें पाडीत. रुपया 'चांदवडी' नांवानें प्रसिद्ध होता. ही टाकसाळ इ. स. १८३० त बंद पडली.

चांदवडची सरदेशमुखी शके १६७४ (इ. स.१७५२) त पंचवीस हजार रुपयाला मल्हारजींनीं खरेदी केली. खरेदी खत त्या काळची लोकस्थिती व ग्रामसंस्था यांचे एक व्यवस्थित दर्शक असल्यामुळें पुढील प्रकरणांत ते सविस्तर दिले आहे. आजमितीस संस्थानचा दक्षिणकडील कारभार चांदवड येथूनच चालतो. यामुळें या ठिकाणचें महत्व आहे.

**इ. स. १७५४–५५**

**उत्तर हिंदुस्थान स्वारी : मल्हारजींस प्राप्ती**

स्वारी होळकर शिंदे पातशहा दिल्लीकडे करार केले. रुपये ८२,५०,००१ पैकीं नबाब गाजुदीनखानाकडून वसूल रुपये ९,७९,१४० याच्या हिश्श्यांत मल्हारजींस वाटणी दरसदे रुपये तेवीस पांच आणे.

**इ. स. १७५५**

संस्थान बंगाला खंडणी अकरा लक्ष रुपये पैकीं मल्हारजींस वाटणी दरसदे तेवीस रुपये पांच आणे. याशिवाय रेवाडी, गढी, शिरसी, शाळकोट, सरबंद, जेतागूजर, गंगापार रोहिला, कुंजपुरा, जैनगर व जाट आकार चार लक्ष त्रेसष्ट हजार पांचशें पस्तीस. यांत मल्हारजींचा हिस्सा दरसदे तेवीस पांच आणे. किल्ले ग्वाल्हेर येथून तोफा उत्तम चार मिळाल्यापैकीं तोफा २ सरकारांत पाठविल्या व दोन तोफा मल्हारजींनीं घेतल्या.

**इ. स. १७५५ : महेश्वर येथील धार्मिक कृत्य**

मुक्काम महेश्वर श्रीकार्तवीर्यार्जुन राजराजेश्वराप्रीत्यर्थ खर्च. मंदिर जीर्णोद्वार बांधकाम रुपये दोन हजार. उद्यापनानिमित्त व अन्नसंतर्पण करविले. खर्च रुपये दहा हजार. एकूण खर्च १२०००.

श्रीमंतांनी मल्हारजी होळकर यांचे सरदार मुत्सद्दी लोकांस इनाम जहागीर सनदा दिल्या. बतपशील :

- १ रावजी महादेव व्यास, मौजे लोणी तालुके निघोज दरोबस्त निधी निक्षेप.
- १ बजाजी मतकर, मौजे नीमन परगणे धोधरफल जहागीर मुकासा.
- १ गंगाधर यशवंत चंद्रचूड, तनखेबद्दल नाशिकपैकीं देवळाली रु. ३२८० व जासमेरी रु. ८७४ एकूण चार हजार एकशें चौपन. नेवासे, दहीगांव, रांजणी हे गांव जहागीर.
- १ पळसीकर आनंद रामाजी यादव यांस करंजगांव, खामगांव, धोधरगांव व गोपाळपूर इनामी जहागीर.
- १ राघो लक्ष्मण यांस देवगांव व घोडगांव.

**पातशाही सनदा**

मल्हाररावांनीं खानदेश दरोबस्त जहागीरीच्या पातशाही सनदा आणल्या. श्रीमंतांजवळ मामलेदार जाऊन मामलती करीत होते.

**इ. स. १७५६**

मौजे मनचर प्रांत जुन्नर येथील पाटीलकी मल्हारजी होळकर यांनीं खरेदी केली.

**ता. ९-१-१७५६**

मालजी होळकर यांस जहागीर. राजमंडळ स्वारी राजश्री पंतप्रधान यांजकडून सनदा पत्रें : (१) मौजे कापटणे परगणे सोनगीर हा गांव जहागीर मुकासा व बाबती सरदेशमुखी दरोबस्त,

**मल्हारजींचे धार्मिक धोरण**

श्रीक्षेत्र जेजुरी येथील देवास वाघे व मुरळी वाहण्याचा प्रघात बराच जुना होता. सरकारी अधिकारी, इतरांप्रमाणें यांसही बिगारी धरून नेत. मल्हारजींनीं पेशव्यांस विनंती करून या वाघ्या-मुरळ्यांची बिगारीतून मुक्तता केली.

**इ. स. १७५६-५७**

**सावनुरांत मल्हारजींचा बहुमान, त्यांचे उदारत्व**

**इ. स. १७५८**

श्रीमंत नानासाहेब पेशवे मल्हारजींचे डेऱ्यांत तुंगभद्रेचे मुक्कामीं गेले. ते समयीं बहुमान श्रीमंतांचा केला. जवाहीर, कापड वगैरेबद्दल जमा रुपये ३००००. सावनूरचा किल्ला हा अजिंक्य असा गणला जात असे. नबाबाचे नौकरीत मुजफरखान होता. प्रथम तो पेशव्यांकडे होता हेच एक कारण लढाईस झाले. त्याचा ५०००० रुपयांचा हवाला मल्हारजींनीं घेतला. या लढाईत मल्हारजी व विंचूरकर यांनीं मोठाच पराक्रम केला. विंचूरकरांकडील सरजेखान आणि मत्ताखान यांनीं मराठ्यांचा बाहुटा किल्यावर लाविला. मल्हारजींनीं विंचूरकरांची बाजू पेशव्यांपुढें मांडून ग्वाल्हेर संबंधात खर्ची झालेले बारा लाख रुपये पेशव्यांकडून विंचूरकरांस देवविले. पुणें दरबारांत होळकर व शिंदे यांची सरंजाम निवाड्याची यादी तयार झाली. त्यांत होळकर चौऱ्याहत्तर लक्ष (७४०००००) व शिंदे साडेसहासष्ट लक्ष (६६५००००).

**इ. स. १७५८**

१ राजश्री मल्हारजी होळकर यांचे सरंजामाचा तपशील खालीलप्रमाणें :

| | |
|---|---|
| २५००००० | पंचवीस लक्ष नवा, जुना, बुळे, बारगळ, वाघसुद्धां. |
| १५००००० | पंधरा लक्ष नवा सरंजाम, अंतर्वेद मोहिमेबद्दल. |
| ४००००० | चार लक्ष थालनेर, अडावद, सेवगांव वगैरे किरकोळ सुद्धां. |
| ७५०००० | सात लक्ष पन्नास हजार शहापुरा वगैरे राणा जैनगर व बुंदीवाल्यांचे परगणे घेतले त्याजबद्दल आकार. |
| २२५०००० | बावीस लक्ष पन्नास हजार श्रीमंतांकडून स्वारीसंबंधांत हिस्सा वाटणीचे. |

७४०००००

**अजमीरकडील मल्हारजींची प्राप्ती**

प्रांत तोडा सरकार रणथंबर सुभे अजमेर. गांववार वसुली झडती संवत १८१५ (इ.स. १७५८) आकार रुपये ८९,२८६. अंमल श्रीमंत मल्हारजी होळकर कमाविसदार मशारनिल्हेतर्फे विष्णू महादेव व सदाशिव महादेव श्रीमंत नानासाहेब पेशव्यांनीं आपले समक्ष राजश्री मालजी होळकर (मल्हारजींचे नातू) यांस बहुमान मोत्यांची जोडी शिलकेपैकीं व तीन वटचुनडी, दुपट्टाशेला, किनखाप, मिठाजरी याप्रमाणें सन्मान केला. श्रीमंतांकडून इंदूराहून सौभाग्यवती गौतमाबाई होळकर यांनीं जरूरी पत्रें देऊन शयफू सांडणीस्वारास पुण्यास पाठविले. त्यास श्रीमंतांनी बक्षीस चार रुपये देऊन परत केले. (या पत्रावरून अंदाज करण्यास हरकत नाही कीं मल्हारराव होळकर हे यावेळीं कोठें स्वारीत असावे व बाईसाहेब खासगी कारभार स्वतः पाहात होत्या.)

सौभाग्यवती गौतमाबाई होळकर यांचा कैलासवास (परगणे रामपुरा हिशेबावरून) इंदूर येथें जाहला. छत्रीखर्च रुपये १२४३ व धर्मादाय जमिनी इनाम, धर्मादाय व गांव उछकीबद्दल रुपये ९९४८.

**इ. स. १७६१**

**पानिपत रणसंग्राम झाला**

**इ. स. १७४० ते १७६१**

या एकवीस वर्षांत उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांनीं जी कमाई केली तिचे वर्णन इतरत्र केलेले आपणास पहावयास मिळते. लढायांची वर्णने त्रोटकच. कार्यकारणभाव अंदाजानें दर्शविलेला आणि त्या सर्व इतिहासांचें केन्द्र ''हिंदुस्थानचा इतिहास'' अगर ''मराठ्यांचा इतिहास''.

आम्हांस ''होळकरांचा इतिहास'' लिहावयाचा या दृष्टीनें जी माहिती मिळविली ती साद्यंत आतापर्यंत नमूद केली आहे. तिच्यावरून मल्हारजींच्या कर्तबगारीची कल्पना साधार करिता यावी या हेतूनेच मानसन्मानांची यादी सादर केली आहे. त्या यादीवरून माळव्यांत, बुंदेलखंडांत, राजपुतान्यांत, अंतर्वेदींत, बंगाल्या व दिल्लीकडे मल्हारजी काय करूं शकलें हें स्पष्ट होईल. जसजसा उदय होत गेला तसतसा त्यांचा उदारपणा फैलावूं लागला. तीर्थक्षेत्रांचा जीर्णोद्धार व दाक्षिणात्यांची वसाहत ही त्यांच्या उदारमनस्कतेची व धोरणाची दर्शके सालोसाल नूतन जिंकिलेल्या प्रांतांत दृग्गोचर होत गेली हे वरील यादीवरून कळेल. अस्तु.

ह्या एकवीस वर्षांतील लढायांची वर्णनें व पत्रव्यवहार अधिक प्रमाणांत मिळावींत. पण ती इकडील दफ्तरांत लाभलीं नाहींत याबद्दल खेद वाटतो. मिळाली त्यांचा उपयोग केला आहे. पुढेंपाठीं आणखी मिळाल्यास त्याचा उपयोग केला जाईल.

**आधार ग्रंथ**

पेशवे दप्तर
होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
काव्येतिहाससंग्रह



प्रकरण १५ वें

# मल्हारजींचा राज्यकारभार
# इ. स. १७३६ ते १७६१

### इ. स. १७५०–१७६१ राज्यविस्ताराबरोबर मल्हारजींच्या प्राप्तीचाही विस्तार

मागील प्रकरणांत मल्हाररावांनीं बाजीरावसाहेबांच्या पश्चात नानासाहेबांचे बरोबर राज्यविस्ताराची जी कामगिरी इ. स. १७५० ते इ. स. १७६१ या अकरा वर्षात केली तिचें वर्णन व त्याबद्दल त्यास प्राप्त झालेले बहुमान, इनामे, सरंजाम व जहागिरी यांचे वर्णन आले आहे. या संबंधात एका दृष्टिकोनाचा उल्लेख करून नंतर मल्हारजींच्या राज्यकारभाराकडे वळूं.

### इ. स. १७२० ते १७४१ चा आणि इ. स. १७२० नंतरचा दृष्टिकोन

### मल्हारजींवर केलेले दोन आरोप आणि त्यांचे स्पष्टीकरण

इ. स. १७२० आणि १७४० या वीस वर्षांच्या कालखंडाकडे कोणत्या दृष्टीनें इतिहासकारानें पाहावयाचे हे प्रथम निवेदन केले पाहिजे. (१) इ. स. १७२० त मराठे जेव्हां पुढें सरले तेव्हां यावनी जुलमाची झळ अगदीं धगधगीत होती. त्यावेळीं धिटाईनें जो कोणी पुढें धजेल तो इतरांस 'सखा सगा सोयरा' असाच भासेल. ती भावना मराठ्यांसंबधीं रजपूत, जाट, बुंदेल इत्यादिकांस वाटणें साहजिक होते. दुसऱ्यापक्षीं, पुढें येणाऱ्या वीरांस ''धीर सो गंभीर'' हेच ब्रीदवाक्य थोरवीचे वाटणें

साहजिक होते. पहिले बाजीरावसाहेबांच्या वागणुकींत हे तत्त्व अनेक वेळां दिसून आले. निजाम व बादशहा यांसी संग्राम चालू असताही व नंतरही त्यांची वागणूक धीरोदात्त होती. (२) वीस वर्षे लोटली. झळ होती कीं नाहीं असें होऊन गेलें. एक पिढी गेली व दुसरी पिढी जन्मली. नव्या पिढीला मागील झळीची जाणीव तितकीशी असणें असंभवनीय. तेव्हां त्रस्त झालेले आतां सावरले, सुखरूप झाले आणि जे प्रथम 'सखे सगे सोयरे' म्हणून आले त्यांची नवी पिढी आपणास जेते असें समजूं लागली. (३) जेता आणि जित ही नवीन भावना वावरूं लागली. जितास आपण जित न राहतां स्वतंत्र व्हावे असे वाटूं लागले. खंडणी येणाऱ्यांची खंड पाडण्याकडे जितांची वृत्ती होऊं लागली. मित्रांच्या ठिकाणीं शत्रू दिसूं लागले. या वृत्तीत फेराचा परिणाम बुंदेलखंडांत विशेष दिसोन आला. (४) दिल्ली दरबारांत सिंहासनाभोंवतीं दोन तट नाचूं लागले. बादशहास मराठ्यांची गरज पूर्ववतच भासू लागली. येवढेंच नव्हे पण या पक्षांत आणखी एक नवीन भर पडली. बादशहास पदच्युत करून अबदालीच्या साहाय्याने पुनः पठाणशाही स्थापित करण्याचा एक नवीन बूट निघाला. (५) अशी सगळी परिस्थिती बाहेरून बदलत असतां हिंदुत्वाची व्यापक कल्पना मराठे पुढाऱ्यांतून दृष्टिआड झाली. पैसा हाच दृष्टीपुढें अधिक खेळूं लागला. राजकारणाचे रंग वेळोवेळीं बदलूं लागले. अशा या अनिश्‍चित कालांत कारकुनांनीं एकदेशीय व केवळ कारकुनी दृष्टीने लिहिलेल्या पत्रांवर विसंबून ''हरामखोर घरबुडवे'' अशी विशेषणें कर्त्या पुरुषास देणें धाष्ट्र्याचे होईल. सारांश, ज्यांनीं कोणी कामगिरी करून कार्य जगताच्या दृष्टोत्पत्तीस आणून दिलें असेल त्यांची सर्व कृत्ये मांडून मग जो निष्कर्ष निघेल तो दिसेलच. कार्यकर्त्या माणसांस त्यांच्या तत्कालीन विचारसरणीचा व अडचणींचा भरपूर फायदा देणें आवश्यक आहे. एकच उदाहरण येथें आम्ही घेतो. कुंभेरीच्या वेढ्याप्रसंगीं मल्हारजींवर जो प्रसंग आला आणि त्यांनीं जी प्रतिज्ञा केली त्यास प्रत्युतर म्हणोन त्यांच्या सोबत्यांनीं जो मार्ग आचरिला तोच मार्ग त्यांनीं स्वतः मेवाडच्या युद्धांत उल्लंघिला. असें असताना एक पक्षास दोष मिळतो आणि दुसऱ्या पक्षासंबंधीं मौन. दुसरें एक उदाहरण, निजामाचे राजकारणांतील कांहीं किल्ले मल्हारजींनीं घेतले. नानासाहेबांच्या आज्ञेवरून ते किल्ले परत देण्यासाठीं मल्हारजींचे वकील व निजामांचे वकील एकमेकांकडे येऊं जाऊं लागले. यावरून कारकुनांचे पत्रव्यवहार सुरू झाले कीं ''होळकर फितव्यांत आहेत.'' सारमुद्दा हाच आहे कीं ज्यावेळीं राजनीतिची अंगेंउपांगें तिरड्याचे रंगाप्रमाणें बदलत जातात. त्यावेळीं कर्त्या माणसांसही देशकालस्थितीनुरूप बदल करणें आवश्यक होतें. तेव्हां एकदम सरसहा शेरा न देतां वस्तुस्थिती कळलीच असेल तशी आणि तितकी वाचकांपुढें इतिहासकारांनीं मांडावी इतकी विनंती करून आम्ही आतां मल्हारजींच्या इ. स. १७४६ ते १७६१ या कालखंडांतील राज्यव्यवस्थेकडे वळतों.

# न्यायपद्धतीचा नमुना
# मल्हारजींचा राज्यकारभार

## (१) न्यायपद्धतीचा नमुना

(१) निवाड पत्र शके १६७९ ईश्वरनाम संवत्सरे वैशाख शुद्ध ७ माळवी संवत १८१४ सर्वजीतनामसंवत्सरे. ते दिवशीं न्याहालकर्ण मंडलोई व कनिष्ट बलकर्ण व जेतकर्ण मंडलोई परगणे इंदूर, सुभा उज्जैन, सुगा सनसबाखमसेन मया व अलफ इ. स. ११६४ निवाडपत्र, पंचहाते वतनाचा निवाडा करून दिला. उभयतां बंधु वाटा वतनाचा परस्परें मागों लागले त्यामुळें कलह होऊन बलकर्ण श्रीमंत राजश्री सुभेदार साहेबांपाशीं गेले. तेथें जाऊन वर्तमान सांगितलें. त्यावरून श्रीमंतांनीं एका बापांचे पुत्र जाणोन वाटा द्यावा म्हणोन पत्रें दिधली. परंतु न्याहालकर्ण मंडलोई याजकडे वडीलपण व नंदलाल मंडलोई यांच्या स्त्रिया व तेजकर्ण यांच्या स्त्रिया व पुरातन सेवक ऐसा रुपयांचा ऐवज ठरावून हुजूरनें द्यावा. त्यास एक बंधु बलकर्ण मजकुर हुजूर गेले. उभयतां जाऊन फडशा व्हावा तो न जाहला. निवाडपत्रें अवकाशें करून आलीं. त्यावर दक्षिण प्रांतातून स्वारी श्रीमंतांची कसबे मजकुरीं माघमासीं आली. ते समई सरदारी खर्चाविषयीं वाटा असावा ऐसा अर्ज श्रीमंतांपाशीं केला त्यावर येथून कूच होऊन अंवतिकेस गेले. तेथें उभयतां बंधूंही मागतीं अर्ज केला. त्याजवर श्रीमंतांनीं पंचाइतीचे परगणे आहेत तेथील वतनदार व प्रांत मजकुरचे वतनदार व पाटील साहूकार मातबर जमा करून पंचाइत करावी येविषयीं राजश्री दत्ताजी गणेश कमाविसदार यांस आज्ञा झाली. त्यावरून मशारनिल्हेनीं पंचाइत जमा केली. येणेंप्रमाणें तपशीलवार :

**कित्ता पंडित व वैदिक ब्राह्मण**

१ वे.शा.सं.पदमाकर उपाध्ये ज्योतिष व धर्माधिकारी तालुके संगमेश्वर सुभा राजापूर.
१ वे.शा.सं.अंबादास पुराणिक निसबत गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई होळकर
१ वे.शा.सं.मल्हारभट पुराणिक निसबत सौ. गौतमाबाई होळकर
१ वे.शा.सं. बाळंभट भसे सांप्रत वास्तव्य पुणतांबे
१ महादेव जोशी मौजे अडवरे प्रांत राजापूर
५

कित्ता असामी ...

**कित्ता दरमहालीचे वतनदार**

२ निहालचंद ठाकोर, परगणे धार सरकार मांडव, खासा व हरराय गुमास्ते
१ देहसिंग मंडलोई, परगणे सावेर
१ गजसिंग मंडलोई, परगणे देपाळपूर
४

परगणे मजकुरचे वतनदार

२ मंडलोई, रजपूत लोक हिसेदार बिजेसिंग, हिंटेसिंग व फत्तेसिंग
२ कानगो मालाचे १ भगोतीदास व नाथूराम
१ सायरचे कानगो दुर्गादास

| | | | |
|---|---|---|---|
| १ | रंजीतगीर गोसावी | ४ | पाटील, हरजी मंडलोई, नरसिंग मंडलोई २ फकीरचंद पाटील, सुंदर पाटील २ |
| १ | धोंडोकृष्ण कोतवाल | २ | साहुकार |
| १ | नारो सिद्धेश्वर | १ | गंभीरचंद. १ रामरतन |
| १ | कुंवरचंद व्यास | २ | कित्ता असामी.. |
| १ | हजरत काजी हिदायतउल्ला | १ | शेख महमदअली व १ रणछोड जोशी |
| ५ | | | |
| १० | | १७ | |

येकुण पंच २७ सत्तावीस.

येकुण सत्तावीस असामी एकत्र करून परस्परें उभयतां बंधूंचे राजीनामे एकत्र घेऊन पंचाईत न्याये वाटे सुदामत पांच करावे पैकीं वजा सरदारी वडिलीपणा व खर्च व कुटुंबपरिवार रावनंदलाल यांच्या स्त्रिया व राव तेजकर्ण यांच्या स्त्रिया वगैरे यांस वाटण्या बलकर्णाकडे. कलम १

बाकी वाटे सुमारी चार तपशील :

२ राव निहालकर्ण मंडलोई दोन वाटे. २ राव बलकर्ण व तेजकर्ण वाटे २ मौजे केळोद गांव सरकारांतून इनाम आहे. त्याचा वर्षास आकार करून वाटे सुमारी पांच करावे. पैकीं वजा निहालकर्ण मंडलोई यांजकडे वडिलपणा खर्च वगैरे वाटा एक.

तपशील बाकी वाटे :

२ राव निहालकर्ण व २ राव बलकर्ण व तेजकर्ण.

जिरायती गांवगन्नावार आहेत. त्यापैकीं राव नंदलाल व राव तेजकर्ण आपल्या स्त्रियांस व बहिणीस व कन्यास जी जमीन आपण दिली असेल त्या जिरायती वजा करून बाकी जिरायती राहतील त्यापैकीं राव मशारनिल्हे यांनीं आपल्या स्त्रियांस जिरायती दिल्या आहेत त्या त्यांजकडे चालतच आहेत. पुढें त्यांचे दिवसकार्य उभयतांही खर्च लाविला तर दोघांही वाटून घ्यावा. निहालकर्ण एकलेच खर्च लावतील तर तेच घेतील. परंतु त्यांनीं जिरायती तूर्त वजा करून बाकी राहिल्या जिरायती त्याचे वाटे सुमारी पांच ५ करावे. पैकीं वजा सरदारीखर्च वगैरे निहालकर्णाकडे वाटा सुमारी १ बाकी सुमारी जिरायती चार. तपशील : २ निहालकर्ण वाटे २ बलकर्ण व तेजकर्ण वाटे एकूण ४ एकूण दामी व जिरायती व इनाम गांवचा वाटा सदरहूप्रमाणें पंचांनीं करार करून दिले.

शिवाय कलमें सुमारी ११ :

१ पित्याच्या वेळेस कर्ज देणें. लोकांचें असेल त्यांचा काळ जाहल्यावर निहालकर्ण यांनीं वारले असेल. त्याचा वाटा उभयतां कनिष्ठ बंधू यांनीं पंचादोईप्रमाणें वारावे. तपशील : ३ वाटे निहालकर्ण यांनीं वारावे व २ वाटे उभय बंधूंनीं वारावे.

२ बागबगीचे शिवाय असतील ते पंचादोईप्रमाणें वाटून घ्यावे. कलम
३ दफ्तर निहालकर्ण, बलकर्ण व तेजकर्ण मिळोन गुमास्ता एक दफ्तर निहालकर्णाकडे असावे. कलम
४ राणीपुरा येथें पैदास्त होईल ते सदरहूप्रमाणें वाटून घ्यावे. कलम
५ तेल्याबाबत खूंट वगैरे सुतळीचा तोडा व उगाई सदरहू पंचादोईप्रमाणें वाटून घ्यावे. कलम
६ पालखी सरकारांतून वेतन आहे, निहालकर्ण वडील बंधू याजकडे करार. कलम
७ पाटीलकीचा गांव परसोईपणाचे गांव असतील ते सदरहू पंचादोईप्रमाणें वाटून घ्यावे. कलम
८ हवेलीवाडा दुकान वगैरे घरें पंचदोईप्रमाणें वाटे. कलम
९ वडीलपणाचा मानपान विडा व दस्तखते, वासलाती वर दस्तखते निहालकर्ण यांनीं करावी. कलम
१० वेतनसंबंधीं परस्परें हरेक गुन्हेगारी वगैरे प्राप्त जाली तर सदरहूप्रमाणें पंचादोईप्रमाणें वाटून घ्यावे. कलम
११ सायरेवर प्राप्ती होईल ते पंचादोईप्रमाणें वाटून घ्यावी. कलम

येकुण कलमें सुमारी अकरा करार पंचादोईप्रमाणें करून देविली असेत. तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें दामी व जिरायता व इनामी वगैरे करार करून दिल्याप्रमाणें वाटून घ्यावे आणि उपभोग करावा. छ. ५ माहे साबान.

**(२) सैन्यांत भरती करण्याचा एक नमुना**

राजश्री गंगाधरपंत व आनंदराव गोसावी यांसी अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारजी होळकर दंडवत विनंती. उपरी शेट्याजी थोरात येथें आले. जामीन मागतात, म्हणून सांगितलें. त्यास लष्करांत आलियावर जामीन द्यावा, ऐसा करार झाला. तर याची बोली करून नेमलियाप्रमाणें दिढाशा रावताची नालबंदी पंधरा हजार रुपये देणें. याजला तयार होऊन आले पाहिजे. तर लिहिल्याप्रमाणें देऊन आटोपून येत तें करणें. छ. २४ सवाल बहुत काय लिहिणें, मोर्तबसुद.

**(चंद्रचूड दप्तर कला १ लेखांक ३१)**

**(३) सरकारी नोकरीत नेमण्याचा एक नमुना**

राजश्री पिराजी ढमढेरे बावाला मुतालिकी किल्ले चांदवड गोसावी अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारजी होळकर रामराम सुसन सलासखमसेन मयाअलफ राजश्री विनायक बाजीराव इतबारी जाणोन यांसी किल्ले मजकूरची सबनिसी करार करून सांगितली असे. तरी सबनिसीचे कामकाज किल्लेमजकूरचे मशारनिल्हेच्या हातें घेऊन वेतन रुपये ७०० सातशें देविले असत. नेमणूक ऐवजीं पावणे मुजरा असत.

छ. १२ जमादिलाखर हे विनंती. (ता. १७ एप्रिल इ. स. १७५३)

**(चंद्रचूड दप्तर कला ११ लेखांक १७)**

**मल्हारजींचें एक ब्रीदवाक्य व आयुष्क्रमांचे दर्शक**

मल्हारजी होळकरांचें सखारामपंत यांस पत्र : विशेष तुम्ही राजश्री गंगाधरपंत यांसीं पत्र लिहिलें त्याचा सर्व अर्थ निवेदन झाला. श्रीमंतांचा यावयाचा भाव लिहिला कळोन आला. त्यावरून राजश्री गंगाधरपंत पाठविले आहेत. यांची तुमची भेट होईल. हे सर्व वृत्त विदीत करतील सर्व प्रकारें भरंवसा तुमचा आहे. येविशीं विस्तारें काय लिहिणें. छ.६ साबान. कित्येक वृत्त गंगाधरपंतापासीं सांगितले आहे. ते विदीत करतील. सारांश, कीं मनसुबियाच्या कार्यात त्वरेस मोल आहे. बहुत काय लिहिणें हे विनंती. **(चंद्रचूड दप्तर कला १ लेखांक १४३)**

**हाताखालचे माणसांची बढती**

**नोकरांस बढती – एक नमुना**

**अ : शिलेदार झाला पागा**

**आ : सुभा झाला सेनापती**

नारोशंकर यांनीं थोरले मल्हारजी बाबा होळकर सुभेदार यांजपाशी प्रथम शिलेदारीचा रोजगार करून लढाईचे प्रसंगीं तरवारीचे मर्दुमकीने कामकाज केले त्यावरून होळकर यांनीं नगारानिशाण पागा देऊन जमेयत हजार पंधरानिसीं वाढविली आणि इंदूर सुभ्याचे बंदोबस्ताचे काम सांगितले. पुढें त्याचे मर्दुमकीची तारीफ स्वमुखे पेशवे सरकारचे कानावर घालून सरकार आज्ञेनें त्याजला पुण्यास बोलविलें. तद्नंतर हिंदुस्थानचे मोहिमेचे काम सांगून वस्त्रें दिलीं. (खरे)

(रा. शिवराम गोपाळ यांनीं मे. वॉर्डन डेप्युटी एजंट दक्षिण यांस यादी सादर केली.)

**चांदवडचें खरेदीखत**
**तत्कालीन स्थितीचें एक उदाहरण**
**ऐतिहासिक माहिती**
**मल्हारजींचा पराक्रम**
**संधीचा फायदा अंकितास दिला**

२५००० खरीदखत शके १६७४ अगिरानाम संवत्सरे, सन ११६२ फसली व संवत १८०९ फालगुन शुद्ध १३ ते दिवशीं खरेदी खत राजश्री मल्हारजी होळकर वल्द खंडूजी होळकर इबन मालजी होळकर देशगांवडे, प्रांत सुबे बारामती व मौजे वाफगांव तालुके खेड सरकार जुन्नर परगणे संगमनेर व मोकदम कसबे असल सरकार जुन्नर यांस फरोक्त कर्द वालजी वल्द जावजी धारोजी व मेहमाजी वल्द सटवाजी देशमुखी परगणे चांदवड मोकदम कसबे मजकुर सरकार संगमनेर सुभे खुजीस्ते बुनियाद फसली सन ११६२ कारणें

लिहून दिलें ऐसीजे. परगणे मजकूरची मोकदमी दरोबस्त आपली आहे. त्यास सेव्यराव कानडा वाणी इंदूरकर कसबे मजकुरी सुखवस्तु मोदीपणा करीत होता. त्याची वरदास्त परगणे मूळचे रु. ६५०० सहा हजार पांचशें झाली. त्याजबद्दल मोदी मजकुरांनीं आपल्या वडिलांसी पैक्याचा तगादा केला. त्याजवरी आपले वडील जावजी देशमुख यांनीं तमाम परगणियांचे मोकदम जमा करून कांहीं आपले इसमाची बाकी व कांहीं परगण्यांत गांवगन्ना पेटी करून देऊन रुपये वसूल मौजे मजकुरास आदा केले. त्या रुपयांचा गल्ला परगणे मजकुरी मोदी मजकुरानें खरीदी करून बैल भरून पातशाही लष्करांत उदीम करावयास गेला. महागाई होती. कोतवालाचे मार्फतीने गल्ला फरोक्त केला आणि कोतवालाशी सख्यत्व करून त्याचे हातें रुपये बरेच करून पातशहापाशीं खिलाफनुमाई करून देशमुखीची सनद आपले नांवें हसल करून परगणे मजकुरांत येऊन आपले वडिलांस बेदखल करून आपण दाखिलकार झाला. त्यावरी वडील कितीका रोजा हुजूर पातशहापाशीं लष्करांत जाऊन आपली हकीगत पातशहापाशीं जाहीर केली, कीं आपले वतन, देशमुखी व मोकदमी कसबे व परगणे मजकूरचा कदीम मूळ आयाम असतां दरम्यान सेव्यराव कानडा वाणी हुजूर येऊन खिलाफनुमाई जाहीर करून सनद हासील करून आपले वतनास खलेल केले आहे. परिविला उमेदवार आहे कीं आपले हक्कास पोहोचले त्याजवर पातशहांनीं मेहरबान होऊन आपले वतन तहकीक जाणून आपला वडील जावजी मजकुरास मुसलमान करून वतनाचा शिरपाव व बहालीची सनद व बाकेखां हाकम याजवर हुकूम देऊन रुकसत केले. त्याजवर बाकेखां यांनीं परगणे मजकूरचे हाकीम व मोकदम व पटवारी जमा करून देशमुखीची हकींकत मनास आणितां आपल्या वडिलांचे वतन पुरातन दरोबस्त तहकीक आहे. ऐसे त्यांनीं जाहीर केले. कानडा खोटा जाहला व यांनीं वतनावर गुमास्ता ठेवून आपण हुजूर लष्करांत जात असतां वाटेत मुद्दईयांनीं दंगा करून देशमुख मजकुरा जीवें मारून सनदा नेल्या. परगणे मजकूरचे हाकीमास रिश्वत देऊन आपला गुमास्तां बेदखल करून आपण दखलकार जाहले. त्याजवर आपलेकडील आजतागाईत भांडत आले. परंतु नातवाणी करतां झगडा रफे न जाहला. कानडा मजकूरपैकीं जबरदस्तीने वतन कमाविस करीत आले. आपला इलाज न चाले याजकरितां आपण तुमचे गळां पडोन बहुत मीनतमान करून बजीद जाहलों कीं आपलें वतन तुम्हीं साधून देणें. याजपैकीं दोन हिस्से देशमुखी व निस्प मोकदमी तुम्हास देऊन त्याजवर तुम्ही आपणास बरोबर दिल्लीस घेऊन गेले. पुढें मनसूरअलीखां वजीर रोहिले यांजवर चालून गेले. त्यासीं यांसी लढाई झाली व वजीराने शिकस्त खाल्ली आणि पळून दिल्लीस आला. त्याजवर रोहिले पठाणांनीं अटकेपार हसन अबदाली यांस लिहून पाठविलें कीं दिल्लीचे पातशहाचा वजीर आम्ही लुटून घेतला. याउपरी दिल्लीस कोणी मातबर राहिला नाही. तुम्ही अटक उतरोन लाहोरास येणें आम्ही तुम्हांस दिल्लीस नेऊन तख्तावर बसवितों. हे पत्र त्यांस पाठविलेवर हसन अबदाली यांनीं अटकेपलीकडोन दिल्लीवर चाल केली. हे वर्तमान पातशहा वजीरास कळल्यावर तुम्हांस लिहिलें कीं तुम्ही आपली कुमक करितां तर आपली पातशहात राहते, नाहीतर हसन अबदाली येऊन दिल्लीचे तख्त

घेतो. याजवर तुम्ही कूच करून मथुरेस गेले. तेथें वजीर भेट जाहली. त्याजबरोबर यमुना उतरून गंगातीरीं फरूकाबादेस पठाण होते. त्यांसी तुम्ही लढाई करून त्यास मोडले आणि गंगा उतरून कुमाऊचे पहाडांपावेतों जाऊन राहिले होते तेही मोडले. मग माघारें दिल्लीस येऊन पातशहाची मुलाखात केली. हे वर्तमान लाहोरास अबदाली यांस कळल्यावर तो अटक उतरून पळून गेला. पातशहा तुम्हावर मेहरबान होऊन सरफराज करून तुम्हांस शिरपाव दिले. त्यावेळेस तुम्हीं पातशहास आपले देहें अर्ज केला कीं वालजी व धारोजी व महिमाजी बरगेली यांची देशमुखी परगणे चांदवड सरकार संगमनेर सुभे खुजिस्ते बुनियाद येथील कदीमुल आयाम आहे. दरम्यान कानडेवाणी यांनीं देशमुखीस खलेल केले. याजबद्दल देशमुख मजकूर आपल्याबरोबर हुजूर आला तर आजराह मेहेरबानी करून देशमुख मजकुरास आपले हक्कास पोहोचविलें पाहिजे. त्यास पातशहांनीं हकीगत पुसली. मग तुम्ही आमची हकीगत इस्तकबालीपासून जुळवून जाहीर केली. ते खात्रीस आणून मेहरबानी करून वजीर मजकुरास फरमाविलें कीं देशमुखीचा फरमान करून देऊन वतनास दखलकार करणें. त्याजवरून फरमान करून दिधले व नबाब गाजुदीनखान सुभे दक्षिण यांस हुकूम केला कीं दिवाणी सनद करून वतनावर दखलकार करणे. बमोजिब हुकूम त्यांनीं सनद करून दिधली व श्री. रा. पंतप्रधान यांनींही सनदा करून दिधल्या. सदरहू सनदा घेऊन तुम्ही परगणे मजकुरीं आलों. तमाम हालीमबाली मोकदमांनीं देहपरगणे मजकुरीं जमा केले. त्याही शाहिदी दिधली कीं कदीम देशमुखी व मोकदमी शाबीत झाली. कानडा खोटा जाहला. याजवर आपले खुश रजामंदीनें देशमुखी दोन हिस्से निस्प मोकदमी याची किंमत मोकेवर रुपये २५००० करून मुबलग मजकूर तुम्हापासोन घेऊन तुम्हांस वतन फरोक्त केले असे. देशमुखीचे दसकत दरोबस्त आपला हिस्सा देखील तुम्हांस दिधले असेत. ते तुम्हीं करीत जाणें व दिवाणीचा शिरपाव व पाने पुढें तुम्ही घेणें. तुम्हांमागें आपण घेऊं व इनाम हक्कवाजीव या देशमुखी व मोकदमी बमोजिब हिस्से रसीद देशमुखीचा रुसूम वगैरे जे पैदा होईल ते दोन वाटे तुम्ही घेणें व तिसरा वाटा आपणांस देणें व मोकदमीचा जाब नांगर मोबरद तुम्हास दरोबस्त दिले असे. तुम्हांमागें आपण असों. उत्पन्न होईल ते निम्मेनिम वाटून घेऊं. येणेंप्रमाणें जे वतन देशमुखी व मोकदमी तुम्हीं लेकराचे लेकरीं अनुभवीत जाणें. याशिवाय कोणी वारसदार उभें राहिले त्यास आपण वारूं. तुम्हीं वतन सुखें अर्जानीं करणें. हक्क व लवाजमा तपशील येणेंप्रमाणें :

**हक्क व लवाजमा, देशमुखी व मान**

१ रुसूम माफिक मामूल बमोजिब हिस्सेरसी.
१ घरेडे साबनवा हिस्से रसीद.
१ इनाम माफिक हिस्से रसीद.
१ कसबे मजकूरचा हुकूम (हु।।).
१ परगणे मजकूर माफिक मामूल देहबदेही असेल त्याप्रमाणें
१ भेट व जात ही तुम्हीं ठेवीत जाणें
१ दसकत तुम्हीं अवघे करीत जाणें
१ शिरपाव व पानें दिवाळी दसऱ्याबद्दल.
१ आमराई बाग दोन कसबे मजकुरीं शिरपाव.

१ भेट दिवाण तुम्ही ठेवणें.
१ नांगर निखालस तुम्ही करीत जाणें.
१ शिरपाव पानें आधी तुम्हीं, मागाहून आपण घेऊं
१ आधी नांव तुमचें मागून आपण कागदपत्रीं
१ टिळा, विडा आधी तुम्हीं मागें आपण

१ भवानीची पूजा तुम्हींच करावी उत्पन्न निमेनिम वाटून घेऊं.
१ हकरी नांगर आधीं तुम्हीं मागें आपण
१ तोरण आधीं तुमचे घरीं मागाहून आमचे घरी.
१ खलमेरी घरीद वगैरे त्यास त्याग गांवानिसबत तुम्ही टाकणें.
१ इनाम जिरायत निमेनिम घेणें.
१ भुसा दर रास एक आणा टके.
१ किराणा दर रास टके दोन आणे.
१ कापड दर रास टके बारा आणे.
१ बकर कसाई दरहक आदशेर.
१ तरकारी दर रास तीन पाव.
१ आले, द्राक्ष दर रास दर मण वजन पावणे दोन पाव.
१ केळे दर रास पांच १ आंबे दर रास पांच.
१ तांबोखी दर दुकानास पाने पन्नास.
१ चांभार सालिना जोडा.
१ मोची सालिना जोडा दर दुकान १
१ सणवार दर दुकानी गहू सेर एक दसरा, दिवाळी सिमगा आखातीज पोळा.
१ तेल दर सणास दर घाणीमागे १ शेर.
१ भवानीची यात्रा चैत्री पौर्णिमेस.
१ बकरे पडेल त्याची मुंडी, जावळे.
१ निगमव्हाण सोमवंशा मोकासा दिला तो तुम्हींच घेणें.
१ बैलांची पोळीं आधी तुमचे घरून वाजवीत आणून बांधणें मग आमचे घरची बांधणें
१ पोळ्याचा बैल आधीं तुमचा व मागें आमचा.
१ दसऱ्याचा हेला यावर वार तुमचा निखालस.
१ दिवाळीचे वाजविणें व परळचे बोलावणें आधीं तुमचे घरीं मागे आमचे घरीं.
१ इनामदारांपासून बाजेवेळा निमेनिम घेणें.
१ आडनिसबत मुरीयाने दरखंडीस मण २.
१ पानडे आधीं तुमचे घरीं.
१ हुरडा पीटीबद्दल निमेनिम.
२ फळाची पाटी, गोंधळाचा विडा.
१ सेला लग्नमुहूर्त, घरवाडा खरीदी पांढरीत होईल आसामी पाहून.
१ ऊस दर रास एक.
१ गवत पुळा एक, कडवा पुळे २.
१ बाजार दलाल दरदुकानी सुपारी वगैरे.
१ साकभाजी वगैरे जिन्नस दुकाने.
१ फसली हरजिन्नस गल्ला.
१ धनगर समाजास बकरे दसऱ्यास.
१ संक्रांती तीळ दर धन्यास एक शेर वजन, गुळ वजन अच्छेर.
१ दर गुऱ्हाळामागे रस घागर व ऊस मोळी १ गूळ भेली १.
१ भूसार हरगाडीस अधोली.
१ कडबा दर गाडा पुळे पांच.

| | | | |
|---|---|---|---|
| | उतरतील त्यांस विडा सुपारी व नगदी रुपये. | १ | साळी, कोळी भागास सालीना पासोडी. |
| १ | धनगर सालिना दर भागास एक चवाळे. | १ | महार हातांत एक. |
| १ | पाथरकर पहिलेपासून सालिना बिनमक्ता रु.२४ | १ | कातडे बैल, म्हैस त्याचें त्यानें घेणें |

देशमुखीचा वाट व मोकदमी याचा वाट कसबे मजकुरीं आमचा तेथें कानडा रहात होता तो वाडा दरोबस्त तुम्हास दिला असे. सदरहू बमोजीब हक्क रुसूम देशमुखी मोकदमी बदस्तूर साबिक नवीन हक्क रुसूम जें कांहीं उत्पन्न होईल ते सरदहूप्रमाणें हिस्सेरसीत घेत जाणें. हे खरीदखत लिहून दिल्हे. सही. ता. छ. ११ माहे जमादिलावल. हस्ताक्षर काशीनाथ महादेव देशपांडे गुमास्ते मोहर.

**जहागिरी**

राज्यकारभाराचे एक अंग जहागिरी, इनामे वर्षासनें ही होत. या दृष्टीने सुभेदार मल्हाररावांनीं ज्या देणग्या दिल्या त्यांचे केवळ दिग्दर्शन म्हणून, हातीं असलेल्या कागदांतून, खालील माहिती सादर केली आहे. सुभेदारांच्या मनोवृत्तीचा विचार करितां त्यांच्या देणग्या रूपानें, गुणानें व संख्येनें याहूनही कितीतरी असल्या पाहिजेत; पण आजमितीस जी माहिती आहे ती इतकीच :

| | **देणगीचे वर्णन** | **वर्ष – इ. स.** | **वार्षिक उत्पन्न** |
|---|---|---|---|
| १ | श्रीकार्तवीर्यराजराजेश्वर यांचे मंदिरास महंताचे नांवें (महेश्वर) | १७४० | ६३४ |
| २ | बढवाय राणाचे घराणें, बटोली, वगैरे गांवें १० दहा. नेमाड | १७४२ | २२,०२१ |
| ३ | बढवाय राणा दुसरी पाती आगर, वाडा, झिरण्या, नेमाड | १७४२ | २,५६६ |
| ४ | भूमिया लवाणी तालुक्यापैकीं उखळदा वगैरे गांवें ७, नेमाड | १७४४ | ४,५२१ |
| ५ | ठाकूर मंडलोई सोनगांव, दाभला, नेमाड | १७४५ | १,६०४ |
| ६ | बावीसे ब्राह्मण, गवळखेडा (नेमाड) | १७५१ | १८९ |
| ७ | सरदार, भुसकुटे सरकार बिजागड पैकीं गोगांव वगैरे गांवें ८ | १७५४ | ७,९०६ |
| ८ | काजी (धर्मगुरु) मुसलमानांचे सिंधखेडा (नेमाड) | १७५४ | २,४११ |
| ९ | भारती महंत पिंपळ्या (नेमाड) | १७५८ | १,२०० |

ह्या देणग्या पाहिल्यावर सुभेदारांच्या राजनीतिची जी अंगे दृष्टोत्पत्तीस येतात ती अशी : (अ) पूर्वीच्या राजवटीत चालू असलेली रजपुतांची, भिल्ल भिलाळ्यांची व मुसलमानांची, इनामे, जहागिरी त्यांनीं तशीच अव्याहत चालविली. (आ) दक्षिणेतून आपल्याबरोबर आलेल्या तलवार बहादुरांना जहागिरी वगैरे बहाल करून येथें स्थाईक केले. (इ) धार्मिक देणग्यांतही तारतम्य ठेविलें ते असें कीं उत्तरेतील बैराग्यांस श्रीनर्मदेच्या तीरावरून जाणाऱ्या येणाऱ्या पांथस्थांचे सोईसाठी गांव दिले. पण ते बहुतेक उजाड असत. आबादी करावी आणि त्यात बैराग्यांनीं आपले पूर्वापारचे अन्नसंतर्पणाचे कार्य चालवावे. (ई) दक्षिणेतील वेदविद्या विशारद अशी मंडळी येथें हस्तें परहस्तें स्थिर केली. अशा मंडळीस आबाद असलेलेच गांव अग्रहार रूपानें दिले. अशा दोन सनदांचा नमुना खाली दिला आहे.)

**वेदविद्येस स्वतः दिलेले उत्तेजन**

राजश्री दामोदर महादेव व राजश्री पुरुषोत्तम महादेव गोसावी यांस.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे दंडवत विनंती सुासन इसने खमसेन मया अलफ. वेदमूर्ती रा. पौंडरिक सूर्यनारायण शास्त्री यांजला मौजे हारी राजपूर परगणे सिद्धपूर हा गांव दरोबस्त धर्मादाय पेशजीपासून आहे. तेणेंप्रमाणें सनद देऊन चालवावा त्यावरोन पौंडरिकजीकडे मौजे मजकूर करार करून दिल्हा असे. त्याजकडे मौजे मजकूर दरोबस्त चालविणें. नवीन पत्रांचा आक्षेप न करणें. या पत्राची नक्कल घेऊन हें पत्र भोगवटियास फिरोन देणें. थोर ब्राह्मण पूज्य आहेत. यांच्या गांवास एक जरा तसदी न देणें. छ. २१ जिल्हेज. बहुत काय लिहिणें हे विनंती. (श्रीलेखनसीमा)

**वेदविद्येस परहस्ते दिलेले उत्तेजन**

वेदशास्त्रसंपन्न पौंडरिकयाजी, राजश्री सूर्यनारायण शास्त्री पिता व्यंकट शास्त्री द्रावीड गौत्र बाघुल आपस्तंब राजमंदिर क्षेत्र काशी स्वाो. विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती सुासन सीत खमसेन मया व अलफ. राजश्री गंगाधर यशवंत यांनीं हुजूर इंदूरचे मुक्कामी येऊन विनंती केली कीं पौंडरिकयाजी सूर्यनारायण शास्त्री हे थोर शिष्ट ब्राह्मण, कुटुंबवत्सल, श्रीक्षेत्रीं स्नानसंध्या करून राज्यास अभिष्ट चिंतून राहतात. याकरितां स्वामींनीं कृपा करून एक गांव नूतन इनाम करून दिल्हा पाहिजे. त्याजवरून मनास आणितां तुम्ही थोर विद्यावंत, सत्पात्र, कुटुंबवत्सल, श्रीक्षेत्रीं राहतां; तुमचे चालविणें आवश्यक म्हणोन तुम्हास मौजें केथरा परगणे अकबरपूर, शहापूर प्रांत अंतर्वेद सरकार काल्पी हा गांव नूतन धर्मादाय जलतरू पाषाण निधीनिक्षेप आदिकरून धर्मादाय दिला असे. तर मौजे मजकूर दरोबस्त तुम्ही आपले दुमाला करून घेऊन तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें धर्मादाय अनुभवून श्रीमध्यें स्नानसंध्या करून राज्याचे अभिष्ट चिंतून सुखरूप राहणें. जाणिजे छ. २३ रमजान (ता. ४-७-१७५५)

या प्रकरणांत आलेल्या (१) न्यायदान, (२) सैन्यभरती, (३) स्थावरजंगमाची खरेदी-

विक्री, (४) सेवकांची बढती बहाली व (५) इनामें, जहागिरी या संबंधातील देणग्या. या सर्वांचा विचार केला असतां सुभेदारांच्या राज्यकारभाराचें धोरण विशद होईल.

**सौ. गौतमाबाईंची कारकीर्द**

**राज्यकारभारांत चौकशी**

सौभाग्यवती गौतमाबाई याही आपल्यापरी कोणती कामगिरी करीत होत्या हे खालील पत्रांवरून विशद होईल.

सौभाग्यादि संपन्न वज्रचुडेमंडित गौतमाबाई यांसी :

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित गोविद बल्लाळ आशीर्वाद विनंती येथील कुशल ता. फाल्गुन शुद्ध ४ पावेतों कृपेकरून वर्तमान यथास्थित असो विशेष. आपला निरोप घेऊन स्वार जाहलों, ते जगमनपुरीं आलो. मार्गामध्यें दांडग्यांनीं फारच हंगामा केला. दोनदोन हजार हत्यारबंद आड होऊन झुंझास येऊं लागले. रात्रंदिवस कमर बांधून उभेच. निजो दिलें नाहीं. अंतर्वेदींत जमीदारांनीं मोठी गडबड केली आहे. तालगांवीं आमचे कमाविसदारापाशीं पांच सहाशें राऊत होते. त्याजवर जमीदाराचे प्यादे सात हजार व हजार राऊत जमा होऊन आला. गढ्या जागा जागा आम्ही पाडल्या. त्या बांधो लागले. ठाण्यांत कजिया केला. रात्रीचे छापे कमाविसदारावर घातले. गांव तमाम तालगांव कनोजे, चोंडल, येथें जाळले. रयत बेफाम आणि त्यांचा जमाव मातबर जाहला. टिकाव न होय. कमाविसदार कारकून निघोन कुफूंदेजवळ एक शंबर म्हणून गढी आहे तेथें चिरंजीवानिशीं कांहीं फौज त्यांच्या कुमकेस पाठविली आहे. आम्ही दोन रोजांत जाऊन पोहचतो. जमीदारांचेही पारिपत्य उत्तम प्रकारें करितों. मागाहून सविस्तर लिहून पाठवूं. दिल्लीकडील वर्तमान आपणाकडे वरचेवर येतच असेल. गिलचा आपले फौजेवर चालोन येऊं लागला तेव्हां दिल्ली सोडून पुढें बरेच अंतर पडतां पिछाडीवर राजश्री गंगाधरपंत तात्यांनीं जाऊं घातलें. त्यांजवर गिलचा फिरतो इतक्यांत पुढें राजश्री सुभेदार व जनकोजीबाबा होते, त्यांनीं तो मागे मुरकतां पिछाडी जाऊन मारिली. दोन हत्ती व दोनतीनशें घोडे पाडाव करून आणिले व गिलचेही बहुत मारिले. त्याबर सहलाबत चांगली बसली. गिलचा मुक्काम करून राहिला. आपल्याही फौजा त्यांचे आसपास आहेत. रसद त्यांजला पोहचत नाही. दोन शेर पीठ त्यांचे लष्करांत जाहले, याप्रमाणें वर्तमान आले आमच्या मुजरद जोड्या पांच सहा गेल्या आहेत. वरचेवर वर्तमान येत जाईल, ते लिहीत जाऊं. गिलच्याचे पारिपत्य ईश्वरइच्छेनें थोड्याच जोरांत होईल. आपला मुक्काम कोठें ठरेल तो लिहावा. देशाकडील मजकूर तर श्रीमंत राजश्री भाऊसाहेब पुढें तीस हजार फौजेनिशीं मोंगलावर गेले. भालकीवर मोगल यांची गाठ पडली. मोंगलांपाशीं जमाव थोडाच आहे. सलूख होईल. श्रीमंत राजश्री नानासाहेब आमदा नगरावर आहेत. आतांच दुसरी पत्रें आम्हांकडे डिगेहून आली. त्यात वर्तमान कीं अबदाली मेवाड प्रांतीं आहे. त्यांचे पलीकडे आसपास आपल्या फौजा आहेत. अबदालीची रसद बंद केली आहे. ईश्वरकृपेनें सत्वरच त्याचे पारिपत्य होईन. बहुत काय लिहिणें, कृपा करीत जावी हे विनंती. (इ. स. १७५९)

**पातशाहीकडून प्राप्ती**

१ परगणे वेरूळ पातशाही फरमान येक कैलासवासी श्रीमंत गौतमाबाई होळकर नांवें अलमगीर पातशाही सन २ छ १७ रमजान.

**बाईसाहेबांचा पत्रव्यवहार व मुद्रा**

१ राजश्री श्रीपतराव मैराळ कमाविसदार परगणे थालनेर गोसावी यांसी स्नेहांकित सौ. गौतमाबाई होळकर दंडवत. तुम्हांकडून दीपावळीची ओवाळणी सालमजकुरींची येणें रुपये १००० एक हजार येणें ते राजश्री लाला शेवकराम यांजकडे देवविले. तरी सदरहू सावकार मजकूर यांस एक हजार रुपये देऊन पावती घेणें. जाणिजे छ.९ सवाल बहुत काय लिहिणें.

**सौ. गौतमाबाईंचा कैलासवास**

परगणे इंदुरीं मौजे पिंपळ्याराव येथें सौभाग्यवती गौतमाबाईचा काळ जाहला. सबब दान पृथ्वी दिली. ब्राह्मण आसामी ३ इनाम जमीन दर आसामीस बिघे सुमारी ३० ती येणेंप्रमाणें बिघे ९० दिले. इनामपत्रें तपशील :

मुरलीधर भट पिता रघुनाथ भट उपमन्य गोत्री औदुंबर जोशी वास्तव्य किल्ले मजकूर. छत्रेश्वर जोशी गोत्र उपमन्यु औदुम्बर वास्तव्य किल्ले व हरिश्चंद्र वैद्य साकीन सदर जमीन अव्वल दुय्यम, तिय्यम प्रतीची लायक, बागाईत व जिराईत सरदेशमुखी जहागीर मोकासा दरोबस्त खेरीज इनामदार करून.

**जमीन लागवड करण्याचा प्रकार**

मिरझा आदिलबेग कमाविसदार परगणे देपाळपूर यांस पत्रकी मौज आटाहेडा परगणे मजकूर येथें तीर्थस्वरूप सौभाग्यवती बाईसाहेब कैलासवासी यांनीं जिरायती जमीन बागास घेऊन बाग करून विहीर खणून उस्तवारी केली. सांप्रत बाग बुडीत जाहला म्हणून हुजूर विदीत जाहलें. त्यावरून तुम्हांस पत्र सादर केलें असे. तरी माळी व बैल बागास देऊन बागाची उस्तवारी करणें. आटाहेडा जिरायत शंभर बिघे सुदामत खासगीकडे चालत आले आहे. त्याप्रमाणें खासगीकडे जिरायत चालते करून त्याऐवजीं माळी यांसी मुशाहिरा व बागास खर्च लावून उस्तवारी होय ते करणें. आंब्याची लावणी फुलें झाडे वगैरे लावून उस्तवारी करणें. बागाची देखरेख पाकरगीर बाबांनीं करणें, म्हणून पत्र.

सौभाग्यवती गौतमाबाई होळकर ह्या किती दक्षतेनें राज्यकारभार पाहात होत्या त्याजबद्दल एका रांगडी कागदाचा उतारा खालीप्रमाणें :




सही गौतमाबाई
अंमल. पंडत भगवंतराव

लि. फारकती लिखी मौजे बडाह परगणे चोळी महेश्वर सीरकार मांडव सूबा माळवा आमल जागीर मुकासा श्री : आंगु मौजे मजकूर कीं जमा कुलदाम दाम माल तथा सायर करनी जो सरकारकी उगाई जाते सबमा मुकाती सामदास बैरागी कीं दामदाम भरी पाया. कुछ बाकी नहीं रही. ता ९ माहे साबान सन ११६५ सदरहू फारकती सुरू सन समान खमसीन ची दिल्ही असे जाणिजे. छ. ९ रोज माहे साबान.

**(विठ्ठलराय कानगो महेश्वर दप्तर–संशोधक विभूते)**




**आधार ग्रंथ**

१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
२. पुणें पेशवे रेकॉर्ड
३. प्रसिद्ध व अप्रसिद्ध सरकारी रेकॉर्ड



### प्रकरण १६ वें

---

# पानिपत व पानिपतानंतर

## इ. स. १७६१ ते १७६६

**पानिपत संग्रामांत शत्रु–मित्र**

पटदुराहून भाऊसाहेब हे विश्वासरावांसह अबदालीवर निघाले. त्यांच्याबरोबर मेहेंदळे, समशेर बहादुर, विंचूरकर, पुरंदरे वगैरे सरदार होते. शिवाय चंबला ओलांडण्यापूर्वीच होळकर, शिंदे, गायकवाड, पवार, बुंदेले वगैरे सरदार त्यांना मिळाले. रजपूत राजे मात्र त्यांना मिळाले नाहींत, याचे कारण दोन वर्षांपूर्वी राघोबादादांनीं व जयाप्पा शिंद्यांनीं त्यांचा पराभव केला होता. हे शल्य त्यांच्या मनांत होतें. साऱ्या पानिपताच्या युद्धात रजपुतांनीं मराठ्यांना एकदांही मदत केली नाहीं किंवा रसदही पुरविली नाही.

**युद्ध–पद्धतीसंबंधांत भिन्न मतें**

सूरजमल जाट हा मल्हारजींचे मध्यस्थीमुळें भाऊसाहेबांना मिळाला. या दोघांचे म्हणणें, (मल्हारजी व जाट) कीं गनिमी काव्यानें लढून अबदालीला माघार घ्यावयास भाग पाडूं असें होतें. परंतु इब्राहिमखान गारदी याचे म्हणणें दुराणीशी समोरासमोर लढाई द्यावी असे होतें. ह्या दोन भिन्न विचारसरणींतून भाऊसाहेबांना एकवाक्यता करितां आली नाही. कारण इब्राहिमखानाच्या कवायती पलटणीमुळें भाऊसाहेबांचा कल इब्राहिमखानाकडे झुकला. इब्राहिमखानाचे म्हणणें न पटल्यामुळें सूरजमल जाट रागावून निघून गेला.

**पक्षापक्षांचे सैन्यबल**

सैन्यबल म्हणावें तर अबदालीची फौज एक लाख १००००० व तीस हजार ३०००० खडें सैन्य व तोफखाना, शिवाय इतकेच बुणगे होते व मराठ्यांचें सैन्य सारे तोफखान्यासह सत्तर हजार ७०००० म्हणजे अबदालीच्या निम्में होतें.

**एक मुद्दा – मराठ्यांचा फसला**

अबदालीची रसद लुटण्याचें अगर थोपवून ठेवण्याचे काम गोविंदपंत बुंदेले यांजकडे होते. त्यांस अबदालीच्या सरदारानें ठार केले.

**मल्हारजी व समशेर बहादुर**

शेवटीं मोठा रणसंग्राम ता. १४ जानेवारी इ. स. १७६१ रोजीं पहाटे सुरू झाला. भाऊसाहेब, विश्वासराव व पवार हे मध्यें होते; नजीब व सुजा यांच्या बगलेनें समोर होळकर व समशेर बहादुरावर हल्ले केले; परंतु त्यांनीं ते परतविले. दुपारपावेतों मराठ्यांचाच जय होता. परंतु सायंकाळच्या सुमारास दुर्दैवानें विश्वासरावांना गोळी ते लागून ठार झाले. ते पाहून भाऊसाहेबांनीं मल्हारजींचे सुप्रत बाया-मुलांना करून, परत नेण्याची कामगिरी सांगून, भाऊसाहेब हत्तीवरून उतरून घोड्यावर स्वार होऊन गर्दीत शिरले व दिसेनासे झाले. त्यावेळींच सर्व मराठी फौजेचा धीर सुटला व त्यांनीं पाय मागें घेण्यास सुरुवात केली.

**मल्हारजींवरील कामगिरी**

मल्हारजींवर श्रीमंतांची बायका-मुले सांभाळून नेण्याची जबाबदारी असल्यानें ते रवाना झालेच होते. त्याजबरोबर गायकवाड, विंचूरकर राजेबहादूरही गेले.

या युद्धांत बरेच मराठे सरदार जख्मी होऊन धारातीर्थी कामास आले. 'मल्हारजींवर येणारे आक्षेपाचे खंडण' श्री. य. खु. देशपांडे, एम.ए., एल.एल.बी यांनीं मालव साहित्याच्या विशेष अंकात (भाद्रपद शके १८५५; इ. स. १९३३) सप्रमाण केलें आहे तें विचारणीय आहे.

**नाना फडणविसांस मल्हारजींनी परतविलें**

नाना फडणविसांस पानिपतांत भाऊसाहेबांची वार्ता ऐकून वाईट वाटले व ते वेश पालटून देशांतरास निघाले. पुढें त्यांचे मातोश्रींबद्दल वार्ता ऐकून वैताग उत्पन्न झाला व काशीवास करण्याच्या हेतूने पुण्यास न जातां काशीयात्रेचा रस्ता त्यांनीं धरला. परंतु ग्वाल्हेरीस त्यांची पार्वतीबाई पेशवे व मल्हारजी होळकर यांनीं समजूत घालून त्यांस पुण्याकडे परतविलें.

**हिन्दुस्थानचे इतिहासांत मार्गसूचक सन**

हिंदुस्थानाच्या अठराव्या शतकाच्या इतिहासांत इ. स. १७०८, १७४८, १७६१, १७७२, १७८५ व इ. स. १८०० ही वर्षें घडामोडीची आहेत. यापूर्वी इ. स. १७०८ चें महत्त्व दाखविलें गेलें आहे.

तारीख १५ डिसेंबर १७४९ त श्रीछत्रपती शाहू महाराज शांत झाले. त्यांचे थोडेच आधीं म्हणजे इ. स. १७४८ त निजामउलमुल्क मृत्यु पावले. याच सुमारें दिल्लीस महमदशहा निधन पावले आणि युरोपात 'ए ला शापेल' येथें इंग्रज व फ्रेंच यांचा तह झाला.

ह्या प्रत्येक बाबीचा परिणाम हिंदुस्थानच्या इतिहासावर काय घडला हें प्रथम पाहू या.

**छत्रपती शाहू महाराज व पंतप्रधान बाजीरावसाहेब पेशवे**

श्रीछत्रपती शाहू महाराज व निजामउलमुल्क हे आपआपल्यापरी विशिष्ट परंपरेचे अनुयायी होते आणि ती परंपरा भली बुरी असेल तशी पूर्णपणे चालविण्यांत त्यांनीं आपले सर्वस्व वेचिलें. श्रीछत्रपतीचा मानस कीं दिल्लीपतीचे स्वामीत्व मानून व राखून जे कांहीं साधेल तितके साधावे. श्रीमंत पंतप्रधान पहिले बाजीरावसाहेब यांची दृष्टी याहीपुढें गेली होती; तरीपण मालकांचे मन सांभाळून आपली कल्पना त्यांनीं कृतींत आणून दाखविली व पर्यायाने मालकांचा दृष्टिकोन अधिक विकसित केला हें मागें वर्णिलेंच आहे.

**नानासाहेबांचे धुरीणत्व व मराठ्यांची कामगिरी, इ. स. १७५०–१७६१**

वडिलांच्या व चुलत्याच्या तालमींत नानासाहेब पेशवे वाढले होते. इ. स. १७४० ते १७४८ पर्यंत मालकांचे मन सांभाळून ते वागत होते. मालकांच्या निधनानंतर सर्व सत्ता नानासाहेबांच्या हातात आली. स्वत:च ते मालक बनले आणि आपल्या कल्पनेला त्यांनीं पूर्ण मुभा देऊन इ. स. १७५० ते १७६१ या अकरा वर्षाच्या मुदतीत,

(अ) हिंदुस्थानांत पश्चिमोत्तर दिशेनें राजपुताना, अंतर्वेद, रोहिलेखंड, मुलतान, लाहोर, ठड्ठा, या प्रांतांत अंमल बसविला.
(आ) पूर्वेकडे काशी, प्रयाग, अयोध्या इत्यादि प्रदेशांत मोहिमा केल्या.
(इ) दक्षिणेत निजामुलमुल्क यांचा कांहीं प्रांत व श्रीरंगपट्टण काबीज केले.
(ई) समुद्रावर सुरत, जंजीरा ह्या स्थानांवर शह बसविला.

**नानासाहेब पेशव्यांचे ध्येय**

सारांश, नानासाहेबांच्या शब्दांत सांगांवयाचे म्हणजे *''एकदा उत्तरेकडील सुवर्णनदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम, सागर कूपसमान पुणें या स्थळीं मध्यें न जिरतां, पर्युक्त योग घडणें, तेव्हां श्रम सार्थक.''* ही अकरा वर्षांची कामगिरी बुद्धी, युक्ती व शक्ती या त्रयीच्या संगमाने खरोखरच घडून आली.

**निजामाचे ध्येय व त्याचा मृत्यु**

**छत्रपती व निजाम यांचे निधनाचे दूरवर झालेले परिणाम**

आतां निजामउलमुल्काकडे वळूं या. हे गृहस्थ औरंगजेबाच्या तालमीत वाढलेले. मराठ्यांच्या वाढत्या शक्तीस जितका बांध येनकेनप्रकरेण घालितां येईल तितका घालावयाचा, हा या गुरुशिष्यांचा निदिध्यास. इ. स. १७०८ त शाहू महाराजांची दिल्लीतून मुक्तता झाल्यावर, दाभाडे, भोसले, जाधव, कोल्हापूरकर छत्रपती यांस आळीपाळीनें हातीं धरून गृहकलह

पेटविण्यांत शिष्यानें गुरूची परंपरा चालविली. पण इ. स. १७३८ च्या भोपाळच्या लढाईनें हे सर्व प्रयत्न फोल करून टाकले. याप्रमाणें जरी वरकांती त्यांनीं तह केला, तरी अंतरंगांतील विष अखेरपर्यंत जाज्वल्य होते. येवढेंच कीं शेरास सव्वाशेर भेटून या जाज्वल्यतेचा परिणाम मराठी सत्तेस तितका म्हणण्यासारखा भोंवला नाहीं. हे निजामुलमुल्क वर म्हटल्याप्रमाणें इ. स. १७४८ त मृत्यु पावले. सारांश, इ. स. १७४८-४९ त छत्रपतीच्या व निजामुल्कांच्या निधनानें दोन निरनिराळ्या परंपरा आपआपल्यापरी अस्तंगत झाल्या. मराठ्यांच्या सहिष्णु वृत्तीचे निर्बंध दूर सरून जयिष्णु वृत्तीच्या उद्योगास ऊत आला. निजामाच्या मुलांमध्यें आपआपसांत तंटे-बखेडे सुरू झाले. या तंटे-बखेड्यांचा परिणाम केवळ राजधानीपुरताच न राहतां राजधानीस अंकित असणाऱ्या दक्षिणेतील अर्काटसारख्या संस्थानांवरही झाला. या संधीचा मराठ्यांनीं जसा फायदा घेतला त्याप्रमाणें इंग्रज व फ्रेंच यांनींही आपआपल्या शक्त्यनुसार आपआपलीं घोडीं पुढें दामटलीं.

याच सुमारास दिल्लीपती महमदशहा निधन पावले, हें वर आलेच आहे. इ. स. १७०८ त औरंगजेब मृत्यु पावल्यापासून या पुढील चाळीस वर्षांत दिल्लीचे तख्त हळूहळू खिळखिळें होत चालले होते. मोंगल साम्राज्याचे सोळा ते वीस सुभे होते. हे सुभेदारांच्या अंमलाखालीं असत. राजघराण्यातील पुत्रपौत्रादिकांस या सुभेदारीवर नेमीत असत व याद्वारें राज्यकारभाराचे शिक्षण वंशपरंपरा चाले. औरंगजेबाच्या मृत्युनें मुख्य व मध्य राजकेंद्र दुबळें व उघडें पडलें. ठिकठिकाणच्या सुभेदारांनीं या संधीचा फायदा घेऊन आपआपली ठाणीं कायम वंशपरंपरा करून टाकिलीं. त्यांचे अनुकरण खालींही उतरत गेलें.

**दिल्लीचे दौबर्ल्य, छोटे-मोठें प्रांत स्वतंत्र बनले**

इ. स.१७०९ त दोस्तमहमद यांनीं भोपाळांस कायमचें ठाणें दिलें. निजामानेंही त्याचेंच अनुकरण इ. स. १७२४ त केलें. अयोध्या, बंगाल, बहार, ओरिसा, याही बाजूंस तीच हवा वाहू लागली. इ. स. १७३० त सैलाना हे लहानसे संस्थान उगवले. या पूर्वीच राजपुतान्यांत स्वांतत्र्याचें वारें शिरलें होतें व राजपुतान्याच्या आजुबाजूस अनेक रजपूत व शीख संस्थाने डोकीं उंच करू लागलीं होतीं. पठाण व रोहिले यांनींही दिल्लीच्या मुख्य शक्तीच्या दुर्बलतेचा फायदा घेण्यास कमी केलें नाहीं. सारांश, पूर्वीच्या भाषेंच्या प्रघातांत सांगावयाचे म्हणजे ''हिंदुस्थान देश छपन्न प्रांतांचा व छपन्न भाषांचा होऊन राहिला.''

**पाश्चात्यांचा चंचुप्रवेश**

ही झाली स्थिती इ. स. १७४८ पर्यंतची. त्यानंतर दिल्ली दरबारांत अनेक फळ्या जाहल्या. वायव्येकडून अबदाली डोकाऊं लागला. शीख आपआपली संस्थाने स्थिरस्थावरूं लागले. रजपुतांचा मराठ्यांबद्दलचा, मोंगलांबद्दलचा पूर्वीचा आदर राहिला नाही. पूर्वेच्या बाजूनें इ. स. १७५७ नंतर प्लासीचे युद्धानंतर इंग्रजांचें आक्रमण सुरूं झालें; व दक्षिणेत फ्रेंचांची सत्ता जोरानें वाढूं लागली.

### इ. स. १७६०–६१ सालचें हिंदुस्थान
### पानिपताचे पठाणांवर परिणाम

एवंच, इ. स. १७६०–६१ चा हिंदुस्थानचा नकाशा पाहिला तर धड (दिल्लीचे सिंहासन) केवळ जीव धरून होते, मधला भाग मराठ्यांनीं पादाक्रांत केला होता व पायांकडील भागांत इंग्रज व फ्रेंच रांगत रांगत उत्तराभिमुख होत होते. ही स्थिती इ. स. १७६०–६१ मध्यें हिंदुस्थानची होती आणि याच स्थितींत पानिपत उभें राहिलें. या पानिपताचे परिणाम तत्कालिक तर दिसलेच. पण पुढेंही दहा बारा वर्षे निरनिराळ्या रूपांत चालू होते. वरवर पाहणाऱ्यास मराठे हरले हे दिसतच होते पण त्याचे प्रतिपक्षी विजयी झाले असेंही म्हणतां येत नाहीं. या लढाईनंतर अबदालीनें दिल्लीचे तख्त स्वाधीन करून घ्यावयाचे होते. परंतु तसे न करितां तो स्वदेशीं निघून गेला; व त्याचे अमीर उमराव कोणीही येथें स्थिर झाले नाहींत. ही मंडळी जी गेली ती कायमची गेली. इतकेच नव्हे, तर त्यांच्या पश्चात् त्यांचे कोणीही सगेसोयरे हिंदुस्थानाकडे पुनः वळण्याचें घडलें नाही. सारांश, पानिपतामुळें हिंदुस्थानाच्या बाहेरील मुसलमानांस जरब जब्बर बसली यांत संशय नाहीं. आतां मराठ्यांकडे वळूं या.

### पानिपताचे मराठी साम्राज्यावर परिणाम
### उत्तर हिंदुस्थानांत नजरा फिरल्या

नानासाहेब पेशवे यांस मोठाच धक्का बसला व त्यातच कांहीं कालानंतर त्यांचा अंत इ. स. १७६१ ता. २३ जून रोजीं झाला. पुण्यास मुख्य केंद्राचे ठिकाणीं चुलत्या-पुतण्यामध्यें गादी संबंधानें तेढ उत्पन्न झाली. इ. स. १७५० ते १७६१ पर्यंत साधन केलेली साम्राज्यसंपत्ती ही केवळ विजयाच्या जोरावर आधारलेली होती. तींत अंतर्बाह्य संघटन घडत होतें, एकजीव झालें नव्हतें, अशा स्थितींत हा पानिपतचा प्रसंग उद्भवला. या परिस्थितीचा फायदा पूर्वजित संस्थानिकांनीं घेण्यास सुरुवात केली. उत्तरेस रजपुतांनीं, दक्षिणेंत निजामानें प्रामुख्यानें व त्याच्या अनुषंगानें लहान लहान संस्थानिकांनीं आपली पूर्वीची वृत्ती टाकून दिली. 'त्यांच्या नजरा फिरल्या.' ही गोष्ट सोबतच्या पत्राच्या उताऱ्यावरून लक्षात येईल.

पानिपतच्या युद्धानंतर उत्तर हिंदुस्थानांत झालेल्या स्थितीचे वर्णन गोविंद शामराज हे गंगाधरपंत तात्यास ग्वाल्हेरीहून ता. २८ जूनचे पत्रांत कळवितात,

''स्वामींस पूर्वी एकदोन पत्रें पाठविलीं त्यांची उत्तरें आलीं, कीं राजश्री सुभेदारसाहेब व आम्ही पुण्यास गेल्याउपर किल्ल्याची पोक्त बेगमी करून पाठवितों. त्यास बेगमीचा मजकूर हा कालपर्यंत होऊन आला नाहीं. आज तीन वर्षे कर्जवाम घेऊन स्थळरक्षण केलें. आपणांस सर्व विदीत आहे. हिंदुस्थानांचा अंमल सर्व उठला. मातबर मामलेदारांनीं ठाणीं सोडली. आम्ही राजश्री सुभेदाराच्या मल्हारजी होळकर व स्वामींच्या वचनावर आजपर्यंत संरक्षिले. स्वामींचे पुण्यास जाणें झालें असेलच. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींस विनंती

करावी. त्यांनीं तो हिंदुस्थानची आशा सोडली. पत्रें वरचेवर लिहितां दमलों. याजउपरी बेगमी करून पाठविल्यास जागा राहील. नाहीं तरी आमचा उपाय नाहीं.

**पानिपतानंतरची मल्हारजींची कामगिरी**

मल्हारजी होळकरांच्या नजरेस ही गोष्ट ताबडतोब आली. आतां सर्व मराठ्यांच्या साम्राज्यांत वयोवृद्ध, तपोवृद्ध तेच होते. पेशव्यांची चौथी पिढी ते पाहत होते. मानला ते देव नाहीतर दगड अशी स्थिती होती. बाह्य स्थिती या प्रकारची. मल्हारजींची स्वत:ची स्थिती सत्तेच्या किंवा मत्तेच्या दृष्टीनें ठाकठिकीची बसून गेली होती. शरीर श्रमसाहसानें थकत चाललें होतें. अशा स्थितींत कोणाच्याही आज्ञेची वा कुमकेची वाट न पाहतां विस्कळलेली घडी पुन: सावरण्याचा त्यांनीं खटाटोप केला. मराठी साम्राज्याच्या पोरवड्या झालेल्या चारही भागांकडे त्यांचे हात व डोळे गेले व मृत्युच्या शेवटच्या घटकेपर्यंतही त्यांची कामगिरी कशी चालली होती हें आतां नमूद करावयाचे आहे.

**इ. स. १७६१**

**पुण्याचे रक्षण मल्हारजींनीं केले**

**पुण्यास दोन पक्ष; मल्हारजी माधवरावांकडे वळतात**

फेब्रुवारींत मल्हारजी पानिपताहून निघाले ते ग्वाल्हेरीस येऊन थांबले. त्यांजबरोबर गोविंदराव बुळेही होते. बुंदेलखंड व माळवा यांतील जमीनदारांवर व संस्थानिकांवर आपला अंमल पुन: प्रस्थापित केला. जाटवाड्यावर लढाई इ. स. १७६१ त जहाली. तद्नंतर आपल्या कुलस्वामीच्या दर्शनास इ. स. १७६२ च्या मार्च महिन्यांत जेजुरीस गेले. जेजुरीस एक पंधरावडा राहून ते चांदवडास आले. यानंतर पुण्याचा घरचा बखेडा जगजाहीर होऊन निजाम मोठी फौज घेऊन पुण्यापासून पांचसहा कोसांचे अंतरावर येऊन थडकला. तेव्हां पेडगांव व सिद्धटेक या ठिकाणीं आघाडीस राहून पुण्याचे रक्षण करण्याचे काम मल्हारजींनीं केलें. त्याच्या मदतीला विसाजीपंत बिनीवाले, हरी गोपाळ व गोपाळराव पटवर्धन हे तिघे होते. पुण्याजवळ उरळीचे मुक्कामीं जेव्हां निजाम आला, तेव्हां मराठ्यांनीं त्यास भोवतीं गराडा घालून त्याला चहूंकडून अगदी जर्जर करून सोडले. तेव्हां त्यानें तहाचें बोलणें लाविलें. दादासाहेब व त्यांचे सल्लागार सखाराम बापू यांनीं निजामास सवलती देऊन त्याची मैत्री जोडली. हेतू हा कीं, त्यानें पुढेंमागें आपल्यास मदत करावी. कांहीं सरदार फुटून आपआपले गांवीं गेले. या तहानें दादासाहेबांचा एक व माधवराव पेशव्यांचा एक, असे दोन पक्ष झाले. मल्हाररावांना दोन्ही पक्ष आपआपलेकडे ओढूं लागले. पण ते माधवराव पेशव्यांकडेसच राहिले.

**घोडनदी व आळेगांवच्या लढाया**

सन १७६२ च्या नोव्हेंबरांत घोडनदी आणि आळेगांव या ठिकाणीं दोन लढाया झाल्या.

ता. ७-११-१७६२ इ. रोजीं माधवराव पेशव्यांनीं आपले मातुश्रींस लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे :

तीर्थस्वरूप दादासाहेब फौजेसह आम्हांवर चालून बेजरब गोटावर आले. घोडनदीमध्यें, पलीकडे ते, अलीकडे आम्ही याप्रमाणें गांठ पडली. तमाम फौजा तयार करवून सरदारांशीं सरदार फौजेसुध्दां उभे राहिले. जेजाल, बाण, वगैरे यांचा मार दिला. त्यानें त्यांची माणसें, घोडीं कांहीं ठार, कांहीं जख्मी होऊन माघारें तोंड केलें आणि सारी माणसें फौज एकत्रित करून गट केला आणि तोफा सुरू केल्या. यावर आम्हींही आपल्या दोन तोफा सुरू केल्या. त्यानें फार काम केले. दादासाहेबांकडील वीस पंचवीस माणूस ठार, दीडदोनशें जखमी, घोडे वीस जखमी व पंधरापर्यंत ठार. आम्हाकडील पांच, सात, दहा, ठार झाले. वीसपर्यंत जखमी झाले. घोडेही पांच सात ठार, दहाबारा जखमी झाले. गोपाळराव, पीराजी नाईक, रास्ते वगैरे सरदारांनीं फार केली. होळकरांची फौज फार झटली.

(माधवरावांचे ता. १२-११-१९६२ चे आपले मातोश्रींस पत्र)

''सर्व मुलुखांची आशा सोडून त्यांचे हस्तगत आपण व्हावें. दुसरा विचार नाहीं. कूच करून आळेगांवचे सुमारें आलों तो मागून त्यांच्या फौजा सड्या होऊन आल्या. आळेगांवावर बुणगे पोंहचले. पाठीमागें फौजा सड्या होत्या. त्यांची व त्या फौजेची गांठ पडली. प्रहर दिवसापासून दिवस मावळेपावेतों झुंझ होत होती. शेवटीं उराशीं ऊर मी केले. उपर कांहीं फौजेंत फितूर याजमुळें आमच्या फौजांनीं माघार घेतली. सरासरी घोडे माणूस आम्हांकडील तीनचारशें पडले. बहुत ठार थोडे जखमी, याजप्रमाणें त्यांजकडील. परंतु ईश्वरें यश तिकडे दिलें. ऊपरी आमचे फौजेचा धीर सुटला. रातोरात भीमा उतरून अलीकडे आलों तों फौजेस उपास. दुसरें दिवशीं भीमेवरून कूच झालें, तों फौजेचा धीर सुटला. तोफांचे बैल थकले. इतक्यांत यांनीं बेजरब गांठले. तेव्हां सर्वांच्या मतें सल्ला करावासा झाला.

### मल्हारजींची मध्यस्थी

(रघुनाथराव दादासाहेब लिहितात) चिं. रा. राव घोडनदीवर होते तो आम्ही येऊन पोंहचलों. प्रथम गोळागोळी झाली. तदोत्तर राजश्री मल्हारजी होळकर, बाबूराव नाईक, पीराजी नाईक आले. चिरंजीव भेटीस येतात म्हणोन सांगितले. त्यांस आणावयास त्रिवर्गास पाठविले. असें असतां मागती सरदारांनीं व कारभाऱ्यांनीं झुंझावयाचा प्रकार करून घोडनदीवरूनच कूच करून चालिले. तिसरें प्रहरीं गांठ पडून झुंझ झाले. समयास सरदारांनीं घालविलें. चिरंजीव येऊन भेटले.

### दादासाहेबांनीं चालविलेली उलथापालथ

येणेंप्रमाणें माधवरावांचा पक्ष पराजित झाला. दादासाहेबांनीं प्रखर रूप धारण करून पटवर्धनांची जहागीर सरंजाम बव्र्यांस दिला. भवानराव प्रतिनिधी याचे प्रतिनिधीपद काढून घेऊन तें आपला अल्पवयी मुलगा भास्करराव याचे नांवानें करून घेतलें. गमाजीकडे प्रतिनिधीची मुतालकी होती ती नारोशंकर यांस दिली. मल्हाराराव होळकर हा सर्व प्रकार चांदवडहून पाहत होतें.

**या उलथापालथीनें झालेला असंतोष**

**पुण्यावर परिणाम**

दादासाहेबांच्या या अनीतिचा परिणाम असा झाला कीं, ही सर्व नाखूश झालेली मंडळी निजामास जाऊन मिळाली. निजामानें या मराठेगड्यांस आपले राज्यांत जहागिरी व इनामे देऊन ठेवून घेतलें आणि त्यांच्या मदतीनें पुन: पुण्याचा रोख धरिला. या मराठे सरदारांचे मदतीनें निजामानें पुणें जाळलें व साताऱ्यापासून खंडणी वसूल केली. तिकडे दादासाहेब सैन्यासह गेले आणि त्यांनीं भागानगर जाळिलें. पण त्याचा कांहीं एक परिणाम निजामावर झाला नाही.

**इ. स. १७६३ पुणें दरबारची हलाखीची स्थिति**

सन १७६३ च्या प्रारंभीं महाराष्ट्रावर हा मोठाच प्रसंग ओढवला. बहुतेक मराठे वीर वीस-पंचवीस हजार सैन्यासह निजामास जाऊन मिळाले होते. इकडे पुणें दरबारांत दादासाहेबांनी राजनीति अलौकिक व अपूर्व. माधवराव पेशवे नजरकैदेंत व त्यांचा पक्ष असा राहिलाच नाहीं. निजामाकडे पायदळ व तोफखानाही भरपूर, तेव्हां यावेळीं त्याच्याशीं समोरासमोर युद्ध करणें ठीक नाहीं, असे पुण्याच्या दरबारांत ठरून गनिमी कावाच अंगिकारावा असें सर्वानुमतें ठरले. या गनिमी काव्याचे भीष्माचार्य जे मल्हारजी होळकर ते चांदवडास होते.

**मल्हारजींस पुण्यास आणिलें**

विठ्ठल शिवदेव त्यांचे जुने दोस्त म्हणून त्यांजकडेस गेले, नंतर सखाराम बापू गेले व शेवटीं माधवराव पेशवे स्वत: गेले व मल्हारजींस फौजेसह पुण्यास घेऊन आले.

**मल्हारजींनीं फूट भरून काढिली**

खलबत सुरू झालें. निजामाचे यश आपआपसांतल्या फुटीवर अवलंबून आहे. ही गोष्ट सर्वांच्या निदर्शनास आली. तेव्हां ही फूट भरून काढण्याचें काम सर्वानुमतें मल्हाररावांकडे आले. मल्हाररावांनीं जानोजी भोसले, भवानराव प्रतिनिधी, पीराजी नाईक, निंबाळकर व घारघुडे इत्यादिकांच्या समजुती सामदामादि चतुर्विध उपायांनीं घालून फुटलेले सरदार माघारीं फिरवले. सर्वांची हमी आपण स्वत: अंगिकारिली आणि सर्व मराठी दळ एकत्रित केलें आणि सर्व सैन्य राक्षसभुवन येथें निजामासमोर आले.

**राक्षसभुवनाचे युद्ध**

लढाईस तोंड लागले. तेव्हां आबा पुरंधरे व हुजूर पागेचे सरदार आघाडीस होते. त्यांजवर निजामाच्या फौजेनें तोफा सुरू केल्या. तो त्यांच्या लष्करांत दारूखान्यास आग लागली. यामुळें घोटाळा झाला. त्या संधींत पुरंधरे व विंचूरकर यांनीं वेगानें हल्ला केला व शत्रूच्या आघाडीस मोर्चा होता, तो उधळून त्यांनीं आंत प्रवेश केला. मागून खुद्द दादासाहेबही सैन्याची एक टोळी घेऊन मारमार करीत आंत शिरले. मोठ्या निकरानें युद्ध

होऊं लागले. त्यांत मराठ्यांची सरशी होण्याचा रंग दिसूं लागला. इतक्यांत विठ्ठल सुंदर (निजामाचा दिवाण) यानें आपल्या फौजेतील निवडक लोकांनिशीं आवेशानें हल्ले करून पुरंधरे व विंचूरकर यांस हुसकून लाविलें. सारें निजामानें सैन्य, मध्यभागीं सापडलेल्या दादासाहेबांवर चोहोंकडून तुटून पडले. त्याप्रसंगीं दादासाहेबांनीं बहुत पराक्रम करून कांहीं वेळ आपला बचाव केला. परंतु ते शेवटीं शत्रूच्या हातीं लागण्याचा अजमास दिसूं लागला. या आणीबाणीच्या वेळीं माधवरावसाहेब व मल्हारराव होळकर यांनीं कुमक पाठवून दादासाहेबांस शत्रूच्या परिघातून सोडवून आणिलें. नंतर दादासाहेब व होळकरादि सरदारांनीं सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्या करून शत्रूवर एकाच वेळीं चोहोंकडून हल्ल्यावर हल्ले चढविले. या लढाईत विठ्ठल सुंदर ठार मारला जाऊन मराठ्यांस अपूर्व यश मिळालें. निजाम व पेशवे यांच्यात, गंगोबातात्या चंद्रचूड आणि कृष्णराव बल्लाळ काळे यांच्यामार्फत तह सप्टेंबर १७६३ त होऊन जवळ जवळ एक कोटीचा मुलूख पेशव्यांस निजामाकडून मिळाला. या लढाईत 'मल्हारराव होळकर यांचा मुत्सद्दीपणा, वजन, आणि पराक्रम सर्वांच्या नजरेस पूर्णपणें आलें. मल्हाररावजींस त्यांचे कामगिरीबद्दल जो प्रांत इ. स. १७३२ त सरंजाम म्हणून दिला होता. त्यापैकीं कांहीं वंशपरंपरेनें देऊन आणखींही प्रांत बहाल केले.

**मल्हारजींस जहागिरीची प्राप्ती**

मल्हारजी बीन खंडोजी होळकर याचे नांवें सनद कीं तुम्हांस सरंजामास सालमजकुरपासून पेशजीचे अंमलदारापासून दूर करून करार करून दिल्हे. महाल व गांव बीतपशील.

१ परगणे सावेर प्रांत माळवा दरोबस्त खेरिज दुमाले गांव व इनाम करून बाकी दरोबस्त.

१ परगणे सिरोंज प्रांत माळवा दरोबस्त खेरिज दुमाले गांव व इनाम वजा करून बाकी दरोबस्त. अंमल.

१ परगणे देपूर पैकीं संगमनेर अजदेह ४५ पैकीं वजा दुमाले गांव १ मौ. पांगरी, १ मौ. शेह, १ धरणगांव, मौजे १ नादनभव व १ नलके वगैरे वजाबाकी देह ३९ गांवें जहागिरी अंमल.

१ मौजे पांडे परगणे दिंडोरी येथील जहागिरीचा अंमल दरोबस्त.

१ सरकार बिजागढ पैकीं दुमाले महाल वजा.

१ परगणे कसरावद निसबत व्यंकटारामशास्त्री.

१ परगणे कान्हापूर कैलासवासी तीर्थरूप यांजकडील अन्नछत्राकडे.

२ निसबत खंडेराव पवार १ परगणे सुलतानाबाद १ परगणे बडखल.

१ परगणे बरडे निसबत बहीरजी बाबर.

तुम्हांकडे पेशजीपासून आहेत ते परगणे सेंधवे व परगणे नागलवाडी सुद्धां दरोबस्त अंमल.

१ परगणे माळवा प्रांत खानदेश अजदेह ६४ पैकीं वजा दुमालेगांव १० निसबत

दाऊनखान टोके पहिले सनदेप्रमाणें.

१ कसबे दाभाडी, १ कसबे पिंपलगांव व गांव (नांव दर्ज नाही) येणेंप्रमाणें महाल चार व सरकार एक देह दोन सरंजाम करार करून दिला असे तरी सदरहूप्रमाणें महाल व गांवचा लिहिल्याप्रमाणें अंमल करून सेवा एकनिष्ठ करीत जाणें म्हणोन सनद.

**इ. स. १७६४ मल्हारजींस जहागीर**

यानंतर दुसरी सनद इ. स. १७६४ त मिळाली ती खालीलप्रमाणें.

मल्हारजी बीन खंडोजी होळकर यांनीं हुजूर येऊन विनंती केली कीं, आपण राज्यातील एकनिष्ठ सेवक स्वामींसेवा एकनिष्ठेनें केली त्यास कृपाळू होऊन परगणे अंबाड सरकार जालनापूर व मौजे कोरेगांव तालुके पाबळ प्रांत जुन्नर नूतन इनाम करार करून देऊन चालविले पाहिजे म्हणून त्यावरून मनास आणून कृपाळू होऊन सदरहूप्रमाणें इनाम नूतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें करार करून देऊन सनद दिली असे.

निजामाचे प्रकरणांत मल्हारराव गुंतले असताना त्यांनीं दमाजी गायकवाड यांस पाठविलेलें पत्र खालीं दिलें आहे.

**गायकवाडांस मदत करण्याची मल्हारजींची मनीषा**

''आम्ही पुण्यास आलों. आपल्याकडील राजश्री रामचंद्र महादेव व शिवराम भास्कर आहेत. त्यांनीं पै दर पै आपल्यास लिहिलें असेल. सांप्रत शिवराम भास्कर आपलेकडे आले आहेत. हे सर्व अंतरबाह्य सांगतील त्यावरून ध्यानांत येईल. मनन करून आपला आशय येईल त्याअन्वयें येथील जाबसाल पैरवी होईल. येथें प्रसंगानुरूप निकाल होणें तो आपला यत्न चालेल त्याप्रमाणें निर्गमांत येईल. तदनुसार आपणांस मान्य आहे तर तैसेंच लिहावें. अगर आपल्या चित्तानुरूप ध्यानास येईल तें निश्चयांत आणून तपसिलीं ल्याहावें. त्याच अनुलक्षें करून आपला प्रयत्न चालेल येथवर होईल.

**अशींच दुसरी उदाहरणें**

हा मनसुबा कशासंबंधीं होता हे या पत्रात स्पष्ट नाही किंवा त्याचे दिग्दर्शनही नाही. पण एक गोष्ट स्पष्ट होते कीं आपल्या बरोबरीच्या सरदारांचे जे कांहीं कार्य श्रीमंत पेशव्यांकडून होण्यासारखें असेल ते अंगिकारावयांचे व शक्यतेनुसार तडीस न्यावयाचें. धारचे पवार, चंद्रसेन जाधवाचे चिरंजीव, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, नारोशंकर यांचीं कार्ये करून दिल्याचे उल्लेख मागें आलेच आहेत.

इ. स.१७६१ त पहिलें माधवरावसाहेबांस वस्त्रें मिळाली. त्या वेळीं त्यांचे वय केवळ सतरा वर्षाचे होते. वास्तविक पाहिलें तर हे पोरवय. अशा स्थितीत एकंदर राज्याची जबाबदारी त्यांचेवर येऊन पडली, आणि ती पानिपतच्या प्रसंगानंतर पण त्यात एक सुदैवाची गोष्ट ही कीं पेशव्यांच्या घराण्यांत गृहशिक्षणाची सोय उत्तम लागून गेली होती.

**पेशव्यांची गृहशिक्षण पद्धती**

बाळाजी विश्वनाथ पंतप्रधान झाल्यावर स्वारी शिकारीत असोत किंवा राजदरबारीं असोत बाजीराव व चिमाजी बरोबर असायचेच. बाजीरावसाहेब व चिमाजी आप्पा स्वारीवर असत तेव्हां नानासाहेब साताऱ्यास दरबारांत राहून दरबारवृत्तें वडिलांना कळवीत. नानासाहेबांच्या कारकीर्दीत विश्वासराव उदगीरच्या लढाईत लढले व पानिपतास धारातीर्थी पडले. या सर्व पद्धतीचा परिणाम असा झाला कीं राजकारण व राज्यकारभार यांचे बाळकडू प्रत्येक पेशव्यास बाळपणींच मिळत गेले. एक सरला तर दुसरा पुढें सरून त्याचा मागील धागा हातांत धरून काम चालवूं शके.

**दंतकथेंतील मर्म शोधावें**

**अकबारनवीस काय बरें म्हणतील?**

माधवरावसाहेब व त्यांचे बंधु नारायणराव हे लहानपणीं वाड्याचे चौकातून हत्तीची झुंज पहात बसले होते. एक हत्ती पटांगण सोडून धावूं लागला तेव्हां नारायणरावसाहेब घाबरून उठण्याचे बेतांत होते. तेव्हां त्यांचा हात धरून माधवरावसाहेब त्यांस म्हणाले. ''अकबारनवीस काय बरे म्हणतील?'' या वाक्यांत पेशव्यांच्या घराण्याकडे गृहशिक्षण ओथंबून राहिलें आहे, असे आमचेप्रमाणें सर्वांसही दिसून येईल. माधवरावसाहेबांच्या सर्व आयुष्याचे अवलोकन केल्यास ही त्यांची उक्ती, त्यांचे चारित्र्याची गुरुकिल्ली असें म्हणता येईल. गृहशिक्षणाचा प्रश्न निघाला आहे तेव्हां हेंही येथें नमूद करणें इष्ट व योग्य आहे कीं गोपिकाबाईंनीं सवाई माधवरावास जें पत्र लिहिलें तें सबंध मननीय आहे.

**माधवराव पेशव्यांची कामगिरी**

वरती उल्लेखिलेंच आहे कीं माधवराव पेशव्यांवर १७ वे वर्षी मोठी जबाबदारी येऊन पडली आणि हेंही आपण आता पाहिलेंच आहे कीं ते या कार्यात तरबेज झाले असले पाहिजेत. ही त्यांचेसंबंधीं धरलेली अपेक्षा योग्य काळीं कल्पनेबाहेर पूर्ण झाली. इ. स. १७०१ त म्हणजे राज्यसूत्रें हातीं आल्यानंतर अवघ्या दहा वर्षांत दिल्लीच्या तटावर त्यांनीं भगवा झेडा रोविला आणि आपल्या पितामहाची प्रसिद्ध वाणी खरी करून दाखविली. या कामगिरीत त्यांस विघ्नेंही थोडीथोडकीं आली नाहीत. अधिकाराची वस्त्रें अंगांवर पडतात न पडतात तोंच काका पुतण्यांत तेढ उत्पन्न झाली; निजामाचें फावलें. घरच्या सरदारांत पक्ष उत्पन्न झाले. तरी पण धीर न सोडितां सामदामादि चतुर्विध साधनांनीं काकांस नरमाईवर आणिले. आपले स्थान निष्कंटक झाल्यावर त्यांनीं आपली नजर दूरवर फेकून कामगिरीचे दोन विभाग केले.

**उत्तर हिंदुस्थानांत बंदोबस्त अनुभवी सरदारांवर सोंपविला**

**दक्षिणेतील बंदोबस्त स्वतः पेशव्यांनीं अंगिकारिला**

**कर्नाटकांतील मल्हारजींची कामगिरी**

उत्तर हिंदुस्थानाचा बंदोबस्त मल्हारराव होळकर, शिंदे, यशवंतराव पवार, नारोशंकर, अंताजी माणकेश्वर, कानडे व बिनीवाले यांजवर सोंपविला.

श्रीछत्रपती शिवाजी महाराज यांनीं तुंगभद्रेच्या खालील जो मुलूख काबीज केला होता तो या वेळीं हैदर बळकावून बसला होता. हिंदुपदपादशाहीची स्थापना हे तर सर्व मराठ्यांचे ध्येय होऊन बसलें होतें. त्या ध्येयास अनुसरून माधवरावांनीं आपल्या दुसऱ्या कामगिरीचें क्षेत्र कर्नाटक योजिले होतें आणि त्या क्षेत्रावरील मोहिमा स्वत: अंगिकारिल्या होत्या. एकंदर पांच मोहिमा व दोन स्वाऱ्या करून हैदरास त्यांनीं अंकित केलें.

**खरे पत्रव्यवहार**

आतां आपणास उत्तरेकडेस वळावयाचें आहे आणि तोच आपला मुख्य विषय आहे. उत्तर हिंदुस्थानांच्या स्थितीचें सिंहावलोकन करूं या.

(अ) दिल्लीचा पातशहा हतबल होत्साता कोणाचे साहाय्य मिळेल या विवंचनेंत होता.

(आ) बंगाल, बहार, आणि ओरिसा या प्रांतांची ''दिवाणी'' कंपनी सरकारच्या ताब्यांत गेली होती. एकास नबाब करावे, दुसऱ्याची उचलबांगडी करावी आणि पुन्हा मागच्यास बरा म्हणून स्थापावें असा प्रकार तेथें चालू होता.

(इ) नागपूरकर भोसले त्या प्रांतावर (बंगाल्यावर) आपला हक्क सांगतच होते. बुंदेलखंडांत बुंदेले आपलें स्वातंत्र्य शोधूं लागले होते.

(ई) जाट अंतर्वेदींत व आजुबाजूस हातपाय पसरून होते.

(उ) यमुनेच्या पलीकडे रोहिले दंड ठोकून उभे होते, आणि,

(ऊ) राजपुतान्यांतील रजपूत मराठ्यांशीं, पूर्वीचा भाव विसरून निराळ्याच दृष्टीनें वर्तूं लागले होते.

असें हें उत्तरेचें राजकारण पानिपतानंतर उभें राहिलें. दक्षिणेंत माधवरावांनीं स्वत: धडाडीनें पुढाकार स्वीकारल्यामुळें कार्य जितक्या झटपटीनें तडीस लागले, तितके उत्तरेस लागलें नाही. त्यास अनेक कारणें होतीं. एकतर माधवरांचे तोडीस शक्ती, बुद्धी व युक्ती अशा त्रिगुणांनीं संपन्न असा पुढारी उत्तरेस लाभला नाही. तरी पण जो कार्यभाग झाला तो प्रस्तुत इतिहासाच्या दृष्टीने नमूद केला पाहिजे.

सन १७६३ त चांदवड सोडून मल्हारराव होळकर सेंधव्याचे मार्गानें इंदूरास आले. एकंदर पुढील कार्याची जबाबदारी त्यांनीं अजमाविली असल्यानें इ. स. १७६४ चा बहुतेक काल त्यांनीं त्या तयारीस लाविलेला दिसतो. आपल्या विस्तृत राज्याचा अंतर्बाह्य भाग ते सांभाळून होतेच हे त्यांच्या ''राज्यकारभाराचे'' प्रकरणांत वर आलेच आहे.

**इ. स. १७६४**

आपल्या राज्यांत बसूनच मोहीमेची किती तयारी त्यांनीं केली होती हे त्यांच्या रोजकीर्दीवरील खालील उताऱ्यानें दिसून येईल. ''परगणे रामपुरा हिशबी खर्च

इसवी सन १७६४.''

| | |
|---|---|
| २५२-१-० | तोफेचे गोळे करण्याकडे खर्च. |
| २,०७८-०-० | जंबुरे (बंदुकी) निसबत खर्च. |
| १६,५९५-३-० | उंटे खरेदी लष्करचे तयारीकडेस. |
| ६७०-१०-० | दारू व शिसें खरेदी. |
| ६६५-४-६ | फौजेंत लागणारे सूत वगैरे सामान. |
| १,०००-०-० | हत्ती मिर्जाबेगकडे. |
| १,५९,२२६-८-९ | शिबंदी, पायदळ सैन्याकडे खर्च. |
| २२-०-० | झेंडे (लावण्यास) तैयार करविले. |
| १,८०,५०९-११-३ | |

हा उतारा अनेक दृष्टीनें महत्वाचा आहे. (१) युद्धाच्या तयारीस त्या काळीं कोठची शस्त्रास्त्रें लागत हें स्पष्ट होईल. (२) सुभेदारसाहेब हे केवळ गनिमी काव्यालाच चिटकून राहिले नाहींत, तर कालमानानुसार तेंही पाऊल पुढें टाकीत होते. (३) ही सर्व शस्त्रास्त्रें रामपुरा प्रांतात तयार करण्याचे कारखाने व कारखानदार होते. हल्लींही कांहीं आहेत.

**दिल्ली दरबार व भोवतीचे तट**

मल्हारराव, वरील तयारी करून, स्वारीची संधी पाहत असतां तो प्रसंग आपोआप चालत आला. दिल्ली दरबारांत यावेळीं बादशहा नरम असल्यामुळें दोन पक्ष समोरासमोर उभे राहिले. एक पक्ष गाजीउद्दिनाचे तर दुसरा नजीबउदौला रोहिल्याचा. दोन्ही पक्ष आजुबाजूच्या राजेरजवाड्यांची मदत मिळविण्याच्या खटपटींत होते. सूरजमल जाट हे यावेळीं एक जाडें प्रस्थ होऊन बसले होते. गाजीउद्दिनाचे पक्षास ते जाऊन मिळाले.

दोन्ही पक्षाच्या झटापटीं पानिपतापूर्वी चालू होत्या व त्यानंतरही त्या तशाच चालू राहिल्या.

**दिल्लीत जवाहीर जाटाचा विजय**
**मल्हारजी व शीख त्यास मिळतात**

आतांच्या वर्णनाचा प्रसंग हा आहे कीं इ. स. १७६३ सालच्या ता. २५ डिसेंबर या दिवशीं शत्रूशीं दोन हात करीत सूरजमल जाट यांचा देह धारातीर्थी पडला. त्यांच्या पश्चात वारसांत गादीबद्दल तंटे सुरू झाले. राणी हंसा हिच्या मदतीनें तिचा पुत्र नाहरसिंग हा गादीवर बसला. जवाहीर हा दुसरा पुत्र म्हणूं लागला कीं वडिलांच्या मृत्युबद्दल सूड उगविणें हे सर्वांचेच कर्तव्य आहे. तो त्या प्रयत्नास लागला आणि त्यांत त्यास यशही आले. इ. स. १७६४ च्या आक्टोबरांत दिल्लीच्या मैदानांत जवाहीरनें स्वत:च्या शंभर तोफा व साठ हजार ६०००० सैन्य उभें केलें. मल्हारराव होळकर यांस आमंत्रण देऊन पंचवीस हजार २५००० मराठे आणिले व पंधरा हजार १५००० शीख येऊन सामील

झाले. सारांश, एक लाख लष्कर मैदानांत खडे झाले. नजीबउदौल्यानें आपले कुटुंब व धन दौलत सहारणपूर प्रांतातील शुक्रताल येथील मजबूत किल्ल्यांत बंदोबस्तांत नेवून ठेविलें होतें. रोहिले सरदारांस आणि अबदालीस त्यानें कुमकेची पत्रें लिहिली होतीं, किल्ल्याभोवतीं खंदक खणून आपल्या परी तोही मोठ्या बंदोबस्तानें राहिला होता.

## जाटांचा व शिखांचा पराक्रम

स्वारी करणाऱ्या पक्षांपैकीं मराठे शहराच्या उत्तरेस उभे राहिले. ईशान्येस शीख सैन्य उभें होतें. जवाहीरानें आपल्या सैन्याचे तीन विभाग पाडून एक नदीच्या पूर्वभागास, दुसरा दिल्लीद्वाराकडे आणि तिसरा अजमेर द्वाराकडे, उभा केला. नंतर त्यानें नजीबखानास आवाहन केले कीं किल्ल्यांत दडी मारून बसूं नका. उघड्या मैदानांत येऊन दोन हात करा. इतकें आवाहन करूनच ते थांबले नाहीत, तर शत्रूस बाहेर पडण्यास वाव मिळावा म्हणून दिल्लीच्या दक्षिणेस सोळा मैलांवर असणाऱ्या फरिदाबाद नांवाच्या शहराकडे आपले सैन्य वळविलें. नजीबखान बाहेर पडला आणि इ. स. १७६४ ता. १५ नोव्हेंबर दोन्ही पक्षांचे युद्ध झाले. जवाहीरच्या पक्षानें अफगाणांना रेटीत रेटीत दिल्ली शहरांत कोंडून टाकिले. जवाहीर आणि मल्हारराव होळकर यांनीं यमुना ओलांडून शहादरा काबीज केले आणि ता. १७ नोव्हेंबर रोजीं त्या बाजूने तोफांचा मारा सुरू केला. तीन महिनेपर्यंत किल्ल्यांतील लोकांचे फार हाल झाले. इ. स. १७६५ च्या ४ फेब्रुवारी रोजीं नजीबखानानें शीख व जाट यांजबरोबर दिल्लीच्या जनावरांच्या व फळफळावळीचे मंडीनजीक युद्ध केले. या युद्धांतही दोन्ही पक्षांकडून तोफांचाच भडिमार उडाला होता. शेवटीं अफगाणास हार खावी लागली. दुसरें दिवशीं दिल्लीचे रहिवासी जाटांच्या छावणीत शिरले आणि आम्हांला खायाला घाला, असे दीनवाणीनें विनवूं लागले. याच सुमारास शीखही स्वस्थ बसले नव्हते. त्यानीं नजीबाची सहारणपूर व इतर कांहीं ठिकाणें काबीज केलीं. याप्रमाणें तो चारी बाजूनें चीत झाला आणि त्यानें तहाचें बोलणे सुरू केलें.

## जवाहीरसिंगास तादृश फायदा मिळाला नाहीं

त्याचे तीन वकील मल्हाररावांस ता. ६ फेब्रुवारी इ. स. १७६५ रोजीं भेटले. नंतर गंगाधरपंत तात्या नजीबाकडे गेले. ता. ९ फेब्रुवारीस नजीब मल्हाररावांना भेटला आणि नंतर ते दोघेही जाटाच्या छावणीकडे गेले. तेथून सायंकाळीं शहरांत ते परत आले, आणि येतांना बरेचसे धान्य घोड्यावरून भरून त्यांनीं शहरांत आणिले. ता. १३ फेब्रुवारी रोजीं नजीबानें मल्हाररावांस एक हत्ती, दोन घोडे व नऊ ताटे भरून जवाहीरात दिलें आणि त्यांच्या लष्करांत १२९ बहुमानाचीं वस्त्रें वाटली. ता. १४ फेब्रुवारी रोजीं जवाहीरसिंगाला जमियतखान (नजीबखानाकडून) येऊन भेटला, आणि त्याला एक हत्ती व बहुमानाचें वस्त्र दिले. याप्रमाणें हें प्रकरण येथें आटोपलें. लढणारे पक्षांत तह झाला. परंतु त्याच्या अटीं बाहेर आल्या नाहीत. फादरवेंडेंड, हे फ्रेंच गृहस्थ लिहितात कीं या युद्धाचा परिणाम असा झाला कीं जवाहीरसिंगाची प्रतिष्ठा त्यांच्या लोकांत वाढली व त्याचे शौर्य जगजाहीर झाले.

मात्र यापलीकडे त्याच्या पदरांत कांहीं पडलें नाहीं.

यात्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील जी कांहीं कामगिरी झाली ती वर आलीच आहे.

या स्वारीचा प्रत्यक्ष जरी नसला तरी अप्रत्यक्ष परिणाम प्रतिपक्षावर (संस्थानिकांवर) झाला असणारच.

## गोहदचे युद्ध व बंगाल, अयोध्येकडील कामगिरी

### नाहरसिंगास मल्हारजींची मदत

सूरजमल जाटाच्या मृत्युनंतर त्याच्या वारसांत व नातलगांत तंटे-बखेडे सुरू झाले. सर्वांनीं मिळून सुरजमलाच्या घाताबद्दल सूड उगवावा म्हणोन जवाहीरसिंगाने केलेला प्रयत्न व त्यात आलेले यश वर निवेदन केलेच आहे. पण हा त्याचा प्रयत्न एकाकीच होता. इतरांची वृत्ती केवळ आपस्वार्थी होती. त्यापैकीं एक नाहरसिंग हा आपणास भरतपूरची गादी मिळावी म्हणून सैन्याची जमवाजमव करीत होता. याच सुमारास चंबलच्या तीरावर गोहदवर हल्ला करण्याचे विचारांत मल्हारराव गुंतले होते. नाहरसिंगाचें लक्ष मल्हाररावांकडे गेले आणि त्यानें त्यांची कुमक याचिली व ती त्यांनीं दिली.

### मराठ्यांचा पराभव

मल्हाररावांच्या सैन्यानें नाहरसिंगाच्या सैन्यास बरोबर घेऊन धोलपूरचे किल्ल्याला वेढा दिला. जवाहीरसिंगानें पंजाबातून शिखांस येण्याचें आमंत्रण केले. मराठ्यांच्या सैन्यांतील एक भाग जाटांच्या प्रदेशात फिरकत होता. त्या भागास वेढा पडला आणि मराठे हरले. नंतर जवाहीरसिंगानें धोलपूर किल्ल्याला वेढा दिला, येथेंही मराठ्यांनीं हार खाल्ली. जवाहीराच्या मनांतून हे युद्ध धसास लावून टाकावयाचें होतें. पण शीख शिपायांनीं आपले मुलखांत परत जाण्याचा पिच्छा पुरविला आणि हें युद्ध येथेंच थांबलें. सारांश, या युद्धांत मल्हाररावांस कांहीं विशेष प्राप्ती तर झाली नाहीच, पण पराजय पदरांत पडला.

### बंगालकडील हालहवाल

ही नाहरसिंगाला केलेली मदत इ. स. १७६५ डिसेंबरमधील होय. याच सुमारास बंगालकडे जी उलथापालथ घडत होती तींत मल्हाररावांचा संबंध आल्यामुळें आपणास त्या बाजूस वळावयाचें आहे.

दिल्ली येथील मध्यशक्ती निर्बल झाल्यामुळें एके काळीं असलेले सुभेदार वंशपरंपरेनें नबाब बनण्याच्या मार्गास लागले. अशाबद्दलचा उल्लेख वरती आलाच आहे. बंगाल हा अशा प्रकारचाच सुभा होता. अलिवर्दीखान व सुराजुदौला, हे एकामागून एक नबाब झाले.

सुराजुदौल्याचे कारकीर्दीत त्याच्या सेनापतीचा भेद करून ईस्ट इंडिया कंपनीनें बंगालच्या राजकारणांत प्रवेश करून घेतला. मीरजाफरास गादीवर नांवाचा बसवून सर्व सूत्रें कंपनीनें आपल्या हातांत घेतली. पुढें मीरजाफरास गादीवरून काढून मीरकासीमास गादीवर

कंपनीनें बसविलें. मीरकासीमच्या स्वतंत्र वृत्तीमुळें त्यास गादीस मुकावे लागले. पुनः मीरजाफरास गादी मिळाली. मीरकासीम स्वस्थ बसणारा नव्हता. आपल्यासारख्या स्थितींत असणाऱ्या दिल्लीच्या बादशहास व अयोध्येच्या सुजाउदौला नबाबास मिळून त्रिवर्गानें पाटणावर स्वारी केली. बक्सर येथें इ. स. १७६४ त लढाई होऊन त्रिवर्गाचा पराभव झाला. सुराजुदौला स्वस्थ न बसतां त्याने आपले वकील मल्हारराव होळकरांकडे पाठविले.

**इ. स. १७६५**

मल्हारराव होळकर ता. ३०-३-१७६५ च्या पत्रांत लिहितात, ''अंतर्वेदींच्या बंदोबस्तासाठीं अनूप शहरीं आलो. तेथें नबाब सुजाउदौला येऊन भेटले. कित्येक प्रकारें निखालस भाव बोलून साह्य व्हावयाचा करार करून गेले. या ऊपर इटाव्यास आलों. येथील काम उरकून गंगातीरीं जाणार.''

इंग्रजांची फौज अलाहाबादेहून वर येऊं लागली. तेव्हां मल्हाररावांच्या टोळ्यांनीं त्याच्या आजुबाजूस घिरट्या घालून सभोवारचा प्रदेश इतका उद्‌ध्वस्त करून टाकिला, कीं दाणावैरणीची आपणांस पंचाईत पडेल अशी इंग्रजांस धास्ती वाटू लागली. ता. ३-५-६५ रोजीं कुराचे मैदानांत इंग्रजांच्या तोफांचा मारा सुरू झाला. मराठ्यांचा कांहीं इलाज चालेना. या लढाईचें वर्णन खालीलप्रमाणें आहे.

''होळकरांचे व इंग्रजांचें युद्ध यमुनापार झालें. इंग्रजांपाशीं तोफांचा मारा फार, तेव्हां निघाले, काल्पीस आले. इंग्रजानें गाजीउद्दीन व सुजा, यांचे लष्कर लुटलें. मल्हारबा फार खट्टे आहेत. याउपरी मागती झुंझ म्हणतात.''

**बंगालची मोहीम मराठ्यांस फलदायी झाली नाहीं**

फेब्रुवारीपासून आगस्टपर्यंत सोन्यासारखा वेळ मराठ्यांनीं दवडिला. ता. १२ आगस्ट इ. स. १७६५ रोजीं क्लाइव्हनें बादशहापासून बंगालची दिवाणी मिळविली. याप्रमाणें बंगाल्यांत केलेला हा प्रवेश मराठ्यांना फलदायी झाला नाही. यापूर्वी नागपूरकर भोसले या प्रांताकडे फिरकून गेले होते. पण कायमचा जम असा बसला नव्हता. आतां इ. स. १७६५ त कंपनी सरकारनें या प्रांतांत पाय रोविला. तो हळूहळू पसरत अलाहाबादवरून दिल्ली व दिल्लीवरून पंजाब अशा रीतीनें पाऊण शतकाच्या अवधींत सर्व उत्तर हिंदुस्तान पादाक्रांत केलें, हें इतिहासप्रसिद्ध आहे.

**माधवरावांचें लक्ष उत्तरेकडे अधिक वेधलें**

**रघुनाथरावदादांची उत्तरेंत रवानगी इ. स. १७६६**

माधवरावसाहेब पेशव्यांना वस्त्रें मिळाल्यावर पहिली तीन चार वर्षे काकांचा बंदोबस्त, रुसून गेलेल्या सरदारांची समजावणी व भोसल्यांचा समाचार या कामांत खर्ची पडलीं. पुण्यांत स्वतःचे आसन याप्रमाणें स्थिरस्थावर केल्यावर माधवरावसाहेबांनीं आपले लक्ष दक्षिणेकडे व उत्तरेकडेही पुरविले. दक्षिणचें काम त्यांनीं स्वतःकडे घेऊन उत्तरेकडचे

काम, होळकर शिंदे वगैरे सरदारांकडे सोपविले होतें. पण लौकरच त्यांच्या लक्षांत आलें कीं उत्तरेकडील कार्यावर कोणीतरी जबाबदार यजमान पाहिजे. रघुनाथरावदादा यांस उत्तरेकडील अनुभव होता. त्यांच्याशिवाय दुसरा कोणीही मनुष्य दिसेना. दादांचे दोष माधवरावांस माहीत नव्हते असें नाही आणि हेंही खरें, दादांस जर गुंतविले नाही तर घरीं बसून तुंबड्या लावण्याचाच प्रकार व्हावयाचा. सारांश, सारासार विचार करूनच ही योजना झाली. त्याप्रमाणें इ. स. १७६६ च्या जानेवारीत दादासाहेब चाळीस हजार फौज घेऊन ब्र्हाणपुराहून निघाले. मार्च एप्रिलच्या सुमारास मल्हारराव दतियास आले. श्रीमंतांची व सुभेदारांची भेट झाली.

**मल्हारजींचा मृत्यु**

जाटाचे पारिपत्याकरितां श्रीमंतासहवर्तमान झाशी प्रांतांत आलमपुरास सुभेदार मल्हारराव आले. दोन अडीच महिन्यांपासून सुभेदारांचे कानास व्याधी होऊन वैशाख शुद्ध ११ मंगळवारीं पावणे दोन प्रहर दिवसा सुभेदारांस देवाज्ञा झाली. द्वारकाबाई व बनाबाई यांनीं सहगमन केले.

(चंद्रचूड लिहितात) ''ईश्वरें मोठा घात केला, सर्वांचे छत्र गेलें. दादासाहेबांनीं तमाम महाल, कोट, किल्ले, यांसी पत्रें लिहिविली कीं चित्तांत कोणेविसी खतरा न आणून आपापले जागा मजबुतीनें व नक्षानें सुखरूप राहावे. सुभेदाराचे जागीं राजश्री मालेरावबाबा आहेत.''
**चंद्रचूड लेख १६७ (पुणें पेशवे रेकार्ड)**

(सनद राजश्री मालजी होळकर यांचे नांवें) कैलासवासी श्री. सुभेदार मल्हारराव होळकर यांचे छत्री व सदावर्ताकरिता इनाम जहागीर.

| | | | |
|---|---|---|---|
| १२ परगणे बेरछा पैकीं गांवें १२ आलमपूर उर्फ मल्हारनगर | | | |
| आकार | ..... | ..... | १७,५०१ |
| ३ परगणे दतिया पैकीं गांवें तीन ३ | ..... | ..... | ७,००० |
| १ परगणे भांडेर पैकीं गांव येक १ | ..... | ..... | ३,००० |
| १६ | | | २७,५०१ |

दरोबस्त कूलबाब कूल कानूसहित.

प्रस्तुत होळकर संस्थानच्या चारिटेबल व एन्डाउमेंट डिपार्टमेंटाकडून कैलासवासी सुभेदार मल्हारराव होळकर यांचे छत्री निसबत खर्च रुपये ५,९७१-१३-६ असून तपशील येणेंप्रमाणें :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वहिवाटदार, चोपदार, मालदार, खासबरदार, | | | | |
| कामाठी, वगैरे निसबत खर्च. इंतजामी | | ..... | | ४,७५२-०-० |
| सदावर्त, धर्मादाय | ..... | ...... | ..... | ५५९-५-६ |
| पूजाअर्चा | ..... | ..... | ..... | ४०५-०-० |

| | | | |
|---|---|---|---|
| सणवार निसबत खर्च . | .... | ..... | १८७-०-० |
| गनशाट तोफा, सलामीबद्दल | ..... | ..... | १७-०-० |
| मरम्मत 'रिपेर' वगैरे किरकोळ खर्च | ..... | ..... | ५१-८-० |
| | | | ५,९७१-१३-६ |

येणेंप्रमाणें हल्लींही इंतजाम चालू आहे.



**प्रकरण १७ वें**

# मल्हाररावांच्या कर्तृत्वाचा आढावा

*''स्वाम्यमात्यश्च राष्ट्रं दुर्ग: कोशो बलं सुहृत् ।*
*परस्परोपकारीदं सप्तांगं राज्यमुच्यते ।।''* (कामंदक)

अर्थ : ''स्वामी (राजा), मंत्री, प्रजा, सैन्य, कोश, कोटकिल्ला व सुहृदगण (आप्त इष्ट मित्र) हीं राज्याचीं सात अंगें होत. व ती एकमेकांस पोषक होत, असे कामंदक सांगतात. ह्याच राजनीतिचा अवलंब मराठेशाहीनें केलेला आपणास अमात्यकृत 'आज्ञापत्र ऊर्फ मराठेशाहींतील राजनीति'' ह्या ग्रंथांत पाहण्यास मिळतो.

**मराठ्यांची राजनीति**

मल्हाररावजींच्या कारकीर्दीत घडलेल्या गोष्टींचा, आतांपर्यतचा इतिहास आपण पाहिला. इसवी सन १७२० ते १७६६ या ४५-४६ वर्षांतील घडामोडी यथाशक्ती आपण अवलोकनांत घेतल्या. आतां या सर्व घडामोडीवरून मल्हारजींच्या कामगिरीचा आढावा आपणांस घ्यावयाचा आहे.

कामंदकांच्या व अमात्यांच्या राजनीतित स्वामीचें स्थान प्रथम आहे. ''अजापालाचा प्रजापाल'' झाला यांतच मल्हारजींचे कर्तृत्वाची कल्पना आपणांस बांधिता येईल, तर कर्तृत्वयशाची कल्पना आज्ञापत्रांतील उताऱ्यावरून ध्यानीं येईल. 'राज्यामध्यें हुजूरात, गड, किल्ले, लष्कर, हशम यांचा नियम करणें, प्रजार्ति निवारण करणें, प्रजा संरक्षणें, धर्माधर्म विचारून पाहणें, यथाकाली दान देणें, नेमिलीं वेतनें पावविणें, समयाचे समयीं प्रजेपासून

करभार घेणें, नित्यानित्य राज्याचा आय–व्यय पाहणें, स्थूल अनागत कार्य सुचोन त्या त्या कार्यानुरूप अगोदर त्याचा विवेक यथान्याय पाहून यथाशास्त्र शासनाचा निश्चय करून शासन करणें, अरिष्टाचा परिहार योजणें, देशोदेशीं वार्तिक प्रेरून वर्तमान आणविणें, समयविशेषें शत्रूशी संधिविग्रह उपेक्षा जे कर्तव्य त्याचा यथोचित विवेक करून तदनुरूप प्रवर्तक करणें, आहे राज्य यांचे संरक्षण करून नूतन संपादणें, हीं सकल नृपकार्येच होत. **(आज्ञापत्र पृष्ठ १८)**

**(१) स्वामी**

हीं सर्व कार्ये मल्हारजींनीं किती उत्कृष्ट बजाविली याचा पुरावा ''राज्यकारभार'' ह्या दोन्ही प्रकरणांत विपुल आहे.

त्यांचे मंत्री गंगाधर यशवंत चंद्रचूड व रामाजी यादव पळसीकर हे होते.

**(२) मंत्री**

यापैकीं चंद्रचूड हे लेखणीबहादुर तसेच तलवारबहादुर असल्यामुळें लवकर पुढें सरसावले. पुणें दरबारांत तसेच उत्तरेकडील राजेरजवाड्यांत त्यांचें चांगले वजन बसले. खुद्द पेशव्यांनीं त्यांचा अनेक वेळां बहुमान करून जहागिरी व इनामें दिलीं. त्यांचे उल्लेख मागील प्रकरणांत वेळोवेळीं आलेच आहेत. ''तुमचे आशीर्वादिकरून श्रीमंतांचा व राजश्री सुभेदारांसारख्यांचा प्रसंग उत्तम रीतीने जाहला. उपरांतिक यवनांचा सख्याचा प्रसंगही येथें तुमच्याच आशीर्वादिकरून उत्तम संपादून दिला. दक्षिणेच्या सख्याचा योग श्रीनें चांगला केला.'' **(चंद्रचूड दप्तर ले. ३३)**

ह्या उताऱ्यावरून पेशवे व सुभेदार ह्यांची दिलसफाई चंद्रचूडांनीं करून दिली व तसाच कांहीं प्रकार निजामाकडे साधला हें वरील उल्लेखावरून स्पष्ट आहे. हे चंद्रचूड इ. स. १७३२ पासून तो मल्हारजींच्या मृत्युपर्यंत म्हणजे ३४ वर्षे मल्हारजींबरोबर काम करीत होते. इतकी वर्षे एकसारखी सेवा रणांगणावर त्याजप्रमाणें दरबारीही केली आणि तीही कोणच्या दर्जाची हें वरील उताऱ्यावरून दिसून येईल. सारांश, मंत्री किती उत्तम लाभला होता व मल्हारजींनीं त्यास टिकविला होता ह्याची कल्पना बांधतां येईल.

**(३) प्रजा**

यावनी जुलुमानें त्रस्त झालेल्या उत्तर हिंदुस्तानांतील मंडळीनें प्रारंभीं मराठ्यांस जें साह्य केलें त्यामुळेंच मराठ्यांचा प्रवेश सुलभतेने झाला. त्यांत कोठेंही दंगाधोपा झाला नाहीं. ह्यावरून प्रजेची मन:स्थिती अजमावितां येईल. राज्य झाले, त्यांत अपराधी निरापराधी असावयाचेच. त्यास वागविण्याच्या पद्धतीवरच पुष्कळ अशी राज्याची प्रियता अगर अप्रियता अवलंबून असते. इंदूर व महेश्वरची वसाहत, चांदवडची व्यवस्था, श्रीखेडापती व श्रीराजराजेश्वर, इत्यादि गोष्टी प्रजापालन दर्शवितात.

चिरंजीव विजयीभव राजश्री मालबा यांसी प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद उपरी.

मौजे सारंगखेडे परगणे सुलतानपूर येथील फत्तेसिंग राऊळ याची स्त्री अमरावतीनें तुम्हांपासी येऊन केसरीसिंग राऊळ फतेसिंगाचा भाऊ यांजला गांवावरून परागंदा करून राऊळकीचें वतन जप्त करविलें. त्यास तेथील जप्ती तूर्त उठवून देशास आलिया मनास आणावें. म्हणून मीरखान टोके यांनीं सांगितलें व त्यावरून तुम्हांस लिहिलें असे. तरी मौजेमजकूरचे राऊळकीची तुम्ही जप्ती करविली असेल ते सोडवून देणें. आम्ही देशास आलिया मनास आणून करणें तें केलें जाईल. तूर्त केसरसिंगास आणून त्याचे हातें राऊळकीचे कामकाज सुदामतप्रमाणें घेणें. छ.१३ रजब हे आशीर्वाद. या पत्रावरून ''न्यायनीति'' कळून येते.

**(४) सैन्य**

सुभेदार मल्हारजी सैन्य भरती कोणत्या धोरणानें करीत व सवलतीही किती देत ह्याचा नमूना म्हणून एक पत्र प्रकरण १४ त दिले आहे.

**(५) कोश**

इ. स. १७५८ साली पेशवे दप्तरांत एकंदर हिशेब होऊन मल्हारजींचा सरंजाम चौऱ्याहत्तर लक्षांचा ७४००००० गणला गेला. म्हणजे ह्यांचे पाऊण कोटीचे ठरले. ह्या मानाने कोश किती समृद्ध होता ह्याची कल्पना खालील कोष्टकावरून करतां येईल.

नादीरशहाचे चरित्रात फ्रेझरसाहेब औरंगजेबांचे कारकीर्दीतील सुभ्याचे उत्पन्न खालीलप्रमाणें देतात.

| | **सुभा** | | **उत्पन्न (लाखांत)** |
|---|---|---|---|
| १ | दिल्ली | ...... ...... ...... ...... | ३०५ १/२ |
| २ | आग्रा | ...... ...... ...... ...... | २८६ १/२ |
| ३ | अजमेर | ...... ...... ...... ...... | १६३ |
| ४ | मुलतान | ...... ...... ...... ...... | ५४ |
| ५ | सिंध | ...... ...... ...... ...... | २३ |
| ६ | लाहोर किंवा पंजाब | ...... ...... ...... ...... | २०६ १/२ |
| ७ | अयोध्या | ...... ...... ...... ...... | ८० १/२ |
| ८ | अलाहाबाद | ...... ...... ...... ...... | ११४ |
| ९ | बंगाल | ...... ...... ...... ...... | १३१ |
| १० | बहार | ...... ...... ...... ...... | १०१ १/२ |
| ११ | ओरिसा | ...... ...... ...... ...... | ३६ |
| १२ | काबुल आणि काश्मीर | ...... ...... ...... ...... | ९७ १/२ |
| १३ | माळवा | ...... ...... ...... ...... | १०१ |
| १४ | गुजराथ | ...... ...... ...... ...... | १५२ |
| १५ | वऱ्हाड | ...... ...... ...... ...... | १५३ १/२ |
| १६ | खानदेश | ...... ...... ...... ...... | ११२ |

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | दौलताबाद किंवा अहमदनगर | ...... ...... | २५९ |
| १८ | बेदर | ...... ...... ...... ...... | ९३ १/२ |
| १९ | हैदराबाद किंवा गोवलकोंडा | ...... ...... | २७८ १/२ |
| २० | विजापूर | ...... ...... ...... ...... | २६९ १/२ |
| | | **एकंदर** | **३०,१८,०००००** |

यांत मद्रास इलाखा नाहीं.

वरील कोष्टकावरून संबंध माळवा एक कोटीचा ठरतो. मोगलाकडून निघून माळवा मराठ्यांकडे आल्यावर तिघांत वाटला गेला, होळकर, शिंदे व पवार. वाटणी समसमान झाली नसली तरी होळकरांस अर्ध्यापेक्षा अधिक माळवा मिळाला नसणार. दक्षिणेंत फुटकळ प्राप्ती झाली ती जमेस धरली तरी सुभेदारांच्या नांवावर पाऊण कोट रुपया सालिना पडला. यावरून कोश समृद्ध होता असें धरण्यास हरकत नाहीं.

### (६) कोटकिल्ले

होळकरांच्या राज्यांत समुद्रभाग नसल्यामुळें 'जंजिऱ्याचा' (समुद्रावरील किल्ला) संबंध येत नाही. जमिनीवरील किल्ल्यांत सेंधव्याचें महत्व विशेष आहे. ते नाक्याचे ठिकाण होते यामुळें बंदोबस्त विशेष ठेवावा लागे. बहुधा राजघराण्यापैकींच कोणाची तरी तेथें योजना होई. हे तेथें असलेल्या छत्र्यांवरून व माहितीवरून सिद्ध होते. कैलासवासी तुकोजीराव (पहिले) यांचे बंधू संताजी कांहीं वर्षे तेथें अधिकारावर होते. हल्लीं होळकरशाहींत किल्ले किती आहेत त्याची माहिती : (१) किल्ले महेश्वर (१) किल्ले मंडलेश्वर (१) किल्ले हिंगलाजगड (१) किल्ले कुशलगड (१) किल्ले कजलीगड (१) किल्ले इंदूर, येथें हल्लीं सरकारी फौज आहे. शिवाय (१) किल्ले चांदवडची माहिती १४ व्या प्रकरणांत आली आहे.

### (७) सुहृदगण, बरोबरच्या सरदारांशीं वर्तन कुटुंबातील माणसांचे राज्यकारभाराचे शिक्षण

आतां राहिलें राज्यनीतिपैकीं शेवटलें अंग सुहृदगण. पवार, शिंदे, गायकवाड, जाधव व चिंचूरकर यांचे संबंधांत पेशव्यांकडे वेळोवेळीं दाद लावून त्यांची कामें मल्हारजींनीं करवून घेतली, हे ठिकठिकाणीं वरती आलेंच आहे. आणखी एक उदाहरण चासकर घराण्यापैकीं येथें देतों. कुटुंबांतील माणसांशीं त्यांचें वर्तन त्यांच्या पत्रांवरूनच दिसणार आहे.

#### चासकरांशीं मल्हारजींचा उदारपणा

राजश्री रामचंद्र महादेव यांचे पाठीमागें राजश्री कृष्णराव महादेव यांनीं कल्याणचा सुभा दोनचार वर्षे केल्यानंतर सरकारांतून सुभ्यावर जाजती रसद मागों लागले. त्यामुळें सुभा टाकून श्रीमंतांसीं सेवा करून मोगलाईत गेले. कुटुंब चासेसच होतें. तेथें गेल्यावर निजामुलमुल्क यांजवळ चाकरीस राहिले. त्यांनीं जागीर चाकरीचे सरंजामास दिली होती.

तेथून श्रीमंतांनीं समजावीश करून इकडे आणिलें. ते समयीं निजामउलमुल्क यांनीं तालुके कोरहाळेपैकीं गांव सुमारे अठरा सरंजाम यांजकडे ठेविला. पुढें मोगलाई अंमल सरकारांत आला. तो राजश्री मल्हारजी होळकर यांजकडे दिला. त्याजवर होळकर कसबे कोरहळे येथील पाटीलकी घेतली आणि दिल्लीकडून कसबे कोरहळे व पोयगांव येथील इनामपत्रें आणिली. तेव्हां कृष्णराव यांजला वर्तमान लागले. ते समयीं होळकरांनीं सांगितलें कीं, ''माझी पाटीलकी आणि तुमची हालाकी हें ठीक पडणार नाही.'' तेव्हां कृष्णराव म्हणाले कीं, ''आम्हांस मोगलाईतील जहागीर असतां, तुम्हांस आम्ही गांव घेऊं देणार नाही.'' त्याजवर होळकर बोलिलें कीं, ''तुमचे दोन गांवें मोबदला दुसरें गांव श्रीमंतांजवळ रदबदली करून देऊं.'' उपरांतीक होळकरांनीं सरकारांत विनंती करून दोन गांवचें मोबदला गांव १२ तालुके अकोला परगणे जुन्नर सुभ्यापैकीं गांव ४ एकूण १६ गांव दिले आणि पेशजीचे सरंजामाचे तालुके कोरहळेपैकीं गांव १६ एकूण बत्तीस ३२ गांव इनाम करून द्यावे म्हणून विनंती केली. त्याजवरून सदरहू गांवचें इनामपत्र कृष्णराव महादेव यांचे नांवें सरकारने दिलें.

**कन्येस आंदण**

चिरंजीव सौभाग्यवती उदाबाई वाघमारे यांस प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद. उपरी परगणे राजपूर उर्फ वेरूळ सरकार दौलताबाद सुभे खुदस्ते बुनियाय येथील देहदुमार बी तपशील:

१ मौजे बेरेगांव, १ मौजे देवपुडी, १ मौजे देमेगांव व १ मौजे सनबा. एकूण चार गांव सरकारांतून तुम्हास आंदण दिले असे. खेरीज मुकासा व राहदारी व हक्कदार व इनामदार करून बाकी अंमल जहागीर सरदेशमुखी व बाबती दरोबस्त सनसबा सीतैनचे अव्वलसालापासून करार करून दिले असे. तरी तुम्ही आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरा सदरहू चार गांव आंदण अनुभवीत जाणें. सु. सीतसितैन मयावअलफ मिती वैशाख शुद्ध ९ शके १६८८ व्यवनाम संवत्सरे रा छ ७ जिल्हेज. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. (इ. स. १७६५)

**सासऱ्यांची तरतूद**

मिर्जा आदिलबेग कमाविसदार परगणे रामपुरा अज अहिल्याबाई होळकर दुवा. सुाासन सबासितेन मयावअलफ. परगणे मजकूर येथील गांव सौभाग्यवती बनाबाई कैलासवासी यांचे तीर्थरूप राजश्री मोहनसिंग यांजकडे मौजे अल्हेड देह १ तीर्थरूप सुभेदार कैलासवासी यांनीं करार करून दिला आहे. त्याप्रमाणें न चालवितां हल्लीं पत्र सादर केले आहे. तरी परगणे मजदुरचा गांव मोहनसिंगाकडे वडिलांनीं करार करून दिला आहे. त्याप्रमाणें चालविणें. दिक्कत न करणें. जाणिजे. छ ५ माहे सफर जादा काय लिहिणें. (इ. स. १७६६) मोर्तबसुद.

कामंदकांनीं सांगितलेली राज्याची सातही अंगें मल्हारजींनीं कशी सांभाळून परस्परोपकारीं केली हे आतापर्यंत सातही अंगांची यथाशक्ती माहिती देवून हा भाग वाचकांपुढें सादर केला आहे. आतां त्याच्या एकंदर चरित्राबद्दल तत्कालीन मत पुढें नमूद

केलें आहे.

**लोक काय बोलले ?**

(१) राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री विठ्ठलराव शिवदेव उमदेतुलमुल्क बहादूर स्वामी गोसावी यांसी. पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें विशेष. मल्हारजी होळकर यांस वैशाख शुद्ध ११ रोजीं देवाज्ञा झाल्याचे वर्तमान येथें आलें. श्रवण होऊन चित्तास फार खेद झाला. मातबर सरदार मोठे दाबाचे होते. ईश्वर इच्छेस उपाय नाही! त्याचा भावीपदार्थ तसाच होता. परंतु तीर्थस्वरूपांचे जाणें हिंदुस्थानास होऊन व परस्पर भेटीं होऊन मल्हाररावाचा काळ झाला. हा त्यांचा सुकृत अंशच.

(२) त्रिंबक हरीने गोविंद हरीस लिहिलें : मातब्बर सरदार जुन्यापैकीं तेवढा होता. होळकर तिकडे होतां, तेणेंकरून वक्र होता.

(३) कैलासवासी तीर्थरूप सुभेदारांची रीत कोठेही न्यूनता ध्यानास येतांच सांगितल्याची प्रतीक्षा न करितां बंदोबस्त करीत होते. याजमुळें कोणाचाही जाबसाल सरसा होऊं न पावला. (अहिल्याबाई).

## अलीकडील काळातील मतें :

(१) डॉक्टर फ्रेझर ह्यांच्या लेखाप्रमाणें 'पुनर्घटनेचे' कार्य मल्हारजींचे हातून घडून, इंदूर संस्थानांत त्या घटनेनुसार अव्यवस्था मोडून टाकून अंतर्बाह्य सुव्यवस्था लावून दिली. नवी सृष्टी निर्मिली.

(२) सर जदुनाथ सरकार यांचे म्हणण्याप्रमाणें मल्हारजींनीं शेकडोंगणती युद्धें पाहिली. हजारोगणती सेनेस इकडून तिकडे हालविलें आणि लाखोगणती रुपयांनी मालकांची व आपली तिजोरी भरली आणि राजकारणाचे नाजूक धागेदोरे उकलिले.

(३) मेजर इ. बेल, एम. पी. यांच्या उक्तीप्रमाणें 'स्वावलंबनांचा व स्वाभिमानाचा अगदी अलीकडचा संयोग हिंदुस्थानाच्या पश्चिम भागांवरून वाहत होता.' या संयोगांत मल्हारजींनीं स्वत: शुचिर्भूत होऊन आपल्या जवळ जवळ तीन तपाच्या कारकीर्दीत हा प्रवाह उत्तरेस आणि दक्षिणेत अप्रतिहत वाहत ठेवण्याचें व पुढेंही वाहत राहविण्याचें श्रेय संपादिलें.

**लोक काय बोलतात ?**

इतकें सगळे सांगूनही मल्हारजी हे मानवी प्राणी होते हेंही आम्ही विसरतां कामा नये. त्यांनीं शेकडों मनसुबे हाती घेतले. त्यांतले जे थोडे कांहीं फसले तरी बहुतेक यशस्वी झाले. राजपुतान्यांतील मनसुबा पूर्ण झाला नाहीं. पानिपतचे संबंधानें पहिल्यापासूनच युद्ध पद्धतीबद्दल मतभेद होता. बंगाल्यांत अगदीं वयोवृद्धत्वामुळें माघार घ्यावी लागलीं; आणि ''धर्मपुत्र'' घेण्याचा अतिरेक किंवा थोडा बहुत अविवेकच झाला. या सर्व गोष्टी खर्चाकडे

टाकूनही उत्तम शिपाई, युक्तिवान सेनापती, उत्कृष्ट राजसेवक व उदार प्रजापालक असेंच शेवटीं बेरजेंत उत्तर येईल.

**जन्मभूमीची व्यवस्था**

होळ या गांवीं मल्हारजींचा जन्म झाला. मराठेशाहीचा अभिमान बाळगणाऱ्यास या स्थानाबद्दल आदर असणें साहजिकच आहे. फलटणच्या संस्थानिकांच्या ताब्यांतील ही जागा स्थानिक पाटलास योग्य मोबदला देऊन श्री. अ. सौ. मातुश्री इंदिराबाई महाराणीसाहेबांनीं खरेदी करवून व जागेस कंपाऊंड वगैरे घालवून, तेथें तसबिरीची स्थापना केली. सदर जागा नंतर जेजुरी येथील होळकर स्टेटच्या म्यानेजरच्या सुप्रत केली.

श्रीमंत होळकर सरकारचे राज्यव्यवस्थेंत पूर्वीपासून खालीं लिहिल्याप्रमाणें चारिटेबल डिपार्टमेंटकडून व्यवस्था चालू आहे.

१ सदावर्त सालिना रुपये १५१ चे, संस्थान जेजुरीचे निग्राणींत वाटलें जातें. तसेंच त्या कामाकरितां एक इसम होळकरांतर्फे चौघुलकीचे जागीं सालिना नेमणूक रूपये ६६ वर मुक्रर आहे.

१ होळमुरूम येथें इनामी जमीन वंशपरंपरा जिराईत चालू आहे. एकर १३० गुंठे ४४.

येणेंप्रमाणें जन्मभूमीची व्यवस्था आहे; कर्मभूमी सर्व हिंदुस्थानभर पसरली आहे.

**समाप्त**

## इतिहासकारांच्या कांहीं नोंदी

**Dr. Fraser**

"With Akbar the Moghul system culminates, and with him it disappears. His principles and reasons vanish. His narrow-minded successor sweeps all away, and creating nothing to replace what he destroyed, leaves chaos behind him after two generations of power. The re-constructing force comes from a quarter where no one looks for it. - The Deccan".

**Sir Jadunarh Sarkar, M.A., C.I.E.,**

"The Marathas have a historical advantage of unique importance in the India of today. Their near ancestors had faced death on a hundred battlefield, had led armies, had debated in the chamber of diplomacy, had managed the finances of kingdoms and grappled with the problems of Empire. They had helped to make Indian History."

**Major E. Bell**

The last chapters of self-development and self-independence in India belong to the Western region. The Maratha Confederation emancipated the Hindus, and set up religious and social tolerance.

**W. Lyon Blease ("A Short History of English Liberalism")**

"By Liberalism I mean, not a policy, but a habit of mind. It is the disposition of the man who looks upon each of his fellow as of equal worth with himself. Men are never to be used by him for his own ends, but for theirs."

"Toryism is the egoistic mind which regards all others as at its disposition."

**Justice Kincaid**

"Resourcefulness, courage, fertility of invention, endurance, all these qualities have been abundantly shown by the Maratha regiments at the front; I felt a glow of pride and pleasure when I learnt of the gallant deeds of the Maratha regiments who sailed to Iraq, who occupied Basra, who took Kurna and won at Saiba. They fought in a way which would have roused the envy of the veterans of the Bhosales and the comrades of Chimnajee Appa."

**आधार ग्रंथ**

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
राजवाडे यांचे ऐतिहासिक ग्रंथ
पेशवे दप्तर सिलेक्शन
पेशवे दप्तरपैकीं अप्रसिद्ध निवाडे, जमाखर्च वगैरे





**पुण्यश्लोक देवी श्री अहिल्याबाई होळकर**

शासन काळ : इ. स. १७६७ - १७९५

# होळकरशाहीचा इतिहास

## विनयकाळ

## देवी श्री अहिल्याबाई होळकर

## इ. स. १७६६ ते १७९५ पर्यंत



**''मी आज जें कांहीं सामर्थ्याच्या व सत्तेच्या बळावर करीत आहें त्याचा मला परमेश्वरापाशीं जाब द्यावा लागेल''**

## प्रकरण १८ वें

# मल्हाररावांच्या मृत्युनंतरचा काळ

सुभेदार मल्हारराव यांचा मृत्यु वैशाख शुद्ध एकादशी रोजीं शके १६८८ (ता. २० मे इ. स. १७६६) झाल्याचे सोळाव्या प्रकरणांत निवेदन केलें आहेच. त्यानंतर सदाशिव गंगाधर चंद्रचूड यांनीं आपले मातोश्रीस पत्र लिहिलें आहे. त्यातील मजकूर, ''श्रीमंत सुभेदारांस देवाज्ञा जाहली. ईश्वरें बहुत वाईट केले. सर्वाचें छत्र गेले. सर्व कुटुंब देखील श्रीमंतसुद्धां सर्व मंडळी सानिध्य असतां देहावसान झालें. सर्वत्रांस शोक बहुत प्राप्त झाला. श्रीमंत दादासाहेबीं कित्येक प्रकारें स्तव करून श्रीमंत कैलासवासीप्रमाणें मानून शोक करितात. सुभेदारांची पुण्याई थोर. योग्याप्रमाणें बहुत शरीरश्रम न होतां मृत्यु जाहला. सौभाग्यादि संपन्न मातुश्री बनाबाई व सौ. मातुश्री द्वारकाबाई उभयतांनीं सहगमन केले. सर्व जनांत धन्य धन्य झाली. उत्तरक्रिया काळीसिंध नदीवर होऊन पुढें शिष्टाचार झाल्यानंतर गोहदकरांचा वगैरे मनसबा कालदेशवर्तमानें होऊन येईल.''

तारीख २८ मे १७६६ च्या पत्रांत माधवराव व गंगाधर चंद्रचूड लिहितात, ''सुभेदारासारिखा पुरुष मागेंही झाला नाहीं व पुढेंही होणें नाही. केवळ दक्षिण हिंदुस्थानचें छत्र गेले. पुढें पंधरा दिवस झाल्यानंतर गोहदेस जाणार. तेथून श्रीमंतांचे (दादासाहेब पेशवे) येणें देशीं झालें तरी उत्तमच आहे. त्याबरोबर श्रीमंत राजश्री मालेराव व तीर्थरूप गंगोबा तात्या चंद्रचूड फौजेच्या बंदोबस्ताकरितां ते प्रांतीं येणार आहेत.''

**देवी अहिल्याबाईंचें मालबांस पत्र**

इ. स. १७६६ जून रोजीचें देवी अहिल्याबाईंचें मालबांस गेलेलें पत्र मननीय आहे

ते खालीलप्रमाणें :

*चिरंजीव राजश्री मालबा यांसी प्रती अहिल्याबाई होळकर आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें. तुमचें पत्र येऊन वर्तमान कळो येत नाहीं. तेणेंकरून चित्त उद्विग्न आहे. तर ऐसें न करोन सदैव पत्र पाठवून सविस्तरें लिहित जाणें. तुम्हांस दोन-तीन पत्रें पाठविलीं आहेत. त्याप्रमाणें चित्ताचें समाधान करावें. आतां शोक करावयाचा प्रकार नाहीं. सरदारीचा विचार, दौलत चालली पाहिजे. यास्तव विवेक करून कामकाजांत चित्त घालून आवर घालावा. ज्याप्रमाणें तीर्थस्वरूप कै. सरदारी चालवीत आले, त्याचप्रमाणें तुम्ही पाया घालून कामकाज चालवून वडिलांप्रमाणेंच लौकिक होय तेच तुम्ही कराल. आतां कोता अंदेशा दूर करून उमदी नजर धरून वडिलांची कीर्ती आहे त्याजपेक्षां तुम्ही अधिक संपादन कराल यांतच तुमचा लौकिक आहे. राजश्री गंगाधरपंत तात्यांचे मर्जीनुरूप वर्तत जाणें रा.छ.२५ जिल्हेज बहुत काय लिहिणें हा आशीर्वाद. मोर्तबसुद.''*

**मालेरावांस सनद प्राप्ती**

ता. २३ आगस्ट इसवी सन १७६६ : मालेराव होळकर ह्यांचे नांवें सनद कीं : तुम्हांकडील मागील हिशेब स्वारीचा व बाबतीचा सरदेशमुखी प्रांत माळवा व स्वदेशचे गांवचे इजारे यांचा, खेरीज बुंदी खमसेन व सितैन दुसाला हिशेब, कारकीर्द कैलासवासी मल्हारजी होळकर, सरकारचा फडशा जाहला. तुम्हांकडे कांहीं लांझा राहिला नाहीं. तरी कैलासवासी मल्हारजी होळकर याप्रमाणें सरंजाम महाल, गांव, खेडी सुदामतप्रमाणें बरहुकूम सरदारीचा बंदोबस्त करून फौज सरंजामानिशीं सेवा एकनिष्ठेनें करीत जाणें, म्हणोन लिहिलें असे. मशारनिल्हेचे नांवें.''

**मालेरावांचा कारभार**

''राजश्री यशवंत गंगाधर यांसी अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मालेराव होळकर दंडवत. विनंती उपरी. येथील क्षेम जाणून स्वकीय कुशल लेखन करणें. विशेष. परगणा गाळणा हा महाल दादूखान टोके यांजकडील गांव व दाभाडी इतके वजा करून बाकी दरोबस्त आम्हांकडे. ऐसियासी परगणे मजकूरचा गांव त्यांत हिस्से टोके मजकूरच्या जागिरीचा, तो आमचा; एक्या गांवांत दोन सत्ता हा प्रकार उपयोगी नाहीं. याजमुळें टोके मजकूर चांदवडचे मुक्कामीं सनअर्बासितेनचे सालीं आले. त्यांनींच कैलासवासी तीर्थरूप बाबांस विनंती करून वडेलचे दोन हिस्से आम्हांस दिले आणि दोन हिश्श्यांचा आकार वडेलीचा होत होता. त्या ऐवजाचे तीन गांव वडगांव वगैरे सोयीचे पाहून सक्त रदबदली करून आपलेकडे निखालस करून घेऊन कागदपत्र केलें. ऐसे असतां सांप्रत त्यांनीं पुण्यांत श्रीमंत राजश्री रावसाहेबांस गैरवाका समजावून वडेलचे दो हिश्श्यांचे ऐवजपैकीं जागा आम्हांकडे राहिली हे भासवून त्या ऐवजाचे गांव सहा नेमून घेऊन ताकीद पत्र घेऊन आले. त्यावरून श्रीमंतांस विनंतिपत्र लिहिलें असे. तरी तुम्ही विनंती करून खानमजकूर यांसी ताकीद पत्र घेणें व परभारें महाली पत्रें गेली त्यांस मनाचिठी घेणें. वडेलचा

तनखाही अलाहिदा यादीवर लिहून पाठविला असे. कित्येक किरकोळ बोभाट येथपर्यंत यावे हें उचित नाहीं. तरी श्रीमंतांस विनंती करून बोभाट न येऊं देणें. छ १९ जमादिलावल बहुत काय लिहिणें हे विनंती.'' (२२-१०-१७६६)







रा. रघुनाथ हरी हवालदार तालुके खेडे गोसावी यांसी सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. तालुके मजकुरीं राजश्री मालजी होळकर राजश्री गंगाधर यशवंत यांचे इनाम गांव वगैरे आहेत, त्यास तुम्ही उपद्रव देतां न नवीन कजिये उत्पन्न करितां, म्हणून मशारनिल्हेनीं विदित केलें असे. तरी तुम्ही उपसर्ग यांचे इनाम गांवास न देणें. कदाचित कजिया गांव असल्यास यांचे हे मनास आणतील. तुम्ही काडीमात्र उपद्रव न लावणें जाणिजे छ. २४ रजब आज्ञाप्रमाण लेखनसीमा. (२७-१२-१७६६)

**(पेशवे सिलेक्शन रेकार्ड व्हॉल्यूम २९) (रा.ब. सरदेसाई) ता. २३-१२-१७६६**

**मालेराव ह्यांचा राज्यकारभार**

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे सेवेसीं.

विनंती सेवक मालेराव होळकर कृतानेक विज्ञापना येथील कुशल मार्गशीर्ष वद्य ७ मुक्काम इंदूर यथास्थित असे विशेष. छ १८ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर झालें ते उत्तम समयीं प्रविष्ट होऊन संतोष प्राप्ती झाला. जातेसमयीं फौज रवाना करितों, आम्ही ही मागाहून सत्वरींच येतो म्हणून बोललें असतां जलद फौज येत नाहीं. जाट ढवळपुरास आला. हे प्रसंगीं तुमची फौज, तुम्ही असावे म्हणून जलद फौज यावयासी आज्ञा केली. ऐसीयास आम्ही साहेबांपासून आज्ञा घेऊन दरमजल इंदूरास आलो. येथें आल्यावर आधीं स्वामींशीं ऐवजाचा करार करून आलों. धनी मोहीमशीर, समयोचित ऐवज पाठविला पाहिजे, यामुळें आठ पंधरा दिवस त्या तजविजेस लागले. कोणेही प्रकारें ऐवज वाटे लावून फौजेचे रवानगीस लागलो. सरंजामी फौजेवर सोयीस नाही. इतलाखी शिवाय भरणा न होय. निकडीचे समयीं स्वामींपाशीं फौज पाठविणें ते मनांत भरून सेवा चाकरी घडे ऐसी पाठविणें. यामुळें नवी फौज ठेविली. मागील लोकांचा राडा, एक दिवस चैन नाही. तशांत आठ पंधरा दिवस राजश्री गंगाधरपंत तात्यांस समाधान नाहीसे झाले. चहूकडून एक प्रकार. मागील लोकांची तीन साले झाली. त्यांचा हिशेब करून समाधानाप्रमाणें देणें. त्यासी करोड रुपये पाहिजेत. घर पाहतां महालचा ऐवज स्वारींत नेऊन भक्षिला. कांहीं चांदवड नालबंदी वगैरे खर्च सावकारी कर्ज घेऊन केला. त्याचे दर कर्जी पावला, बाकी मागील सावकाराचें

देणें. पुढें तीन सालां समजावीस व हल्लीं फौज रवाना करणें. त्यांची नालबंदी व नवीन फौजेबद्दल स्वारीची येणें. जुनी व नवी त्यासी नालबंदी एकूण मुबलक पैसा पाहिजे. तीन वर्षाचे ओझें एक समयीं पडलें. या काळांत तीर्थस्वरूपांस कैलासवास झाला. ईश्वरसत्ता प्रमाण. त्यांनीं आम्हाविशीं सर्व प्रकारे स्वामींस निरऊन समक्ष हातीं देऊन आपण निधन पावले. ते एकनिष्ठ स्वामींसेवा यावत्शक्ति केली. पुण्यवान् प्रतापी. खावंदांनीं त्यांचे ठायीं अकृतिम लोभ केला. त्यांचा आशीर्वाद आमचे पदरीं आणि सर्वप्रकारें स्वामींचे अभय पूर्णपणें. मग आम्हास चिंता काय आहे? बहुत दिवसांचे राड्यामुळें चार दिवस बखेडा झाला, तथापि आम्ही सर्व निकडी सोसून रवानगीची फौज देशीची उमरनिशा पडे ऐशी ठेऊन त्यास नालबंदी देऊन राजश्री गंगाधर यांची रवानगी केली. येथून सुमुहूर्ते स्वार जाहले. अत:पर दरमजल सेवेशीं अविलंबें येतील. वरकड लोकांची मागील निर्गत बहुतेक झाली, कांहीं राहिली तेही होईल. ज्याची समजोती पडली त्यासी नालबंदी देऊन आज्ञा दिली. जलद फिरोन यावयाचे करार केले आहेत. ते सत्वरींच श्रीइच्छेनें येऊन पावतील. खावंदांचे पुण्यप्रवाहें, तीर्थस्वरूपांचे आशीर्वादें, यावर कांहीं अगाध न पडतां फौज तो अती सत्वरच येऊन पावती आणि आमचे स्वारीचेहीं योजनेंत लागलो. यंदा लोकांचा बखेडा फार जाहला, त्याचा विस्तार काय लिहावा? लोकांनीं कांहीं विचार ठेवला नाही. प्रस्तुत स्वामींचे कृपेकरून फौजेची रवानगी होऊन पुढील कामही चालीस लागलें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.''

ता. ३-६-१७६७ मालेराव होळकर मृत्यु पावले, त्यास सरदारीचा बंदोबस्त पूर्ववत प्रमाणें तुमचा तुम्हांकडे सांगून पेशजी कैलासवासी मल्हारजी होळकर यांजकडे सरंजाम जुना व नवा स्वदेशी व खानदेश व प्रांत माळवा व अंतर्वेद वगैरे हिंदुस्थानांत सरंजामी व इनामी वतनी दरोबस्त चालत आला त्याप्रमाणें महाल.

१ परगणे सिरोंज प्रांत माळवा.

१ सरकार बिजागड खेरीज परगणे सेंधवे व नागलवाडी व ऊन, तीन महाल वजा करून बाकी.

१ तर्फ देपूर परगणे संगमनेर.

---

३

एकूण तीन महाल सरकारांत घेऊन बाकी दरोबस्त सरंजामी व इनामी वतनी व मक्ते सरकारांतून चालत आले ते व प्रांत हिंदुस्थान परमुलखी स्वारीचा तह वगैरे सुदामत चालत आल्याप्रमाणें तुमचे तुम्हाकडे करार करून असे. तरी सर्व आपला बंदोबस्त करून सेवा एकनिष्ठेनें करीत जाणे. म्हणोन तुकोजी होळकर यांचें नांवें सनद.

तुकोजी होळकर यांचे नांवें जाब कीं, तुम्हांस मालेराव होळकर मृत्यु पावले त्यांचे सरदारीचा बंदोबस्त सांगोन ऐवज करार रुपये :

| | |
|---|---|
| १५,३०,००० | नजरेबाबद |
| | १५,००,००० ऐन. ३०,००० परगणे गाळण्याबद्दल. |
| १,३२,००० | कित्ता ऐवज खासगीकडे भरणा करून द्यावा. |
| | १,००,००० किल्ल्याबद्दल आनंदवल्लीचे इमारतींस एक लक्ष. |
| | ३२,००० खरगोणचे मोकाशाबद्दल तीसालापैकीं करार. |
| १६,६२,००० | |

येकुन सोळा लक्ष बासष्ट हजार रुपये करार केले त्यापैकीं भरणा रुपये :

| | |
|---|---|
| २,५०,००० | रोख भरणा गुजारत विष्णु महादेव. इस्तकबील वैशाख वद्य ५ ता ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा. |
| ७,५०,००० | सावकारी निशा आषाढ शु. १ मुदतीनें गु. विष्णु महादेव, सिदापा वीरकर, गोपाळ संभाजी. |
| १०,००,००० | असे दहा लक्ष जमा झाले. |

**मालेरावांचा मृत्यु**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर यशवंत स्वामींचे सेवेसी पोष्य रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. मालेराव होळकर यांस फाल्गुन वद्य द्वादशीस देवाज्ञा झाली म्हणून राजश्री सदाशिव गंगाधर यानीं निवेदन केलें. (ता. ७ मार्च इसवी सन १७६७)[१]

**तुकोजी होळकर यांचे नांवें सनद**
**घेणें सर्व माफ केलें**

तुकोजी होळकर यांचे नांवें सनद कीं, तुम्ही हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, आपल्याकडे सरकारचा ऐवज खेरीज बुंदी मागील सालोसालचा खंडण्याचा व कर्जपट्टीचा वगैरे तपशील सनसबा अखेरपर्यंत बाकी ओढत आहे. त्यास मल्हारजी होळकर यांचा काळ जाहला, सरदारी ओढगस्त जाहली, याजकरितां मागील फडशा करावा म्हणोन, त्याजवरून तुम्ही थोर सरदार मल्हारजी होळकर मृत्यु पावले. याजकरितां खेरीज बुंदी मागील सालोसालची बाकी खंडण्या व कर्जपट्टी वगैरे तागाइत सनसबा सितेन अखेरपर्यंत देणें ते तुम्हांस माफ केले असे. याउपरी तुम्हांकडे गुंता नाही. बुंदीचा हिशेब सरकारांत विल्हेस लागला असेल. त्याकडे अलीकडे हिशेब व ऐवज येणें तो तुम्ही सरकारांत द्यावा. पुढें बुंदीचा ऐवज सरकारांत देत जाणे, म्हणोन. **(पेशवे रेकार्ड)**

**टीप :** १. मालेराव होळकर यांच्या मृत्युच्या तारखेबाबत विसंगती आढळते. त्यांच्या मृत्युची तारीख पृ. १२९ वर ३-६-१७६७ ही सांगितली आहे तर इथे ७ मार्च १७६७ अशी दर्शविली आहे. - **संपादक**

**आधार ग्रंथ**

चंद्रचूड दप्तर कला १, २
पुणें सिलेक्शन पैकीं व्हॉल्युम २९
होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें नं. ३ ते ८



**प्रकरण १९ वें**

# देवी श्री अहिल्याबाईंची कारकीर्द

गेल्या प्रकरणांत मल्हारजींच्या पश्चात एक दोन वर्षात घडलेल्या घडोमोडींचें वर्णन आले आहे. मालेरावांची अल्प कारकीर्द, पण तींतही दानधर्मादि कामें अव्याहत झालीं, पश्चात् तुकोजीरावांस पेशवे दरबारांतून मिळालेली सनद, सूट व तद्नंतर जप्ती व परत मोकळीक ह्या एक दोन वर्षात घडलेल्या घडामोडी आल्या आहेत.

वस्त्रें तुकोजीरावांस मिळालीं ही गोष्ट खरीं. त्यांस मांडीवर घेतलें असा जो प्रवाद कांहीं ठिकाणीं ऐकण्यास मिळतो त्यास कागदी पुरावा अद्याप उपलब्ध नाहीं. जनसमजुतीत ठोकळ मानानें मल्हारजींच्या पश्चात् अहिल्याबाईंचीच कारकीर्द ठाम बसून गेलेली आहे आणि त्याचप्रमाणें आम्ही वर्णनास सुरुवात करीत आहोत.

त्यांच्या कारकीर्दीचें वर्णन करण्याचे पूर्वी त्यास मिळालेले शिक्षण ही बाब ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची असल्यामुळें कागदोपत्री मिळालेल्या माहितीच्या आधारानें ती या व पुढील प्रकरणांत आम्ही सादर करीत आहोत.

**जन्मभूमी**

**जन्मकाळ व भावंडे**

मौजे चौंडी, तालुके अष्टे, जिल्हा बीड प्रांत निजामशाही, दक्षिण हैदराबाद हा गांव शिंदे घराण्याचें मूळ ठिकाण. तेथें या कुळातील पुरुषांपैकीं कांहींस पाटीलकीची वतनें होती. इ. स. १७२५ सालीं या गांवीं अहिल्याबाईचा जन्म झाला. वडिलांचें नांव माणकोजी शिंदे. माणकोजींच्या मुलांची थोडीबहुत हकीगत त्यांस श्री अहिल्यादेवीनें

दिलेल्या सनदेवरून खाली नमूद करूं. तूर्त इतकेच सांगांवयाचें कीं माणकोजीस अहिल्या ही एकुलती एक कन्या होती. अहिल्येच्या भावांची नांवें (१) महादाजी (२) येसाजी (३) बाणाजी (४) विठोजी (५) सुभानजी, अशीं होती.

**विवाह**

इ. स. १७३७ त[१] अहिल्याचा विवाह खंडोजी होळकरांशी झाला. तेव्हांपासून मल्हारजींचे मनसुबे कसे चालले होते हें आतां पाहूं या.

**इ. स. १७४१ त मल्हारजींची सत्ता व मत्ता**

महाल झाडा निसबत मल्हारजी होळकर महाल आकारी तेवीस व मोघम साडेसात. एकूण महाल साडेतीस. आकार बेरीज रु. ७,१८,९५४ सात लक्ष, अठरा हजार, नऊशें चोपन्न.

(अ) परगणे सेंधवे सरकार बिजागड बाबती सरदेशमुखीचा मोकासा दिल्याची सनद. तसेच, (आ) देशगांवडेपणाचे वतन सुपे येथील चालविण्याबद्दल पत्रें आणि (इ) मौजे वाफगांव तालुके खेड, परगणे जुन्नर येथें मिरासपट्टी व चाकरमानेपट्टी घातली आहे. त्याचा आकार होईल तो राजश्री मल्हारजी होळकर यांचे नांवें खर्च घालणें (इ. स. १७३८). (ई) प्रांत माळवा मक्ता दरसाल दोन लाख; पैकीं, जयाजी शिंदे व पवार यांचे हिश्शाबद्दल रु. १२३००० व मल्हारजींचे हिश्शाबद्दल रु. ७७०००.

अहिल्याबाई होळकरांच्या घरीं आल्या त्यावेळीं सुभेदारांचा संसार चांगला थाटला असून कमान सर्व बाजूंनीं चढती होती आणि ही कमान चढत असताना अहिल्याबाई पडद्यांत बसून प्रेक्षकाचे काम करीत नव्हत्या, तर चालत्या गाड्यास त्याचा हात कसा लागत होता हे आतां पाहूं या.

सन १७४१ पासून सुभेदार कोणकोणत्या मनसुब्यांत गुंतले होते आणि त्यांत अहिल्याबाईंकडून कसकशी उठावणी होत होती हें आतां पाहूं या.

**इ. स. १७४१ ते १७५४**

(अ) इ. स. १७४१ चे जमाखर्चांत 'कसबे पुणें पैकीं रयतेची शेती घेऊन बाग करावयास जमीन दिली. संगमावरील आंब्याची झाडे लावण्यास जिराईत बिघे तीन ३.

(आ) इ. स. १७४३ चे ताळेबंदांत ''मीठ वगैरे जिन्नस वाड्यांतून विकून रुपये केले, ९० रुपये मिठाबाबत, १९७ रुपये गूळ साखर, ४९० रुपये बाजारचे वाण्याने

---

**टीप** : १ काही इतिहासकारांच्या मते अहिल्याबाई आणि खंडेराव यांचा विवाह इ. स. १७३३ मध्ये झाला होता. अहिल्याबाईंचा जन्म इ. स. १७२५ चा. त्यांचा विवाह वयाच्या आठव्या वर्षी झाला होता. म्हणजे विवाहाचे इ. स. १७३३ हे वर्ष बरोबर आहे, असे दिसते.

जिन्नस घेतले.'' हा काटकसरीचा मजकूर येतो, तर दुसरीकडे रुपये २००० दोन हजार शिवरामभट चित्राव यांचे नांवें धर्मादाय, इमारत या सदराखाली पडतो. ही धर्मादाय रक्कम शिवरामभट व कृष्णभट यांचे नांवें दोन तीन वर्षे लागोपाठ पडलेली आहे. इमारत कोणची याबद्दल उल्लेख नाहीं.

(इ) इ. स. १७४७ मौजे कोरेगांव तालुके पाबळ खाजगत शेतापैकीं उत्पन्न रु.२३५ दोनशें पस्तीस.

(ई) इ. स. १७४७ फिरंगाण गल्ला हरजिन्नस व मीठ मल्हारजी आणतील त्यास जकातीचा तगादा न लावणें.

(उ) खासा मल्हारबाबा यांची मेंढरें रिकामी रानीं चरणी करतील सुमारे दहा हजार १०,००० मौजे वडगांव कांदली प्रांत जुन्नर.

(ऊ) इ. स. १७४७ खेड परगणे जुन्नर येथें मल्हारजींची पागा व शेतें आहेत तेथें शेतानजीक कुरण राखिलें आहे तें त्यांजकडे चालविणें.

(ए) बुंदीवाल्याशीं संबंध सुरू इ. स. १७४८ पासून बाळाजी शामराज, रामाजी रुद्र भिडे, रामाजी वासुदेव, रामचंद्र नाईक, गणेश महादेव बिवलकर वगैरेंच्या नावें हुंड्या व वराता दिसतात.

(ऐ) इ. स. १७४९ उदेपूर, बावाडा, बासोदाशीं संबंध पडून एक लाख सोळा हजार रुपया जमा होतो. यांत ऐनजमा, शिवायजमा, मुक्ता व सायर इतके प्रकार आहेत. प्रांताशीं संबंध येतांच ''रुपये ३० देवस्थान श्रीनीलकंठेश्वर कस्बे उदेपूर नैवेद्य नंदादीप सालाबादाप्रमाणें'' सुरू होतो.

(ओ) इ. स. १७४७ चे जमाखर्चात उल्लेख येणेंप्रमाणें. (श्रीमंतांकडून) सनगे ७०० रुपये. बायकांस सनगें. १ सौभाग्यवती गौतमाबाई स्त्री. १ सौभाग्यवती अहिल्याबाई सून. २ कन्या. १ सौ. उदाबाई व दुसरी.

(औ) इ. से. १७५१ चे जमाखर्चांत उल्लेख येणेंप्रमाणें : ८७५-०-० सौ. गौतमाबाईंस वस्त्रें. ९९४-०-० दोघी लेकी, व दोघी सुना यांस वस्त्रें. ५२१-१४-० मोहीबाई मल्हाररावांची सासू. यावरून असें स्पष्ट होतें कीं इ. स. १७५१ त अहिल्याबाईंस सवत घरांत आली होती.

(अं) इ. स. १७५४ चे जमाखर्चांत उल्लेख येणेंप्रमाणें : ३११-४-० अहिल्याबाईंस वस्त्रें व खंडेराव होळकर यांच्या कन्या दोघींस वस्त्रें. कन्या कोणत्या व कोणत्या स्त्रीच्या हे स्पष्ट नाहीं.

(अः) इ. स. १७५० मल्हारजी होळकर यांचे नांवें मोकासे गांव व महाल कमाविसींनें दिल्याबद्दल सनद. जुन्नरपैकीं २ गांव, मौजे मुक्ती प्रांत खानदेश सरदेशमुखी, मौजे आळेची खेरीज मोगलाई व मोकासा वजा करून कमाविसी, बारामतीची सरदेशमुखी, परगणे उत्राण प्रांत खानदेशची सरदेशमुखी.

(क) इ. स. १७५१ मारवाडांत फौज मदतीस रामसिंग ईश्वरसिंग यानें गेली, निसबत

सूरजमल जाटास दोन लक्ष एकूणतीस हजार.

(ख) इ. स. १७५१ मारवाडांत फौज मदतीस रामसिंग ईश्वरसिंग यानें नेली, निसबत मल्हारजी होळकर. प्रांत गंगापाल सादुल्लाखान रोहिला याची जप्ती केली त्याचा वसूल रु. ५०,०६२ आला.

(ग) मल्हारजींचीं मेंढरें एक लाख वरघाटीं रिकामी रानीं चरणीं करतील त्याविषयीं दस्तक मिळाला.

(घ) इ. स. १७५३ बुंदी व कोटे संस्थानांशीं खंडणीचा संबंध व कर्नाटक स्वारी नजराणा उदेपूर, खंडणी सूरजमल जाट, सादुल्लाखान पठाण, संस्थान मेणपूरी व जयनगर. नूतन इनामगांव पंचवीस. खानदेश, संगमनेर, जुन्नर, अहमदनगर इत्यादि प्रांतीं.

(ङ) इ. स. १७५३ तहनामा पंतप्रधान व मल्हारजी होळकर यांच्यामध्यें. यांतील खालील उल्लेख महत्त्वाचा व मननीय आहे.

१ खावंदाच्या आज्ञेप्रमाणें वर्तावें. कलम

१ खावंदसाहेबांनीं तह करून दिला आहे व करार केले आहेत त्याप्रमाणें चालावें. यास अंतर न करावें. अकृत्रिमपणें कृपा करावी. सर्वांविषयीं घरेब्याच्या नात्यानें चालवितात त्यापेक्षां अधिकोत्तर माया करून लोभ करीत जावा. मानमहत्त्व हरएकविषयीं राखून चालवीत जावें. कलम.

(च) करारनामा सरकार राजश्री मल्हारराव होळकर व राजश्री जयाजी शिंदे यांतील सरकार शब्द प्रथमच याच वर्षी अस्तित्वांत येतो हें ध्यानीं घेण्यासारखें आहे.

(छ) इ. स. १७५४ ''रुपये दहा हजार रोजखर्चास रवानगी चिठ्ठी खंडेराव होऊकर यांच्या क्रियेस दिली आहे.'' गुरुवार माघ शुद्ध १ शके १६७५. येथें आह्मी थांबतों. विविध दिशांनीं वाढत्या कमानीस येथें धक्का बसतो. सन १७४१ ते ५४ ह्या तेरा वर्षांत ही अनेक दिशांनीं, अनेक बाबतींत होणारी रोजची घडामोड अनेक व्यक्तींस मागेंपुढें करीत होती. हा प्रकार अहिल्याबाईंच्या डोळ्यांपुढे अव्याहत चालला होता. त्याचा संस्कार मनावर घडला असला पाहिजे असें अनुमान पुढील आयुष्यक्रमावरून काढितां येतें. हे शिक्षणात्मक कार्य फार मुग्ध चाललें असणार. खंडेराव हयात होते तोपर्यंत जनरीतीप्रमाणें जबाबदारी प्रत्यक्षपणें आहिल्याबाईंवर आली नाहीं. पण इ. स. १७५४ नंतर वस्तुस्थिती बदलली. १७५४ पर्यंतचा सासरा व सून यामधील पत्रव्यवहार (जर घडला असेल तर) आज मितीस उपलब्ध नाहीं. या नंतरचा इ. स. १७६६ पर्यंतचा म्हणजे मल्हारजींचे मृत्युकालापर्यंचा जो थोडाबहुत उपलब्ध आहे तो पुढील प्रकरणांत देऊं. त्यावरून अहिल्याबाईसाहेब यांस बिनमोल व्यवहारी शिक्षण कसें लाभत गेलें यांची कल्पना बांधितां येईल. तेव्हां पत्रद्वारें लाभलेल्या या शिक्षणात्मक भागांकडे आतां वळूंया. त्याचप्रमाणें सरकार

राजश्री मल्हारराव होळकर कोणकोणते मनसुबे जिंकीत होते तेंही पाहू या.

मागील प्रकरणांत आपण पाहिलें कीं कुंभेरीच्या मोर्च्यात अहिल्याबाईंच्या सौभाग्याचा कुंभ फुटून गेला. तावत्कालपर्यंत वाढत वाढत जाणारी 'सरकार' मल्हारजींची सत्तेची व मत्तेची कमान आता थोडी बहुत थबकली. अहिल्याबाईंचा सती जाण्याचा बेत अगदी ठाम झाला होता. पण मल्हारजींच्या विनवणीमुळें तो बेत रहित झाला. ते कसें हें आतां पाहू या :

**मल्हारजींची सत्ता व मत्ता**

(सत्ता व मत्ता पुढें चालू) :

(अ) इ. स. १७५४ फौजेचे बेगमीस सरंजाम जहागीर मोगलाई अंमल प्रांत अंतर्वेद याबद्दल. सनद.

इ. स. १७५४ परगणे चांदवड देहे १५३ ची सनद.

इ. स. १७५४ संस्थान जयनगरची तिजाई.

(आ) इ. स. १७५५ मौजे निंब परगणे मल्हारजींकडे कमाविसीनें.

इ. स. १७५४ किल्ले ग्वाल्हेर येथील चार तोफा चांगल्या घेण्याचा करार केला आहे. त्यापैकीं तोफा दोन चांगल्या सरकारांत ठेवून बाकी दोन राजश्री मल्हारजींकडे देविल्या असत.

(इ) इ. स. १७५६ ''मौजे मनचर तालुके जुन्नर येथील पाटीलकी निम्मे रा. मल्हारजी होळकर यांनीं खरेदी केली आहे. त्याप्रमाणें पाटीलकी सरकारांत जप्त आहे. त्याची मोकळीक करून सोडणें.

इ. स. १७५६ मालजी होळकर यांस मौजे कापटणे परगणे सोनगीर हा गांव जहागीर मोकासा व बाबती, सरदेशमुखी दरोबस्त इनाम दिला असे.

इ. स. १७५६ स्वारी गडमुक्तेश्वर. गंगाधर यशवंत उसणे दिल्हे.

इ. स. १७५६ सरकार मांडवगड येथील देशमुखीचे वतन व कानगोईपणाचे वतन सरकारचें होतें ते रा. मल्हारजी होळकर व जनकोजी शिंदे यांसी उभयतां निमेनिम करून दिल्हे.

इ. स. १७५६ रुपये १०,००० दहा हजार पंढरपुरीं दिले, इमारतीबद्दल.

इ. स. १७५६ रुपये ६३,००० स्वारी सावनूर.

इ. स. १७५६ रुपये १०,००० वज्रयोगिनी देवालय बांधावयास दिले.

(ई) इ. स. १७५७ मौजे मांडवे परगणे संगमनेर हा गांव आत्माराम जोशी यांसी जहागिरी इनाम आहे तेथील सरदेशमुखी मक्ता रु. २०८.१२

(उ) इ. स. १७५८ यादी सरंजाम होळकर व शिंदे निस्बत राजश्री मल्हारजी होळकर फौज दहा हजार, कदाचित कमी जास्त असेल. निस्बत राजश्री जनकोजी शिंदे फौज पंधरा हजार, कदाचित कमी जास्त असेल.

उत्पन्न सरंजाम होळकर ............... शिंदे

२५००००० सरंजाम जुना देखील बुळे, २५००००० सरंजाम जुना.

| | | | |
|---|---|---|---|
| | बारगळ, वाघ. | १९००००० | नवा १५ लक्ष |
| १९००००० | सरंजाम नवा १५ लाख | | अंतर्वेद व ४ |
| | अंतर्वेद व ४ लक्ष खानदेश मोघम | | लाख खानदेश |
| ७५०००० | जयनगर बुंदीकडील. | | मारवाडकडील. |
| २२५०००० | स्वारीमुळें वाटणी हिस्सा. | २२५०००० | होळकरांप्रमाणें हिस्सा. |
| ७४००००० | | | |

(ऊ) इ. स. १७५८ रुपये २२१,९८० खंडण्या संस्थानिक वगैरे पैकीं होळकरांचे हिश्याचा ऐवज देणें राहिला. ती संस्थानें १ बंगला, २ जेतागुजर, ३ सरबंद, ४ जयनगर, ५ मोसखानबालाचे व प्रांत अंतर्वेद.

(ए) इ. स. १७५८ झडती जमाखर्च प्रांत तोडा सरकार रणथंबेर सुबे अजमीर अंमल श्रीमंत रा. मल्हारजी होळकर कमाविसदार विष्णु महादेव व सदाशिव महादेव रु. ५९५६२८.

(ऐ) इ. स. १७५९ होळकर यांजकडे हिंदुस्थानपैकीं महाल सरंजामाचे एक लक्ष व सावेर तीन लाख सत्याहत्तर हजार व सिरोंज पंधरा लक्ष, अंतर्वेद शहापूर एक लाख व पंचपहाड अर्धा लक्ष, प्रमाणें ब्रम्हावर्त ऊर्फ बिठूर निमे रामाजी अनंत व निमे मल्हारजी.

(ओ) इ. स. १७५९ अजमास निसबत तुकोजी होळकर जमा ९३९६२८० प्रांत माळवा, स्वदेश, २८९३८. गांडापूर येथील सरदेशमुखी मक्ता ४०००. तो. कोरहा १९००४.

(औ) इ. स. १७५९ यादी शिवायजमा परगणे उदेपूर घासदाणा खर्च तुकोजी होळकर ३२००, महादजी शिंदे १९०० व गणेश संभाजी ३३५०.

(अं) इ. स. १७६० जवाहीरखान्यापैकीं मालजी होळकर (नातू) यांस सदरेंत वस्त्रें दिली ते समयीं मोत्यांची जोडी.

(अः) इ. स. १७६१ मौजे कापटणे तो।। सोनगीर हा गांव जहागिर मोकासा, इनाम, मालजी होळकरांचे नांवें.

(क) इ. स. १७६२ हिशेब निसबत रा. मल्हारजी होळकर इसन्नेसीतेन तिसाला स्वारी हिंदुस्थानांतील ऐवज रु. ५३३८५३.

(ख) इ. स. १७६२ हिशेब सरकर बिजागड व सरकार हांडे निसबत नारो बल्लाळ रु, ३५७४७९.

(ग) इ. स. १७६२ मल्हारजी बिन खंडोजी होळकर यांस परगणे नाशिकपैकीं इनाम गांव दोन मोगलाई अंमलाचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें.

(घ) इ. स.१९६२ परगणे मवार प्रांत नंदुरबार फौजेचे सरंजामास मल्हारजी होळकरांकडे.

(ङ) इ. स. १७६३ ताळेबंद नि।। मल्हारजी होळकर नाशिकचे मुक्कामीं फडशा झाला. देणें मोरो गोपाळ गोळे मुजमदार दिमत मजकूर यांसी संस्थान श्रीरंगपट्टण येथील खंडणीबद्दल १०००० देवविले.

(च) इ. स. १७६३ परगणे कान्हापूर कैलासवासी ती. राव यांजकडील अन्नछत्राकडील मल्हारजी होळकर यांस फौज सरंजाम खरगोण खेरीज मुकासा.

(छ) इ. स.१७६४ परगणे अंबाड सरकार जालनापूर मौजे कोरेगांव पाबळ प्रांत जुन्नर इनाम नूतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें मल्हारजींस व अंबाड वेरूळ तालुका देपूर पूर्ववत मल्हारजींकडे.

(ज) इ. स.१७६५ हिशेब परगणे रामपुरा सुभा श्रीमंत राजश्री मल्हारजी होळकर विद्यमान मिर्झा आदिलबेग कमाविसदार. १२४३ छत्री कारखाना इंदूर मातुश्री गौतमाबाईसाहेब विद्यमान परशराम शिवाजी व नुकसानपायमली ३०५१.

(झ) इ. स. १७६६ मालजी होळकर यांजकडे कै. मल्हारजी होळकर यांची छत्री मल्हारनगर उर्फ आलमपूर येथील सदावर्त वगैरे खर्चाबद्दल इनाम गांवें १५, बेरछापैकीं गांवें ११, पन्नापैकीं गांवें ३ व परगणे भांडेर पैकीं एक गांव एकूण आकारीं रु. २७५०१.

एकूण पंधरा गांव सत्तावीस हजार पांचशें एक रु. इनाम कुलबाब, कुलकानु, हालीपट्टी, पेस्तर पट्टी, खेरीज हक्कदार, जलतरु, तृण, काष्ठ पाषाण, निधीनिक्षेपादि करून दरोबस्त नूतन इनाम करार करून दिल्हे असत. सनद.

सारांश, इ. स. १७५४ ते १७६६ म्हणजे खंडेराव महाराजांच्या मृत्युपासून तो मल्हारराव महाराजांच्या मृत्युपर्यंत १२ वर्षांत ज्या ठळक गोष्टी घडल्या त्याचे वर्णन वरती दिलें आहे. निरनिराळे हक्क, निरनिराळ्या प्रांतांत संपादन होत होते. त्यांचे पैश्याचे रूपानें हिशेब डोळ्यापुढें ठेवणें, निरनिराळ्या व्यक्तींशीं असलेले व घडून येणारे संबंध नाजूकतेनें पाळणें तितकेच किंवा त्याहूनही दुरापास्त होतें. खंडेरावांच्या मृत्युनंतर सल्ला घ्यावयाचा अगर हितगुज सांगांवयाचें तर मल्हारजींनीं अहिल्येसच सांगांवयाचें. मूळची बुद्धी तीव्र असल्यास या सर्व बाबींचे शिक्षण तसेच परिणामकारक व्हावयाचें. ती बुद्धी तशी होती याचा पुरावा म्हणजे जो थोडाबहुत मल्हारजींचा पत्रव्यवहार शाबूत आहे ते पुढें मांडणें होय. त्यावरूनही अहिल्याबाईचे राजकारणीं शिक्षण कसकसे विकास पावत गेलें हे स्पष्ट होते.

**श्री. मल्हारराव होळकर ह्यांची अहिल्याबाईंस पत्रें :**

(१) चिरंजीव अहिल्याबाई प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें. विशेष आपणास पत्र श्रीमंतांचें कीं, रा. कुसाजी पाटील शिंदे मौजे पिंपरखेड येथील संबुगीर गोसावी यानें कुसाजी मजकूर याचा पुतण्या व सेत व मळे व घर जप्त केलें म्हणून कळलें. त्यास वाफगांवीं व जेथें मुलें-माणसें

त्याची असतील तेथें तुम्ही गोसावी यांसी ताकीत उत्तम प्रकारें करून इसम मजकुराची जप्ती शेत मळे याची जे असतील त्याची ताकीत करून सोडून द्यावी. त्यावरून हें पत्र लिहिलें आहे. तरी वाफगांवीं शिंदे मजकुराचा पुतण्या आहे. तो सोडून देणें व पिंपरखेडी गोसावी यानें माणसे कैद केली असतील ती माणसें व शेतमळे यांची मोकळिक करणें ऐसी ताकीत करून सोडून देवविणें. छ. १५ बहुत काय लिहिणें आशीर्वाद. मोर्तब सुद : (ता. ३ डिसेंबर इ. स. १७६२)

(२) चिरंजीव अहिल्याबाई यांसी प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद. उपरी तुम्हास जाते समयीं सांगितलें कीं मथुरेसी अगर आग्रासी कांहीं मुक्काम न करितां भारी भारी मजला करून ग्वाल्हेरीपर्यंत झाडून जाणें. म्हणोन ऐसें असतां, तुम्ही मथुरेसी दोन तीन मुक्काम करणार असें ऐकिलें. ऐसीयासी जातेसमयीं समक्ष आज्ञा केली असतां त्या गोष्टी सर्व एकीकडे ठेवून मथुरेसी मुक्काम केला हे उत्तम नसे. आम्हीं सांगितलें तें न करावें आणि आपल्याच चित्तास येईल तसें करणें असेल तरी सुखरूप तीर्थे करून असणें. सांप्रत पत्र लिहिलें आहे, तरी इतकियावरी पाणी पिण्यासी देखील मथुरेसी न राहतां थोर थोर मजला करून चाल उतरून ग्वाल्हेरीस जाणें. तेथें बनेल तरी चारपांच मुक्काम करावे. त्या स्थळीं थोर तोफखाना ठेवून त्याचे गोळे व जबुरियाचे गोळ्यांची तजवीज होईल तितकी करावी. परंतु ग्वाल्हेरी अलीकडे एकही मुक्काम न करणें. मागाहून वरचेवर लिहूं, त्याप्रमाणें वर्तणूक करणें. तोफखाना थोर ग्वाल्हेरीस ठेवून त्याची महिन्याभराची बेगमी खर्चाची करून देऊन मग पुढें तुम्हीं जाणें. चौकी पहारा मार्गाचा जाबता करीत जावा. छ.९ साबान हे आशीर्वाद. मोर्तब सुद (पैवस्त ता.३-२-१७६५ छ. १२ साबान.)

(३) ता. ३१ जानेवारी इ. स. १७६५ चिरंजीव अहिल्याबाई होळकर यांसी प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करणें. विशेष. तुम्हांस दरमजल ग्वाल्हेरीस जावयाविषयीं अगोदर पत्रें लिहिलीं आहेत; त्याप्रमाणें कूच दरकूच ग्वाल्हेरपर्यंत जाणें आणि तेथें गेलियावरी पांच-सात मुक्काम करून थोरल्या तोफेचे गोळे हजार पांचशेंपावेतों व जंबुरियाचे गोळे होतील तितके जरूर करवावे. याशिवाय जंबुरेही शंभरपावेतों कारखाना लावून तयार करवावे. बाणाच्या पालेका, शेर दारू मावे ऐसी पालेक उत्तम निवडक पाहून, ज्या मिळतील त्या घेणें. येविषयीं हयगय नसावी. जातेसमयीं तुम्हांस जंबुरियाकरितां सांगितले आहे. त्याप्रमाणें गोळ्याचा साचा करून जंबुरे जरूर करविणें. ग्वाल्हेरी पलीकडे तुम्ही तेव्हां तोफखान्याचे खर्चाची बेगमी एक महिन्याची करून मग पुढें तुम्ही जाणें. छ. ९ साबान बहुत काय लिहिणें. (पैवस्त छ १२ साबान मु. आग्रा.)

(४) (ता. १० फेब्रुवारी इ. स. १७६५) चिरंजीव अहिल्याबाई यांसी प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद. उपरि येथील कुशल माघ शुध्द ५ मुक्काम दिल्ली जाणून तथास्थित असे. विशेष राजश्री गोविंद शामराज यांनीं लिहून पाठविलें कीं किल्ल्यावर

तोफा उतरावयाकरितां लिहून पाठविले आहे. त्याप्रमाणें तोफांचा सरंजाम नाही. त्यांची आज्ञा काय, म्हणोन त्यावरोन येथोन लिहून पाठविलें कीं तोफा किल्ल्यावरील न आणणें. आम्ही येथून तोफा थोर चार पाठविल्या आहेत, त्या शहरात ठेवणें; आणि तोफा तुम्ही ग्वाल्हेरीस पाठवाल त्यासमयीं बैलांस चारा, चंदी गाडी माणसांच्या रंजमुरियाची वगैरे नेमणूक देणें, आणि आम्ही येथून ग्वाल्हेरीस सरंजाम पाठविली आहे, त्याची सुमारी : थोरले तोफांचे गोळे ४०००, जंबुरियांचे गोळे १००००, बाणांच्या गोळ्या अणकुचीदार १०००, एकूण पंधरा हजार पाठविले आहेत. त्याच्यांत महिना मान पावेतों रा. गोविंद शामराव लिहून पाठवितील त्याप्रमाणें ऐवजाची बेगमी करून देणें. इकडील वर्तमान तर छ. १८ साबानीं नजीबखान पुत्रासह डेरियास भेटीस आला. त्याची आमची भेट जाहली. उपरांतिक जाटासी व गाजुद्दीनखान याचे भेटीस गेले. तेही भेटले. पुढें जें होईल ते लिहून पाठवूं. तुम्ही ह्या लिहिण्याच्या प्रमाणावर मुक्काम करून राहणें. दरमजल जाणें. सलूख यथास्थित ठरलिया उपरीच इकडील बंदोबस्त सत्वरच होईल. जाणिजे छ. १९ साबान बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. मोर्तब सुदा (पैवस्त छ. २५ साबान माघ मास)

(५) ता. २३-२-१७६५ चिरंजीव अहिल्याबाई यांसी प्रती मल्हारजी होळकर विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पोचलें. लेखनार्थ अवगत झाला. ग्वाल्हेरीस तोफखाना ठेवावयाची सोय नव्हती. त्याजकरितां सिरोंजेस घेऊन जातो. तेथें तोफखाना ठेवूं म्हणून लिहिलें ऐसीयासी तोफखाना सिरोंजी ठेवून तेथें बैलांस चारा दाण्याची सोय उत्तम प्रकारें करून देऊन तोफासुद्धां ठेवणें आणि तुम्ही इंदुरीं जाणें. तेथें गेलियावरी सेंधव्याचा व सुलतानपुरचा बंदोबस्त जरूर करणें. वरकड इकडील मजकूर तुम्हांस लिहिला. प्रस्तुत दिल्लीहून कूच झालें. अंतर्वेदींतून बुंदेलखंडाचे सुमारें येत असों. पुढील मनसबा उपयोगी पाहूं तैसा घडून येईल. जाणिजे. छ. २ रमजान. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. मोर्तब सुद : (पैवस्त छ १३ रमजान फाल्गुन मास मुक्काम थोरली नदी)

(६) ता. २३-२-१७६५ चिरंजीव अहिल्याबाई यांसी प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करीत जाणें विशेष. तुम्हासमागमें ताजू तोफखाना घेऊन आला आहे; त्यास तोफखाना झाडून सिरोंजेस येऊन, तेथें बैलांस चारा पोटभर व चंदीची बेगमी करून देऊन मग तुम्ही पुढें जाणें. राजश्री चिमणाजी गोविंद मामलेदार यांस बैलाच्या चाऱ्याविषयीं व तोफखान्याच्या डागडुजीकरितां ताकीद करून तोफांची झाडून तयारी करून ठेवणें. येविषयीं असावधता नसावी. ते प्रांतीं लवकरच येतों. तिकडे आलियावरी तोफांचे प्रयोजन लागेल. ते समयीं पत्र जाईल ते घडीस स्वार होऊन जलद येऊन पावे. (पर्जन्य काल याजस्तव) दोर, दोरखंड, कान वगैरे सामान सांभाळून सिद्धता करून ठेवावी. बैल ताजे जरूर राखणें. तोफखान्यांचे तयारीविषयीं ताजूस लिहिले आहे आणि तुम्हीही ताकीद करून बैलाची

वगैरे तरतूद चांगली करविणें. जाणिजे छ २ रमजान. बहुत काय लिहिणें, हे आशीर्वाद.

(७) ता. २ मार्च इ. स. १७६५ गंगाजलनिर्मळ मातोश्री अहिल्याबाईसाहेबांचे सेवेसी. आज्ञांकित कृष्णराव गंगाधर अनेक आशीर्वाद. विज्ञापना उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखनाज्ञा करीत गेले पाहिजे. साहेबांकडून अजूरदा काशीदाबरोबर पत्रोत्तरीं बहुत आनंद झाला. ऐसेच सदैव कृपापत्रीं सेवकांतें लिहीत जावे. इकडील वर्तमान तरी नजीबखान, जाट. यांच्या भेटी परस्परे सौरस्ययुक्त करून जाटास मार्गस्थ केलें व नजीबखानही आपले उद्योगास लागतील. पुढें कूच दर कूच सकुराबाद, इटावे, फपुंद, कडाकुरा वगैरे महालांचा बंदोबस्त करावयाची जात असतो. तदोत्तर रोहिले पलीकडील व अहमदखान पठाण यांनीं आपले मुक्कामांत अंमल केला. त्याचा जाबसाल सुजाउदौलाची कुमक वगैरे कामें आहेत. त्यांत उपयोगी कर्तव्य तिकडे जातील सदैव कृपापत्रीं साथ लिहीत जावें. वरकड वर्तमान श्रीमंत सुभेदारसाहेबीं लिहिले आहे त्यावरून कळेल. शेवेसी श्रुत होय हे विनंती. (पैवस्त छ ९ रमजान फालगुन मास मुक्काम महेश्वर.)

(८) चिरंजीव अहिल्याबाई यांसी प्रती मल्हारजी होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें विशेष. येथील वर्तमान अगोदर तुम्हास लिहून पाठविलें आहे. त्यावरून कळलें असेल. तूर्त येथील मजकूर तरी दिल्लीहून आमचे तुंबळ होऊन छ.११ रोजीं अनुप शहरानजीक कर्णवस येथें आलो. यास्थळीं हुताशनी होईल. तदोत्तर उपयोगी मनसबा दिसेल तसा कौल केला जाईल. गिलच्याचे भानगडीस नजीबखान आहे. अबदाली सरहद्दीअलीकडे आला म्हणून बोलवा असे. त्याजकडे नजीबखान रवाना केला. त्याजकडील तहरहाची पुरती केली. यावरील पुढील तरतूद करणें तें करण्यांत येईल. ठीक खबर येईतोपर्यंत गंगातीरीं मुक्काम होतील. गिलच्याकडील बातमी पक्की लागलीयावरी सकुराबादचे रोखे येथेंच होईल. दुसरें देवकासीद यासमागमें पत्रें तुम्हास पाठविली तीं पावोन रवानगीचे तजविजीत असाल, त्यास मार्गाचे ठीक नाहीं. भरवशाचे पथक नसे. याजकरितां रवानगी केली नसली तरी तूर्त कोणासही इकडे न पाठविणें. तुम्ही अवघी ग्वाल्हेरीस मुक्काम करून असावें. आम्हीही लवकरच ते प्रांतीं येतो. तिकडे आलियावरी तुम्हांस बोलवावयाचे झाल्यास बोलावून घेऊं. गोहदकराकडील एकगढी तोफा लावून तुम्ही खाली केली म्हणून येथें कासीदाने सांगितलें. त्यास तुम्ही ग्वाल्हेरीसच राहून तोफेचे गोळे व जंबुरियाचे गोळे यांचा कारखाना लावून सरंजाम पूर्ववत करवणें. आयंदा आम्हांस गोहदकराचें पारिपत्य जरूर कर्तव्य आहे. रवानगी कराल तरी भरवशाची सोबत सामान चांगले असेल आणि तुमची निशा पडली तर रवानगी करणें. नाहींतरी तेथेंच असावें. रवाना छ ११, रमजान बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. मोर्तब सुद: (पैवस्त छ २३ रमजान ता. १६ मार्च इसवी सन १७६५)

(९) पुरवणी पत्र : चिरंजीव अहिल्याबाईस आशीर्वाद उपरी. गोहदकराकडील गढीचा जमाव अटोकाट पूर्ता मनास आणून मग तोफखाना पाठवीत जाणें. शहसर्वथा गुंता न जाणें. दबावानें जितकें काम होईल तोवर करीत जाणें. तोफखाना आपल्यापासून कोणाच्या भरवशावर सर्वथा लांब पाठवावयाची तजवीज न करीत जाणें. तोफखान्याची आब राखून आपला नक्षा साधेतों अर्थ करीत जाणें. छ.११ रमजान हे आशीर्वाद मोर्तब सुद : (पैवस्त छ. २३ रमजान खमसासितैन सन ११७४)

(१०) ता. २८ मार्च इ. स. १७६५ चिरंजीव आहिल्याबाईस आशीर्वाद विशेष. गोहदकराकडील एकदोन गढ्या मातबर घ्यावयाच्या होत्या तेथें तोफा लावून ठाणीं खाली करून घेऊन रा. गोविंद शामराव याचा अंमल पेशजीप्रमाणें चालत आला. सांप्रत मोहीम जाटाची आहे. लोकांस खावयास द्यावें लागतें याकरितां खेतसी करमसी याजपासोन लष्करांत रुपये दोन लक्ष २००००० घेऊन हें पत्र तुम्हांस हुंडीदाखल लिहिलें असे. तरी पत्र पावतांच सदरहू दोन लक्ष रुपये सावकार मजकूर याजला देऊन पावती घेणें. चिठ्ठी जे समयीं पावाल तेचक्षणीं ऐवजाची भरती करून देणें. येविषयीं हयगय एकंदर न करणें. तुम्हांस आमची अगत्य असली तरी ऐवजाची सरबराही होऊन सावकार मजकुरास ऐवज क्षेपनिक्षेप पावता होय तें गोष्ट करणें.

(११) माहे एप्रिल इ. स. १,७६५ ह. मुकाम कुतबा. अहिल्याबाईस पत्र कीं, चिरंजीव तुकोजी होळकरांचे स्त्रीची ऋतुशांती झाली. सबब पैठणी, शेले, सुमारे तीन पाठवून देणें आणि आख लिहून पाठविणें. म्हणून मल्हारजींचे अहिल्याबाईंस पत्र.

वरील ११ पत्रांवरून हे लक्षात येणार आहे कीं सुभेदार मल्हारराव होळकर यांनीं आपल्या सुनेस शिक्षण देऊन राजकारणांत कशा तरबेज केल्या हें कळून येईल. देवी अहिल्याबाईचे राजकरण आपण पुढील प्रकरणांत पाहू या.

**आधार ग्रंथ**


१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
२. पुणें पेशवे रेकॉर्डचे सालवार जमाखर्च




**प्रकरण २० वें**

# रामपूरचे चंद्रावत

## इ. स. १७६८ ते १७९६

**चंद्रावतांचें पूर्ववृत्त**

रामपूरची हकीगत ज्ञानकोशकार देतात ती येणेंप्रमाणें : येथें सातव्या शतकापासून तो नवव्या शतकापावेतों बौद्ध धर्मीय लोक राहत असत. धमनार, पोलादो नगर आणि खोलवी ह्या ठिकाणीं त्याचे चैत्य आणि विहार, गुहांचे कांहीं अवशेष दृष्टीस पडतात. नवव्या शतकापासून तों चौदाव्या शतकापर्यंत हा जिल्हा परमार रजपूत राजांच्या ताब्यांत होता. पंधराव्या शतकांत माळव्याच्या मुसलमानांच्या ताब्यात व नंतर हा उदेपुराकडे गेला. हा जिल्हा इ. स. १७२९ मध्यें जयपूरचा राजा सवाई जयसिंग याचा दुसरा मुलगा माधवसिंग यांस मिळाला. माधवसिंगाकडून हा जिल्हा सुभेदार मल्हारराव होळकर यांजकडेस आला.

चंद्रावत हे चंद्रवंशातले म्हणून त्यास चंद्रावत असे म्हणतात. सुमारें सहा-सातशें वर्षांपूर्वी उदेपूरच्या घराण्यांत मुनसी या नांवाचा एक शूर राणा झाला. याला चंद्र ह्या नांवाचा एक मुलगा होता. त्यानें रामपूर भानपूर येथें आपले राज्य स्थापिले. तेथें चंद्रावत रजपूत स्थिर झाले. चंद्रावत हे उदेपूरच्या घराण्यांतले असल्यानें त्यांचा संबंध उदेपूराशीं असणें हे साहजिक आहे.

जयपूर, जोधपूर व उदेपूर या संस्थानांचा आपआपसांत जो तहनामा झाला त्यामुळें राजा सवाई जयसिंग यांच्या पश्चात् माधवसिंगास ती गादी मिळावयाची. या प्रकरणांत

जे प्रश्न उपप्रश्न उत्पन्न झाले त्यांचा खुलासा सुभेदार मल्हारजींच्या कारकीर्दीत आम्ही केलाच आहे. माधवसिंगानें मल्हारजींस, रामपूर बहाल केला. त्यामुळें चंद्रावतांस मोठा पेंच पडला. उदेपूर दरबार, चंद्रावत व होळकर या तिघांचा या प्रश्नाशीं संबंध आला. उदेपूरकर स्वस्थ बसले. मल्हारजींच्या दबावाखालीं चंद्रावत दबून राहिले; पण त्यांच्या मनांतील डंख गेलेला नव्हता. मल्हारजींच्या पश्चात या प्रश्नास तोंड फुटलें.

**सुभेदार मल्हाररावांचे पश्चात : प्रसंग १ ला**

सन १७६८ चे होळकर दफ्तरांत खालील माहिती उपलब्ध आहे. यादी चंद्रावतांकडे गांव दिले मार्फत गोविंदकृष्ण परगणे रामपुरा संवत १८२४ चें सालीं.

७ **परगणे आमद व हवेली. सांत गांवें :** १ कसबे रामपुरा, १ पिंपळ्या भाट, १ तळाऊ, १ अरण्या, १ बडखुंबा, १ शेमळी व १ दाता.

९ **परगणे दातोली. गांवें नऊ :** १ कसबे मजकूर, १ खेतपाळ, १ माकलपूर, १ तुंबड्या, १ किसनगड, १ पोखरदा, १ पिंपळ्या बु, १ खेमपुरा, १ महारजफा.

४ **परगणे गरोठ :** १ आमली, १ शेमळीसोंद्याची, १ धामन्याराय, १ पलासली.

१० **परगणे पठार :** गांवें दहा. १ पगारा बुाा, १ पगारा खुर्द, १ पिंपलदा, १ संग्रामपुरा, १ बणजारी, १ मोकलपुरा, १ अमरगड, १ भीलखेडी बु. १ भीलखेडी खुर्द व १ बिसलवास.

१ शिवाय भाटखेडी बुद्रक रावत हटेसिंग चंद्रावत यांजकडे.

---

**३१**

एकूण गांवें तीस. ३१ भाटखेडीसुद्धां. सदरहूची सनद नाही. आपसात सलूक न होय सबब दिले, असे एकतीस गांवें.

१ गोविंदकृष्ण याजला पत्र कीं, लक्ष्मण चंद्रावत यांचे बंदोबस्ताकरितां परगणे मजकूरी येथून गांवें व जमिनी नेमून दिल्या, त्याची याद अलाहिदा पाठविली आहे. त्याजप्रमाणें बुंदीकर, कोटा बांसवाडेकर याजकडून मातब्बर जामीन घ्यावे कीं महाली बशर्त दंगा न होय. ऐसा करार ठरवून मग गांव त्याजकडे सांगणें. जे गांव सरकारांतून दिले त्या गांवीं गढी न बांधावी. असा करार करून मग गांव देणें.

**३१ गांवांची वाटणी**

१ लक्ष्मणसिंग चंद्रावत यांस पत्र कीं तुम्हांकडील बंदोबस्ताकरिता राजश्री गोविंदकृष्ण यांस लिहिलें आहे त्याप्रमाणें करून देतील.

२७ भवानीसिंग चंद्रावताकडे ६ तालुके आमदपैकीं, ४ ताो गरोठपैकीं, ७ तालुके दातोलीपैकीं, १० तालुके पठारपैकीं, एकूण सत्तावीस.

१ रावत छत्रसिंग व किशनसिंग मदानेवाले तालुके आमदपैकीं अरण्या.

१ मौजे सेमली मियाची भवानीसिंगास.

१ मौजे भाटखेडी रावत सालमसिंग व दूलेसिंग भाटखेडीवाले.

१ मौजे दातोली बिजेसिंग दातोलीवाले यांजकडेस.

३१ **(पुणें एलिएनेशन रेकॉर्ड देहझाडा संवत १८६५)**

१ परगणे रामपुरा प्रांत माळवा सरकार श्रीमंत राजश्री तुकोजीराव होळकर विद्यमान आबाजी विष्णु कमाविसदार लिसासबैनमया व आलफ प्रांत रामपुऱ्याचे कुलदेह ७६३ पैकीं जहागीर, इनाम, चाकराणा गांवे सुमारी ९१ ही गांवें वजा जातां खालसा वहिवाटींत गांवें ६७२.

४ उदमी देहचार : (१) मौजे देवराण, गोसावी नित्यानंदाकडे (२) देवरी महंत मयारामबाबाकडे (३) खेडी महंत चतुरदास (४) पिंपळ्या महंत गेदीरामाकडे तालुके हवेली रामपूरा :

९ चाकरी देह सुमारीं नऊ. (१) क्षेत्रपाल रामाभीलाकडे इतर चाकरी देह ८.

३ तालुके कोहळा भानपूर. (२) इनामी देह नारोपंतनानाकडे अंतराल व पगाण्या. (१) उदमी गांव मौजे वामरिया गोसावी गणेश शंकर यांस.

१० तालुके गरोठपैकीं (३) उदमी गांव (३) इनामी. सटवाजी राजोळेकडे बेलमोल्या. अप्पाजी रामाकडे खजूरी व नारोपंत नानाकडे पावासर व चंद्रावताकडे गांवे (४) आमली, धामण्या, पळासली, शेमली सौद्याची.

२८ तालुके दातोली पैकीं : (१८) राणाजीकडे गांव अठरा. (१०) चंद्रावताकडे देह दहा.

२७ तालुके पठार पैकीं : (१०) चंद्रावताकडे गांवें दहा. (२) चाकरी देह भोपालसिंगाकडे कंठेला व डिंगनवास.

१ तालुके शंकोद्धार इनाम सकरियाखेडी शिवजी लोहार यांस

९ तालुके आमद पैकीं : (७) चंद्रावताकडे (१) हरीसिंग राठोडकडे (१) चाकरी गांव वडा भिलाकडे चालू.

---

९१

तपशील चंद्रावताकडे (३१), राणाजीकडे (३३) व इनाम चाकराणा गांवें (२७), ह्याप्रमाणें वजा होऊन बाकी खालशांत गांवें ६७२.

या इ. स. १७६८ च्या केलेल्या व्यवस्थेवरून स्पष्ट दिसून येईल कीं चंद्रावतांनीं कांहीं उचल केली असावीं. आपआपसातील प्रकरण चुरसीस लागून चिघळून जाऊं नये म्हणून सामदामाचा प्रकार मातोश्रींनीं अंगीकारिला असावा. पण तेथें हे प्रकरण विल्हेस न लागतां वेळोवेळीं पुन; उचल खाई. त्याचे विवरण व वेळोवेळीं मातोश्रींनी योजिलेले

उपाय सरकारी कागदांवरून खालीं देत आहोंत.

सन १७७१ त रामपूरकरांनीं बंड उभारलें. उदेपूरकरांनीं त्यांचे साहाय्य केले. राणाजी चितोडपर्यंत आले होते. युद्ध तीन महिने चालिले. याचवेळीं थोरले माधवरावांनीं उत्तर हिंदुस्थान सर करण्याकरितां विसाजी कृष्ण बिनीवाले यांच्या बरोबर जे मोठे सैन्य पाठविलें होतें त्यांत सुभेदार तुकोजीराव होळकर गुंतले होते. या प्रसंगीं मातोश्रीसाहेबांजवळ फौजेचा जमाव फारसा नव्हता. त्यांनीं तातडीनें लोकांची जमवाजमव केली आणि त्यांचे सैन्य उभारून, आपल्या पाहऱ्यावरील शूर शिपाई शरीफभाई याचे हाताखालीं तें सैन्य दिले, आणि त्यास चंद्रावतावर पाठविलें. ही लढाई मंदसोरच्या उत्तरेस पळसुडा म्हणून एक गांव आहे तेथें झाली. युद्धाची सर्व सूत्रे मातोश्री स्वत: हालवीत होत्या. या युद्धांत पहिल्या पहिल्यानें होळकरांच्या सैन्याचे रजपुतांच्या कडव्या लोकांपुढें कांहीं चालेना. ते मागे हटले. पण या पिछेहाटीने न डगमगतां मातोश्रींनीं प्रयत्न भारी केला. शेवटीं चंद्रावतांचा पराभव झाला. पराभवाचे स्वरूप खालील सरकारी पत्रांवरून ध्यानीं येईल.

(पत्र) ''दंडवत विशेष उपरी. चितोडहून राजश्री रावत भीमसेनानें एक किंवा दोन पत्रें पाठविलीं कीं चंद्रावतांच्या जाबसालासाठी तुम्हांकडील कोणी भला माणूस पाठवून देणें. त्यास त्याजकडे येथें पाठवावयासी कोणी नाही. तेथून राजश्री नारो विश्वनाथ यांजला पाठवून देणें म्हणजे त्याला भीमसिंगाकडे पाठवूं.'' हे पत्र इ. स. १७७१ चें आहे.

याप्रमाणें दंडाचा अंगीकार करून नंतर मातोश्रींनीं शरण आलेल्यांस तह करून दिला.

**प्रसंग दुसरा**

ह्यापुढें इ. स. १७८२-८३ त चंद्रावतांनीं पुन: उपद्रव मांडिला. त्याचा उल्लेख 'महेश्वर दरबारचीं पत्रें'मध्यें आला आहे. पत्र येणेंप्रमाणें : कृष्णाजी तानदेवांचे पुत्र लक्ष्मणराव कृष्ण हे चंद्रावत वगैरे मवासावर गेले होते. दोनशें स्वार, हजार पायदळ, यांजसंगातें होतें. इंदूरहून दोन तोफा नेल्या होत्या. परंतु मवासाचा जोर अधिक यास्तव भोपाळवाले पठाण सरहदेवर होते, लक्ष्मणरावांनीं आपलेकडे बोलविलें. ते दोनशें लोकांनिशीं पठाण यांस सामील झाले. मवासाचे पारिपत्य करून पठाणांनीं कामकाज चांगलें केलें. यास्तव लक्ष्मणरावांनीं या पठाणांस पंचवीस लोकांनिशीं महेश्वरीं घेऊन आले. लक्ष्मणरावांनीं बाईजवळ पठाणांचे मर्दुमीची तारीफ केली. बाईंनीं त्यांस मेजवानी दुरोजा पाठविली आणि नंतर पठाणांस भेटीस वाड्यांत बोलविले. बाई आत समोर बसली. अलिकडे दालनांत यांनीं आपले लोक व मुत्सद्दी बसविले. दहा-पंधरा खाशांनिशीं पठाण आले. दुरून बाईंस मुजरे केले. दोन घटका बसले होते. विडे देऊन बिदा केले.

ह्या पत्रावरून इ. स. १७८३ सालीं चंद्रावतांनीं पुन: उपस्थिलेला उपद्रव मातोश्रींनीं किती युक्तीनें शमविला आणि त्यांतच नवे मित्र जोडले हे पाहण्यासारखें आहे. यावेळीं झालेला तहनामा खालील सरकारी कागदांवरून स्पष्ट होईल.

''यादी बिजेसिंग चंद्रावत भाटखेडीकर व सालमसिंग चंद्रावत दातोलीकर यांसी, भवानीसिंग चंद्रावत आमदकर यांसी आपसामध्यें लढा होता. त्यांसीं उभयतांनीं मिळोन तालुके झार्डा, कंजार्डा येथील सरकाराचा गांव मारला तेव्हां सरकारांतून राजश्री नानाजी भास्कर यांज समागमें सरंजाम व ''दळसलाम'' तोफ पाठवून पारिपत्य केले. तेव्हां उभयतांनीं राजश्री सामतसिंग संस्थान देवळे यांचे विद्यमानें सलुखाचें बोलणें लाविलें. याकरितां रामपुऱ्याहून चिं. रा. बाजी जाधव दिमत पागा निस्बत सरकार याजला व मामलेदाराकडील कारकून देवळ्यास पाठविलें. तेथें उभयतां मशारनिल्हेसी जाबसाल जाले. त्याप्रमाणें जाधव मजकूर यांनीं सरकारांत महेश्वरचें मुक्कामीं येऊन विदित केले. त्यावरून सलुखाचे जाबसाल ठराव करणें येणेंप्रमाणें. सलासमानेनेमया व आलफ.

१ बिजेसिंग व सालमसिंग याजकडील दोन्ही गांव भाटखेडी व दातोली मारून, रहावयाची घरें देखील पाडली. सबब तूर्त रहावयास स्थळे व गांवची आबादी नाहीं. याअर्थी पोटाची बेगमी पाहिजे. याकरितां सात हजारपर्यंत ऐवज रामपुरेकर मामलेदार यांनीं तूर्त द्यावा आणि या ऐवजास जागा भवानीसिंग चंद्रावत याजकडे करून घेऊन त्याजकडून निकाल करून घ्यावा. कलम

१ भवानीसिंग चंद्रावत आमदकर याची वाडी. उभयतां चंद्रावत बाहेर पडले आहेत. यांची सुदामत पासोन रीतभात कोणेंप्रकारें चालत आली, प्रस्तुत अंतर कोणाकडून पडतें, हे मनास आणून जिकडील अंतर असेल त्याजला निक्षून ताकीद करून पेशजी पासून चालत आल्याप्रमाणें ज्याची त्यांनीं वर्तणूक करावी. ऐसा ठराव करून देऊन आपसांत लढ्याचे जाबसाल असतील ते उगवून देऊन समजुती पाडून घ्यावी. कलम

१ बिजेसिंग व सालमसिंग यांनीं पुन: फंदफितूर करूं नये. मामलेदारांशीं रुजू राहून सरकार उपयोगी यांस जपत जावे. येविषयींचा जिम्मा राजश्री जालमसिंग देवळेकर याचा करून घ्यावा. कलम

येणेंप्रमाणें तीन कलमें लिहिल्याप्रमाणें करार करून सदरहु अन्वयें राजश्री आनंदराव दिनकर यांसी बोलून रवाना केली असे.

### प्रसंग तिसरा

इसवी सन १७८३ त मातोश्रींनीं विजय मिळविला असतांही समेटाचे धोरण कसे व किती पाळिले हें वरील पत्रावरून दिसून येईलच. परंतु दुसऱ्या बाजूनें मातोश्रींचें हें उदार धोरण समजण्याची पात्रता दाखविली नाही. इ. स. १७८७ सालीं रजपुतांनीं शिंद्यांचा लालसोट येथें पराभव केला. त्यांनीं होळकरांचा निंबाहेडा म्हणून महाल होता तो खालसा केला आणि तेथें मराठे यांची फौज होती ती हाकलून जावद शहर घेतलें. निंबाहेडा येथें शिवाजी नाना हे होळकरांचे सुभेदार होते ते राण्यास शरण गेले. हा प्रकार पाहून रामपुऱ्याचे

चंद्रावत स्वस्थ बसेनात. रजपूत चकरड्या व चलदू गांवापर्यंत येऊन थडकले तेव्हां ते त्यांस जाऊन मिळाले. दोघांनी मिळून होळकरांविरुद्ध बंड उभारले. तेव्हां मातोश्रींनीं आबाजीपंत, राघोरणछोड इत्यादि लोकांबरोबर आपले सैन्य युद्धास पाठविलें. राण्याच्या सैन्यानें मराठी सैन्यावर चकरड्या मुक्कामीं छापा घातला. त्यांत आबाजीपंत मारले गेले. होळकरांची फौज जावदेस जमा झाली. मातोश्रींनीं मागील युद्धाचा नायक शरीफभाई यांस बहुत गौरवून युद्धावर पाठविलें. खासगतडेरा बाहेर दिला. तेथें रोज फौजेची हजेरी. शंभर स्वार आले ते रवाना केले. पांचशें आले ते रवाना केले. रजपुतांनीं निंबाहेडा शहर घेतलें. ही रजपुतांची लाट परतून द्यावयास्तव मातोश्रींनीं जी योजना केली ती खालील पत्रावरून दिसून येईल.

### शिंद्यांची मदत

सुभेदार तुकोजीरावांचे पत्र. ''वडिलांकडून जे पत्र आलें तें पावलें. माळवे प्रांतीं चंद्रावतांनीं दंगा मांडला आहे त्याचे पारिपत्य झालें पाहिजे. याकरितां राजश्री लक्ष्मणराव कृष्ण यांची रवानगी झाली आहे. त्याजला सामील होऊन आपल्या महालांत हरामखोरांस थारा न देतां पारिपत्य करावयाविषयीं माळव्यांतील मामलेदारांस राजश्री महादजी शिंदे यांची पत्रें पाठवून देणें म्हणोन आज्ञा. त्यावरून शिंदे यांची पत्रें घेऊन मामलेदारांस पाठविली आहेत. प्रविष्ट होतील तीं लक्ष्मण कृष्णाकडे रवाना करावी.'' ता. ३ एप्रिल इसवी सन १७९०.

ह्याप्रमाणें सैन्यबळ वाढविल्यावर मातोश्रींनीं शिवाजीनानाच्या मदतीस आपले बंधू तुळाजी शिंदे यांस पांच हजार स्वारांसह पाठविले. शिवाजीनानानें मंदसोर किल्ल्याचा आश्रय धरून तेथें फौजबंदी केली होती. या उभय सैन्याची गांठ पडून त्यांची मोठी रक्तपाताची लढाई झाली. तीत राण्याच्या सैन्याची फार कत्तल होऊन त्याचा पराभव झाला. या कत्तलीत राण्याचा प्रधान मालदास मेथा मारला गेला. त्याचप्रमाणें कनोर व सादडी येथील ठाकूर व पुष्कळसे लोक जखमी झाले. त्यात सादडीच्या ठाकरास कैद केलें. या ठाकरानें दोन वर्षांनंतर आपल्या राज्यातील उत्तमशी चार गांवे जेव्हां मराठ्यांस दिली तेव्हां त्याची सुटका झाली.

### होळकरांचा विजय

### पुणें दरबारांत देवींचे अभिनंदन

याप्रमाणें रजपुतांची वाताहत केल्यावर होळकरांचे सैन्य दुसरें दिवशीं कूच करून जावद, निंबाहेडा, राणीपुरा वगैरे किरकोळ महालात ठाणीं बसवून रामपुऱ्याकडे आलें. रामपुराही सातावीसा दिवशीं आम झाला. चंद्रावत पळून आमदेस गेला. आमदेस मोरचे लागले. ''ज्वाला'' तोफ रामपुऱ्यास होती ती आणली. मग मोरचे जमवून, ज्वाला जाय होती म्हणून, निम्मे बार भरून एक गोळा मारला. तो इकडील अलंग फोडून भवानीसिंग चंद्रावत निजला होता, त्याचे वरील खपरेल उडून पलीकडील सफल फोडून, मग तो गोळा पार झाला. त्यातच त्याचे टांके ढिले झाले. दुसरें दिवशीं हल्ला करावा असा आबाजी रणछोड व शरीफभाई यांचा विचार ठरल्यावर हे वर्तमान चंद्रावतास समजलें. त्यांनीं मार्गात

दारू बिछाऊन दिल्ही कीं, हल्ला येतांच बत्ती द्यावी, म्हणजे माणसें उडून जातील. अशा भावी त्यांनीं दगा केला. पण इकडे मार्तंडसाह्य ! हल्ला आला नाहीं तो अगोदर भवानीसिंगाचे बंधू सोभागसिंगकडून किल्ल्याबाहेर जागाजागा माणसे बसविण्यांत आली. त्यातून तोड्याचा गुल पडून दारूचा भडका उडाला. तों पन्नास माणूस जळून जातीनें सोभागसिंग चंद्रावत हाही फार जळाला. इतक्यांत हल्ला जाऊन पोहचला. त्याजला उचलून नेण्याचे किल्लेवाल्यास न बनतां तो हातीं सापडला. परंतु किल्लेवाल्यांनीं हल्ला मारून काढला. सोभागसिंगास घेऊन आले. त्यानें रदबदली फार केली. परंतु न ऐकतां सोभागसिंग चंद्रावत या तोफेच्या तोंडी देऊन उडवून दिला. सोभागसिंग हा चंद्रावतात शूरत्वाचा व कर्तृत्वाचा होता; तोही खर्ची पडला. तेव्हां भवानीसिंगाची हिमत न पुरतां तो तीनशें स्वारांनिशीं रात्रौ पळून गेला. चहूकडे जलूश वाढून पूर्ववत बंदोबस्त झाला. राज्यांत राज्य, प्रजेस चैन, याप्रमाणें चहूंकडे आनंद झाला व बाईनें आपली फत्ते केली. (बाईच्या शौर्याच्या व चातुर्याच्या) पुण्यास खबरा गेल्या. तिच्या विजयाचे नाना फडणवीस यांस वर्तमान समजून आनंद प्रदर्शित करावयास्तव तोफा सोडून शिरेदरबार बाईसाहेबांचे स्तुतिस्तोत्र सहा घटकांपर्यंत केले. ''शापादपि शरादपि, अशी बायकांत अहिल्याबाई दिसण्यांत आली. आजपावेतों बाईची स्नानसंध्या, धर्मांची प्रवृत्ति ऐकण्यांत आली होती. आज पराक्रमाची ही गोष्ट मोठीच केली. पुण्याचा दरवाजा म्हणजे माहेष्मती नर्मदातीरची, आम्हांस आज समजलें.'' संपूर्ण मानकरी सरदार यांनीं माना डोलविल्या.

ह्या संबंधांत सरकारी दप्तरातील ता. २९ मार्च इ. स. १७९५ चे पत्र (खंड तीन, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र क्रमांक ६७५) मननीय आहे. त्यावरून मातोश्रीसाहेबांची एकंदर वृत्ती चांगली लक्षांत येईल.

सन १७६८ त रामपुऱ्यांतील चंद्रावतांनीं बंड उभारले ते इ. स. १७९६ त थंडावलें. तीन निरनिराळे प्रसंग कालाकालांतरानें उद्‌भवले. सुभेदार तुकोजीराव तीनही प्रसंगीं स्वामीकार्यास बाहेर गुंतलेले अशा या परिस्थितींत मातोश्रींनीं स्वत: शिरावर जबाबदारी घेऊन प्रथम साम दाम उपयोजिले. त्याची किंमत समोरच्या पक्षकारास उमगली नाहीं तेव्हां मात्र मातोश्रींनीं दंड दाखविला. शत्रू पूर्ण ताब्यांत आला असतांहीं त्याचा समूळ उच्छेद न करितां त्यास पुन: गांवावर बसविला. त्याच्यावर प्रसंग येतांच दुखवट्याची वस्त्रें पाठवून मनाचे औदार्य जगतास पटविलें.

**लष्करी सामर्थ्याचा विनियोग देवीने कसा केला?**

अवघ्या तीस वर्षाच्या कारकीर्दीत राज्यांत बंडाळी ही पहिलीच झाली आणि ती शेवटलीच ठरली आणि तिचा शेवटही गोड झाला.

राज्यकारभारांतील लष्करी सामर्थ्य हे एक अंग असते. मातोश्रींनीं त्या अंगाचा कसा काय उपयोग केला हें या प्रकरणावरून दिसून येईल. लष्करी सामर्थ्य सुभेदार तुकोजीराव बरोबरही होते. ते स्वामी कार्यार्थ याच कारकीर्दीत लढत होते. तेथील जयापजयाची

जबाबदारी अखिल मराठा मंडळावर आहे. हें प्रकरण पुढें यावयाचें आहे. त्या कामींही मातोश्रींनीं आपले स्वत्त्व वेळोवेळीं दर्शविलेलें नजरेस येईल.

शांतता कालांत राज्यकारभाराची जी दुसरी अनेक अंगे असतात त्यांचे वर्णन पुढील प्रकरणांत पहावयास मिळेल. ती सर्व कामगिरी मातोश्रीसाहेबांचीच आहे. ती कृती आणि ती कीर्ति अजरामर आहे. तेथील व बाहेरील भावी पिढ्यांस त्यांनीं तो कित्ता घालून दिला आहे तो कित्ता मातोश्रीसाहेबांच्या आशीर्वादानें प्रसादरूपी होवो.

**आधारग्रंथ**


१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
२. महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें
३. पुणें एलिनेशन रेकॉर्डपैकीं जमाखर्च, झाडे, देड झाडे वगैरे




## प्रकरण २१ वें

# देवी अहिल्याबाईंचा राज्यकारभार
## इ. स. १७६७ ते १७९५

आधीच्या प्रकरणांत सुभेदार मल्हारजीच्या राज्यकारभारासंबंधीं प्रकरणें दिली आहेत. त्यांचा काल धामधूमीचा. फुरसतीच्या कालांत जो कांहीं स्वस्थपणाचा क्षण मिळे, तेवढ्यांत जमेल तितका राज्यकारभार आटपायचा. ही झाली एक गोष्ट. दुसरी गोष्ट अशी कीं तो संक्रमण अवस्थेचा काल होता. मोगली राज्यकारभार अकबराच्या वेळेचा राहिला नव्हता. त्या पद्धतीचे विकृत स्वरूप सर्वत्र माजले होते. अशा वेळीं मोंगली कारभाऱ्यांस एकीकडे जिंकायचे आणि दुसरीकडे आपली राज्यव्यवस्था अंमलांत आणावयाचा उपक्रम करावयाचा. अशी दुहेरी कामगिरी सुभेदारांवर व त्यांचे समकालिकांवर पडली होती आणि ती त्यांनीं शक्य तितक्या उत्कृष्ट रीतीनें पार पाडून यश संपादिलें. मल्हारजींनीं नवा जमाव बनविला आणि तो वंशाच्या हातीं देऊन ते परलोकवासी झाले. कांहीं प्रांत त्यांचाच होऊन राहिला होता. पेशव्यांबरोबर राहून नवीन-नवीन मुलूख मिळविण्याची आशा व खात्री वाटत होती. स्थिरस्थावरता झाली होती आणि पाऊल पुढेंही टाकावयाचे होतें. अशा या सिद्ध व साधक स्थितीत राज्यकारभारांचे धोरण मातोश्रींनीं कसें ठेविलें होतें हे साधार निवेदन करण्याचे या व पुढील प्रकरणांत आम्ही योजिलें आहे.

छत्रपती श्रीशिवाजी महाराजांच्या वेळीं सरंजामी पद्धत नव्हती. पुढें श्रीछत्रपती राजाराम महाराजांच्या काळीं, औरंगजेबाच्या धामधूमींत परिस्थितीनें सरंजाम पद्धती अस्तित्वांत आली आणि ती त्या वेळीं यशस्वीही ठरली. श्रीमंत पंतप्रधान पहिले बाजीरावसाहेब यांनीं उत्तर

हिंदुस्थानाचे जे धोरण अंगिकारिलें आणि तडीस नेले. त्या वेळीं ही सरंजामी पद्धत तर कायमची स्थिरावली. ह्या पद्धतीचें, त्या कालमानाच्या चौकटींत बसवून, निरीक्षण केलें पाहिजें.

सुभेदार मल्हारजींनीं, माळव्याची स्थिरस्थावरता झाल्यावर या पद्धतीचा अंगिकार करून आपल्याबरोबर दक्षिणेंतून आलेल्या शूर पुरुषांस सरंजाम देऊन स्थिरस्थावर केलें. श्रीमंत पंतप्रधानानींही या सरंजामी सरदारांचा बहुमान केलेला आधीचे प्रकरणांत निर्दिष्ट आहे. मातोश्रींच्या कारकीर्दीत या सरंजामपद्धतीस स्थिरस्थावरतेचे व सन्मानांचें स्वरूप लाभले, इतकेंच नव्हें तर राज्ययंत्राचे ते एक प्रधान अंग होऊन बसले. त्या सरंजामी सरदारांपैकीं कित्येकांनीं आपल्या मुद्रा चालू केल्या. कित्येकांनीं आपआपल्या अधिकारांत जहागिरी, इनामें वंशपरंपरा दिलीं आणि ती वरिष्ठ सरकारांत मान्यही झालीं. या सरंजामी सरदारांची यादी सरकारी कागदांवरून खाली सविस्तर सादर करितो.

सरंजामी सरदारांची यादी. फूट गांव सरंजामी यांची सरंजामवार नांवें.

| अ.नं. | नांव | | सरंजामी प्रांतांची नांवें | अजमासें उत्पन्न | स्वार |
|---|---|---|---|---|---|
| १ | राजश्री गोविंदराव बुळे | ३ | पाटणा, झाबुवा व चिखलदे, तीन परगणे | १,९५,००० | ७०० |
| २ | राजश्री वाघ | ३ | महतपूर, बेटमे व उत्राण | ३,००,००० | १००० |
| ३ | रा.नारायणराव बारगळ | ४ | बुढे, नारायणगड, करही व रायपूर | ९६,००० | ७४० |
| ४ | रा. लांभाते | २ | जिरापूर, माचलपूर | ६०,००० | २०५ |
| ५ | रा.फणसे यशवंतराव | १ | तराणा परगणा | १,१५,००० | २८० |
| ६ | रा. बाबूराव वाघमारे | १ | सावेर परगणा | १,०४,००० | २२५ |
| ७ | रा. अप्पाजीराम पळसीकर | १ | परगणे बरडावद | ३०,००० | १० |
| ८ | रा. नारो गणेश | १ | परगणे पंचपहाड | ५०,००० | ० |
| ९ | रा. भागवत व खटके | १ | परगणे जावरा | ६०,००० | १२० |
| १० | रा. गोविंदराव महाडिक | १ | प. पिंपलोदा | ४,००० | ० |
| ११ | रा.खंडूजी नलगे, निसबत ढमढेरे | ४ | अडावद, आहूर, रायपूर व दहीवद | ६०,००० | २२५ |
| १२ | रा. भागवत | १ | परगणे बागदरा | १५,००० | २५ |
| १३ | रा. माधवराव राजोळे | ३ | हसलपूर हरसोले, जांब | ३३,००० | १०० |
| १४ | रा. पिसे | १ | वडगांव परगणा | ५,००० | १५ |

सदरहू सरदारांस १५,९६,००० पंधरा लक्ष शहाणव हजार रुपयांचा मुलूख खर्चास लाऊन दिला. याशिवाय फुटकर गांवें सरंजाम खर्चास दिली. त्याची नावें खालीलप्रमाणें.

| | | | स्वार |
|---|---|---|---|
| १ | राजश्री शिंदे चौंडीकर | १ परगणे निंबाहडा निम्मे महाल | ६५ |
| २ | राजश्री काशीराव होळकर | १ परगणे कायथे | ० |
| ३ | चंद्रचूड यशवंतराव गंगाधर | १ मौजे केसोद प्रांत मेवाड | ० |
| ४ | रा. शितोळे | १ करई पैकीं | ५ |

ज्या सरंजामी गांवांचा खुलासा उपलब्ध नाहीं अशीं नावें खालीलप्रमाणें :

(१) रा. बांडे, (२) रा. पिंगळे., (३) रा. जगताप, (४) रा. बोराडे, (५) रा. गीते. (६) रा. कालगांवडे, (७) रा. गुंजाळ, (८) रा. कोकरे, (९) रा. कारले, (१०) रा. थोरात, (११) रा. पुरंधरे, (१२) रा. दाभाडे, (१३) रा. इंगळे, (१४) रा. जाधव, (१५) रा. चिखले, (१६) रा. बहाड, (१७) रा. गांवडे, (१८) रा. धायगुडे, (१९) रा. होंगाडे, (२० रा. डोयफोडे, (२१) रा. म्हसके, (२२) रा. मकाजी गायकवाड.

एकंदर वरील सरंजामी जहागिरदार व सरदारांस छत्तीस महाल उत्पन्न ह्यांचे अजमासें ३२,५७,००० बत्तीस लक्ष सत्तावन्न हजारचें दिले होते. सैन्य कोठून जमवीत. (याजबद्दल तुकोजीराव होळकर व मराठे ह्यांचे पत्रव्यवहारांपैकीं कांहीं खुलासा खालीलप्रमाणें : (डिसेंबर इसवी सन १७९२)

''फलटण वगैरे देशचे लोक देखणे मात्र, परंतु आवच पहावा. याजपेक्षां पंढरपुराकडील बालेघाटचे, सरदेचे हाटकर, सेलार, धनगर, पाखरे, ढोणे, सेडगड, जाट वगैरे चांगले. त्यांजला ठेविल्यास माणूस घोडे चांगले आणि सालस. याजकरितां फलटणचे न ठेवितां बालेघाटाकडील नीट ते ठेवावे. फलटणाकडील कांहीं अटळाचे चांगले असल्यास सोईचे आल्यास पहावे. बिना फौज नवीन ठेविल्यावांचून कोणतेही ठीक नाही. येथें जुनी फौज आहे ते कांहीं उपयोगी नाही. पैशांस मात्र जाट आहेत. फलटण वगैरे जागाचे लोक वडिलांचेही सर्व ध्यानांत आहे. उपयोगी तें करावें म्हणोन वगैरे.''

प्रत्येक सरंजामी सरदारांचा गोट असे. त्या गोटात सरदारांसन्निध असलेले शास्त्री, पंडीत, पुराणिक, वैद्य व ज्योतिषी यांचाही योगक्षेम चाले. पागे, पथके, हिशेबी कारकून यांचाही समावेश त्यात असे. नालबंदी करणारे, चांभार, धोबी, तंबू ठोकवणारे व शिवणारे या सर्वांचा समावेश व निर्वाह या गोटांत होई. सारांश, हे सरंजामी सरदार लहानशा प्रमाणावर राजे असत. त्याप्रमाणें अहिल्या मातोश्री त्यांचा बोज राखीत व वेळीं कानउघडणीही करीत. याची दोन उदाहरणें सरकारी कागदपत्रांवरून खालीं नमूद करितों.

सुभेदार तुकोजीरावांनीं स्वारीतून खर्चाचे पट्टीचा कागद मातोश्रींकडे पाठविला तो कागद नामंजूर झाला. कांहीं कालाने तुकोजीरावांनीं विनंती केली कीं सरंजामी सरदारांवर यादी बसवून रक्कम जमा करून पुण्यास पाठवावी. त्यावर मातोश्रींचे उत्तर येणेंप्रमाणें गेलें. ''सरंजामी सरदारांस त्यांचा त्यांचा खर्च आहे. त्यांच्या गोटांतील हजेरीप्रमाणें त्यांस नेमणूक

आहे. ते स्वत: जातीनिशीं तळावर सेवेत हजर असतां त्यांच्यावर यादी करावी हा न्याय कोठचा? याप्रमाणें सरदारांची योग्य वेळीं बाजू धरली. पण अन्यायाच्या समयीं मुरवत न धरितां रयतेची बाजू धरून सरदारांस शुद्धीवर आणले. ह्याचेही एक उदाहरण आहे. महतपूरचे सरंजामी सरदार रयतेपासून अन्यायाने वसूल करूं लागले. रयतेने मातोश्रींकडे धाव घेतली. सरदारांस व रयतेच्या पुढाऱ्यांस आपणासमक्ष बोलावून दोघांचेही म्हणणे समोरासमोर ऐकून घेतलें. रयतेस सरदारांकडून न्याय देवविला आणि सरदारांसही आपला उग्रपणा दाखविला. सारांश, सरंजामी सरदार हे राज्ययंत्रांतील चक्रस्थानीं योजून त्यांजकडून योग्य तें काम करून घेतले, पण नाकापेक्षा मोती जड होऊं दिले नाहीं.

श्रीमंत मातोश्री अहिल्याबाईसाहेबांची 'सरंजामी सरदारांशीं वागणूक कशी होती'. या संबंधात खालीत चार पत्रें अनेक दृष्टींनीं मननीय आहेत.

(१) चिरंजीव राजश्री तुकबास प्रती अहिल्याबाई होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें. विशेष तुम्हांकडोन राजश्री अप्पाजीराम व पाराशरदादाजी आले त्यांनीं तिकडील साधन निवेदन केलें. त्यांतील अर्थ आम्ही देशीं आल्यावर स्वरूपायोग्य कोणती गोष्ट घडून आली. पुढेंही एखादी मसलत केल्याखेरीज निरोप न द्यावा हे कारभारी याचे मनास आणि आपल्या स्वरूपास उचीत तें करणें त्याअर्थीं मोहीम कबूल करण्यांत चांगले. मोहिमेस जमियत असावी. जमियत पैशाखेरीज होत नाही. पैशाचा अर्थ पाहातां स्वदेशाच्या महालाच्या रसदा घेऊन श्रीमंतांकडील भरणा केला. फौजेस ऐवज पाहिजे. त्याची तजवीज कैसी करावी हे ध्यानास आणून जास्त ऐवजाचा उपराळा होऊन प्रसंगास उपयोगी ते करावे. म्हणून बोलणें. ऐसीयासीं देशीं गेल्यावर एकएक अवडंबर येत गेले. तुम्ही प्रसंगीं असोन कांहीं न घडावे हे उत्तम नाही. कैलासवासी तीर्थरूप सुभेदारांची रीत कोठें? कांहीं न्यूनता ध्यानांत येतांच सांगितल्याची प्रतीक्षा न करितां बदोबस्त करीत होते. याजमुळें कोणाचाही जाबसाल सहसा होऊं न पावला. त्या धोरणास जपून कर्तव्य करावें उचित, परंतु याची सावधानी अगोदर असावी. तो प्रकार राहिला नाही. बरसात येऊन पोहोंचल्यावर योजना केली. इकडील सरंजाम तोफा वगैरे बरसातींत कैशा पावाल? तथापि तयारी होतच आहे.

ऐवजाचा मजकूर तर पेशजी इंदूरचे मुक्कामीं समजाविशींकरितां सावकारापासोन ऐवज घेऊन त्याऐवजीं महाल लावून दिले. त्या ऐवजींची फेड होई तोंपावेतों महाली वरात करूं नये. ऐसे असतां तुम्ही गुजराथ प्रांतींहून आल्यावर दुसरें समजाविशींचा राडा पडला. ऐवज पाहिजे तेव्हां निम्मे ऐवज सावकारास देऊन निम्मे सरकारांत घेऊन फडशा केला. गुदस्त तोतियाचे मसलतीमुळें फौज ठेवावी लागली. त्याकरितां ऐवज पाठवावया अन्वयें पत्रें निकडीचीं आलीं. तेव्हांही तिगस्ताप्रमाणें तोड काढून यादी करून पाठविल्या. त्याप्रमाणें विष्णू महादेव याजकडील महालांचा ऐवज दरोबस्त त्याचे कर्जात दिला. मणीराव नागनाथ याजकडील निम्मे ऐवज रद

कर्ज देऊन निम्मे सरकारांत घेतला. रा. गो. रघुनाथ (गानू) याचे विद्यमानें सावकाराचा ऐवज देणें त्याजला महाल लावून दिले. त्यापैकीं चांदवड व नंदुरबार येथील रसद ठरावून सावकाराकडे एक रुपया न देतां दरोबस्त ऐवज घेतला. घोडीं पोषणार्थ प्रगणे थालनेरपैकीं साडेसत्तावीस हजार रुपये देविले होते. तर कांहीं तिकडे आल्यावर नगद देतात. ऐसें झालें, तेव्हां तोही ऐवज तिकडेच नेला. सावकर वाट पाहतच राहिले. अशा रीतीचा कारभार जाहल्यावर ज्यानें पुढें होऊन ऐवज घेऊन दिला त्याचा परिणाम काय? जो करार ठरल्यांत आला त्याप्रमाणें सर्व सही राखावें. तरी दौलतीत चार माणसें राहून उपयोगी पडतील. अधिक उणा प्रकार केल्यास एक वेळ झीज खाईल. दुसऱ्यानें उभा राहणार नाही. हें समजलें असोन डोळेझांक करून सालमजकुरचाही ऐवज दोही महालचा ऐवज दुसाला घेतला. त्याचा मोबदला दुसरें ठिकाणीं लावून द्यावा हें तुमचे गांवींच नाहीं. याप्रमाणें सर्वांपासून ऐवज घेतल्यास तुम्हांसही अवघड पडणार नाहीं. तेंही न केलें. असो. जितके लिहावें तितका विस्तार मात्र आहे. दोन-दोन महिने काशीस जाऊन बसलें, त्याचा जाबसाल देखील येत नाहीं तेव्हां लिहून साध्य काय? कर्तव्य ते करीतच आहांत. त्यांत सारासार विचार पाहून दौलतीस चांगले परिणामीं नीट तें करावें. घडल्या गोष्टीवर दृष्टी देऊन अंगांवेगळें टाकल्यास ठीक दिसत नाहीं. याजकरितां सालमजकूरचे रसदेचा अजमास झाडा करून अलाहिदा पाठविला आहे. तो मनन करून त्याप्रमाणें ऐवज घेऊन व्यवस्था केल्यास कोणासही जड पडायचें नाहीं. सरंजामी याजकडील कर्जपट्टी व महाली दहकपट्टी वगैरे ऐवज तो ऐवज निकडीच्या प्रसंगांस येऊन उपयोगी पडेल, हें कळतच असे. सरंजामीयापासोन चाकरी घेणें नसल्यास कर्जपट्टीचा ऐवज त्याचा अर्थ न पाहतां, निकड करून घेतल्यास चिंता नाहीं. चाकरी घ्यावयाची उमेद त्या अर्थी त्याचे मनोगतच राखून कर्तव्य तें करावें लागेल. तैसाच दहकपट्टीचाही जाबसाल देशीं घेतला त्या भरवशावर माळवे प्रांतीं घेऊं म्हणाल तर वसूल होणार नाही. उलट जहागिरीच्या मात्र ऐवजास खामी पडेल. ऐसें समजोन कारकून ठेवून घेतले. पुढें हंगामशीर पाहून कर्तव्य तें केलें जाईल. (इ. स. १७७६)

(२) (ता. १२ आगष्ट १७८८) चिरंजीव राजश्री तुकबास अहिल्याबाई होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेष. तुम्हांकडून चि.रा. तुळसाजी वाघ यांजला बोलावून खिजमतदार आले त्यांनीं इंदुरीं मशारनिल्हेस अटकाविले आहे म्हणोन विदित झाले. ऐसीयासी खिजमतदार आल्याचे पूर्वीचे येथून चिरंजीवास सत्वर जाण्याविशीं ताकीद करून रवानगी केली. महतपुरी जाऊन वरचेवर तेथील बंदोबस्त करून जातो असे बोलून गेले, त्याप्रमाणें येतील. खिजमतदाराचे प्रयोजन नाहीं. यास्तव हें पत्रलेखन केले असे. तरी खिजमतदार मशारनिल्हे तुम्हांकडे मार्गस्थ करून महालीं जाऊन दिवसगत न लावितां जलदीनेंच येऊन पोहोंचतील.

बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

(३) (ता. २९ मार्च इ. स. १७८९) श्रीमंत महाराज मातुश्रीबाईसाहेबांचे सेवेशीं आज्ञाधारक चिमाजी बुळे दंडवत विनंती विज्ञापना ऐसीजे. सरदारी कर्जदार जाहली याजमुळें स्वारीसमागमें चाकरीस जाणेचा योग घडला नाही. सांप्रत महाराजांस विनंती करून करार केला असे. पुढें स्वारीस दोनशें स्वार सरनौबत यांजबरोबर पाठवितों. त्याची सिद्धता आजपासून करून अखेर ज्येष्ठ मासीं सरंजाम लष्करांत दाखल करितों व मागाहून आम्ही विजयादशमी करून जाऊं. गेलो तरी महाराजांचे विचारास येईल ते करावें. मिती चैत्र शु. ३ शके १७११ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

(४) सन १७८१ चि. सौभाग्यवती पार्वतीबाई वाघ यांसी अहिल्याबाई होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें विशेष. परगणे महतपूर येथील गांवगन्नाचे पाटील सरकारांत आले होते. त्याचे समजुतीस मामलेदार व फडणीस, मुजुमदार, जमीदार आले. त्यांचें वर्तमान ऐकून पुढें वहिवाट करणें त्याची याद कलमबंदीवार अलाहिदा ठरवून देऊन चि. रा. तुळसाजी वाघ यांचें नांवें लिहून हें पत्र तुम्हांस लेखन केलें आहे तरी तुम्ही आपल्याकडून मामलतसंबंधीच्या जाबसालांत ओढ न करितां, महालचा जाबसाल येईल जाईल तो मामलेदारांकडे पाठवून देत जाणें. कदाचित तुम्हांसच मनास आणावा असा असल्यास मामलेदारांस बोलावून आणून त्यांचे विद्यमानें मनास आणून निर्गम करून देत जाणें. याद ठरवून दिली आहे. त्यात लटके दिक्कतीचे जाबसाल न करितां सर्वांची खातरजमा करून, यादीप्रमाणें बंदोबस्त करून देऊन पुन्हा बोभाट न ये तें करणे.

पहिल्या पत्रांत मल्हारजींची वागणूक दाखवून तुकोजीरावांची कानउघडणी केली आहे. पेशवे दरबाराकडे आपली योग्य बाजू न मांडल्यामुळें तुकोजीरावांची फसगत कशी होत गेली हेंही त्या पत्रांत निदर्शनास येते. तिसरें, सावकारी देणें फेडण्यासाठी सुभेदारासारख्या संपन्न माणसांची वेळीं त्रेधा उडून साहुकारांच्या कच्छपी त्यांस पडावें लागें. तत्कालीन राज्ययंत्रातील हे व्यंग प्रथम फारसें भासलें नाहीं, पण कालांतरानें सिंहासनस्थ सत्ता कमकुवत होतांच या व्यंगाचे दुष्परिणाम सर्व राष्ट्रास भोगावे लागले. मातोश्रींनीं पुणें दरबार, आपला स्वत:चा कारभार आणि सरंजामी सरदार यांमधील ऋणानुंबधाचा काटा किती सूक्ष्म व न्याय्य ठेवण्याचा प्रयत्न केला, हें पहिल्या पत्रावरून दिसेल. सर्व बाजू सांभाळून पडतें कसे सावरावें, हे दुसरें पत्र शिकवितें. तिसऱ्या पत्रांत बुळे सरदार एवढ्या मोठ्या मानाचे, पण कामांत खामी पडतांच आपण होऊनच मातोश्रींस विनंती करितात. म्हणजे मातोश्रींची दहशत किती होती हेही दिसेल. चौथ्या पत्रांत सरंजामी सरदार मोठ्या मानाचे; त्यांस 'राजे' ही पदवी होती; तरी पण रयतेसंबंधाचे वागणुकीत न्यून पडतांच त्यांची मुरवत न धरितां रयतेची बाजू रुजू करून दिली. कारवाईचा दीर्घसूत्रीपणा न अंगिकारितां दोन्ही पक्षास समोरासमोर आणल्यामुळें, सत्य बाहेर पडण्यास विलंब मुळींच लागला नाहीं. कलमबंदी दोन्ही पक्षास बांधून दिली. वादाचें बी मुळांतच उखडून टाकिलें. इतर सरंजामी मातबरांस

धडा पोहचला आणि नाकापेक्षां मोती जड होण्याची चिंता राहिली नाहीं.

सरंजामी सरदारांसंबंधीं हा प्रकार. जवळच्या अधिकारी वर्गासंबंधीं वागणूक दूरदृष्टीची, प्रेमाची, आणि माणसें सांभाळून धरण्याची असल्यामुळें लायक माणसांचा पदरीं संग्रहच होत गेला; आणि त्या माणसांचा कामाचा उरकही तसाच श्रमाचा, कीर्तीचा व शहाजोगपणाचा जाहला. ह्या संबंधांत खालील उतारे मननीय आहेत.

(१) सन १७७६ त रोजकीर्द श्रावणमास मुक्काम महेश्वर शके १६९८ दुर्मुखनाम संवत्सरे श्रावण शुद्ध ५ ते दिवशीं राजश्री गोविंद रघुनाथ, गोत्र काश्यप, सूत्र हिरण्यकेशी, शाखा तैतीर्य, उपनाम गानू, पाटील मौजे कलबस्ते तालुके संगमेश्वर प्रांत राजापूर, यांनीं कसबे महेश्वर प्रांत नेमाड येथील मुक्कामीं विनंती केली कीं आम्ही कुटुंबवत्सल पुरातन या राज्यांतील सेवक सरकाराची सेवा बहुत दिवस केली. यास्तव कृपाळू होऊन एक गांव आम्हांस खर्चाचे बेगमीस इनाम करून दिल्हा पाहिजे. म्हणोन त्याजवरोन मनास आणितां मशारनिल्हे पुरातन सेवक सेवा एकनिष्ठपणें फार दिवस केली. यांचे चालविणें आवश्यक जाणोन मौजे बांगरदा परगणे सावेर हा गांव खेरीज हक्कदार व इनामदार करून बाकी अंमल दरोबस्त थल, मोड व थलभरीत, कुलबाबसुद्धां पंत मशारनिल्हे यांस संसाराचे बेगमीस साल मजकुरापासोन इनाम करार करून देउन ही सनद सादर केली असे. तरी मौजे मजकूर खेरीज हक्कदार, इनामदार, करून बाकी अंमल दरोबस्त थलमोड, थलभरी, कुलबाबसुद्धां मशारनिल्हेस दुमाला करून देऊन चालविणें. प्रतिवर्षी नवीन पत्रांचा आक्षेप न करितां या पत्राची प्रती लिहून घेऊन हें अस्सल पत्र पंत मशारनिल्हेस भोगवटियास परतोन माघारें देणें. म्हणोन सनद.

(२) ता. २-६-१७९२ श्रीमार्तंडभैराव प्रसन्न
गंगाजलनिर्मळ मातुश्री बाईसाहेब स्वामी गोसावी यांस,

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित नीळकंठराव तुकदेव चिटणीस कृतानेक साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील वर्तमान माघ शुद्ध १० पावेतों किल्ले निफाड येथें आपले कृपावलोकनें करून सुखरूप आहों विशेष. आम्ही श्रीमंत सुभेदार व खंडेरावबाबा, मालेरावबाबा कैलासवासी झाल्यावर इंदूरहून घरीं बसलो. आपणापाशींही न आलों. मातोश्रीचा वृद्धापकाळ यामुळें राहिलें तो आमचे स्त्रीस देवआज्ञा झाली. मुलें लहान. हें ईश्वरे वाईट केलें. असो. श्रीमंत राजश्री तुकोजीरावही नेत होते ते न गेलों. दरख चिटणीशीचा चालू करावयास दहा हजार नजर द्यावे म्हणत होते. आमचें जाणें न झालें. चि. रा. मैराळराव बापू आपल्याजवळ आहेत. फार उत्तम आहे आम्हांपासून रुसून गुजराथेंत जात होते तो उंबराण्याचे तळावर चि. रा. मल्हाररावबाबांची भेट झाली. आमची पागा व पालखी सरंजाम घरीं पोंहचविला. चिरंजीवास पांच-सात घोडीं बसावयास याप्रमाणें सडे ठेविलें. इकडे दाजीबा विंचूरीं आले त्याहीं आम्हास व मातुश्रींस धरून नेलें. त्यांजला परभारीं सरकारी पत्रें आली, मग सोडलें. याप्रमाणें श्रीने दोष श्रीमंत शाहू छत्रपती व कैलासवासी सुभेदारसाहेबांपासून न लागला तो दैवास आणिला. ही लज्जा आपणांस असावी. पूर्वी

श्रीमंत सुभेदार, रा. गंगाधरपंत तात्याही दरमहा रु. २२५ रोजमुरा व नालबंदी घरबेगमीस रुपये ४००० व पालखीस रुपये ६०० सरंजाम व सणगे दसऱ्यास व पाडव्यास आख रुपये १२०० दर पोषाखास सणगे साडेतीन प्रमाणें देऊन सव्वाचौदाशें लोकांनिशीं चाकरी घेत होते. आतां आपण वडील धनी आहां. कळेल त्या रीतीनें मुलास रीतीस लावून सन्निध ठेवणें याची लज्जा सर्व आपणास असावी. चिरंजीव ओटींत आहे. अपराध क्षमा करून पावन करावें. बहुत काय लिहिणें लोभवृद्धी करीत असावी हे विनंती.

(३) (ता. ३० आक्टोबर इ. स. १७९१) श्रीमंत मातुश्रीबाईसाहेबांचे सेवेशीं आज्ञाधारक लक्ष्मणराव नरहर कृतानेक विज्ञापना ऐसीजे. येथील सेवकांचे वर्तमान साहेबांचे कृपेकरून यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. विशेष. तीर्थरूप कैलासवासी सबनीसांचा काळ झाल्यानंतर सेवेशी विनंती पत्रें रा. आनंदराव बाळाजी यांजवळ पाठविलीं होतीं. तीं सेवेशी प्रविष्ट केली न केलीं हें न कळे. तीर्थरूपांनीं महाराजांचे पायाचा आश्रय करून सेवा केली. त्याचें सार्थक होऊन ते गेले. आम्हांस महाराजांचे पदरीं घातलें आहे. महाराजांचे अन्नाचे पिंड आहोंत. याचे पावन करणार महाराज समर्थ मायबाप धनी आपण आहांत. आम्हांस आपल्याशिवाय आधार नाहीं. सेवकासी राजश्री महिपतरावजी विनंती करतील ती मनन करून सेवकांस अभयपत्र यावें. वडिलांनीं साठ वर्षे आपली सेवा करून आम्हां सर्वांचे संगोपनास महाराजांचा आश्रय करून ठेवला आहे. येविसीं सेवकाने विस्तारें विनंती काय लिहावी. माझी ही वृद्धापवस्था झाली असे. याचा निर्वाह करणार महाराज आहेत. याउपरीं सेवकाची उपेक्षा केल्यानें वाचणें कठीण असें. जाणून विनंती लिहिली असें. कुटुंब घेऊन महाराजांजवळ यावें असें मानस. येविसीं कृपा होऊन आज्ञापत्र पाठविण्यास आज्ञा केली पाहिजे. बहुत काय लिहणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

***पत्रांक १ :*** यांत रा. रा. गानू यांस त्यांचे मागण्यावरून जहागीर दिली म्हणोन उल्लेख आहे. हे गानू आतां खासगीवाले या उपनावानें प्रसिद्ध आहेत. श्रीमंत मातोश्रीसाहेबांचा खासगीकडील कारभार हे पाहत म्हणून खासगीवाले हे नांव पुढें झाले. मातोश्रींच्या कारकीर्दीत जी धर्मदाय कृत्यें झाली ती बहुतेक या गोविंद रघुनाथ गानू यांचे देखरेखीखालीं झाली. तेव्हांपासून हे यांचे वंशज ‘खासगी दिवाण’ या नांवानें संबोधिले जातात. ‘दौलत’ आणि ‘खासगी’ अशा दोन नामाभिधानाखालीं इंदूर संस्थानाचा कारभार चालतो; खासगीची गादी इ. स. १७३४ त स्थापना झाली. त्याचा उल्लेख आलाच आहे. त्याप्रमाणें दौलत आणि खासगी हीं दोन पृथक हल्लीं आहेत. गोविंद रघुनाथ गानू यांजपासून खासगी दिवाणगिरी जी सुरू झाली ती आतापर्यंत बहुतेक त्यांचेच घराण्यांत चालू आहेत.

***पत्रांक २ :*** हे हुजूरचिटणीस घराण्यांतील पत्र आहे. त्यामध्यें चिटणीस घराण्याचा

राजघराण्याशीं घरोबा व ऋणांनुबंध दृष्टीस तर पडतोच; शिवाय त्याप्रमाणें त्या घराण्यास काय काय नेमणुका होत, तेही पहावयास मिळते.

***पत्रांक ३ :*** यात सबनीस घराण्याची हकीगत आली आहे.

सारांश, होळकर राजवटींतील राज्ययंत्राचा अगदी वरचा भाग सरंजामी सरदार आणि त्याचाच खालचा दुसरा भाग म्हणजे दिवाण, फडणीस, चिटणीस, सबनीस, इत्यादि. या दोन्ही भागांशी मातोश्रीसाहेबांची वागणूक कोणत्या प्रकारची होती आणि त्या लोकांची कामगिरी कोणत्या प्रकारची झाली याचे दिग्दर्शन या वरील पत्रांवरून होणारे आहे.

**आधार ग्रंथ**

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
कर्नल ल्यूअर्ड साहेबांनीं संशोधिलेले कागदपत्र



**प्रकरण २२ वें**

---

# देवी अहिल्याबाईंचा राज्यकारभार

*''स्वाम्यमात्यश्च राष्ट्रं दुर्गः कोशो बलं सुहृत् ।*
*परस्परोपकारीदं सप्तांगं राज्यमुच्यते ।।''*
(कामंदक)

आर्य चाणक्यांचा अर्थशास्त्र हा ग्रंथ आतां चांगलाच प्रसिद्धीस आला आहे. त्यांत आर्यांची राजनीति समाविष्ट आहे. कामंदक हे इसवी सनाच्या सातव्या शतकांत जन्मले असें पुराण व इतिहासतज्ञांचे मत आहे. आर्य चाणक्यांच्या ग्रंथांत कालमानानुसार फेरबदल करून कामंदकांनीं आपला ग्रंथ लिहिला. वरील श्लोकांत राज्याची सात अंगें निवेदिली आहेत. छत्रपती शिवाजी महाराजांचे अमात्य व छत्रपतींचे पश्चात् पाव शतकभर झालेल्या मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धांचे सूत्रधार रामचंद्रपंत अमात्य यांनीं लिहिलेला (आज्ञापत्र) ग्रंथ हा कामंदकांचेच प्रतिबिंब आहे. तेव्हां मराठेशाहीतील राजनीतिचा तराजू तोच ग्रंथ धरून चालण्यास हरकत नसावी. ग्रंथाचा ''मागील प्रकरणांत'' उल्लेख होऊन गेलाच आहे. तीच विचारसरणी येथेंही धरिली आहे.

वरील श्लोकाचा अर्थ येणेंप्रमाणें. (१) स्वामी, (२) अमात्य म्हणजे मंत्री, (३) राष्ट्र म्हणजे प्रजाजन, (४) दुर्ग म्हणजे किल्ले, (५) कोश म्हणजे भांडार, (६) बल म्हणजे सैन्य व (७) आप्त इष्टगण ही परस्परांस मदत करणारी राज्ययंत्राची अंगें होत. मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत ही अंगें कशी होती, अंगाअंगाचे चालक कोण होते व त्यांची वागणूक कशी होती हे साधार खालीं नमूद करूं या.

**स्वामी**

स्वामी पेशव्यांनीं सुभेदारीचीं वस्त्रें तुकोजीरावांस दिली ही गोष्ट खरी, पण जनमनांत अहिल्याबाई याच स्वामी होय हे अगदी ठरल्यासारखेंच होतें. खुद्द पेशवे आणि इतर राजेरजवाडे मातोश्रीसाहेबांसच मानून तसेच चलनवलन ठेवीत होते आणि स्वत: त्याही स्वामीपणाच्या दर्जानें वागत होत्या. सर जान मालकम यांस मातोश्रीसाहेबांबद्दल आदर व कुतूहल वाटत असल्यामुळें भारमलदादा होळकर यांचेकडून पुष्कळशी माहिती त्यांनीं मिळविली. तीवरून मातोश्रीसाहेबांची दिनचर्या आम्ही खाली देतों.

**दिनचर्या**

अहिल्याबाई ह्या सूर्योदयापूर्वी घटका-अडीच घटका उठून स्नान करीत व नंतर पूजाअर्चा करीत. या नंतर त्या नियमितकालपर्यंत पुराण श्रवणास बसत. नंतर दानें देऊन त्या आपणासमक्ष ब्राह्मणांस भोजनें घालीत. हें होत आहे तोंच त्यांचें ताट वाढून येई. त्यांचे स्वत:चें भोजनास सारे शाकभाज्यांचे पदार्थ असत. त्या आपलें भोजन आटपल्यावर पुन: कांहीं वेळ परमेश्वर स्तवन करून थोडा वेळ वामकुक्षी करीत. नंतर पोशाख करून त्या सरकारी कामकाज करावयास दरबारांत जात असत. जेव्हां दरबारांत जात तेव्हां बहुधा दोन प्रहर होत. तेथें सूर्यास्तापर्यंत कामकाज चाले. याउपर एक प्रहर पूजाअर्चा फराळ वगैरे कृत्यांत जाई. मग रात्रौ सरकारी काम मध्यरात्रीपर्यंत चाले.

**राजनीति**

खालील उताऱ्यावरून मातोश्रीसाहेबांचे राजनीतिचे धोरण दिसून येईल.

(अ) बाई बोलत होती जे इंग्रजांनीं चहूंकडून प्रसार करण्याचा मनसब केला आहे. त्यांस या समयास श्रीमंतांनीं शिलेदाराचा व हुजरातीचा पुष्कळ भरणा करावा आणि इंग्रज जागजागां कोठें दोन पलटणें, कोठे तीन पलटणें अशी तोंडें काढिलीं आहेत. अशांत जागजागां फौज पाठवून जे जेथील तेथेंच दाबावे. म्हणजे मागल्याला दहशत पडेल; पुढें कोणी येऊं पावणार नाही. नबाब, भोसले सारे जमा होऊन इंग्रजांचें पारिपत्य करावे. (पत्र इ. स. १७८०)

**अंतर्बाह्य राजनीति**

(आ) पुणें सरकारचे देवाण देणें शिंद्यांनीं दिल्यावर मग आम्हीं देऊ या सबबीवर तुम्हांस (तुकोजीरावांस) टाळतां आलें असतें. पण तोही अर्थ न पाहिला. ऐवज दिला तो कायम समजून दिला हें न कळे असो. पहिल्यापासोन कैलासवासी तीर्थरूप सुभेदार श्रीमंतांच्या दौलतीस आणि आपलें नक्षांस कोणें प्रकारें जपत होते हें ध्यानांत धरून त्या धोरणाप्रमाणें पुढें घडावें हे लक्ष धरणें उचित आहे. (इ. स. १७७६ मध्यें तुकोजीरावांस धाडलेल्या या पत्रावरून मातोश्रीसाहेबांची अंतरराजनीति व बाह्य राजनीति स्पष्ट होईल.)

**प्रांताची झाडून माहिती**

(इ) मातोश्रीसाहेबांस आपल्या प्रांताची माहिती किती बारकाईची व काम करण्याची त्यांची कशी तरतरी होती है खालील पत्रावरून दिसून येईल. पत्र ता. ६ फेब्रुवारी इ. स. १७९५ चे आहे.

पत्र ''गंगाजलनिर्मल मातोश्री अहिल्याबाई यांचे नांवाचा लखोटा होता. सायंकाळचे स्नान करून जपांत होती. खुणे करून सांगितलें कीं भोजनोत्तर पत्रें श्रवण करीन. ते दिवशीं ग्रहणाची कर होती. स्नानें करून, दानें करून, श्रमली होती. दिवसभर उपोषण. रात्रीं भोजन झाल्यानंतर कांहीं कचेरी झाली होती. ती बरखास्त करून, बिछान्यावर एकलीच बसून कारभारियांपैकीं राजश्री विनायक बाजीराव व बाळाजी कृष्ण यांस बोलावून, त्यांजकडून पत्रें अक्षरश: श्रवण केली. सरकारचे पत्र एक (पेशव्यांचें) व नबाबाकडील वकिलाचे पत्राची नक्कल एक होती. मजकूर ध्यानास आणून सरकारआज्ञेप्रमाणें तेच क्षणीं सव्वाप्रहर रात्रपर्यंत बसून, जागांजागां घाट नाके येथील कमाविसदार यांस पत्रें लिहून रवाना केलीं व आसपासचे जवळ होते त्यांस समक्ष बोलावून ताकीद करून बंदोबस्त करविला. दक्षिणउत्तर महालाचे घाट व नाके, चोरवाटा व उभय रेवातीर येथील नावघाट पायउताराचे तर, नेमावरपर्यंत, यांजकडील जिल्ह्यांतील झाडून बंदोबस्त करविला. राजश्री रघुनाथपंत यांस बरहाणपूर येथें पत्रें पाठविली. येथील कमाविसदार यांस व जमीदार भूमिये वगैरे यांस ताकीदी सांगून पाठवून नंतर सवाप्रहर रात्रीस निद्रा केली.'' सारांश, आतापर्यंत मातोश्रीसाहेबांची दिनचर्या अंतर व बाह्य राजनीतिचें धोरण, कामकाजाची तरतरी व आपल्या प्रांताची बारीक माहिती, ही आपण पाहिली. याउपर पेशव्यांचे वकील लिहितात,

''दीड महिन्यांपर्यंत आम्ही येथें होतों. दहा-पांच वेळा मातोश्रीशीं आम्ही एकांतीं भाषणें केलीं. परंतु बाईचे मर्जीचा थांग लागला नाहीं. विश्वास हा कोणाचाही नाही.''

राज्यकर्ती किंवा सत्ताधारी यादृष्टीनें चरित्र अत्यंत हृदयसंगम व्यवहारपटु पण सात्त्विक असें बनलें आहे. आपले यजमान जे पेशवे त्या संबंधाचे खालील उद्‌गार मननीय आहेत.

**पेशव्यांचे गादीशीं वृत्ती**

१ केवळ धनी पै दर पै चाकरीस बोलावीत असतां न जावे आणि घरांतच रामायण करीत बसावें हे कोणास पुरवणार नाही. कामगारांनीं चाकरीच करावी. आपले कजिये लोकांचे येथें गेल्यास मग काय महत्त्व राहिलें?

२ आमचे वडिलांपासून श्रीमंतांच्या पायांशीं अवज्ञा घडली नाहीं. श्रीसर्वोत्तम पुढेंही आम्हांजवळून अन्यथा विचार त्यांच्या पायांशीं घडवणार नाही.

३ श्रीमंतांच्या कल्याणांत आमचें, सर्व जगताचें कल्याण आहे.

**अधिकाऱ्यांवर नजर**

हाताखालील अधिकारी यांजवर नजर कशीं असे :

१ चांदवडचे मामलेदार यांस एका बोहऱ्याने ताझीम न दिल्यामुळें बोहऱ्यास त्रास भोगावा

लागला. मातोश्रींस ही हकीगत कळतांच मामलेदारास पत्र गेलें कीं, ''तीर्थरूप कैलासवासी सुभेदारांनीं कोणकोणत्या प्रकारें आणून रयतेचें संगोपन केलें. अत:पर गैरवाजवी उपसर्ग लागू नये. रयतेची दिलभरी करून हरएक प्रकारें गौर करीत जाणें. फिरून बोभाट आलिया उपयोगी पडणार नाहीं. परिणाम लागणार नाहीं.'' (ता. ६ जून इ. स. १७७६)

**अधिकाऱ्यांशीं वर्तन**

समानाधिकारी जे जे शेजारी होते त्यासंबंधाचें वर्णन : ''निजामासंबंधीं घौशानें एकनिष्ठपणें सेवा केली यावरून नबाबांनींही प्रेम करून वाढवावयाची कमी केली नाही. त्यांचे पुत्राने रीत सोडून चाल धरली. तदनुसार फळही पावतील. ज्यापासून वाढले त्यासीं अवक्रिया केल्यानें परिणाम लागत नाही. श्रीमंतांचे लक्षास नबाब यांचे जपणें अंत:करणपूर्वक कसें आहे. त्याअर्थी श्रीमंतांनीं नबाबाचे कुमकेस फौज रवाना केली उचित आहे.''

(२) मल्हारराव गायकवाड लिहितात,''आम्हांविषयीं पाटीलबाबांस आपण पत्रें लिहून पाठवावी कीं, संस्थानास कांहीं उपसर्ग न होय ऐसे केलें पाहिजे.''

(३) कोट्याचे जालमसिंह झाले लिहितात, ''श्रीमंत महाराज महारावजी श्रीउमेदसिंगजींनीं कृपा करून फौजदारी व किल्लेदारी व हत्ती, घोडे व नगारा निशाण व जव्हाराच्या रकमा, सिरपाव बक्षीस केल्या आणि पांच ठाकूर लोकांची व मुलकाची चाकरी करावयासी सांगितली आहे. हा अगदी प्रताप बाईसाहेबांचाच आहे.''

(४) महादजी शिंदे यांस देवी लिहितात, ''राजे जालमसिंह यांस ताकीद करून वरातीप्रमाणें ऐवज पावतां होय तें करावे.'' (इ. स. १७८०)

(५) माधवराव लक्ष्मणराव वकील हैद्राबाद यांस देवी लिहितात कीं, ''श्रीमार्तंडापाशीं चौघड्याविषयीं दोन तीन वेळां लिहिलें त्यांस ही गोष्ट घडणें घडविणें इच्छा त्याची आहे. अशी कामें लिहिल्यानें अथवा सांगितल्यानें घडतात असें नाहीं. देवास पाहिजेसा होईल त्यादिवशीं कसा करून घेईल हें कळणार देखील नाहीं.'' (ता. २-२-१७८३)

(६) चिरंजीव तुळाराम होळकर पागा निसबत हरकार्य यांसी देवीचे ताकीदपत्र. ''तुम्ही परगणे शेवगांव येथें मागील जुनी खटलीं लोकांची काढून मनस्वीपणें तसदी करितां हे परिछिन्न उपयोगीं पडणार नाही. जाबसाल सरकारांतून समजून घेतला जाईल.''

(७) चि. रा. तुकबास, ''अप्पाजीराम पळसीकर मृत्यु पावल्याचे ऐकोन चित्तास परम श्रम झाले. दत्तक पुत्राबद्दल त्यांस समक्ष सांगितलें होते. पूर्वीपासून आपल्यापदरचे. पुढें संस्थान चालले पाहिजे याजकरितां त्यांचे गोत्राचें मूल लहान उत्तम, चांगले आणवून दत्तविधान करवून संस्थान पूर्ववत चालतें करावें.'' (ता. २१-६-१७७८)

**राज्यकारभारांत तुकोजीरावांशीं वागणूक**

(१) ''ऐवजाची ओढ. तशांत मोहीम कबूल करणें प्राप्त झाली. यास्तव दरोबस्त सरंजामीयांपासून कर्जपट्टी घ्यावी म्हणोन तुमची पत्रें आलीं. बहुतकरून सरंजामी तुम्हांसमागमें आहेत. फणसे, वाघमारे तिकडचे आले आहेत. जाबसाल करतील. खटके, भागवत, महाडिक, राजोळे यांजलाही ताकीद केली. असो. आपल्यास ओढ म्हणोन डोळेझांक करून ऐवज घ्यावा. वरकड त्यांचा विचार पाहतां पेशजी इंदूरचे मुक्कामीं कर्जपट्टी घेतली तो ऐवज त्यांनीं सावकारांपासून कर्ज काढून दिल्हा त्याची अद्याप फेड झाली नाही. इतक्यांत दुसऱ्यांदा कर्जपट्टी देणें आली. तेव्हां त्यांनीं तरी काय करावें? कर्जपट्टी देऊन चाकरीही करावीच लागते. यामुळें त्यांचा ठिकाण राहत नाही. तशांतही रा. गोविंदराव बुळे, चि. रा. कुसाजी वाघ यांची पथके चि. रा. बापू होळकर या समागमें चाकरी आणि तेही सरंजामासुद्धां तुमचे बरोबर आहेत, त्याजला ऐवजाची निकड करून वाघांकडे एक लाख तीस हजार व बुळे एक लाख ह्याप्रमाणें ठरावून दस्तऐवज लिहून घेतले म्हणोन विदित झाले. ह्या दोन्ही सरदाऱ्या बहुता दिवसांच्या वाढविल्या आहेत. त्यांच्या स्थितीत केवळ निष्कर्ष केल्यानें परिणाम नाहीं. पुढें चाकरीही घ्यावयाची उम्मेद. त्याअर्थी त्यांचें मनोगत रक्षून सरकार कामही करावे. जुन्याची उपेक्षा करून नव्यांवर चरितार्थ होईल ऐसें घडणार नाहीं. याजकरितां उभयतांस सूट येणेंप्रमाणें देऊन ऐवज घ्यावा. (१) गोविंदराव बुळे यांजकडे एक लक्ष रुपये ठरविले त्यापैकीं तीस हजार सूट. बाकी सत्तर हजार रुपये राहिले त्याचा दोन हप्त्यांनीं निकाल करून घेणें. (२) कुसाजी वाघ यांजकडे एक लक्ष तीस हजार ठरविले आहेत. त्यापैकीं तीस हजार सूट देऊन बाकी एक लाख रुपये राहिले त्याचा निकाल करून घेणें. एकूण कलमें दोन करार करून हे पत्र लिहिलें असे. साठ हजार रुपये उभयतांचे ऐवजांत मुजरा देऊन बाकीचा निर्गम करून घेणें. सूटीचे ऐवजाचा अंदेशा न करणें. माणसाचें मनोगत रक्षावें यांतच उपयोग फार आहे. इतका ऐवज हरकोठें साधला जाईल.'' (इ. स. १७७६)

(दुसरें पत्र) कमाविसदार तराणा कुसाजी महिपतराव यांस. ''साल मजकुराच्या ऐवजावर चिरंजीवांनीं परभारें वराता लष्करांतून केल्यास आम्हांकडेस लिहून पाठवीत जाणें. येथून लिहूं त्याप्रमाणें वर्तणूक करणें. येथील चिठ्ठीखेरिज ऐवज दिल्यास मुजरा पडणार नाही.'' (इ. स. १७६९)

(तिसरें पत्र) त्रिंबक राजदेव कमाविसदार परगणे इंदूर यांस. ''चिरंजीव तुकबांनीं लष्करांतून नहेखान अरब याजला एक हजार रुपयांची वरात तुम्हांवर दिली आहे. त्यासीं ते वरातीचा ऐवज सरकाराचे आज्ञेशिवाय अरब मजकुरास न देणें. दिल्यास मुजरा पडणार नाहीं.'' (इ. स. १७७०)

स्वामी हें जें राज्ययंत्राचे प्रथम व मुख्य अंग, त्या अंगाच्या निरनिराळ्या बाजू आपण आतांपर्यंत पाहिल्या. कर्तव्याची तीव्र जाणीव व कर्तव्य बजावण्यास आवश्यक असणारें मनोबल, बुद्धिबल व शरीरबल कशा तऱ्हेचे होतें जे वर दिलेल्या सरकारी दप्तरांतील

उताऱ्यांवरून स्पष्ट दिसून येईल. प्रत्यक्ष तुकोजीराव, पण त्यांसही योग्यवेळीं दाबांत ठेविलें आहे. सरदारांस त्याच्या हुद्याप्रमाणें मानिलें, पण त्यांस वरचढ होऊं दिलें नाही. हाताखालील कामगारांसंबंधीही तोच प्रकार. ही झाली सर्व वैयक्तिक बाजू. राजाला केव्हांही झाले तरी मंत्री हा असावा लागतो आणि तो योग्य मिळाल्यास त्याच्या कर्तबगारीचें फळ मालकाची कीर्ति आणि प्रजेची आबादानी अशा श्रेयस्कर रूपानें दिसते. इंग्लडच्या एलिझाबेथ राणीचे भाग्य ह्या तऱ्हेचे होते. एलिस हा कारभारी मिळाल्यामुळें इंग्लडच्या नौकेचें, साम्राज्याचें व व्यापारवृद्धीचें बीज त्याजकडून बुद्धीपुर:सर पेरलें गेले. श्रेय एलिझाबेथ राणीस मिळालें आणि इंग्लंडच्या अभ्युदयास प्रारंभ झाला.

**अमात्य**

**चार कारभारी**

**अमात्य :** मातोश्रीसाहेबांस अशा योग्यतेचा मंत्री मिळालेला दिसत नाही. चंद्रचूड व पळसीकर हे वडिलांचे वेळचे कार्येकर्ते कारभारी. पण मातोश्रींच्या कारकीर्दीत हे भूतकालीन होऊन बसले. पेशव्यांचा वकील इ. स. १७८२ सालीं लिहितो, ''कारभारी चार आहेत. एक मुकुंदराव, नारो गणेश यांचे भाचे. ते दिवाण सरंजाम महाल आहेत त्यांचा कारभार त्यांजकडे. दुसरें, छोटे मुकुंदराव. ते नारोपंत यांचेच निसबत. त्यांजकडे जामदारखाना. तिसरे, गोविंदपंत गानू ते खासगत देशीं महाल खेडीं आहेत, त्यांचा हिशेब व खाजगत खर्च, जमाखर्च ते पाहतात. चौथें, बाळाजीपंत दप्तरदार तेही आहेत. कुल अख्त्यार आपला ठेविला आहे. जें करणें व देणें ते आपल्या परवानगीशिवाय होत नाहीं.'' ह्यावरून कुशल मंत्री मातोश्रीसाहेबांस लाभला नाहीं असेंच म्हणावें लागतें.

**पुराणिक 'पाचे' अंबादास**

मंत्री दोन तऱ्हेचे असू शकतात. पुरातन हिंदु राजवटींत उपाध्याय हा कुशल मंत्री जाहल्याचे पुराणांतरीं आपण वाचतों. इतिहास व पुराणें राजास वाचवून दाखवून अप्रत्यक्षपणें कुशल मंत्र्याचे काम त्याचे कडून होई. त्याकाळीं उपाध्यायाची विद्या, तपोबल, निरपेक्षबुद्धी यामुळें हें कार्य सुलभपणें घडे. सम्राट अशोक व हर्षवर्धन हे या तऱ्हेचे भाग्यवान नृपती होऊन गेले व उपगुप्तादि उपाध्याय यांजकडून उपयुक्त असें ज्ञान त्यास लाभलें. सर जान मालकमसाहेबांस मातोश्रीसाहेबांबद्दल अत्यंत आदर वाटत असल्यामुळें त्यांनीं कसून जी चौकशी केली तीत खालील माहिती मिळते. 'त्यांना पुराण ऐकण्याची गोडी असल्यानें अंगीं लौकरच बहुश्रुतपणा व चतुरता आलीं. चांगल्या लिहिण्यांतलीं वर्मे कळूं लागलीं. स्वत:ही मोठे मार्मिक व खोचदार लिहीत असत. बाईंची पारमार्थिक बाजू पाहिली असतां कात्यायनाची आठवण येते.'' ज्या पुराणिकाकडून त्यांनीं पुराण श्रवण केले व गुरुमंत्र घेतला त्यांचे नांव अंबादास असें आहे. यांचे उपनांव पाचे. हे देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण मूळचे राहणार खानेदशाकडील. ''आधीच्या प्रकरणांत'' जमीदाराची पंचायत दिली आहे. त्यांत जे सत्तावीस पंच नेमिले होते त्यात या अंबादासाचा उल्लेख आहे. (इ. स. १८१९ चा

एक कागद खालीलप्रमाणें आहे.) ''इज्जतदार आनंदराव कृष्ण कमाविसदार परगणे शेवगांव. आजतर्फ कप्तान हेनरी पाटंजरसाहेब बहादूर कलेक्टर सुभे अमदानगर सलामआंकीं, अंबादास पुराणिक, पुणतांबेकर यांस मौजे बालमटाकळी परगनेमजकूर हा गांव होळकर सरकारांतून संसारबेगमीस धर्मार्थ दिला.'' ह्या सनदेत उल्लेखिलेले अंबादास पुराणिक तेच हे देवी अहिल्याबाईंचे पुराणिक होत. यांचे वंशज हल्लीं इंदुरास असोन राजवाड्यातील श्री मार्तंडापुढील श्रीमद्‌भागवताची नेमणूक त्यांस चालू आहे. त्यांचेचकडील कागदपत्रांवरून वरील माहिती दिली आहे. सारांश, अप्रत्यक्षपणें मंत्र्यांचें काम या पुराणिकाकडून झालें असें मानण्यास हरकत नाही.

मातोश्रीसाहेबांच्या कारभारांत कोणी विशिष्ट व्यक्ती अधिकाराची होती असें दिसत नाहीं. सर्वांचे ऐकावें व मनाचें करावें असाच त्यांचा बाणा दिसे. पुराणिक अंबादास हे त्यांचे गुरू होते, असे मालकम यांस शोधाअंतीं कळले होते. पुराणिक बोवांस जहागीर देण्यांत आली, यावरून त्यांचा अधिकार ध्यानीं येतो. गुरूचा अधिकार व शिष्याची कुशाग्र बुद्धी याचा समन्वय नेहमीच असतो असें नाहीं. पण जेव्हां होतो तेव्हां राष्ट्रांत रामराज्य ऊर्फ सुवर्णयुग उदेतें. वशिष्ठ व श्रीरामचंद्र याज्ञवल्क्य व जनक, समर्थ रामदास व छत्रपती शिवाजी महाराज, ही आपलेकडील उदाहरणें होत. थोडाबहुत प्रकार येथेंही झाला असणार. काय संभाषणे झाली असतील, श्रवण आणि मनन कोणत्या ग्रंथाचे झाले असेल, अशा संबंधात कुतूहल उत्पन्न होणें अगदी साहजिक आहे. आपणा सर्वांच्या सुदैवानें मातोश्रीसाहेबांच्या संग्रही असलेल्या ग्रंथांची यादी सरकारी कागदांत उपलब्ध झाली आहे. ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, त्यावेळीं छापखाने नव्हते. ग्रंथ हस्तलिखित असत. त्यामुळें ते दुर्मिळही असत. अशा स्थितीत ग्रंथसंग्रह हा मालकाची आस्था व ज्ञानतृष्णा दर्शवितो. पहिली यादी संग्रहाची आहे, तर दुसरी यादी 'चांदवडहून मागविणें' अशा सदराखाली आहे :

**देवींचा ग्रंथसंग्रह**

**यादी**

१ श्रीधरी अध्याय १८
१ मुहूर्त चिंतामणी
१ महाराष्ट्र विराटपर्व
१ श्री मथुरामहात्म्य
१ आश्रमवास पत्रें
१ वनपर्व लहान सांचा
१ उद्योगपर्व लहान सांचा
१ द्रोणपर्व
१ निर्णयसिंधु पोथी
१ रूख्मिणी स्वयंवर
१ गीतगोविंद सटिक पत्रें
१ नैमिषारण्य माहात्म्य
१ जन्माष्टमी पूजा
१ व्रतार्क पत्रें
१ स्वर्गारोहण
१ सभापर्व लहान सांचा
१ विराटपर्व लहान सांचा
१ भीष्मपर्व
१ चित्रसृष्टीमीमांसा
१ कान्यकुब्ज माहात्म्य

१ भगवद्गीता पंचरत्नी
१ ज्ञानेश्वर नमन
१ श्रीदेवीची मानसपूजा
१ भगवद्गीता
१ महाप्रस्थान पत्रें
१ श्रीज्ञानेश्वरी पोथी
१ अणु वेदांत
१ श्रीविष्णुसहस्त्रनाम
१ अपामार्जन
१ रुद्रन्यास
१ भैरव तंत्रोक्त मन्युसुक्त
१ सर्वसार तिथिनिर्णय
१ श्रीविष्णुप्रतिष्ठा पद्धती
१ श्रावणी निर्णय
१ संवत्सरी श्राद्ध
१ वैद्य निदान
१ रघुवंश सटीक
१ यंत्र विभाग
१ किरकोळ वेदोक्त सूक्त
१ प्रकृती हौत्र
१ ग्रहमख
१ अमरकोश तीन कांडें
१ ब्रम्हपंचिका सटीक
१ व्यंकटेशस्तोत्र वही
१ जंबुमार्ग प्रस्ताव
१ पुष्कर माहात्म्य
१ अध्यात्म रामायण सप्तकांड
१ वेदांची पोथी
१ व्यंकटेशस्तोत्र पोथी
१ मल्हारीकवच पोथ्या दोन
१ मल्हारीस्तवराज
१ नारायण वर्म
१ श्रीचंडिकापूजाविधान
१ सिंहस्थ स्नानविधी
१ उत्सर्जन उपाकर्म (श्रावणी)
१ वापीकूपोत्सर्ग प्रयोग
१ रसमंजरी सटीक
१ चातुर्मास प्रयोग पत्रें
१ विष्णुसहस्त्रनाम भाष्य
१ वायुस्तुति सटीक
१ वेदोक्त आन्हिक
१ दर्शपौर्णिमा पत्रें
१ श्रीगायत्री पद्धती
१ शिक्षा उपनिषत्
१ पद्मपुराणोक्त मल्हारीस्तवराज
१ पंचक्रोशी, नैमिषारण्य माहात्म्य

**दुसरी यादी पुस्तकें चांदवडहून आणविणें**

१ श्रीभागवत द्वादशस्कंद ११४०
१ श्रीरामायण सप्तकांड वाल्मीकी
१ मयूख : (१) शांतिमयूख, (२) समयमयूख,
(३) दानमयूख, (४) श्राद्धमयूख,
(५) प्राय:श्चित्तमयूख,
(६) उत्सर्गमयूख
१ स्मृत्यर्थसार अर्चाप्रकरण
१ काल माधव
१ कार्तिकमाहात्म्य पद्मपुराणें
१ पद्मपराणोक्त भागवतमहात्म्य
१ अर्चादीप
१ यमुना-माहात्म्य
१ संवर्तक-प्रणित धर्मशास्त्र
१ कन्यादानविधी
१ निर्णयसिंधु, मथुरामाहात्म्य
१ हरिवंश
१ मार्गशीर्षमाहात्म्य
१ भारत-समग्रपर्व
१ सर्वसारतिथी निर्णय (ज्योती)
१ स्वप्नाध्याय

येणेंप्रमाणें पोथ्या पाठवून देणें म्हणून बागकरी महादेव यांस पत्रें पाठविलीं. (इ. स. १७८६)

**नारो गणेश रांझेकर**

चंद्रचूड हे होळकर दरबारांतून सुटल्यानंतर पुणें दरबारच्या समंतीने नारो गणेश रांझेकर यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें मिळाली. त्यांच्या सगळा काळ तुकोजीबांबरोबर बाहेरच गेला. मातोश्रींच्या कारभारांत कांहीं विधायक कामगिरी त्यांजकडून झालेली दिसत नाही. सुभेदार यांजबरोबर बाहेर राहून बरीचशी विघातक कामगिरी त्यांजकडून घडली आणि अंतही वाईट झाला.

**विसाजी शामराज अप्रत्यक्ष मंत्री**

याप्रमाणें प्रत्यक्ष वस्त्रें ज्यांस मिळाली ते नामधारीच अमात्य असें म्हणावे लागते. पण वस्त्रें न मिळूनही ती कामगिरी ज्यांचे हातून झाली ते विसाजी शामराज देशपांडे हे होत. पेशव्यांचे वकील लिहितात :

(१) राज्यसूत्रें चालविण्याचे खलबत करण्याकडे अहिल्याबाई, विसाजी शामराज, मावशीबाई आणि महादजी शिंदे. (२) भोपाळवाले पठाण येथें आले ते अस्सल पहिले किल्लेदाराचे भाऊबंद आहेत. त्यांचे बोलणें कीं 'तुम्ही सर्वप्रकारें आमचें साहित्य करणें.' विसाजी शामराज व कृष्णाजी तानदेव आपले मुत्सद्दी बसवून दोन तीन दिवस ये गोष्टींचे खलबत केलें. (३) भोजनसमयीं (महादजीस मेजवानी) राजश्री विसाजी शामराज व नारो शिवदेव व बाईंकडील मंडळी, असे जवळींच बसले होते. (४) वस्त्रें व जवाहीर (पेशव्यांचे लग्नास पाठवावयाचें) बाई व गोविंद रघुनाथ गानू उभयतां बसून काढलीं. तदोत्तर विसाजी शामराज यांस बोलावून दाखविलें. (५) बक्षीगिरीबद्दल सालिना रुपये तीनशेंची नेमणूक. (६) रावेर परगण्यांतील मुजूमदारीची अर्धी नेमणूक. (७) नथ्थूराम आणि धुळा चौधरी जिरापूर जिल्ह्याचे यांस पत्र कीं मौजे बटवाडा परगणे जिरापूर येथील वसूल विसाजी शामराज यांस देणें. (८) सनद जहागीर राजश्री आबाजी विष्णू कमाविसदार परगणे सुलतानपुर यांस स्नेहांकित तुकोजी होळकर दंडवत राजश्री विसाजी शामराज यांनीं सरदारीत सेवा एकनिष्ठपणें केली यास्तव यांचे चालविणें आवश्यक जाणोन तर्फ शहादे परगणे मजकूरपैकीं गांव येणेंप्रमाणें. १ मौजे मादे, २ मौजे धुरखेड, ३ मौजे सिरूड, ५ मौजे बेले, ६ मौजे नांदेड एकूण सहा गांवें तुम्हांकडून दूर करून मशारनिल्हेकडे खेरीज हक्कदार व इनामदार व मोकासा व जकात उभामार्ग करून बाकी अंमल जहागीर व बाबती व सरदेशमुखी दरोबस्त कुलबाब कुलकानू सहित सालमजकूरपासोन जहागीर द्यावयाचे ठरून सनदा अलाहिदा देऊन हे पत्र तुम्हांस सादर केले असे. छ. ७ रविलावल. (ता. ६ एप्रिल १७७८) (९) कै. पंत मशारनिल्हे सरकारपदरचे. त्यामागें त्याचे मुलांबाळांचे चालविणें अगत्य जाणोन मौजे बटावद परगणे जिरापूर हा गांव विसाजीचे पुत्र त्रिंबक विश्वनाथ यांजकडे करार करून दिला. त्रिंबक विश्वनाथ देवलोक जाहले. त्यांची मुले रघुनाथ, शामजी व लक्ष्मण त्रिंबक लहान, यांचे चालविणें अगत्य. ह्या अर्थाची सनद. (१०) (देवी अहिल्याबाईंचे नाना फडणीस यांस पत्र) मौजे निंबसाखर व वरकुटे परगणे इंदापूर हे गांव सरकारांतून पूर्वीपासून

विसाजी शामराजाकडे. आतां ते शहाजाद्याकडे जाणार. कोणेविशीं उपसर्ग न लागें तें करावें. त्यांचे पुत्रावर लोभ करून चालविणें आपलेकडे आहे.

वरील दहा उताऱ्यांवरून विसाजी शामराज यांचा होळकर दरबारांत असलेला दर्जा, त्यांची योग्यता व त्यांनीं केलेल्या कामगिरीचे स्वरूप अजमावतां येतें. पण कामगिरी कोणच्या खात्यांत अगर स्वरूपात झाली हे नमूद करण्यांस कागदपत्रांचा पुरवठा दरबारांत अगर त्याचे घराण्यांत नाही याबद्दल खेद वाटतो. पण अमात्य या सदरांत त्यांची गणना करण्यास हरकत नसावी, असें वाटतें.

**(३) राष्ट्र :** प्रजाजनांच्या हिताअहिताकडे किती लक्ष पुरविले जाई हें खालील उताऱ्यांवरून स्पष्ट होईल.

कांहीं उतारे प्रत्यक्ष प्रजेच्या अर्जासंबंधीं आहेत, तर इतर उतारे अधिकारी वर्गास दिलेले अधिकार व सूचनांसंबंधीं आहेत. त्या सर्वावरून अधिकारी व प्रजाजन यांत सलूख रहावा हे धोरण नित्य ठेविलेलें दिसेल.

१. राजश्री धोंडो गोपाळ मुजुमदार यांसीं : महालानिहायचे सर्व कागदपत्रांचा दाखला एके ठिकाणीं राहावा याकरिता दरखदार, मुजूमदार लोकांची नेमणूक महाली आहे.

२. विसाजी रंगनाथ कमाविसदारांस पत्र कीं कारकून मंडळीस रोजमरा एकदीड माही देणें. म्हणून वराता : २०० विनायक बाजीराव खासे. व २०० नारो गणेश निस्बत मुकुंद हरी. २०० राघो रावजी नि. नारो मल्हार. एकूण सहाशें परगणे मजकूर येथील सालमजकूर ऐवजी कबज घेणें म्हणोन वरात.

३. कमाविसदार परगणे इंदूर यांस अन्नछत्राकडील शिल्लक राहील ती आपलेकडे जमा करीत जाणें म्हणून पेशजी लिहिलें आहे. हल्लीं हें पत्र सादर केलें असे तरी सत्राकडील शिल्लक आपलेकडे न ठेवणें. हिशोबाचा मात्र दाखला राखणें आणि शिल्लक हरी ब्राह्मण यांजकडे राबत आहे, त्याप्रमाणें असों देणें.

४. कलमें ११ निस्बत मामलेदार :

१ नेमणुकीबद्दल यादी महाल मजकूर. मामलेदार वेतन पालखी व शिबंदी नामजात ठाणेजात व भोजनखर्च तीस हजार कुलखर्च.

१ सरकारचे जमीदार, फडणीस, दरखदार आहेत त्यांचे अभागाप्रमाणें काम घ्यावें.

१ सरकार मजकुरीं भील, भूमिये, चोरचोरटे वगैरे बंदोबस्त उत्तम प्रकारें राखावा.

१ परगणे मजकुरीं रयत राजी राखून आबादी, लावणी उत्तम प्रकारें करावी.

१ वर्षासने, रोजीनदार, देवस्थानें सालाबादप्रमाणें चालविणें.

१ जमीदारी वतनसंबंधीं लावारिस व भूमीगतमाल येईल तो दाखल करावा.

१ गोविंद शिवराम रुपये ३००.

१ महालीं जास्त शिबंदी दरोबस्त ५०० पांचशें.

१ आफत फितुरी मुलूख सूट शिरस्तेप्रमाणें दिली जाईल.

१ हूड, जहाल, हिशेबाचें समयीं चौकशी करून मुजरा दिले जाईल.

१ मामलतीचा एकंदर आकडा तो व्यक्तीवर व स्थानावर अवलंबून राहील.

---

११

(५) पायमल्ली व अनावृष्टीसंबंधीं दिलेली सूट. (सन १७८०-८१) पायमल्लीमुळें सूट. श्रीमंत रा. तुकोजीबाबा इंदूराहून देशीं मर्दान्याचे घाटें उतरोन जातां शेताची पायमल्ली झाली. त्याचे चौकशीस सरकारांतून गंगाधर बल्लाळ कारकून व मोतीराम कवडे वगैरे. मखलीशी याद छ.९ मोहरम **(ताळेबंद सरकार बिजागड) २ (स. १७८०)** श्रीमंत राजश्री दादासाहेब व हरी बाबाजी यांचे लष्करचे पायमल्लीमुळें लावणी कमी व पर्जन्याच्या आफतीमुळें पीक कमी सबब वजा रु. २५३३२-११-३

(६) एका पाटलाचे अर्जाचा विचार : जुने पाटलांपैकीं रामचंद्र नाईक येथें आलेले आहेत. त्यांचें बोलणें कीं आमचे वतन जबरदस्तीनें घेतलें आहे. त्यास पेशजी विषयीं कागदपत्र जाहले ते समयीं जाबसाल झाला असेल तसा पाठविणें म्हणजे योग्य विचार करणेस ठीक पडेल म्हणोन आज्ञा.

(७) पांथस्थाचे पोटगीचा विचार (इ. स. १७७९) सनद राजश्री नारो गणेश गोत्र गार्ग्य सूत्र अश्वलायन शाखा शाकल उपनाम गाडगीळ देसाई मौजे अणसुरे कसबे मिटगांवणे तालुके विजयदुर्ग प्रांत राजापूर यांसी. तुम्ही महेश्वर प्रांत नेमाड रेवातीर येथील मुक्कामीं विदित केलें कीं मौजे मजकुरीं पांथस्थ ब्राह्मण वगैरे जातात-येतात त्यांजला अन्नदान द्यावे लागते, यास्तव कृपा करून सरकारांतून कांहीं नूतन वर्षासन दिले पाहिजे म्हणोन. त्यांजवरून मनास आणितां पांथस्थ ब्राह्मण वगैरे यांजला अन्नदान द्यावें. हे धर्मकार्य जाणून मौजे सिवडी परगणे चांदवड येथील माल ऐवजीं सालिना वर्षासन रुपये १०० शंभर साल मजकुरापासोन करार करून हे सनद लिहून दिल्ही असे. तरी साल मजकूरापासून करार करून देऊन सनद दिली असे तरी आपले पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें साल दरसाल शंभर रुपये दरसाल देत जाऊन त्यांनीं मार्गस्थ ब्राह्मण वगैरे येतील-जातील त्यांजला सिधासाहित्य देत जाणें. अधिक श्रावण शु. ३ शके १७०१ विकारी नाम संवत्सरे. छ.१ माहे रजब.

(८) मामलतीचे घालमेलीबद्दल ताकीदपत्र ता. ४ आक्टोबर इ. स. १७९५. ''राजश्री रामराव अप्पाजी यांसी मामलतीची घालमेल अथवा पैशाची वरात कोठें करू नये येविषयीं वरचेवर लिहिण्यांत येत असतां ध्यानांत न राहून परगणे देपाळपूरची घालमेल केली, परगणे इंदूर येथील रसद ठरावून तमाम महालीं रातावरून ऐवज घेतला. निंबाहेडा येथील फडणीसीची आसामी राजश्री आबाजी चौंडाजी यांजकडे बहुत दिवस होती ते काढून दुसऱ्यास सांगितली. ह्याप्रमाणें मनस्वी प्रकार घडतो. म्हणोन विदित झालें. ऐसियासी येथून आज्ञा होईल तितकेच करून तुम्ही असावे ते येकीकडे ठेवून जो नसे समजावितो तसे त्याचे भरी पडून अमार्गे कारभार करितां ही गोष्ट परिछिन्न सोईची नाहीं. याजकरितां खिजमतदार रवाना करून हें पत्रलेखन केलें असे. तरी अत:पर महालाची घालमेल अथवा पैशाची वरात कोठेंही न करितां मामले ज्याचे त्याजकडे कायम राखून कोणापासी पैसा

न घेतां फक्त रोजिन्याचा खर्च सनदी वगैरे व अन्नछत्र आदिकरून लागत असेल तो चालवून, भिल्लांनीं त्या प्रांतीं दंगा केला आहे त्यांचे पारिपत्य करून बंदोबस्त राखणें. निंबाहेडा येथील फडणीशीचें काम पूर्ववतप्रमाणें आबाजी चौंडाजीकडे कायम ठेवणें. याउपरी एखादी गोष्ट घडलिया मुलाहिजा होणार नाही. सारांश, सविस्तरें खिजमतगार सांगतील त्याअन्वयें येथील आज्ञा घेऊन कर्तव्य ते करीत जाणें. छ. २० रविलावल.''

राष्ट्र या शब्दानें प्रजाजन हाच अर्थ विशेष प्रामुख्यानें डोळ्यापुढें येतो. अगदीं अलीकडच्या राजनीतितत्त्वानें प्रतिपादिले जातें कीं राष्ट्रातील प्रत्येक व्यक्तीस पोटभर अन्न, अंगभर वस्त्र, भरपूर प्रकाश आणि निदान प्राथमिक शिक्षण इतके मिळालेंच पाहिजे. मातोश्रीसाहेबांच्या एकंदर कारभाराकडे पाहिले म्हणजे पोटभर अन्नाची व्यवस्था केवळ आपल्याच मुलुखांत नव्हे पण इतरत्रही त्यांनीं करून ठेविलेली वरील पत्रांवरून दिसून येईल. महेश्वर येथील मारू लोकांस उत्तम व स्वल्प असे रेशीम पुरवून अंगभर वस्त्राचा उपक्रमही त्यांनीं केला. त्यावेळीं बहुतेक प्रजा खेड्यांतूनच राहत असल्यामुळें भरपूर सूर्य प्रकाशाचा प्रश्न उद्भवला नाही आणि महेश्वरसारख्या ठिकाणीं व इतर तीर्थ क्षेत्रांचे ठायीं अन्यप्रांतीय शास्त्री, पंडित, वैद्य व वैदिक आणवून जी वसाहतीची योजना केली ती पर्यायानें ज्ञानसंरक्षण व ज्ञानसंवर्धन याचीच योजना होय. श्रीक्षेत्र काशी येथें त्यांनीं 'ब्रम्हपुरी' वसविल्याची ख्याती आहे. ती पुरी म्हणजे ''साधी राहणी व उच्च विचारसरणी'' अशा आजन्म विद्येस वाहिलेल्या समाज–नायकांची वसाहतच होय. ते एक प्रकारचे विश्वविद्यालयच होय. अशा विश्वविद्यालयांतून रामशास्त्री प्रभुण्यांसारखीं विद्वद्रत्नें चमकलीं. मातोश्रीसाहेबांचे हे उदाहरण त्यांच्या सरदारांनीं, जहागिरदारांनीं, इनामदारांनीं यथाशक्ती गिरवल्याचीं अनेक उदाहरणें अनेक कुटुंबांतून आजमितीसही दिसून येतात. मात्र ही पद्धत जरी त्याच रूपांत रोडावत चालली आहे, तरी तिचे रूपांतर शाळा व कॉलेजांतून दिसत आहे.

येथें ''श्रीअहिल्याकामधेनु'' या ग्रंथाचा अतिआदरानें उल्लेख केल्यावाचून राहावत नाही. राजधर्म आपणास यथोयोग्य व यथासांग कळावा या हेतूनें अनेक विद्वानांच्या साहाय्यानें हा ग्रंथ मातोश्रीसाहेबांनीं तयार करविला. या 'कामधेनुचे' अठरा 'वत्स' आहेत. ग्रंथाची रचना अतिचातुर्याची आहे. प्रत्येक विषयावर असलेल्या ग्रंथाचा समावेश करून जरूर तेथें निर्णय दिलेला आहे. यामुळें तत्कालीन प्रसिद्ध व मान्य असलेल्या विद्या, कला, आणि त्यांचे प्रणेते यांचा हा एक कोशच बनला आहे असे म्हणतां येईल. ज्ञानप्रसाराचें कार्य या ग्रंथाने तर केलें असेलच, पण पूर्वापार पद्धती जिवंत ठेवण्यासही या ग्रंथाचा उपयोग झाला असणार. आतां राज्यकारभाराच्या इतर अंगांकडे वळूं या.

(प्रजाजनांचें कल्याण यादृष्टीनें खालील तीन कागद मननीय आहेत.)

**फडणीसीचे कायदे : इ. स. १७७९**

(१) पोते जामदारखान्यापैकीं खर्चाच्या चिठ्ठ्या देण्याच्या फडणीसांनीं दप्तरीं ठेवून पोते व जमादारखान्यावर चिठ्ठी फडणीसांनीं करावी. उचापतीच्या चिठ्ठ्या होतील. त्याजवर

तारीख फडणीसांनीं घालावी.

(२) मुलकी महालचा हिशेब रुजुवात पाहोन सनदी गैरसनदी निवडून फडणीसांनीं समजवावा. धन्याचे उरूबरूत तोडजोड होऊन मखलासी कारभाऱ्यांनीं करावी. कमाविसदार यांस शिक्क्यानिशीं झडती करून देणें, त्याजवर जमा व खर्च बाकी यांजवर एकूणात कारभारी यांनीं करावी. फडणीसांनीं तारीख घालावी. मोर्तबसुद कारभारी यांनीं करावें.

(३) फौजेचा हिशेब करणें, तो हजेरी बरहुकूम धन्याचे उरूबरू फडणीसांनीं दप्तरीहून करवून त्याजवर मखलासी कारभारी यांनीं करावी. हजेरी फडणीस व सबनीस यांनीं घेत जावी.

(४) सिलेदार यांच्या खर्चाच्या व रोजमरे याच्या व किरकोळ यादी सबनीसांनीं लिहाव्या. त्याजवर आंख रुपयांचा घालणें तो धन्याचे उरूबरू कारभारी यांनीं घालावा आणि मखलासीं करावी. धन्याची निशाणी जाल्यावर फडणीसांनीं पोत्यावर चिठ्ठी करावी.

(५) महालपोते व जामदारखाना याची कीर्द एक दिवसाआड फडणीसांनीं तयार करून रुजुवात करावी. पोत्याचा सिलबंद फडणीसांकडे पोतनिसांनीं सुरुवातीस आणून रूजवात करावी. बाकी कारखाने जिरायतखाना, हत्तीखाना, उष्ट्रखाना वगैरेंचा हिशेब त्या कारखान्यांचे कारकून आणतील ते फडणीसांनीं तपासून कारभाऱ्यांसी दाखवून धन्याचे रूबरू फडशा करावा व इतर मखलासी कारभारी यांची व्हावी.

(६) महालावर नेमणुकीच्या, यादी ठरेल त्याप्रमाणें, बेहडा फडणीसांनीं लिहाव्या, तारीख घालावी व मोर्तबसुद कारभारी यांनीं करावी.

(७) सनद किंवा चिठ्ठी देणें म्हणोन फडणीसांनीं करून दप्तरीहून सनद चिठ्ठ्या लिहाव्या.

(८) समाईक, परमुलखी, जाप्त्या व खंडण्या होतील त्याची याद व हिसाब सरकारचे मुतालकीचे फडणीसांकडे फडशे होतील त्याच्या नकला उभयतांकडील फडणीसांनीं लिहून घ्याव्या.

(९) चिटणीसीपत्रें होतील त्यांत फडणीसीकडील असतील ती फडणीसांकडे बार व्हावीं. मसाला भरणें, तो फडणीसांनीं भरावा.

(१०) जामदारखान्याकडे कापड वगैरे खातें. त्याची आंखपट्टी जमेची नफासुद्धां फडणीस-पोतनीस यांनीं धरावी.

(११) कीर्द फडणीसांनीं पोते व जामदारखाना रवासुदगी व दफा ते पत्रांसुद्धां तयार करून धन्यास दाखवावीं. धन्यानें ज्यास पहावयासी सांगितलें त्याने पहावीं. कीर्दीवर धन्याची निशाणी व्हावी, अथवा धनी सांगेल त्यानें करावी.

(१२) झडत्या फडणीसांनीं तयार करवून धन्यास समजवाव्या.

(१३) पागेकडील वगैरे कारखाने यांजकडील चंदी व लागवड वगैरे यादी पागनिसांनीं आणून त्याची चौकशी फडणीसांनीं करून कारभाऱ्यास समजावाव्या व कारभाऱ्यानें धन्यास समजावून धन्याचें निशाण व्हावे.

(१४) शागीर्दपेशा देखील हशम कारकूनास मोघम रुपये दिल्हे असतील ते त्यांनीं वाटावे. रोजमरा हजेरी घेऊन वाटावे. पोतनिसांनीं फडणीसांचे रुजवातीनें एकंदर हिशेब करून मखलासी कारभाऱ्यानें करावी.

(१५) सरंजामी याची चौकशी करणें पडेल तेव्हां फडणीसांनीं कारभाऱ्यांसी समजावावी. सरंजामाचा खर्च दरसाल फडणीसांनीं धन्यांस समजावून करावा.

येणेंप्रमाणें पंधरा कलमें लिहिल्याअन्वयें चालावें. करार.

**मामलतीचा ब्याहडा : इ. स. १७९३**

ब्याहडा परगणें रामपूरा विद्यमान गणपतराव विष्णू कमाविसदार यांस कीं परगणे मजकूर येथील मामलत साल मजकूर पासोन मक्त्यानें तुम्हांकडे सांगोन येथील मक्ता येणेंप्रमाणें महाल चलणी रुपये :

| | |
|---|---|
| ५,२९००१ | सनमजकुरी रुजू गुदस्त आकार रु. ६५,००१ व इजाफा रु. ६४००० |
| ५,२९००१ | सनआर्बातिसेन रुजूगुदस्त |
| ५,२९००१ | सनखमस तिसेन रुजूगुदस्त |
| १५,८७,००३ | |

एकूण पंधरा लक्ष सत्यांशी हजार तीन रुपये तीन साला हकदार, इनामदार व दुमालेगांव व फरोई खेरीजकरून ठेरावून देऊन हे पत्र लेखन केले असे. तरी महालची आबादी उत्तम प्रकारें राखून ठराविक आकार सालोसाल जमा लिहिल्याप्रमाणें करून त्यापैकीं महाल मजकूर वगैरे सालाबादी खर्च येणेंप्रमाणें...

रुपये ११५००० महाल मजकूर बारमाही

७०००० महालसंबंधीं

४००० मामलेदार, जातीस वेतन ३०००, पालखी ८००, शागीर्दपेशा २००,

१००० दरखदार गोविंद रघुनाथ फडणीस ६०० व अप्पाजी मेघ:श्याम मुजूमदार ४००,

५००० कारकून निस्बत मामलेदार इसम चार १२००, व सायरीकडील आकार ९००, दफेदार १० दर २५० प्रमाणें २५००, कोतवालीचे कामावर २००, व कित्ता असामी २००,

एकूण आकार पांच हजारांचा

| | |
|---|---|
| ३००० | शिबंदी स्वार असामी १७५ |
| | आकार २८०००, |
| | व प्यादे असामी १००० दरमहा २५०००, |
| ३००० | खेरीज मुशाहिरे भोजनखर्च वगैरे. |
| १००० | सिरपाव जमीदार वगैरे लावणीमुळें. |
| ३००० | जासती रदबदलीमुळे थोरमहाल सबब. |
| ७०००० | शिबंदी. |
| ४५००० | किल्ले हिंगळाजगड संबंधी. किल्लेदार, कारकून, फडणीस, सबनीस, गस्ती, वगैरे असामी. 'जमादार दफेदार बरकंदाज, स्वार, प्यादे, भिल्ल वगैरे' मिळून. |
| ११५००० | |
| १३१८२-४-० | शेरी नजराणा खासगीकडे ७५०० देवस्थानें १८२-४-० रोजीनदा ५५००. |
| १,२८,१८२-४-० | एकूण आकार सालाबाद वहिवाटीप्रमाणें वजा करून बाकी सरकारांत दाखल करीत जाणें म्हणोन. |

**महसूल (दहक) – इ. स. १७९४**

चिरंजीव राजश्री तुकबास आशीर्वाद विशेष. प्रांत नेमाड व प्रांत माळवा येथें दहक वगैरे सहा कलमांचे ऐवजीं वराता करून पागापथक यांचे कारकून वसूलास रवाना केले व त्यांज समागमें पत्र आले तें पावून लेखनार्थ अवगत जाहला. ऐशियासीं दहक वगैरे कलमांचा ऐवज देशीं व खानदेश प्रांतीं घेतला त्याप्रमाणें इकडेही घेऊं म्हटल्यास मिरासदार, कुणबी अथवा वतनदार पाटील कुलकर्णी कोठें नाहींत. कौलापेक्षां कांहीं अधिक घेतल्यास पुढें त्यानें चित्तास येईल तिकडे जावें. ज्यानें इजारा करावा त्यानें गांवची लावणी टुपणी करावी. पाटलाचे कारणच नाही. कदाचित कोठें असलाही तरी शेत पाहून सारा घ्यावा. हक्क दस्तूर इनामें ही रीतच आहे. तैसाच पटवारी वर्षभर झाल्यावर कामाचा नसल्यावर नवाजुना करावा. जमीदाराचा प्रकार पाहतां इंदुरींचे मुक्कामीं सर्वापासोन पेशकसी घेतलीच आहे. त्यावरही गुदस्तां दो चौ महालाचे जमीनदारांवर ऐवज ठेरावून घेतला त्याची अद्याप फेड झाली नाही. इतक्यांत आणखीन ऐवज मागितल्यावर त्यांनीं कोठून द्यावा? कमालजमेची दहक रयतेपासोन घेणें तेव्हां कौलपेक्षा एक रुपया घेतल्यानें सोईस पडत नाही मग दहकेचा प्रकार समजतच आहे. तशांत घेणें तो खरीफ किंवा रब्बीचे हंगामावर युक्तीनें घेतल्यास त्यांजला अवघड पडत नाही. तो अर्थ पाहता खरीफ होऊन रबीचाही बहुतेक करून गुंता उरकण्यांत आला. आतां रयतेपासून पांच रुपये घेतल्यानें पुढें पंचविसांचे नुकसान होऊन

लावणीस पेंच पडून लाखोचे महाल खराबीत येऊन पैसा येणें कठीण. स्वल्पस्वार्थावर दृष्टी न ठेवतां ज्याजवर दौलतीची भिस्त तें राखावें हें उत्तम. यास्तव तूर्त दहकेचा जाबसाल महकूब ठेवून महालीं कारकून पाठवूं नयेत.

सरंजामी याचा मजकूर वाघ, बुळे, बारगळ, आदिकरून लहान मोठे सरंजामी बहुता दिवसांचे. वडिलांनीं आजपर्यंत माणसांची जोड केली आणि पुढेंही चार माणसें जुनी केल्या कामाची पदरीं असल्यांतच दौलतीचे स्वरूप. तथापि तेही आपल्यास प्रतिकूल काय. पेशजी पुण्याचे मुक्कामीं ऐवज घेतला त्याजवर इंदुरीं समजाविशींचे समयीं चार रुपये मागितले ते दिल्हे. पुढेंही त्यांची चाकरी सरंजामाहून खुश राखून जाबसाल केल्यास त्यांच्यानें दुसरी गोष्ट सांगणार नाही. केवळ जे ऐकतील त्यांच्या जप्त्या केल्यानें माणसें दुखतात. तशांत वाघाचे राऊत चिरंजीव राजश्री बापू होळकर यांजसमागमें आहेत. त्यांची हाजरी बिंबा जाधव यानें घेतली. याशिवाय मशारनिल्हेही जातीनें तुम्हासमागमें असोन जप्ती करावी तेव्हां फौजेस त्यांनीं ऐवज कोठून द्यावा हेही विचारून कर्तव्य ते करावें. येविषयींचे जाबसाल उगवले पाहिजे. याजकरितां बापूजी आनंदराव पाठविले आहेत. सविस्तर बोलतील ते मनन करून उत्तरें लिहून पाठविणें. हे आशीर्वाद.

**आधारग्रंथ**


१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
२. सरकारी हुजूर फडणीसी रेकॉर्ड
३. महाल ताळेबंद सरकार बिजागड




**प्रकरण २३ वें**

# देवी अहिल्याबाईंचा राज्यकारभार

किल्ले : अमात्य बावडेकर यांच्या 'आज्ञापत्र' ऊर्फ 'मराठेशाहीतील राजनीति' या ग्रंथात किल्ल्यांचें महत्त्व वर्णिलेले आहे. ज्या काळीं व ज्या स्थळीं त्यास राज्यकारभार करावयाचा होता. त्या दृष्टीनें त्यांचे लेखन यथार्थ आहे. महाराष्ट्राची भौगोलिक स्थिती व तत्कालीन राजकीय परिस्थिती या उभयतांच्या दृष्टीनें किल्ले दोन बाजूंनीं उपयुक्त होते. राज्यसंरक्षण व संवर्धन ह्या दोन्ही कामीं महाराष्ट्रातील किल्ले मराठी स्वराज्याचे माकडहाड होत. पण मध्य हिंदुस्थानांत सपाट भूमीवर किल्ल्यांचा उपयोग निराळ्याच दृष्टीनें व्हावयाचा होता; आणि तो कसा झाला हे खालील वर्णनावरून लक्षांत येईल.

होळकरांच्या राज्यात ज्या किल्ल्यांचा कागदपत्रांत केवळ उल्लेख आहे ते खालील सात होत.

१. महेश्वर, २. चांदवड, ३. सेंधवा, ४. अशीरगड, ५. गाळणा, ६. कुशलगड, ७. हिंगलाजगड.

(१) महेश्वर किल्ला श्रीनर्मदेच्या काठीं आहे. मातोश्रीसाहेबांनीच त्यास तीस वर्षेपर्यंत राजधानीचे वैभव लाभूं दिलें. केवळ इंदूर संस्थानचीच राजधानी न राहतां अखिल हिंदुस्थानचे प्रेमस्थान हेंच ठिकाण होऊन राहिले. सुभेदार मल्हाररावांच्या वेळीं येथें वसाहत सुरूं झाली. मातोश्रींच्या कारकीर्दीत वाहतूक वाढली म्हणून सायरची पुनर्घटना करावी लागली, ती मागील प्रकरणांत आलीच आहे. अनेक देवालयें व प्रेक्षणीय घाट ही कारागिरीच्या दृष्टीनें चिरस्मरणीय आहेत. नाना फडणीसांनीं म्हटलें होते. 'पुण्याचा दरवाजा म्हणजे माहेष्मती

नर्मदातीरची.' यावरून मराठी साम्राज्यांत नानासारखे मुत्सद्दी महेश्वरचें महत्त्व मानीत हे लक्षांत येईल.

**(यादी सरकारी दप्तर)** कांहीं जीर्णोद्धार व कांहीं नवीन बांधून स्थापना केलीं. तीं देवालयें खालीलप्रमाणें :

**महेश्वर येथील देवस्थानें – इ. स. १७९२**

| | |
|---|---|
| १ श्रीराजराजेश्वर (कार्तवीर्य) | १ श्रीकाशीविश्वेवर मंदिर |
| १ श्रीमातंगेश्वर महादेव | १ श्रीरामजी गडावरील |
| १ श्रीपरशराममंदिर चौखंडी | १ श्रीबाणेश्वरमहादेव नर्मदेंत |
| १ श्रीगणपती, धर्मशाळा | १ श्रीमारुती जंबूआळी |
| १ श्रीविंध्यवासिनी देवी | १ श्रीरावणेश्वर |
| १ श्रीराधाकृष्ण, लाडवी | १ श्रीचतुर्भुजरायजी |
| १ श्रीरामजी मंडणमिश्र | १ श्रीगणपती सहस्त्रधारा |
| १ श्रीगोपाळमंदिर सरकारी | १ श्रीकेशवराय चौखंडी |
| १ श्रीभैरवनाथ नावघाट | १ श्रीओंकारेश्वर |
| १ श्रीहरदेवलाला | १ श्रीगोकर्णेश्वर |
| १ श्रीरामजी तिबारींतील | १ श्रीसीतलामाता |
| १ श्रीमार्तंड चौखंडी | १ श्रीतिलभांडेश्वर नर्मदाघाट |
| १ श्रीत्रिंबकेश्वर महादेव | १ श्रीगौरीशंकर घाटावरील |
| १ श्रीदेवीपंचायतन, श्रीराजेश्वर | १ श्रीनर्मदामूर्ती घाटावरील |
| १ श्रीमुरलीमनोहर, कृष्णबाग | १ श्रीरामजी वटयक्षिणीबाग |
| १ श्रीबांकेबिहारी, नजरबाग | १ श्रीमारुती, नावडातावडी |
| १ श्रीरामजी, नावडातावडी | १ श्रीमार्तंड |
| १ खास संस्थानची देवपूजा | १ श्रीमारुतीमंदिर |
| १ श्रीभैरवनाथ | १ श्रीरामेश्वर पेशवेघाट |
| १ श्रीजलरूपीदेवता | १ श्रीगणपतीमंदिर |
| १ श्रीकालेश्वर (कालाग्निरुद्र) | १ श्रीमारुतीमंदिर |
| १ श्रीवटयक्षिणीदेवी | १ श्रीवृद्धकाळेश्वर |
| १ श्रीमहालक्ष्मी | १ श्रीगणपती, काळेश्वर |
| १ श्रीजाळेश्वर महादेव | १ श्रीगणपती वाड्यांतील |
| १ श्रीगौतमेश्वर | १ श्रीरामजी |
| १ श्रीसोमेश्वर | १ श्रीचंद्रिकेश्वर |
| १ श्रीविठ्ठलमंदिर | १ श्रीयशवंतेश्वर |
| १ श्रीरेवेश्वर किंवा रेवाशंकर | १ श्रीमल्हारेश्वर |
| १ श्रीउमेश्वर | १ श्रीकृष्णेश्वर |

| | |
|---|---|
| १ कै. मल्हारराव महाराज छत्री | १ श्रीहरिहरेश्वर |
| १ श्रीभद्रकालीमाता | १ श्रीदत्तमंदिर |
| १ श्रीरामेश्वर निंबादीत | १ श्रीमनकामनेश्वर, राजेश्वरामागें |
| १ श्रीरामजी, गडाखालील संस्थान | १ श्रीहरिहरेश्वर |
| १ श्रीमारुती घाटावरील | १ श्रीगणपती |

ह्याशिवाय यादीत आणखी देवालयांची नांवें होती. परंतु कागद जळाला असल्यामुळें नाईलाज आहे.

### किल्ल्यावर वस्ती करविली

(वेदशास्त्रसंपन्न, वगैरे मंडळींची देवीनें आबादी करविली.) ह्या माहितीची यादी महेश्वर येथील विठ्ठलराय कानुगो यांचे दप्तरांत मिळाली. ती खालीलप्रमाणें :

| | मूळ पुरुषांचीं नांवें | प्रवीण |
|---|---|---|
| १ | वेदशास्त्र संपन्न मल्हारभट गोविंदभट मुळे संगमनेरकर | याज्ञिकी |
| २ | वेदशास्त्र '' जनोबा व गोविंदभट पुराणिक नार्मदेय ब्राह्मण | शास्त्री, पुराणिक |
| ३ | वेदशास्त्र '' रामचंद्र नानाजी रानडे कोकणस्थ. | पुजारी |
| ४ | वेदशास्त्र '' काशीनाथ शास्त्री | शास्त्री |
| ५ | वेदशास्त्र '' दामोदर शास्त्री नार्मदेय ब्राह्मण | पूजा, पुराण |
| ६ | वेदशास्त्र '' निहालभट भगवानभट | याज्ञिक, पुराण |
| ७ | वेदशास्त्र '' भैयाशास्त्री ऋग्वेदी | शास्त्र, व्याकरण, वेदांत |
| ८ | वेदशास्त्र '' तेलंग ब्राह्मण गोटू शास्त्री | वैदिक, महंत |
| ९ | वेदशास्त्र '' मनोहरबुवा तेलंग ब्राह्मण हैद्राबादकडील | कीर्तनकार |
| १० | वेदशास्त्र '' बळीरामजी खेडावाल ब्राह्मण | श्रीविठ्ठल मंदिरचें पूजन |
| ११ | वेदशास्त्र '' गणेशभट यांसी मातोश्री द्वारकेच्या यात्रेस गेल्यावर समागमें आणिले | पूजा, अर्चा |
| १२ | वेदशास्त्र संपन्न त्रिंबकभट जंबू ब्राह्मण हे ज्योतिषशास्त्रप्रवीण ह्यास गुजराथेतून बोलावून वसविलें | ज्योतिषशास्त्री |
| १३ | वेदशास्त्र महंत सुजानगीर गोसावी | महंत पुजारी श्रीराजराजेश्वर |
| १४ | वेदशास्त्र त्रिंबकबुवा हररूदास कीर्तनकार यांस संगमनेरहून आणिले. ऋग्वेद ब्राह्मण | कीर्तनकार |
| १५ | वेदशास्त्र संपन्न आनंदरामजी नार्मदेय ब्राह्मण | पूजाअर्चा, श्रीरावणेश्वर |

| | | |
|---|---|---|
| १६ | वेदशास्त्र संपन्न गोविंदरामभट पंडे जटाशंकर गुजराथेंतून आले | ज्योतिषशास्त्र |
| १७ | वेदशास्त्र '' बाळकृष्णभट जंबू ब्राह्मण गुजराथेंतून आले | ज्योतिष, संस्कृत |
| १८ | वेदशास्त्र '' दाजी रघुनाथ जंबू ब्राह्मण | संस्कृत, वैद्यकी |
| १९ | वेदशास्त्र '' गणेशराम वल्लभराम खेडावाल, ब्राह्मण | वैद्यकी, पूजाअर्चा |

२० पालखी-वाहक : देवणी बीन किसन नाईक भोई सिकंदरपूर लखनौ. येथून मातोश्रीसाहेबांनीं यात्रेसमयीं मुद्दाम स्वत:चे पालखीवर चाकर ठेवून, यात्रेनंतर मौजे जलकोटी गांव जहागीर दिले. हे त्यांचे वंशाकडे चालू आहे. हल्ली श्रीराजराजेश्वर, श्रीकाशीविश्वेश्वर ह्यांच्या पालख्या निघतात, त्यांवर चाकरी करितात.

**महेश्वर येथील माहिती**

**(विठ्ठलराय कानगो दप्तर)** जुन्या कागदपत्रांवरून :

(१) महेश्वर : मोगलाईत अंमलात किल्ला मातीचाच होता. संवत १७९० म्हणजे इ. स. १७३३ होळकरांचे अंमलांत दुरस्तीचें काम सुरू झाले. श्री. मातोश्री अहिल्याबाईसाहेब होळकर ह्यांची स्वारी इंदूरहून महेश्वरीं संवत १८२४ अर्थात इ. स. १७६७ भाद्रपदमासीं येऊन राहिली.

(२) प्रथम सरकारवाडा बांधवून, श्रीनर्मदेचा घाट वाड्याखालीं बांधविला.

(३) श्रीकाशीविश्वेश्वराचें देऊळ मोठें शिखरबंद बांधवून स्थापन केली. तदनंतर किल्ल्यावर श्रीराममंदिर बांधवून पूजन नथ्थूभट भिकंभटास सांगितलें. नंतर श्रीकृष्णमंदिर बांधविलें. नंतर किल्ल्याचे बाहेर श्रीरेवेकाठीं श्रीविठोबाचे देऊळ बांधविलें. याप्रमाणें प्रत्येक देऊळ बांधवून स्थापना करीत जाऊन त्यांचे पूजेअर्चेची व्यवस्था निरंतरची करीत गेल्या.

(४) कस्बे महेश्वरची वस्ती : किल्ल्याखालीं जुना बाजार होता, तेथें मारु (साळवी कापड विणणारे) लोकांची वस्ती करविली व नव्या पेठां व पुरे वसविले, ते (१) आदितवार पेठ, (२) मंगळवार पेठ, (३) फणसेपुरा, जावयाचे स्मरणार्थ, (४) मल्हारगंज, (५) गोविंदपुरा, गोविंदपंत गानू खासगीवाले यांचे स्मरणार्थ. ह्याप्रमाणें वस्ती बाहेरगांवचे व्यापारी, उदमी आणवून वस्ती करविली.

(५) श्रीभवानीदेवीचें मंदिर शहराचे उत्तर दिशेस संवत १८३५ विक्रम सालांत बांधवून स्थापना करविली.

(६) श्रीपरशुराम मंदिर श्रीमंत मातोश्रीसाहेबांनीं बांधवून स्थापना केली व त्याचे व खाली श्रीनर्मदेस पेशवेघाट बांधवून ठेविला.

(७) श्रीअहिल्याघाट भारमलदादा होळकर ह्यांनी बाईसाहेब कैलासवासी झाल्यावर संवत १८५८ (इ. स. १८०२) चे सालापासून काम सुरू करून ते संवत १८९५ (इ. स. १८३९) सालीं श्रीमंत मातोश्रीसाहेबांच्या छत्रीचें काम पूर्ण झाले.

**चांदवड किल्ला**

खानदेश व नाशिक यांच्या दरम्यानचा घाट किल्ल्यांच्या पूर्ण आटोक्यांत आहे. वऱ्हाड व नाशिक यांच्या वाटेवर हें शहर असल्यामुळें व्यापाराचे भलें मोठे केंद्र होतें. या किल्ल्यांत मल्हारराव होळकरांनीं टाकसाळ घातली होती. ह्या टांकसाळींत हजारीं वीस एकवीस रुपये घेऊन चांदीचे रुपये पाडून मिळत असत. इ. स. १८२९ त चांदीचे नाणें व इ. स. १८३० त तांब्याचें नाणें पाडण्याचें बंद करण्यांत आलें.

**सेंधवा किल्ला**

होळकरांच्या उत्तरेंकडील प्रांताच्या सरहद्दीवर हा किल्ला असल्यामुळें येथें राजघराण्यापैकींच विश्वासूक आप्तइष्टांची योजना होत असे. सुभेदार तुकोजीराव होळकर यांचे एक बंधू येथें मुक्रर झाल्याचें कैफियतींत उल्लेखिलें आहे. त्यांच्या तैनातीस शिबंदी असे व खर्चासाठी सरकार बिजागडमधून योजना केलेली होती. संताजीराव होळकरांचा उल्लेख कागदपत्रांत आलेला आहे. ह्या किल्ल्यांत या पुरुषांच्या छत्र्या आजतागाईत दृष्टोत्पत्तीस पडतात.

बाकीच्या किल्ल्यांसंबंधात ह्या कारकीर्दीच्या कागदांत माहिती उपलब्ध नाही.

**कोश**

प्रथम भागांत मल्हारजींचें सालिना उत्पन्न पाऊण कोटी होते, असे पेशव्यांचे कागदाच्या आधारानें दाखविलें आहे. मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत त्यांच्याच कागदपत्रांवरून दौलत रुपये १,०५,३७,२११ एक कोटी पांच लक्ष सदतीस हजार दोनशें अकरापर्यंत चढलेली दिसते. सुभेदार मल्हाररावांचा काळ धामधुमीचा होता. सगळी घडी बसत-बसत चालली होती. मातोश्रीसाहेबांची कारकीर्द अधिक स्वस्थतेची होती. राज्यकारभाराची घडी पूर्वीपेक्षां अधिक ठाकठिकीची झाली होती. शांतता आणि सुराज्य यांनीं लक्ष्मीची प्राप्ती करून दिली असेच म्हणणें रास्त होईल. पण *येथें एक गोष्ट नमूद केली पाहिजे कीं या तीस वर्षाचे कारकीर्दीत हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं दुष्काळ पडल्याचा उल्लेख कागदोपत्रीं सापडतो. मेजर ल्यूअर्डसाहेबांनीं मध्य हिंदुस्थानासंबंधीं जें टिपण तयार केले होतें त्यांत त्याच कालांत व कारकीर्दीत राजपुताना व बुंदेलखंड येथें दुष्काळ पडल्याचा उल्लेख केलेला आहे. आणि मातोश्रीसाहेबांच्या या तीस वर्षांत कारकीर्दीत दुष्काळ कोठेंही पडल्याचा उल्लेख नाही. दुष्काळ म्हणजे दुर्भिक्षता: हा दुष्काळ ओला असूं शकेल, तसाच कोरडाही असूं शकतो. गांवोगांवीं पेवे राखून ठेवण्याची दक्षता राज्यकर्त्यांनीं घेतली असल्यास अतिवृष्टी वा अनावृष्टी लोकांस बाधूं शकत नाही, म्हणजे दुष्काळाची ओरडाओरड होत नाही व ऐकूंही येत नाही. सारांश, त्यावेळीं कोश समृद्ध असण्यास (१) शांतता, (२) सुराज्य, (३) स्वामींची साधी राहणी व उच्च विचारसरणी, (४) मंत्र्याची कार्यनिष्ठा हीं मुख्य कारणें होय.*

**बल**

बल म्हणजे सैन्य. हे सैन्य पायदळ व घोडेस्वार या स्वरूपांत असे. मल्हारजींनीं आरंभीं-आरंभीं याच अंगांवर जोर दिला होता. पुढें त्यांनीं तोफखान्याचा कारखाना काढून तें अंग आपल्या सैन्यास जोडिलें. त्यानंतर यांस प्रत्यक्ष इंग्रजांबरोबर युद्ध करण्याचा प्रसंग आल्यावर कवाईत फौज ठेवण्याचा उपक्रम त्यांनीं केला आणि युरोपियन अधिकारी हाताखाली घेतले. प्रत्यक्ष मातोश्रीसाहेबांचे उद्गार पेशव्यांच्या वकिलाकडे याप्रमाणें निघाले होते, 'श्रीमंत हुजरातीची उपेक्षा करितात. हे ठीक नाही.' मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत सैन्याची व्यवस्था व योजना सरंजामी सरदारांच्या मार्फत होत असे. तिचा तपशील सरकारी कागदांवरून (इ. स. १७८३-८४ सालचा) खालीं नमूद केला आहे.

१ महालनिहाय फुटगांव सरंजामी श्रीमंत रा. तुकोजीराव होळकर यांजबरोबर सरदार लोकांस फौजेचे खर्चाबाबद पंधरा सरदारांस पंधरा लक्ष शहाण्णव हजार रुपयांचा मुलूख महाल खर्चास दिला. (इ. स. १७६६)

| | |
|---|---|
| १,९५००० | निस्बत राजश्री गोविंदराव बुळे यांजकडे तीन महाल, परगणे पाटण ७५०००, परगणे झाबुवा ८५०००, परगणे चिखलदे ३५०००. |
| ३,००००० | निस्बत वाघ. परगणे महतपूर व उत्राण. |
| ९६००० | निस्बत नारायणजी बारगळ. परगणे बुढे ७५०००, रायपूरपैकीं १५००० व करही ६०००. |
| ६०००० | निस्बत लांभाते. परगणे जिरापूर ३०००० व माचलपूर ३००००. |
| १,१५००० | निस्बत यशवंतराव फणसे. परगणे तराणा महाल. |
| ३०००० | निस्बत अप्पाजीराम पळसीकर. परगणे बडदावदा. |
| ५०००० | निस्बत नारो गणेश. परगणे पंचपहाड. |
| ६०००० | निस्बत भागवत व खटके परगणे जावरा, इसम दोन मिळून. |
| ४००० | निस्बत गोविंदराव महाडिक परगणे पिंपळोदा. |
| १,६०००० | निस्बत खंडूजी नलगे निस्बत ढमढेरे. आबेर ४००००, अडावद ६००००, दहीवद ६००००. |
| १५००० | निस्बत भागवत, परगणे बागदरा. |
| ३३००० | निस्बत माधवराव राजगोळे. प. हसलपूर १२०००, जांब ३५००, हरसोले ७५०० व बुढे पैकीं १००००. |
| ५००० | निस्बत पिसे वडगांव. |
| १५,९६,००० | |

सदरहू पंधरा सरदारांस मुलूख फौजखर्चास दिला असे. ह्यालगत दुसरी याद उपलब्ध आहे ती पुढें दाखवीत आहोत.

१ प्रगणे पिंपळोदा, महाडिक
१ प्रगणे बुढे, नारायणगड, बारगळ

| | |
|---|---|
| १ प्रगणे बरडावदा, पळसीकर | १ मौजे कासोदे, यशवंत गंगाधर चंद्रचूड |
| १ प्रगणे सावेर, वाघमारे | १ प्रगणे कायथे, काशीराव होळकर |
| १ प्रगणे तराणे, फणसे | १ प्रगणे अडावदा, अहूर, ढमढेरे |
| १ प्रगणे जिरापूर, माचलपूर, लांभाते | १ प्रगणे बेटमे, माधवराव वाघ |
| १ प्रगणे पाटण, झाबवे, कोठडे वगैरे, बुळे | १ प्रगणे पंचपहाड, नारो गणेश |
| १ प्रगणे करही, शितोळे, बारगळ | १ प्रगणे हसलपूर, राजोळे |
| १ प्रगणे महतपूर, वाघ | १ प्रगणे निंबाहेडा, शिंदे चोंडीकर |
| १ प्रगणे जावरा, खटके व भागवत | |

मातोश्रीसाहेबांनी आपले कुटुंबातील माणसांची, गणगोत्रांची व आप्तइष्टांची व्यवस्था कशी केली हे खालील लेखांवरून दिसून येईल.

***पत्रांक १.*** माणकेश्वराची देवी व गर्ग्याची सटवाई दोन्ही देवतांची स्थापना कैलासवासी मातोश्री गौतमाबाईसाहेब यांनीं वाफगांवचे बागांत केली. आपले घरच्या मुलांची जावळे वगैरे यात्रेचा विधी येथेंच होत असतो. कै. श्री. मल्हारराव बाबासाहेब व सौ. बाईसाहेबांच्याही यात्रा येथेंच झाल्या. असे येथें जुनी पुराणीं माणसें सरकारपदरची आहेत, ती सांगतात.

***पत्रांक २.*** महादजी थिटे केदुरकर यांजपासून कै. ती. सुभेदार यांनीं घोडे खरेदीकरितां कर्जाऊ ऐवज घेतला होता त्यास थिटे मृत्यु पावला. हल्लीं त्यांचा नातू राणोजी थिटा महेश्वरचे मुकामीं खत घेऊन आला त्याचा फडशा करून देणें.

***पत्रांक ३.*** चिरंजीव राजश्री यशवंतराव फणसे ह्यांस देशीं रवाना केलें आहे. त्यांजबरोबर मेवाती व खानदेशी लोक दिले आहेत. त्यांस दीडमहा रोजमुरा सदुसष्ट रुपये (एकंदर इसम चौदा) देविले असे. कजब घेणें म्हणोन दिनकर अनंत कमाविसदार चांदवड यास पत्र, इ. स. १७७१.

***पत्रांक ४.*** इ. स. १७९१ तुकोजीराव होळकर यांचे देवी अहिल्याबाईंस पत्र चिं. रा. काशीराव याजकरितां वडिली बंधू पाहून प्रमाणसूत्र आणवून पाहिलें व एकच लग्न केल्यानें तीन होतात, यामुळें दुसरी वधू पहावयास लिहिलें आहे. वधूचा निश्चय झाला म्हणजे दोन्ही लग्नाची कार्यसिद्धी करावी लागेल. लग्नाची योजना इकडे किंवा तिकडे करावयाची तें लिहून पाठविणें, म्हणजे वधूची रवानगी केली जाईल म्हणोन आज्ञा. त्यांस वडिली वधू पाहून प्रमाणसूत्र पाठविलें ते पावलें. दोन लग्नाचा विचार लिहिला तोही प्रमाण आहे. पण रुईशी लग्न करणें प्राप्त आहे. त्यापक्षी तूर्त दोन लग्नें करण्याची जलदी कशास? यंदा एकच लग्न करून पुढें दुसऱ्याची योजना करावी असें आहे. इतक्यावर वडिलांचे मर्जीस येईल ते खरें. चिरंजीवास वडिलांकडे लौकरच रवाना करण्यांत येईल. वडिलीं तिथीचा निश्चय केला पाहिजे.

***पत्रांक ५.*** इ. स. १७९१, तुकोजीचे मातोश्रींस पत्र : (अहिल्याबाईंची लेक मुक्ताबाई सती गेल्यावर अहिल्याबाईची स्थिती व तुकोजीरावांची समाधान करण्याची तऱ्हा) वडिलीं कोणतीही गोष्ट मनांत आणूं नये, माझी शपथ आहे. मी येतों तोपर्यंत दुसरी तिसरी कोणतीही गोष्ट मनांत आणूं नये. आणाल तर शपथ. मी लौकरच पायांशीं येऊन पोहोचतो. वडिलीं

कोठें जाण्याचा विचार करतील तर कै. तीर्थरूप सुभेदारांच्या पायाची व माझे गळ्याची शपथ आहे.

सुहृद्गणामध्यें नातलगांचा पराशर्म घेणें, त्यांस चालीस लावून त्यांचा व पर्यायानें राष्ट्राचा उत्कर्ष साधतों हेही असामान्यच काम होय. मातोश्रीसाहेबांनीं अशा तऱ्हेची जी योजना केली तींत दोन उदाहरणें सरकारी कागदांवरून आम्ही पुढें सादर करितो. त्या पत्रांवरून सुहृद्गणांचा समाचार मातोश्रीसाहेब कसा घेत हें तर दिसेलच, पण तत्कालीन राजनीतिची अंगे व उपांगे हीही दृष्टोपत्तीस पडतील म्हणोन दोन पत्रें सादर करीत आहोंत.

***पत्रांक* ६,** तैनात जाप्ता सुभा तुकोजी होळकर पथक बाबूराव मानाजी वाघमारे सु. सलास सबैन मयाबअलफ इ. स. १७८२ मुकाम कस्बे महेश्वर. तुमच्या पथकाचे बेगमीस प्रगणे सावेर सुभा उज्जैन. एकूण देह १२० सुमारे पैकीं वजा मजरे ८ बाकी देह सुमारी ११२ तपशील तनखा रुपये १५७०३५-८-० पैकीं वजा इनामी जमिनीबद्दल रु. २०,००० बाकी तनखा रुपये १३७०३५-८-० पैकीं वजा पदमसिंह चौधरी याचे देह सुमारी ५. १ मांगळ्या २५००, २ पारड्या १४००, ३ गवला ७२५, ४ उज्जलखेडा ६००, ५ रामखेडी २१००. एकूण आकार ७३२५ बाकी देह सुमारी १०७. एकूण तनखा रुपये १२९७१०-८-० कमाल जमावसूल कुलबाब रुपये १००००० पैकीं वजा :

७८५ वर्षासन देवस्थान

| | | | |
|---|---|---|---|
| ४८ | घनश्यामभट श्रीमारुतीचा पुजारी | १०० | रतनेश्वरभट उज्जेनकर |
| २४ | जहुरामभट उज्जेनकर | २५ | विद्याधरभट अग्निहोत्री |
| ९० | केशवभट ,, | ९० | पेमचंदभट उज्जेनकर |
| २५ | कृष्णशास्त्री ,, | ३६ | सोमेश्वर उज्जेनकर |
| ६५ | यज्ञेश्वरभट गंगाधरभट उज्जेनकर | १२ | घन:श्यामभट |
| २० | छीतरभट गंघाधरभट ,, | ४० | गरीबदास उदासी |
| ३० | बकावशहा फकीर | १५० | देवस्थानाबद्दल |

......................

७८५

१००० मोजमदार रु. ५०० व फडणीस रु. ५००

२००० खेरीज ठरावाबद्दल गांव २ अजनोद व दर्जीकराड्या

१०,५४२ दुमालेगांव

| | | | |
|---|---|---|---|
| २,९०० | मौजे बरलाई | १,७०० | मौजे डकाच्या |
| १,१०० | मौजे पानोड | १,१२५ | मौजे हतूण्या |
| २,००० | मौजे बांगरदा | ५११ | मौजे बणेद्या |
| २५५ | मौजे जेतपुरा | ९२६ | मौजे मानपूर |

---

१४३२७

बाकी रुपये ८५,६७३-०-० तपशील :

| | |
|---|---|
| ११,३९८ | जातीस व पालखीस व हत्तीखर्च, सरदारी |
| २२,५०० | स्वार समंजस चांगले असामी ५० दर असामीस रु. ४५० |
| २४,३७५ | करोला (बंदूक-स्वार) असामी ७५ दर असामीस रु.३२५ |
| २५,००० | भालेकरी असामी १०० दर असामीस रु.२५० |
| २,४०० | सौभाग्यवती उदाबाई वाघमारे यांचे रोजमरा दरमहा रु.२०० |
| ८५,६७३ | |

येणेंप्रमाणें तैनात पंचायशी हजार सहाशे त्र्याहत्तर सालियाना बिलाकरार समस्त असाम्या. करोल ७५ भालेकरी १०० स्वार हमेशा बारमाही चाकरीस असावे. हाजरींत कमी न आणावे. जाणिजे चंद्र १४ जमादिलावल.

***पत्रांक ७.*** (रोजकीर्द इ. स. १७७९) राजश्री राणोजी बिन महादजी (देवींचे बंधू) पाटील व गोविंदराव बिन बाणाजी पाटील, आप्पाजी येसाजी पाटील व त्रिंबकराव, व्यंकटराव व खंडेराव बिन विठोजी व लक्ष्मणराव बिन सुभानजी पाटील शिंदे चौंडीकर परगणे श्रीगोंदे यांजकडे पथकाचे सरंजामांत परगणे निंबाहेडा प्रांत मेवाडपैकीं गांवे ४४ व निमे सायर मिळोन तनखा बेरीज एक लक्ष १००००० करार करून देऊन सनदा तैनातजाबता अलाहिदा करून त्याची वाटणी येणेंप्रमाणें :

| तेरीज एकंदर | | ऐनबाटणी : | गांवगन्ना : | सायरपैकीं : |
|---|---|---|---|---|
| १ | राणोजी शिंदे | २१००० | १६८०० | ४२०० |
| २ | आप्पाजी शिंदे | १९००० | १६५०० | २५०० |
| ३ | गोविंदराव शिंदे | १९००० | १६५०० | २५०० |
| ४ | त्रिंबकराव शिंदे | १९००० | १६५०० | २५०० |
| ५ | लक्ष्मणराव शिंदे | १९००० | १६४५० | २५५० |
| | | ९७००० | ८२७५० | १४२५० |

एकूण पांच जणांस मिळोन सत्याण्णव हजार रुपये पैकीं गांवगन्ना व सायरपैकीं, मिळोन करार करून दिल्हे. तरी वाटणीप्रमाणें अंमल करून तैनात जाबत्यावरहुकूम खातेंवार भालेकरी, घोडेमाणूस, सरंजाम चांगला आणून चाकरी करीत जावी. पुढें साल दरसाल जमा वाढत जाईल त्याप्रमाणें स्वारही जास्ती ठेवीत जाणें व चाकरी करीत जावी.

***पत्रांक ८.*** (तुकोजीरावांकडून मातोश्रींस इ. स.१७८९ कै. खंडेराव होळकर ह्यांचे छत्रीचे रिपेरीबद्दल कीं) इकडील धोंडा चांगला नाही. चांगला पाहून छत्रीचे कामास व मूर्तीचे स्थापनेची व्यवस्था करणेस जासूद, खिजमतगार कुंभेरीस पाठविले आहेत व बागास कांहीं जमीन जाटापासून घेऊन ती बाग वाढविणेस लावण्याचा विचार आहे. छत्रीचा

कारखाना काळजीनें चालत आहे. जासूद सेवेशीं निवेदन करीलच.

***पत्रांक ९.*** (इ. स.१७९४) श्रीक्षेत्र त्रिंबकेश्वर येथील तीर्थ पुरोहित दयाळभट व रघुनाथभट व अनंतभट उपनाम देवळालीकर सूत्र कात्यायन वाजसनेई यांसी कीं, क्षेत्रमजकुरीं पुरोहितपण ती. कै. सुभेदार मल्हारजी होळकरांपासोन असोन, हल्लीं हें पत्र लेखन केलें असे. तरी क्षेत्री आम्ही अथवा आमचे वंशीचा कोणीही येईल तो तुमचें पूजन करीत जाईल. अन्यत्र लिहून दिलें असल्यास ते रद्द असे. तीर्थरूपजीनीं लिहिलेले आम्हांस मान्य आहे. मि. आश्विन वद्य ५.

***पत्रांक १०.*** (आगस्ट इ. स. १७९०) येसो अंबाजी पूर्वीपासोन पदरचे उपजीविका सांप्रत नाहीं. मुले माणसें अंबाडीं आहेत. त्यांचा कालक्षेप चालला पाहिजे. अंबाड येथील मामलेदारांस लिहून दोनतीन गांवचे ठाणेदारीचें काम मशारनिल्हेकडे सांगून कालक्षेप चालेल अशी योजना करून देविली पाहिजे म्हणोन.

***पत्रांक ११.*** (इ. स. १७९२) तुकोजीरावांकडून मातोश्रींस पत्र : इंदुरीं मंडळी आहेत त्यांजकडून पुण्यास पत्रें व कारकून जावून खटपटीस लागल्याचे वर्तमान समजण्यांत आले होते. त्याजवरून ताकीद केली ऐसियास दौलतीत बखेडे बहुत. चिरंजीवाचें खूळ मोडावें ऐसें असतां इंदुरींहून संधान ऐकतों. तसें असल्यास फार वाईट. याकरितां शिक्षा होऊन संधान तुटावे असें केल्याखेरीज बरें नाही. चि. मल्हारराव याची उपेक्षा येथून झाली. यामुळें या थरास गोष्ट आली. तरी वडिलांकडून बंदोबस्त व्हावा. अगर झाडून खटले इकडे पाठवून द्यावे. सारांश, ज्यांत खूळ न होय तें झालें पाहिजे.

***पत्रांक १२.*** इ. स.१७९२ तुकोजी यांजकडून मातोश्रींस. राजश्री नारो गणेश यांचे समागमेंमुळें चाल वेगळी पडत गेली. यामुळें वडिलांचे मनांत अनेक प्रकारें कल्प येत गेलें ते दूर होऊन हुकूम असावा. याविषयीं अंत:करणात येत गेलें. परंतु देशीं राहणें झाल्यामुळें गोष्ट न घडली. इकडे आलेवर इतिकर्तव्यता करावयाची होती ती केली. महाल, खेडी, बायका मुले इत्यादि वडिलांचे आज्ञेंत राहून आयुष्य कंठावे अशी इच्छा आहे. त्याप्रमाणें निभावणें वडिलांकडे आहे. दुसरा अर्थ किमपि नाहीं. श्रीमंतांचे दरबार साधन राखणें, सोबती प्रबळ आहे त्या मार्गाने चालून दौलतीचे स्वरूप वाढविणें, घरचा अर्थ पाहणें हे तीनही अर्थ वडिलांकडे आहेत. नारो गणेश यांचा कारभार निघाला तो पुन्हा बदलतो. असा अर्थ नाही. याविसीं वडीलही खंबीर आहेत आणि इकडूनही दुसरें मनांत येईल असें नाहीं. याप्रकरणीं कोणी बोलूं लागल्यास वडील कसें ऐकितात व आम्ही कसे ऐकूं. हें सर्वात्मना व्हावयाचें नाहीं.

***पत्रांक १३.*** (इ. स.१७८०) तुकोजी होळकरांकडून मातोश्रींस पत्र : चिरंजीव मल्हारराव याचें लग्न वडिलांचे पायापाशीं व्हावें असा हेतू आहे. मध्यंतरीं नाना प्रकारचें बखेडे येत गेले याजमुळें हा योग न घडला. लग्नाचे दिवस जात चालले. मुलें थोर आहेत. यंदा माघ मासीं लग्न वडिलांपाशीं व्हावें. इंग्रजांचे शहामुळें श्रीमंतांपाशीं गुंतून राहिलों

त्यांचीही आज्ञा कीं यंदा लग्न उरकून घ्यावें. पुढें मसलत कशी पडेल, ऐसें संकष्ट जाणोन माघपक्षीं निश्चय करून सेवेशी ती. महादजीबाबा व जिवाजी बाबूराव पाठविलें आहेत. विनंती करतील तें मान्य करून वडिलीं येऊन लग्नसिद्धी आपले हातें केली पाहिजे. सर्व करणें वडिलांस. आम्ही विनंती मात्र लिहावी. यास्तव अगत्यरूपें केलें पाहिजे. दुसरें, राजश्री सुलतानबांसही शरीरें समाधान नाहीं. त्यांचाही आग्रह कीं लौकर करावें. याकरितां माघ मासी दोन तिथी शुद्धपक्षीं आहेत. वडिलीं येऊन आपले हातें करावे. याउपरीं दुसरें लग्न लौकरच व्हावयाचें अर्थ समजलाच आहे. एक मूल वडिलांचें आहे. सर्व प्रकारचें वडिलीं येऊन करावें.

***पत्रांक १४***. इ. स. १७८१ ता. ८ फेब्रुवारी (अपूर्ण पत्र) मातोश्रींकडून : ते शिंदे व तुम्ही होळकर एकेभावें चालून मानापान, शिक्का, रोखा, कानू, कायदे, वगैरे रीत परस्परें कैलासवासी उभयतां सुभेदार मल्हारराव व राणोजी शिंदे यांजपासून चालत आल्याप्रमाणें राखावें. उभयपक्षीं भाऊपणांत फरक न पडतां सरकार चाकरी घडे तें करणें.

आज इंदूर संस्थानांत जीं घराणीं प्रामुख्यानें नांदत आहेत त्यापैकीं ज्यांचा उत्कर्ष मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत झाला त्यांचा उल्लेख शक्य तितका येऊन गेलाच आहे. त्यांचा उदय मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत होऊन उत्कर्ष पुढें झाला अशा कर्तृत्ववान घराण्यांची माहिती खालीं देत आहोत.

१. **धोंगडे :** या उपनामाचे गृहस्थ दक्षिण हैद्राबादेंत निजामाचे नोकरीस गेले. पुढें बीड आणि अंबाड या प्रांताचे ते अधिकारी झाले. त्याचे नांव चिमणाजीपंत असें होतें. चिमणाजीपंताचा अंत निजामाच्या सेवेंत झाला. त्यांस सखाराम नांवाचा एक अल्पवयस्क मुलगा होता. चिमाणाजीपंताच्या पश्चात् सखारामास घेऊन त्याची मातोश्री महेश्वरीं राहवयास आली. सखारामास त्याचे आईची ताकीद होती कीं त्यानें श्रीदेवी अहिल्याबाईचे नित्यनेमानें दर्शन घ्यावें. ही गोष्ट मातोश्रींच्या लक्षांत येतांच त्यांनीं सखारामास हातीं धरून त्याचे शिक्षणाची आपले कारकुनाचे हाताखालीं सोय लावून दिली. ह्यामुळें कामकाजानिमित्त सखारामास मातोश्रीसाहेबांपुढें जाण्याचा लाभ वारंवार मिळूं लागला.

ह्याच वेळीं महेश्वर येथें रेशीमकाठाचे वस्त्रांचा धंदा चांगला चालत होता. पेशव्यांची वस्त्रें येथून जात होती, तो धंदा बरकतीचा असल्यामुळें एखादे सरकारी दुकान असावें असा सल्ला स्वामींस मिळाल्यावरून तसलें दुकान उघडण्यात आलें. सखाराम हा स्वामींचे नजरेपुढें होताच. तेव्हां त्याची योजना या दुकानावर झाली हे सांगणे नकोच. ते काम याने दक्षतेने व सचोटीने चालविले. पैसा जमविल्यावर सखाराम महेश्वरासच घरदार करून स्थाईक झाला. रेशमाचे काम त्याजकडे आल्यामुळें यापुढें मूळचें उपनांव मागें पडून रेशीमवाले हे नांव पुढें झाले आणि त्याच नांवानें हे घराणें इकडे प्रसिद्ध आहे. सारांश, या घराण्याचा उदय या कारकीर्दीत झाला. उत्कर्ष पुढें कैलासवासी श्रीमंत सरकार तुकोजीराव द्वितीय यांचे कारकीर्दीत परमावधीचा झाला.

२. **पळसीकर दिवाण** : ह्याचा होळकरशाहींत प्रवेश सुभेदार मल्हाररावांचेच वेळीं

झाला होता; पण चंद्रचूडाच्या वर्तणुकीनें व कृर्तृत्वानें ह्यांस पुढें येण्यास वाव मिळाला नाहीं. भक्तिविजयकर्ते महिपती यांचे उपनांव कामळे. तेंच उपनाव ह्या पळसीकारांचे पूर्वीचे आहे. चौकशीअंतीं असें कळतें की महिपती आणि हे पळसीकर दिवाण एकाच वंशातले आहेत. मातोश्रींच्या कारकीर्दीतही प्रारंभीं प्रारंभीं पळसीकर दिवाण फारसे पुढें आलेले दिसत नाहीत. मातोश्रींनी त्यांस हातीं धरून आपले पदरचे असे समजून पुढें जवळ केलें आणि मग तें घराणें पुढें सरसावले. ह्यांचीं कांहीं पत्रें राज्यकारभार ह्या सदराखालीं आलेली आहेत. त्यांजवरून यांचा दर्जा लक्षांत येईल.

सुहृदगण ह्या शब्दांत आप्त, इष्ट, मित्र, रक्ताने जोडलेले व प्रेमाने जोडलेले या सर्वांचा समावेश होतो. चोंडीकर शिंदे व वाघमारे हे जवळचे नातलग त्यांस पुढें आणिलें व तसेच काम लावून दिलें. त्यांना ज्या देणग्या दिल्या त्यात अनेकांच्या उदरनिर्वाहाची सोय परस्पर लावून दिली. हे सरंजामी सरदार: त्यांच्या छायेखाली लष्करी बाण्याचे धार्मिक संस्थांचे व विद्याव्यासंगी लोकांचे पालन पोषण होऊन राहिले. पूर्वी ज्यांनीं नोकरी केली त्यांचा आणि त्यांच्या वंशजांचा परामर्श घेतला. सुभेदार तुकोजीरावांची पत्रें प्रेमळपणा, आज्ञाधारकत्व व श्रद्धा यांची दर्शक आहेत. सेवक लोकांकडून आलेली पत्रें मोकळेपणाची आणि आस्थेवाईक दिलाची आहेत आणि रावापासोन तो रंकापर्यंत अधिकारी आणि बिनअधिकारी, प्रजाजन व बाहेरचे लोक, ह्या सर्वांची मातोश्रीसाहेबांचे चरणीं एकच वृत्ती असल्यामुळें राज्यकारभाराचें कार्य सुकर झाले हे सांगांवयास नको.

नेपोलियन बोनापार्ट ह्याचे स्वदेशी व परदेशी चरित्रकार एका गोष्टीबद्दल मोठ्या आदराने उल्लेख करितात. नेपोलियनच्या हाताखालीं काम करणाऱ्या अगदीं य:कश्चित शिपाईगड्यापासून तो अगदी वरिष्ठ अधिकाऱ्यापर्यंत प्रत्येकाची ही श्रद्धा कीं आपण लढाईत पडलों तरी आपल्या पश्चात् आपल्या मुलांबाळांचा परामर्श आपल्यापेक्षांही अधिक घेणारा आपला यजमान आहे. या भावनेनें प्रेरित झाल्यामुळें नेपोलियनचे शिपाई धडाडीनें काम करीत. मराठेशाहीच्या उदय व उत्कर्षकालीं हीच उदारवृत्ती सर्वत्र नांदत होती. छत्रपतींचे मावळेगडी, अमात्यांचे धनगर व मराठे अनुयायी, बाजीरावसाहेबांचे 'उजवे व डावे हात' याचप्रमाणें प्रेरित झाले होते. 'जेथें आमची पत्रावळ तेथें तुमचा द्रोण' ही सुभेदारांची उक्ती त्यांच्या घराण्यांत परंपरेनें चालली होती. मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत ज्यांनीं विशेष तऱ्हेची कामगिरी बजाविली त्यांची चरित्रें जशी उपलब्ध झाली तशी दिल्याविना हे 'रामराज्य वर्णन' अपूर्ण राहील. हीं चरित्रें पुढील प्रकरणांत देऊं.

### आप्तसुहृदगणांपैकीं कांहीं पत्रांचा सारांश

***१ पत्रांक :*** इ. स.१७९० ता. ७ डिसेंबर चि. मल्हाररावांकडून मातोश्रीस. चिरंजीव धोंडिबा फणसे यांचे शरीर दोनतीन वर्षापासोन रोगग्रस्त होते. अलीकडे निजून होते. औषध उपचार करूनही गुण न येतां कार्तिक शुद्ध ९ इंदुवारीं निधन पावले. उभयतां स्त्रियांनीं सहगमन केले. चिरंजीव सौ. आनंदीचेंही शरीर रोगग्रस्त होतें. परंतु तेच दिवशीं प्रथम

प्रहर रात्रीं तिचाही काळ झाला. एकाच दिवसांत दुःखाचे पर्वत प्राप्त झाले. परमेश्वरें बहुत क्षोभ केला. वडिलीं कोणेविसीं खेद करूं नये. म्यां लेकरानें लिहावें ऐसें नाहीं.

**२ पत्रांक :** चि. काशीराव होळकर तुकोजीरावांकडून : यशवंतराव फणसे एकाएकीं निधन पावले. मुक्ताबाई व नूतन दोघी स्त्रियांनीं सहगमन केले. मातोश्रीसाहेब शोक समुद्रांत आहेत. आपले येणें होऊन शांतवन झाल्यावाचून वृत्तीवर येतीलसे दिसत नाही. म्हणोन लिहिले. ऐसियास वर्तमान ऐकतांच चित्तास खेद झाल्याचा विस्तार कोठवर लिहावा? फारच अनुचित झालें. मातोश्रीसाहेबांचें, धोडिबांस दुःख. परंतु विचारवंत म्हणून मुलीवर व जावयावर दृष्टी ठेविली होती. त्यांचा प्रकार असा झाला. तरी त्यांचे शांतवन कसें करावें आणि ऐकतील असा माणूस तरी कोण आहे? याकरितां आम्ही येण्याचा जलद विचार केला आहे. इकडील अर्थ राहो अथवा बुडो. आम्हांस त्यांजपेक्षा कांहीं अधिक नाहीं. यास्तव मातोश्रीसमान मावशीस पुढें करून तुम्ही त्याचे पायावर डोकीं ठेवून लेकुरपणें विनंती करून स्नान, भोजन करीत ते करणें. तुम्ही त्यांजपाशीच नेहमीं बसून, जेव्हां त्या अन्नसंस्कार करतील तेव्हांच तुम्ही करणें. सारांश, आम्ही येऊन पोंहचेपर्यंत त्यांस निग्रह करूं न देतां, कांहीं वृत्तीवर येत ती गोष्ट करणें.

**३ पत्रांक** : सौ. रखमाबाई होळकर यांजकडून चि. काशीरावांस पत्र : यशवंतराव फणसे यांस वाखा होऊन देवआज्ञा झाली. मुक्ताबाई व दोघी स्त्रियांनीं सहगमन केलें. ईश्वरें मोठाच अनर्थ केला. आम्ही ऐकतांच यावें. तों मधीं अस्पर्शाचा गुंता झाला. उदईक मंगळवारीं निघून येऊन पोहचतों. मातोश्रीसाहेबांस दुःखाचे डोंगर झाले. तुम्ही वडिलांचें शांतवन करावे. माझी तर कंबरच बसली.

**४ पत्रांक :** यशवंतराव गंगाधरकडून मातोश्रीसाहेबांस पत्र ता. २९ मार्च इ. स. १७९२. यशवंतराव फणसे निधन पावल्यानंतर सौ. मुक्ताबाईनीं सहगमनसमयीं सांगितलें कीं 'रेवामूल नालीसुद्धां नर्मदेत सापडलें तें घेऊन संस्थान चालवावे.' त्यावरून पाहतां भाऊबंद जवळ असतां केवळ रेवाजीच अधिकारी असावा असें नाहीं. याजकरितां राणोजी फणसे यांचा मूल अप्पाजी फणसे व रेवाजी असे दोघे विधानयुक्त दत्तक घेऊन अधिकारी केले. हें वृत्त राजश्री बाळाजीपंत नानांस श्रवण करणें म्हणोन आज्ञा. त्यावरून श्रीमंत रा. नानांस विनंती केली. त्यांनीं संतोष मानून, उत्तम केले म्हणून आपल्यास लिहावयास सांगितलें आहे. श्रुत होय.

**५ पत्रांक :** श्री मातोश्री अहिल्याबाईसाहेबांस फणसे यांचे निधनासंबंधात समाधानपर पत्रें आलीं त्यापैकीं जीं उपलब्ध जाहलीं तीं खालीलप्रमाणें :

१. राघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांचे शांतवनपर पत्र
२. श्रीमंत माधवराव नारायणराव पंतप्रधान पेशवे ,,
३. रा. बाळाजी जनार्दन (नाना फडणवीस) ,,
४. रा. व्यंकटेश कृष्ण वकील होळकर नागपूर ,,
५. रा. कृपालसिंग वकील जयपूर ,,

६. रा. यशवंतराव गंगाधर चंद्रचूड ,,
७. रा. रामराव अप्पाजी पळसीकर ,,
८. रा. सदाशिवकृष्ण. ,,
९. रा. शेख शरीफभाई मुकाम कृष्णगड ,,
१०. रा. रायाजी पाटील शिंदे ,,

६. ***रोजकीर्द :*** चिरंजीव सौ. मुक्ताबाई फणसे यांनीं महेश्वर मुक्कामीं विनंती केली कीं आम्ही तुमचे पोटीं जन्म घेतला. तुमच्या पाटीलकीच्या वृत्ती बहुत आहेत. त्यापैकीं एखादे गांवची पाटीलकीची वृत्ती द्यावी. त्यावरून मनास आणितां उचित समजोन कस्बे निफाड येथील मोकदमी तिसरा हिस्सा आहे तो तुम्हास आंदण करून, हे आंदणपत्र करून दिल्हे आहे. वंशपरंपरेनें अनुभवून खाणें. आमचे वंशींचा कोणी हरकत करणार नाही. करील तर त्यास कुलस्वामींची शपथ आहे.

७. ***रोजकीर्द :*** रा. बाबूराव वाघमारे यांजला कन्या उदाबाई थोरले सुभेदार यांची दिली, तेव्हां जहागीर दिली :

१ प्रगणे संधारे यांतील निम्मे वाटणी
१ वेरूळपैकीं चार गांवें
१ मौजे पाथेगांव तर्फ कोरहाळे
१ प्रगणे सावेर प्रांत माळवा
१ मौजे तीसगांव प्रगणे चांदवड
१ मौजे गाळणे प्रगणे उत्राण

७. बाबूराव वाघमारे जावई थोरले सुभेदार. उदाबाईचे संबंधांत मातोश्रींस पत्र (इ. स. १७८२) : घरांत शरीरास समाधान नाहीं. श्रीनाथाचे देवालयापाशीं राहिल्या. परंतु गुण नाही. आराम होईल तो सुदिन. भैरवगज हत्ती आपलेपाशीं आहे तो श्रीओंकारेश्वरास वाहावा म्हणोन सांगितलें आणि संकल्प त्यांनीं आपले हातीं सोडला. आपणांस कळविण्यास सांगितलें आहे कीं मातोश्रीस विनंतिपत्र लिहून हत्ती श्रीओंकारेश्वरीं पोहोचता करावा. याकरितां वडिलीं अगत्यरूप ओंकारेश्वरीं पाठवून द्यावा. ह्या संकटांतून परमेश्वर पार पाडून पाय दृष्टीस पडतील तो सुदिन. आम्हास आधार सर्व प्रकारें वडिलांचे पाय आहेत.

### सल्लागार मंडळ

### १. गोविंदपंत गानू

हल्लीच्या मनूत 'प्रधान आणि प्रधान-मंडळ' हा राज्यकारभाराचा प्रमुख भाग गणला जातो. मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत ही घटना अस्तित्वात आली नव्हती. राज्यकारभाराच्या सर्व अंग-उपांगांवर त्यांची बारीक नजर असे. कोणच्याही कामांत दक्ष अगर भला माणूस दिसला तर मात्र त्याच्यावर तें काम सोपविलें जाई. अशी जी कांहीं कर्तृत्ववान माणसें त्यांच्या कारकीर्दीत वावरत होती. त्यांची यादी व कामगिरी नमूद करीत आहोंत. त्यास अमुक एक पद बहाल केलें होतें असें नाही. दीर्घकालीन वहिवाटीनें ते ते पद त्यांजकडे लागू झाले. अशा या कर्तृत्ववान मंडळीत गोविंदपंत गानू यांचे नांव प्रथमच पुढें येते. हे व यांचे वंशज, यापुढें खासगीवाले या नांवानें प्रसिद्धीस आले. नांवावरूनच लक्षांत

येईल कीं खासगीचा कारभार यांचे हातून चालू राहिला. मातोश्रीसाहेबांचा सर्व नित्यांच्या व कायमचा दानधर्म याच खात्यांतून पुरा झाला. यावरून गोविंदपंतांची काम करण्याची शिस्त वाखाणण्यासारखी असली पाहिजे, ह्यांत संशय नाही. तपशीलवार माहिती मिळेल तर ती फार उपयुक्त होईल. स्थानाची निवड, इमारतीची बांधणावळ, पूजेअर्चेचे नियम, उत्सवाचे कार्यक्रम, हे बहुतेक त्यांचेच वेळीं ठरून गेले. कालमानानें त्यात फेरफार झाले आहेत ही गोष्ट जमेस धरूनही त्यांचे कर्तृत्व मान्य करावें लागतें. त्यांचे 'प्रशस्तींत'' वर्णन केलें आहे तें येणेंप्रमाणें.

*''गोविंदपंत सन्नाम्ना तथा स्यात्सचिवोऽपरः।*
*विदितोऽमात्यवर्गेषु सदाचारपरायणः।।*
*नित्यं देवतार्चनेऽतिनिरतः शास्त्रार्थवेत्तो गुणी*
*सद्विद्याभिपरः परोपकृतिरतो विद्वज्जनालंकृतः*
*श्रीमत्स्वामिनिकार्यभारनिपुणः स्वाचारनिष्ठाव्रतः*
*गोविन्देति सुधीःसदा विजयतां पापातिभीतोभुवि*
*सदा भक्तिशीलःसदा धर्मशीलः । सदामन्त्रकार्यार्थ विज्ञानशीलः ।।*
*सुमन्त्री दयालुर्गुणज्ञो विवेकी । सुगोविन्दनामा सदा नीतिशीलः ।।''*

ह्या श्लोकांचा मथितार्थ येणेंप्रमाणें आहे : गोविंदपंत हे सदाचारसंपन्न धार्मिक वळणाचे, शास्त्रसंपन्न व परोपकारवृत्तीचे होते. ते पापभीरु असून स्वामीकार्यास वाहिलेले असत. ते दयाळू, गुणज्ञ, विवेकी व उत्तम मंत्री होते. गोविंद हे नांव त्यांनीं सार्थ केले. मालकमसाहेबही या म्हणण्यास दुजोरा देतात. यापलीकडे अधिक माहिती देतां येत नाहीं, याबद्दल खेद वाटतो.

**२. शिवाजी गोपाळ गंधे, इ. स. १७९१**

ता. १७ जानेवारीचे पत्रांत सुभेदार तुकोजीराव मातोश्रीसाहेबांस लिहितात, 'पत्र लिहून यांस आपणाकडे बोलवा.' ह्या एका उल्लेखावरून या गृहस्थांच्या कामगिरीची कांहीं अटकळ बांधतां येईल. हे शिवाजी गोपाळ शिवबाबाजी या नांवानें त्यावेळीं ओळखले जात. कर्नल ल्यूअर्डसाहेबांनीं ह्यांचेसंबंधीं जें टिप्पण तयार करून ठेविले होते. त्यावरून खालील माहिती आम्ही सादर करितो. कैफियतीत आणि जुन्या सरकारी कागदांत ह्यांचे नांव आदरपूर्वक उल्लेखिलेले आढळते. सुभेदार मल्हारजी, देवी अहिल्याबाई, सुभेदार तुकोजीराव या सर्वांशीं शिवबाचा निरनिराळ्या प्रसंगीं आणि कामांत संबंध घडून आला आणि त्या सर्वांचे प्रेम शिवबांनीं संपादिले. कर्तव्यनिष्ठा, स्वार्थत्याग, मनमोकळेपणा, निर्भयता, प्रसंगांवधान हे सर्व गुण या व्यक्तीमध्यें परिपूर्ण दिसून आले. या सर्व गुणांची उदाहरणे साहेब मजकुरांनीं नमूद केली नाहीत याबद्दल खेद वाटतो. (उदाहरणें हाताशी असल्याविना वरील शेरा त्यांनीं खचित दिला नसावा.)

वरील सर्व गुण वैयक्तिक होते. ते गुण आजुबाजूस पसरलेले दिसत नाहींत. खासगी,

फडणिशीं या खात्यांतून अगदी खालच्या पायरीवरून ते काम करीत पुढें उदयास आले. त्या त्या खात्यांची सर्व तपशीलवार माहिती यांनीं पूर्णपणें अवगत करून घेतली होती. पुणें दरबारांत आणि होळकर दरबारांत राज्यकारभारासंबंधीं अगर पैशासंबंधीं जेव्हां प्रश्न उद्‌भवें तेव्हां समजूत पाडण्यासाठीं पुणें दरबाराकडे ह्यांची योजना होती. पहिले माधवराव पेशवे यांस ह्यांची किंमत मोठी वाटे.

नारो गणेश रांझेकर हे गृहस्थ या शिवबाचे हाताखालीं काम करीत होते. असे असूनही शिवाजी गोपाळांनीं नारो गणेशांस प्रधानपद मिळावें म्हणून खटपट केली आणि पेशव्यांची संमती संपादन केली. नारो गणेशानें केवळ कृतघ्नपणानें केवळ आप्पलपोटेपणानें शिवबाची उचलबांगडी करून पुण्यास रवानगी केली. मातोश्रीसाहेबांस ही गोष्ट अमान्य होऊन शिवबास त्यांनीं आपल्या सन्निध घेतलें.

महेश्वर दरबारची पत्रें पुणें दरबारचे वकीलांनीं लिहिलेली आहेत. त्यातही, शिवबा हे पुणें दरबारच्या मागण्या फेटाळून लावतात, असें म्हणतात. तरी पण शिवबाची योग्यता ते वकील मोठी मानतात. सुभेदार तुकोजीरावांच्या मृत्युनंतर शिवबाचे नांव कागदोपत्रीं फारसे आढळत नाही. त्यांनीं आपल्या कामगिरीबद्दल सरकारांत कांहीं मागणी केलेली दिसत नाही व गंधे ह्या घराण्यांत कांहीं जहागीर वगैरे आजमितीस येथें दिसत नाही.

शिवाजी गोपाळ गंधे ह्यांचे वंशजांनीं जी माहिती दिली ती आम्ही सादर करितो : हे पारनेरकर श्रीदेवी अहिल्याबाई होळकर यांचे दिमतीत सल्लागार म्हणून बरेच दिवस होते. सुभेदार मल्हारराव होळकर हे निवर्तल्यावर श्रीदेवी अहिल्याबाईसाहेब यांजवर पुढें वारस कोणी न राहिल्यामुळें व संपत्ती बरीच जवळ असल्यामुळें मोठे संकट येऊन कोसळले असतां ह्या संकटांतून पार पाडण्याची कामगिरी शिवाजी गोपाळ यांनीं आपली स्वामीभक्ती, कळकळ व निरिच्छतेनें त्यावेळीं केली याची साक्ष होळकर कैफियतीवरून ध्यानीं येईल.

श्री देवी अहिल्याबाईसाहेब यांची श्रीत्रिंबक येथील कुशावर्त बांधण्याची कामगिरी बाईसाहेबांच्या इच्छेनुरूप मोठ्या दक्षतेनें बाईसाहेबांचें महत्त्व सांभाळून केली. शिवाजी गोपाळ हे पारनेरचे रहाणारे असून हल्लींचे हुजूर फडणीस हेही पारनेरकरच आहेत. ह्याचे वशिल्यानें त्यांनीं प्रथम श्रीमंत पेशवे यांचे दिमतींत काम केले. पानिपतप्रसंगीं यांनीं उत्तम कामगिरी बजाविली होती व त्या कामगिरीबद्दल श्रीमंतांकडून पांच गांवे जहागीर मिळाली असतां त्यांनीं घेतली नाहीत. ज्यांचे आश्रयाने श्रीमंतांचे पाय दिसले त्यास ही जहागीर दिली असतां भूषणास्पद आहे. म्हणून ती पांच गांवची सनद हुजूर फडणीस व्यास यांचे नांवानें झाली. ती हल्लीं त्यांचे वंशजांकडे चालू आहेत. याचा मोबदला म्हणून शिवाजी गोपाळ यांस हुजूर फडणीस यांनीं आपली प्रत्यक्ष कन्या दिली व आपले जहागीर गांवांपैकीं एक गांव कन्येस लुगडे-चोळीकरितां व कांहीं इनाम जमीनही दिली. त्याची वहिवाट त्यांचे वंशजांकडे (नगर जिल्ह्यांत) आहे. जमीन, गांवें उत्पन्न जरी मुबलक नाही तरी ही एक वंदनीय गोष्ट आहे.

शिवाजी गोपाळ यांचे वंशापैकीं लोक होळकर सरकारचे पदरीं आहेत व यांचे

वंशजांपैकीं अंताजी माणकेश्वर गंधे कामरगांवकर यांनीं प्रसंगीं पैशाची मदत सुभेदार मल्हारराव होळकर यांस केलेली आहे.

**३. शरीफभाई पागाकामदार**

ह्यांचे संबंधात कर्नल ल्यूअर्डसाहेबांनीं जे टिपण तयार करून ठेविलें आहे त्यांतील माहिती येणेंप्रमाणें. यांचा जन्म खानदेशांत झाला. मल्हारजींचा माळव्यांत प्रवेश झाल्यावर शरीफभाई सरकारी पागेंत बारगीर होऊन राहिले आणि तेव्हांपासोन त्यांचे मृत्युपर्यंत म्हणजे इ. स.१७९२-९३ पर्यंत त्यानें आपल्या धन्याची नोकरी इमानें इतबारें केली. बारगिरावरून वाढतां वाढतां आपल्या खात्यांत मुख्य झाला. सुभेदार मल्हाररावांच्या सर्व लढायांत तो स्वत: जातीनिशीं हजर असे. त्याप्रमाणें सुभेदार तुकोजीरावांच्याही लढायांत हजर असे. इ. स. १७८४ ते इ. स. १७८७ ह्या वर्षीच्या कर्नाटकातील युद्धांत तो हजर होता. इ. स. १७८९ पासोन १७९२ पर्यंत उत्तर हिंदुस्थानांतील लढायांत तो लढत होता. या दोन्हीं स्थानांवरून त्याने मातोश्रीसाहेबांस जीं पत्रें पाठविली ती ल्यूअर्डसाहेबांनीं पाहिलीं असावींत असें दिसतें. (दुर्दैवानें ही पत्रें आज उपलब्ध नाहींत.) त्या पत्रांवरून ल्यूअर्डसाहेब म्हणतात कीं, त्याची बाईसाहेबांचे ठिकाणीं अनन्य भक्ती होती. तसाच त्यांचाही त्यावर लोभ व विश्वास अपूर्व होता. शरीफभाई याची वागण्याची हातोटी खरोखरीच अद्वितीय दिसते. सुभेदार तुकोजीराव आणि देवी अहिल्याबाई ह्यांच्यामध्यें जेव्हां जेव्हां मतभेद होई तेव्हां तोड काढून शेवट गोड करण्याचे श्रेय बहुधा शरीफभाईसच मिळे. शरीफभाई सुभेदारांबरोबर जरी बाहेर असत तरी चंद्रावतांसारखीं प्रकरणें जेव्हां उद्‌भवत तेव्हां मातोश्रीसाहेब त्यास बोलावून घेत आणि त्याचेकडून शेवटीं बंदोबस्त करून घेत. अगदी घरगुती गोष्टींत मातोश्रीसाहेब त्यांचा सल्ला घेत आणि तोही तितक्याच प्रेमानें घरगुती गोष्टींत लक्ष घाली.

याप्रमाणें घरीदारीं शरीफभाई प्रिय व यशस्वी होत गेला. सुभेदार तुकोजीराव व कारभारी नारो गणेश यामधील बेबनाव जेव्हां विकोपास गेला तेव्हां शरीफभाई आपण होऊन मध्यस्थीस गेला. अपयशाचा हा पहिलाच टिळा त्याचे कपाळीं आला आणि तोही शेवटलाच झाला. ही गोष्ट त्याचे हृदयास झोंबली आणि त्यांतच त्याचा अंत झाला. त्यास संतती नव्हती व त्याचा संबंध सांगणारेही कोणी आज संस्थानांत दिसून येत नाहींत. मातोश्रीसाहेबांचे नित्याचे पंक्तीस जेवण्याचा मान शरीफभाईस मिळाला होता.

**४. सरदार कालगावडे**

मल्हारजींबरोबर हे खानदेशांतून आले. बारभाई छावणींत हे होते. मल्हारजींचे हाताखालीं हे वाढले. मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत हे वरेच वरती चढले. काशीरावांच्या मुलीचा विवाह ह्यांच्या घराण्यांत झाला. या संबंधामुळें वाघमाऱ्यांप्रमाणें ह्यांचाही दर्जा व लौकिक वाढला. सुभेदार तुकोजीरावांच्या पश्चात जी अव्यवस्था माजली तींत हेही सामील झाले आणि यशवंतराव महाराजांचे कारकीर्दीत ह्यांचा मागमूसही राहिला नाहीं. आज संस्थानांत कालगांवडे या नांवाचें कोणी गृहस्थही आढळून येत नाहींत.

**५. भारमलदादा होळकर**

(इ. स. १७३० तागाईत इ. स. १८२८) कर्नल ल्यूअर्डसाहेबांनीं ह्या गृहस्थासंबंधीं जें टिपण करून ठेविलें आहे त्यावरून खालील माहिती मिळते. मालकमसाहेबांस ह्या गृहस्थानें अहिल्याबाईंच्या चरित्रांसंबंधीं अतिसूक्ष्म अशी माहिती दिली होती. जवळ जवळ अर्धशतकपर्यंत भारमलदादा मातोश्रीसाहेबांच्या तैनातींत व सान्निध्यांत होता. हा भारमल कुंवर (दासीपुत्र) होता. यामुळें बाळपणींच त्याचा राजगृहांत प्रवेश झाला. प्रथम प्रथम देवाकडील गंधादि व्यवस्था याकडेस होती. पुढें मातोश्रीसाहेबांच्या विश्वास व प्रेमामुळें त्यांच्या सर्व धार्मिक कृत्यांत व व्रतांत तो त्यांचा उजवा हात होऊन राहिला. इ. स. १७६६ सालपर्यंत त्याचें नांव सरकारी कागदांत फारसे आढळत नाही. मात्र मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीस प्रारंभ होताच याचा उदयकाल आला. चोर-लुटारू लोकांनीं कांहीं गांवें उद्ध्वस्त केली असतां मातोश्रीसाहेबांनीं भारमलास त्या कामगिरीवर पाठविलें. भारमलाने बंड तर शमविलेच पण गांवगन्ना पुन्हा शांतता स्थापून लोकांची भरपाई करून दिली. ह्यानंतर मातोश्रीसाहेबांनीं त्यास अगदी सान्निध्यांत घेऊन आपल्या मुलामाणसांची व्यवस्था त्याजकडे सोंपविली. मातोश्रींचा नातू नथ्याबा फणसे शेवटल्या दुखण्यांत अत्यवस्थ असतां सर्व शक्य दैवी व मानवी उपाय भारमलानें आपल्या जबाबदारीनें योजिले. भारमल ह्याची मातोश्रीसाहेबांच्या ठिकाणीं दैवी भक्ती होती. मातोश्रीसाहेबांच्या निःस्वार्थ वृत्तीनें व व्यापक धर्माचरणामुळें तो त्यांस अवताररूपी मानी. सुभेदार तुकोजीराव व त्यांचे कुटुंब या सर्वांचा भारमल हा 'दादा' होता; तसाच मातोश्रीसाहेबांचाही होता. मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत व ह्यातीत तो कधीच फारसा दूर गेला नाही. त्यांच्या पश्चात् त्यांचे देवतार्चन भारमलानें पूर्वस्मरणपूर्वक चालविलें. मातोश्रीसाहेबांच्या पश्चात् जो 'गर्दीकावख्त' आला, त्या कालांतही मातोश्रीसाहेबांचे देवतार्चन, धर्मविधीं, हीं सर्व भारमलानें जिवापलीकडे जोपासलीं. मालकम म्हणतात, ''अहिल्याबाईचे नांव हें त्याला देवाचेच नांव झालें होतें.''

मातोश्रीसाहेबांच्या पश्चात् तुकोजीराव हे पुणें दरबारांत आपले व आपल्या मुलांचे तंटे-बखेडे ह्या संबंधांत गुंतले असतां भारमल महेश्वरास राहून राज्यकारभार प्रत्यक्ष जरी हाकीत नव्हता, तरी तो सूत्रधार होता.

सुभेदार तुकोजीरावांच्या पश्चात् भावाभावांत कलह सुरू झाले. पुणें दरबाराचा बंध सुटला, यशवंतराव होळकरांच्या शिंदे, भोसले व पवार इत्यादिकांच्या बरोबर लढाया चालू झाल्या. अशा स्थितींत कोणत्याही पक्षात न गुंततां भारमल आपलें काम सांभाळून राहिला. यामुळें यशवंतरावांच्या हातात कारभार येतांच त्यांनीं नेमाड आणि नेमावर जिल्ह्यांचे काम याचेवर सोंपविलें. भारमलानें आपल्या नेहमीच्या पद्धतीनें काम चालवून यजमानाचे प्रेम व विश्वास संपादिला. महाराज यशवंतरावाच्या पश्चात् राज्यांत जी बेबंदशाही माजली त्यावेळीं महेश्वर येथें कमाविसदारांचे काम सांभाळून भारमल राहिला होता. इ.स. १८१८ त जो ब्रिटिशांशी तह झाला त्यावेळीं आणि त्यानंतरही मालकमसाहेबांस याजपासून पुष्कळशी

पुरातन उपयुक्त माहिती मिळाली. इ. स. १८२८ त त्यानें इहलोकीची यात्रा संपविली.

मालकमसाहेब याच्या व्यक्तित्वाबद्दल आदर दर्शवितात. शंभर वर्षाच्या आयुष्य-क्रमांत कोठेंही फटका न लागतां अखेरपर्यंत सुरक्षित राहणें आणि तेंही बदलत जाणारे काळांत, हें कांहीं सामान्य भाग्य नव्हे.

### ६. विसाजी शामराज देशपांडे

महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें यांत उल्लेखिलें आहे कीं, 'अहिल्याबाई, विसाजी शामराज, मावशीबाई व महादजी शिंदे उर्फ पाटीलबुवा हे नेहमीं खलबतांत असत.' हेच विसाजी शामराज देशपांडे होत. त्यांच्या वंशजांकडून व इतरत्र जी माहिती मिळाली ती येणेंप्रमाणें; जिल्हा सातारा तालुके माण कसबा ताथवडे उर्फ संतोषगड येथें श्रीछत्रपती महाराजांचा संतोषगड लढावू किल्ला असून वरती श्रीदेवीचें मंदिर आहे. पहाडी किल्ला असून त्याचे चढणीचे मध्यभागीं रस्त्यांत पाण्याचे टाकें आहे. तें कौठीचे झाडाखालीं असल्यामुळें त्याचे नांव कौठीटाकी असें पडलें आहे. येथें शामराजपंत आपले कुटुंबासह राहत असत. शामराजपंतांस दोन मुलगे. वडिलांचे नांव माणिकराव, हे पेशवे सरकारचे पदरीं सरंजामी होते. धाकट्याचे नांव विसाजी. या विसाजीने काळभैरवाची स्थापना केली. तेव्हांपासून ते दैवत त्यांचे कुलदैवत झाले आहे.

सुलतानजी लांभाते त्याचे प्रांतातून येऊन होळकरशाहींत प्रविष्ट झाले होते. लांभात्याच्या द्वारे विसाजीचा प्रवेश होळकरशाहींत झाला. हळूहळू राजद्वारीं त्यांचा प्रवेश स्थिर होऊन त्यांचे राहणें महेश्वरीच होऊं लागले. महादजी शिंदे उज्जेनीस राहत असून त्यांचा संबंध वारंवार येत गेल्यामुळें त्यांजकडे जाण्यायेण्याची व विनंती करण्याची कामगिरी विसाजी शामराज यांजकडेस सोपविण्यांत आली.

(१) ता. १-१२-१७८० रोजीं विसाजीपंत उज्जेनीहून महेश्वरास आले. त्यांसी मावशीबाईच्या विद्यमानें निराळेंच खलबत होत असतें. ता. १७ पर्यंत पथकसुद्धां ते तेथेंच होते. सांप्रत सल्ला मसलतीस पोक्त तेच आहेत, असे पेशवे यांचा वकील लिहितो.

(२) सुभेदार तुकोजीराव व नारो गणेश आपण होऊन पुण्यास उठून गेले. मातोश्रीसाहेबांस याबद्दल विषाद वाटणें साहजिकच होतें. यावेळीं विसाजी शामराज मातोश्रीसाहेबांस बोलले, 'राजश्री तात्यांनीं श्रीमंतांच्या बुद्धीस विपर्यास घालून हे मसलत उभी केली आहे. हें पुढें वाईट दिसते. तुम्ही आपले जागां सावध असा. इकडील इंग्रजांचा बंदोबस्त करून मीही आपले भेटीस लवकरच येतों. याप्रमाणें पाटीलबाबांनीं निवेदन केले आहे.' यावर हरकुबाई (मावशीबाई) ह्या पुष्कळशा बोलल्या. त्यावरती विसाजीपंत बोलले, 'श्रीमंतांची वारंवार तुकोजीबाबांस शिक्षा (= शिकवण) अशी असावी कीं बाईचें आज्ञेंत राहत जाणें. म्हाताऱ्यांची म्हातारपणें वडिलांची वडिलपणें राखण्याविशीं व कोठें फूट पडूं नये येविशयींच्या शिक्षा (शिकवणी) पूर्वापार श्रीमंतांचे

घरच्याच होत. हे दौलत विश्वकुटुंबीं होय. श्रीमंत जे करितात ते विश्वाच्या बऱ्याचसाठी करितात. यास्तव प्रस्तुत श्रीमंतांनीं तुकोजीबाबांस निषेध करून पत्रें पाठवावीं आणि बाईचे भेटीस पाठवावें यांत फार उत्तम आहे. आम्ही सर्व श्रीमंतांचे शुभचिंतक आहोत.'

(३) कांहीं दिवसांनीं पाटीलबाबांस आणण्यास विसाजीपंतांचीच नेमणूक झाली. पाटीलबुवा आले. खलबताची सर्व योजना विसाजीपंताच्या द्वारें झाली.

(४) बाजीराव बर्वे ह्यांस पेशव्यांकडून वारंवार बोलावणें येत होते. बाईसाहेबांचे म्हणणें कीं त्यांनीं जावे; पण ते जाईनात. तेव्हां विसाजीपंतांचा विचार घेण्यांत आला. विसाजी बोलले.'असे जे बदफैली आहेत त्यांचा बंदोबस्त करावा. नाहींतर श्रीमंतांचा शब्द तुम्हांकडे लागेल. असे एकनिष्ठ इनामी असते तर असें खराब कां फिरते? श्रीमंतांचे येथें नीति आहे.' अशा प्रकारें घटका दोन घटका बोलल्यावर बर्व्यांवर परिणाम झाला आणि ते म्हणाले, 'आम्ही जातो; परंतु पक्केपणें बाईंनीं बंदोबस्त करून द्यावा.' ह्यावर बर्व्यांचें प्रकरण विसाजीपंतानीं विल्हेस लाविलें.

(५) पेशव्यांची लग्नचिठ्ठी आली. बाईंनीं वस्त्रें व जवाहीर गानूंच्या विचारें निवडून काढलीं. तेव्हां विसाजीपंत बोलले, 'वस्त्रांस व जवाहीरास श्रीमंतांस काय कमी आहे? परंतु घोडे चांगले पाठविल्यास जेव्हां बसतील तेव्हां स्मरण श्रीमंतांस आपले होईल.' वस्त्रें व जवाहीर विसाजीपंतांस पसंत पडल्यावर पुण्यास पाठविलीं.

(६) भोपाळवाले पठाण. भोपाळच्या किल्ल्यांत टिकाईत अधिकारी जो होता तो घरचा बंदा होता. भाऊबंदाच्या द्वेषेंकरून बायकांनीं त्यास बसविलें होतें. तो बंदोबस्त करून होता. अस्सल किल्लेदाराचे भाऊबंद होते त्यांस त्यांनीं परागंदा केले होते. ते देवी अहिल्याबाईकडे येऊन मदत मागूं लागले. बाईंनीं विसाजी शामराज, कृष्णाजी तानदेव इत्यादि मुत्सद्दी बसवून खलबत केलें. त्यावेळीं विसाजी शामराज म्हणाले, 'आलेल्यांचें साहित्य आपण केलें आणि प्रस्तुत जो टिकाईत आहे त्याचे स्वाधीन महाल, मुलूख व पैका देणें-घेणें आहे. त्यानें तिकडील पाटीलबाबांकडे संधान लावून त्यांस आपले साहाय्य केले ते प्रस्तुत पाटीलबाबांशीं आपल्याशी विटेल असें करूं नये. सांप्रत हे वर्तमान पाटीलबाबांस लिहून पाठवावें. त्यांचे आपले संवतें एक झाले, म्हणजे याजकडे सरकारची व आपली उभयतांची नजर काय ठरविणें ते ठरवून उभयतांच्या संवते यांचे साहित्य उत्तम प्रकारें करावें.' त्यांनींही तें मान्य केलें. ते दिवशीं पठाणास मेजवानी केली. पांच-सात जणांस वस्त्रें देऊन संध्याकाळीं बिदा केलें.

ह्या सर्व बाबींवरून विसाजीपंत किती पोक्त, दूरदर्शी व नेक सल्ला देणारे होते हे दिसून येणारे आहे. अशा किती तरी बाबी त्यांनीं सोडविल्या असतील पण त्यांचा पुरावा आजमितीस आपलेकडे नाहीं.

मातोश्रीसाहेबांची कारकीर्द यशस्वी होण्यास ज्यांची सेवा कारणीभूत झाली अशी जवळचीं व दूरचीं अनेक माणसें असणार. त्यापैकीं ज्यांची थोडीबहुत माहिती मिळाली ती वर आलीच आहे. एक जमाखर्चाचा उतारा देत आहोत त्यावरून अशा कांहीं व्यक्तींची नांवें आपणापुढें येतात. त्यांची उपनांवें नमूद नाहीत याबद्दल खेद वाटतो. त्यावरून नांवें तर कळतीलच; शिवाय त्याबरोबर त्यातील 'तर आणि तम' हेही कळेल. तो उतारा येणेंप्रमाणें. :

यादी समजाविशीं कारकून मंडळी मुक्काम महेश्वर (इ. स.१७७५ तैनात सालिना)

| | |
|---|---|
| ५३०० | राघो रावजी (रावजी महादेव व्यास हुजूर फडणीस यांचे वंशज) खासा २०००, शिवाजी गोपाळ ११००, जयराम रावजी ७५०, अप्पाजी राजाराम ७५० व महिपत गिरमाजी ७०० |
| २००० | विनायक बाजीराव |
| १५०० | बाळाजी लक्ष्मण |
| ३७५० | व्यंकोजी मुकुंद, खासा १५००, राघोराम ७५०, महादजी रुख्मांगद ५००, नानाजी गंगाधर ४०० व गिरमाजी व्यंकटेश ६०० |
| २६०० | नरहर पिलाजी सबनीस. आसामी १६०० व पालखीबद्दल १००० |
| ३२५० | गोविंद पुरूषोत्तम मुनसी. खासा २०००, गोविंद कृष्ण ७५०, गोविंद जितेंद्र ५०० |
| २९०० | काशी शिवाजी. मशालनिल्हे १५००, खंडो यशवंत ६००, रामाजी मोरेश्वर ४०० व अंताजी जगन्नाथ ४०० |
| १००० | त्रिंबक विनायक |
| ५०० | हरिहर उद्धव पोतनीस |
| २४५० | आश्रित मंडळी, सकंभट ९५०, भटंभट ५००, कचेश्वर भट ५००, व मनोहरभट पुराणिक ५०० (अंबादासभट पुराणिकाचे वंशज पाचे) |
| २५२५० | |
| ४३५० | जास्ती, राघोरावजी मार्फत. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४०० | संक्राजी कृष्ण | ४०० | अप्पाजी भगवंत |
| ४०० | बालाजी कृष्ण | ४०० | आबाजी महादेव |
| ४०० | खंडो गोविंद | ४०० | विसाजी गोविंद |
| ३५० | गोविंद दादाजी | १६०० | सबनीसांकडील असामी |

२९६००

एकूण दुसाला रुपये ५९२००

यासी भरणा.

| | |
|---|---|
| ५५०० | पेशजीअदा राघोरावजी ३५००, व्यंकाजी मुकुंद १५०० व हरिहरपंत ५०० |
| ७०० | गोविंद दादाजी |
| ५३००० | हल्लीं वराता पेस्तर साल ऐवजीं |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५००० | परगणे | मल्हारगड | १५००० | परगणे | रामपुरा |
| ५००० | ,, | इंदूर | ७६०० | ,, | पिढावे |
| १०००० | ,, | सिरोंज | १०००० | ,, | संस्थान देवळे |
| ४०० | ,, | मोहगम | | | |

५३०००

५९२००

**हुजूर फडणीसी काळेगांव,**
**जि. नगर दप्तर**

**आधार ग्रंथ**

१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
२. महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें
३. होळकरांची कैफियत
४. सरकार बिजागड येथील ताळेबंद



**प्रकरण २४ वें**

# देवी अहिल्याबाईंचा राज्यकारभार

***पत्रांक १.*** (इ. स. १७८८) दफा ते पत्र : करवंद प्रगणे थालनेर बापूजी यांस कीं दुर्जनसिंग राऊळ तालुकेमजकूर याजकडे चिरंजीव राजश्री तुकबांनीं घासदाण्याची वरात करून वसुलास स्वार पाठविले होते. त्याजला मनाई पाठविली तेव्हां उठोन गेले. वरकडाप्रमाणें घासदाणा घ्यावा, परंतु तालुके मजकूरची निम्मे राऊळकी सरकारची. त्याकरितां घासदाणा माफ करून, हें पत्र पाठविलें आहे तरी मुजाहिम न होणें.

***पत्रांक २.*** (इ. स.१७८९) राजश्री आनंदराव दामोदर, मुकुंदराव दामोदर शिदोबा दामोदर यांस कीं तालुके मल्हारनगर येथील फडणीसीची असामी राजश्री भगवंत कृष्ण याची आहे. तेथें मशारनिल्हेचे तीर्थरूप कै. कृष्णाजी दामोदर सरकारकामास आले. सबब त्यांचें अगत्य जाणोन पूर्ववत असामी भगवंत कृष्ण याजकडे सांगोन चिरंजीव तुकबांनीं पेशजी सालीं माजी मामलेदारांचे नांवें सनद देऊन तुमचे नांवें अलाहिदा पत्र दिलेंच आहे. तरी तालुके मजकूरचे फडणीसीचे कामकाज करून मशारनिल्हे वेतन घेत जातील. तुम्ही मुजाहिम न होणें.

***पत्रांक ३.*** (ता. ११ डिसेंबर इ. स. १७९०) श्रीमंत मातोश्रीसाहेबांचे शेवेसीं आज्ञाधारक श्रीपत मैराळ कृतानेक आशीर्वाद विशेष. महाराजांनीं राजश्री शंकरराव यांजला परगणे मजकूरचे पाहणीस पाठविलें त्याप्रमाणें पाहणी दरोबस्त केली. महाराजांकडे पाहणीचें पत्रक व देहझाडा पाठविला आहे. त्यावरून महालाचा विचार ध्यानास येईल. याविशीं जमीदारांनींही विनंती लिहिली आहे. पुढें जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक होईल.

***पत्रांक*** ४. (ता.४ डिसेंबर १७८९) तुकोजी होळकरांकडून मातोश्रीस रा. रामचंद्र आबाजी वानवळे पैठणाहून लष्करांत येणार बरोबर कापड व घोडीं, उंटे, तट्टे वगैरे येतील. त्यास महेश्वरी दाखल झालियावर वडिलीं स्वार बरोबर देऊन सुरळीत पावत तें केलें पाहिजे.

***पत्रांक*** ५. (ता.१४-१०-१७८९) माधवराव भुसकुटे यांजकडून मातोश्रीसाहेबांस. इकडील वृत्त कीं राजश्री मल्हारराव पवार उदाजी पवाराचे नातू दोन वर्षे म्हणत होते. तों श्रीदेवीचे नवरात्र उत्सवांत आमत्रंण केले. ते कथेंत येऊन भेट झाली. घटकाभर बसले होते. पानसुपारी दिली. उपरांत उठोन गेले. फिरोन आश्विन वद्य सोमवारीं प्रात:काळीं निरोप पाठविला कीं भेटीस येतों. मातब्बर माणूस म्हणून यावें असें सांगून पाठविलें. त्यावरून तीस चाळीस माणसांसह आले, भेट झाली. बोलणी होत होती. विडे दिले. दगा करतील असे माहीत असते तर बंदोबस्ती केली असती. तों अकस्मात दगा करावयाचा विचार करून त्यांजकडील पठाण पुढें येऊन सुरा काढून चालविला तेव्हां दगा असें समजलें. सुऱ्याची जखम बोटांस हलकीच लागली. इतक्यांत त्यांच्या लोकांनीं तलवारी उपसोन तक्याजवळ आले. दोन प्रहरचा समय कचेरींत माणसें फारशी नव्हती. दहा-पांच माणसें होती. तों तलवारीची मिठी पडली. त्यात साहेबांच्या कृपेनें ईश्वरें वाट दिली. खोलींत जाऊन दुसरें दरवाजानें घरांत निघोन गेलों. दोन भले माणूस पाडाव झाले आहेत. पवार निघोन जातांना आपले माणूस सांभाळून पाठलाग केला तो आठ-दहा माणसें त्यांचीं ठार केलीं. साता स्वारानिशीं पळोन वोढापेरास गेला. पाठलागांस स्वार लागले. परंतु रात्र पडली. ज्वारींत घुसून तिडीबीडी होऊन गेले. दोन स्वार मारले गेले. त्याचा भाचा व उदाजी पवाराची राख बिऱ्हाडीं सापडली. चिरगूट पांघरूण तख्तावर राहिलें आहे. याचा विचार, पुढें काय करावें ही चिंता लागली आहे; त्यास महाराजांची आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करू. पवारांनीं दगा केला होता. परंतु महाराजांचे पुण्यप्रतापें सर्व क्षेम आहे.

***पत्रांक*** ६. (ता.१२ मार्च इ. स. १७९०) तुकोजीरावांकडून मातोश्रीसाहेबांस. वडिलांकडून पत्र आलें त्यांत आमचे खातरजमेचें व अभयाचें विस्तारें लेखन केलें तेणेंकरून बहुत संतोष पावलो. आम्हांस सर्व आधार वडिलांचे चरणींचा आहे. आजपर्यंत वडिलांचे पुण्यप्रवाहें करून दौलतीचा निर्वाह होत आला व पुढेंही आश्रय तोच. सांप्रत प्रासंगिक वर्तमान अलाहिदा सादर केले आहे. मजकूर ध्यानांत येऊन गाडेलोटल्या अर्थ करणें वडिलांकडे आहे.

***पत्रांक*** ७. (ता. १३-१-१७९१) तुकोजीरावांकडून मातोश्रीसाहेबांस परगणे पिंपळोद येथील ऐवजापैकीं महाडिकाकडील पागेच्या खर्चाचा सावकाराचे रद कर्जाची व्यवस्था करून दिली तो मजकूर वडिलांस विदित आहेच. नेमणुकीप्रमाणें वहिवाट झाली पाहिजे. याजकरितां लष्करांत पागेच्या खर्चाची बेगमी तिलोकसी पदमसी याजकडून करवून महाडिकाचे नेमणुकीचे आकार रदकर्जी लावून दिला. असें असतां गोविंदराव महाडिक परभारें वसूल करतात. सावकारास ऐवज पावत नाहीं. तेव्हां सरकार चाकरी घडणार नाहीं. तरी वडिलें गोविंदराव महाडिक यांस ताकीद करतील.

***पत्रांक ८.*** (ता. १३-८-१७९०)  खंडो बाबूराव यांजकडून मातोश्रीसाहेबांस. पत्रीं आज्ञा कीं चिरंजीव राजश्री तुकोबा मोहीमसीर, सरकारांत ऐवजाची ओढ, फौजेच्या खर्चाकरितां चिरंजीवांनीं बळवंतराव वाकडे याजपासून कर्जाऊ घेऊन देशच्या महालावर वराता करून दिल्या आणि भरण्यांत परगणे मजकूरची रसद दोन लक्ष धरली आहे. महालचा मक्ता आहे त्याप्रमाणें देऊन रयत राजी राखावी व मक्त्याप्रमाणें जमा द्यावी म्हणोन आज्ञा. आज्ञा किमपि अमान्य होणार नाहीं. पहिल्यापासूनही हेच रीत आमची कीं 'स्वामिकार्यगत:प्राण अंते तिष्ठति माधव:' ह्याचा अर्थ : पूर्वीपासून आमच्या वर्तणुकीची रीत साहेबीं जाणतात. प्राण गेला तर सुखाने जावो, परंतु आज्ञा मान्य करणें प्राप्त झालें, या अर्थी साहेबींही कृपाच करीत आले आणि पुढेंही साहेबीं कृपाच करतील हा भरवसा आहे. आमची परीक्षा सहस्त्र वेळां साहेबीं घेतली आहे. आतां अब्रू साहेबीं रक्षण करावी. साहेबांचे चरणारविंदीच आमचा जन्म गेला. आतां साहेब अंतर कसे देतील? श्रावण शु. १० मुहूर्ते निघोन सेवेशीं चरणांपाशीं आलोंच जाणावें.

***पत्रांक ९.*** (ता.१२-१२-१७९०) तुकोजीरावांकडून मातोश्रीसाहेबांस. मौजे माथण्या परगणे पिढावा हा गांव वेदमूर्ती बाळाराम जोशी यांजकडे इनाम आहे. तेथील भूमियांनीं खलेल करून वस्ती होऊं देत नाहींत व सुरळीत अंमलही देत नाहींत. याचा बंदोबस्त झाला पाहिजे. जोशी मशारनिल्हे स्वारी समागमें आहेत. तरी वडिली मामलेदारास ताकीद करून गांवचा बंदोबस्त होईल तें करतील.

***पत्रांक १०.*** (ता.२१-१-१७९१) तुकोजी होळकरांकडून मातोश्रीसाहेबांस, पुण्यापर्यंतच्या काशीद जोड्यात बंदोबस्त करणें व महतपूर परगण्यांत काशीद लुटला गेला, त्यांचे बंदोबस्ताविषयीं.

***पत्रांक ११.*** (ता.२१-१-१७९१) तुकोजीरावांकडून मातोश्रींस. लष्करांत वाकडे व पदमसी या उभयतांची मातब्बर दुकानें, पेशजीपासून उभयतांही सरकार-उपयोगीं पडत आले. हल्लीं गुमास्ते आहेत. ते कामकाज करितात. तत्रापि त्यांस शेटाचा वचक राहतो. तरी शेटांस येथें पाठविण्याची व्यवस्था व्हावी.

***पत्रांक १२.*** (ता.३०-८-१७९१) यशवंतराव गंगाधराकडून मातोश्रीसाहेबांस. पेशजी साहेबीं रामपूरा खुर्द जयपूरचे राजाकडून सरकारानें घेतल्याची पत्रें श्रीमंतांस व श्री. नानांस व राजश्री हरिपंत तात्यांस आली होती. ती पाहून श्रीमंतांस संतोष झाल्याचे पेशजी साहेबांस लिहिलें आहे, त्याजवरून श्रवणांत आलें असेल. जाब द्यावयासी आज्ञा झाल्याप्रमाणें श्रीमंतांचा व नानांचा असें दोन्ही जाब सेवेशीं पाठविले आहेत, त्यावरून ध्यानांत येईल. रा. हरिपंतांचे पत्र लष्करांत पाठविले आहे. जाब आल्यावर पाठवून देऊं.

***पत्रांक १३.*** (ता.१-९-१७९१) मातोश्रीसाहेबांकडून भारमलदादास पत्र. जाखोजी जगताप मौजे वाघाडी प्रगणे थालनेर याजकडील स्वार पेंढाऱ्यांस लुगारीस जातात, असा आरोप ठेवून जगताप मजकूरांपासोन तुम्ही चारशें रुपये वसूल केले ते जमा आहेत. परंतु तपास करितां जगतापांकडे दोष नाही. सबब सदरहू चारशें रुपये माघारें देणें.

***पत्रांक १४.*** (ता. ६-५-१७९२) तुळसाजी वाघाकडून मातोश्रीसाहेबांस पत्र, सखाराम मुरार यांनीं सविस्तर लिहिलें तें समजलें. ऐशास वडिलांनीं चौकशी करून मग आज्ञा कर्तव्य ते करावयाची होती. चौघांचे सांगितल्यावर धन्यांनीं चित्तावर धरून लेकावर रोष केला. चाकरचुत्र्यांनीं जादूटोणा केला. याचें नामग्रहण नसावें. चाकरमाने लोक आहेत. कोणास उपद्रव देणार नाहींत.

***पत्रांक १५.*** (ता.११-५-१७९२) चिरंजीव तुकबास पत्र कीं तुम्हांकडून पत्रें येत गेली कीं लोकांनीं गवगवा आरंभिला आहे. पदमसी तिलोकसी सावकार याचे मागील साडे तीन लक्ष देणें ते स्वदेश खानदेशचे महाल ऐवजी खुलासा. परंतु हा ऐवज पटल्यावाचून पुढें ऐवज सावकार देत नाही. म्हणोन ऐशियास स्वदेश खानदेशच्या वराता साडेतीन लक्षांच्या लावून दिल्या आहेत. ऐवज पटण्यास चार अधिक दिवस लागतील. भोइटे वगैरे लोकांनीं धरणीं बसविलीं आहेत. याजकरितां सावकार मजकूरापासोन हुंडी भाद्रपद वद्य ६ शके १७१३ एकतीस दिवसांचे मुदतीची लष्कर चलणी ऐवजाची पाठविली आहे. पावल्याचें उत्तर पाठवावें.

***पत्रांक १६.*** (ता.२९-११-१७९२) काशीनाथ अप्पाजी किल्लेदार चेनपूर यांस. तुम्ही पत्रें पाठविली ती पावून त्यांचीं उत्तरें खालीलप्रमाणें -

१ प्रगणे मजकूर ऐवजीं रु.५००० पाठविलें तें पदमसी सावकाराकडे जमा असे.

२ फिरंगी व लछीराम परदेशी अशा दोन असाम्या गांवोगांव चौकशी करीत मारुगडपर्यंत आले. म्हणोन त्यास कोठें माहितगारी होऊ न देतां दोघे माणसे देऊन अडचणीच्या वाटेनें रस्त्यास लावून देणें.

३ बऱ्हाणपूरचे वर्तमान कळलें. पुढें नवल विशेष असल्यास कळविणें.

***पत्रांक १७.*** (ता.१२-१२-१७९२) (फडणीशी हिशेबांचे कागद महेश्वर येथें अहिल्याबाईकडे गेल्यावर तेथें दरबाराकडून खालीं लिहिल्याप्रमाणें मंजुरीचा शेरा सापडतो.) एकूण जमा सत्तर हजार एकशेंपन्नास रुपये साडे पंधरा आणे जमा. पैकीं खर्च अठ्ठावन हजार चारशें दोन रुपये साडे पंधरा आणे. बाकी महाली एकूणीस हजार नऊशें अठ्ठावीस सवाचौदा आणे. फाजील मामलेदार मशारनिल्हे यांचे आठ हजार एकशें ब्यायशी रुपये सव्वासहा आणे. करार. नि. मार्गशीर्ष वद्य १३ शके १७१४ मुक्काम महेश्वर जाणिजे.

***पत्रांक १८.*** (ता.२४-७-१७९४) अप्पाजी चिमणाजी गोंधळेकर यांजकडून अलिकडील वर्तमान कीं रा. हरीपंताचा काळ जाहला व श्रीमंत पाटलांचा काळ जाहला. हे वर्तमान कळलेच असेल. सुभेदारांची रवानगी लौकर करण्याविषयीं विनंती लिहिली होती. इकडे येतात म्हणून आवया येतात. परंतु दाखल होत नाहीत. तेव्हां माझे लिहिण्याची असार्थकता सहजच आहे. त्यास आपण म्हणतील कीं, तुम्ही संकटांत आहांत म्हणून लिहितां. त्यास आमचे दैव आम्ही भोगीतच आहों. आपण धर्मपरायण सबब आपले ध्यानांत आहेच. परंतु श्री. थोरले सुभेदारांचे अन्नाचा प्रताप माझे अंगीं आहे. याजकरितां इकडील हुजरातीचे कांहीं विशेष कार्यभाग उरकावयाचे यश तुमचे सरदारीकडून व्हावें, म्हणून वारंवार

आपल्यास लिहित असतो. तरी सत्वर पाठवावें. माझे लिहिण्याचा आशय पुढें आपल्यास कळेल. तेव्हां माझे स्मरण करतील. बरोबर चि.रा. मल्हारराव यांस द्यावे. जवळ खरपूस माणूसही नेमून द्यावा यात कांहीं चमत्कार आहे. याचा अर्थ पुढें साहेबांचे ध्यानांत येईल.

***पत्रांक १९.*** (जानेवारी इ. स. १७९५) मातोश्रीसाहेबांचे गणपतराव नारायण यांस पत्र. तुमचें पत्र पावलें. लेखनार्थ अवगत जाहला. तुमचे पत्राचे एक दिवस पूर्वी चि. राजश्री तुकबाचें पत्र आलें होतें. त्याचें उत्तर चिरंजीवांस लिहिलें आहे. सारांश, दौलत मोठी, सरकारांत पैक्याची ओढ, श्रीमंतांस मसलत, चिरंजीव प्रसंगीं पोहोचले. वरकड सरदारांच्या तयाऱ्या सिद्ध आहेत आणि इकडील अद्याप बंदोबस्त कांहींच नाहीं, चित्तास वाईट वाटतें. या प्रसंगीं सर्वांनी एकदिल राहून धनी व कारभारी यांनीं ऐक्यतेनें चालावें, यांत कामाचा आळा. सावकाराशीं पत राहून सरकार चाकरी घडून दौलतीचाही आबताब राहून गाडें चालते. तो प्रकार न घडतां वेगळाल्या चाली पडून अशा गोष्टीं घडतात हें कोणासही चांगलें नाहीं. बाळाजीनानांस दौलतीचा अगत्यवाद. ते अनुकूल आहेत. ओढीच्या प्रसंगास वचनाची प्रामाणिकता व सचोटीस जपलें तरच चालतें. तुम्ही घाबरे न होतां हिंमत धरून आपले कडे शब्द न ये या गोष्टीस जपून चिरंजीवांचे सांगितल्याप्रमाणें वर्तणूक करणें. एकनिष्ठपणें सरकार चाकरीवर लक्ष ठेवल्यास ईश्वर उत्तम करील. सावकारास चिरंजीवांपाशीं नेऊन त्याची खातरजमा करून ऐवज घेऊन गाडे चालवून प्राप्त प्रसंगास कोणाविसीं विलग न पडे तें करणें.

***पत्रांक २०.*** (ता.२६-१-१७९५) तुकोजीरावांकडून मातोश्रीसाहेबांस पत्र. रा. बाळाजी लक्ष्मण यांनीं बहुत धावधूप केली परंतु कोणी सावकार उभा राहिना. फौज आणि पैका दोन्ही गोष्टीची बळकटी असल्याव्यतिरिक्त आपले स्वरूपास नीट नाही त्यास श्रीमंतांबरोबर असतां गळाठा नसावा. या अन्वयें बंदोबस्ताची पैरवी कोणत्या अन्वयें करावी? घरचा प्रकार पाहतां दोन-दोन सालचा ऐवज येऊन चुकला. तेव्हां सावकार खातरजमेचा पाहून गाडे चालते करावे. सरकारचे कूच होऊं लागल्यास आपल्यास राहतां नये. हा विचार चालू असतां रा. बाळाजीपंत नानांचे मशारनिल्हेस सांगणें झाले कीं तुम्ही सरदारीचा बंदोबस्त कसा केला. आम्ही सांगू तसा फौजसरंजाम जमवून मसलतीचा समेट होय. तोंपावेतों कमी पडूं नये या गोष्टीची खातरजमा करावी. तेव्हां आम्हांकडून कारभार होत नाहीं असे उत्तर करून येथेंही येऊन सांगितलें. नंतर रा. यशवंतराव गंगाधर यांजला त्यांनीं बोलावून कांहीं तजवीज करून पुढील योजना करण्याविषयीं वडिलांस लिहिलेंच आहे. सिलेदार, उठोन गेले, पागेंत घोड्यावर बारगीर नाहीत. शागीर्दपेशाचा प्रकारही असाच. पलटणा दरमहा पगार द्यावा लागतो. चंदीचा बेत राखिला पाहिजे, प्रसंग अडचणीचा. पैशावांचून काय करावें? याउपर वडिलांकडून पैशाची सरबराई होऊन आल्यास आपले स्वरूपांची गोष्ट घडेल. शरीर दिवसेंदिवस क्षीण होत आहे. एकवेळ स्वामींसेवेंत पुढें होऊन उजळणी करावी. त्यांत श्रीमार्तंड जसें घडविणार तसें घडेल. वडिलांचे पुण्यप्रवाहें करून घडेल तें खरें.

***पत्रांक २१.*** (ता.२०-४-१७९५) खंडो बाबूरावकडून मातोश्रीसाहेबांस पत्र. पेशजी बाकीची याद महादाजी पंतांपाशीं पाठविली आहे. त्याप्रमाणें आमचे फाजिलांत लावून दिली

म्हणजे दोन-तीन वर्षांत वसूल घेऊं म्हणजे आमची लज्जा महाराजांनीं राखिली असें होऊन चारचौघांत अब्रू राहील. पूर्वीपासून लौकिकास चढविलें तो प्रसंग आज निभावला.

***पत्रांक २२.*** (खंडो बाबूरावाचें पत्र अपूर्ण आहे. मथितार्थ खालीलप्रमाणें) परगणे अंबाड येथें साहेबांच्या नांवांचा अहिल्यापुरा नांव ठेवून पेठ नवीन वसविली. त्यावर कसबे जालनापूर येथील मोगलांचा उपद्रव भारी झाला. दोन चार सावकार नागाविले. यामुळें तेथील सावकार, मातब्बर दलाल ज्यांचे विद्यमानें लाखो रुपयांचे कापड खरीदी फरोक्ती व्हावी, ते सावकार कबीलेसुद्धां आणिले आहेत व साळी, कोष्टी, मोमीन व पितांबर विणणार पटवे व खतरी ऐसे मिळून दोन चारशें असामी अंबाड येथें आणिले. साहेबांचे नांवचा पुरा कौलाचा वसविला आहे. साहेबांच्या नांवाचा लौकिक भारी आहे. पुऱ्यास कुसू व दरवाजा चिरेबंदी करविला. दरवाजाचें काम होत आलें आहे. औरंगाबादही खराब होत चालली. तेथीलही सावकार तजविजीनें आणवितों. पैठणचे एक दोन सावकार आले आहेत. पुढें साहेबांचें प्रतापे वस्ती अशी होईल कीं मागे ऐशी कधीं झाली नाहीं. ज्याप्रमाणें मालगंज वसविला त्याप्रमाणें येथें वस्ती होईल. साहेबी एक कौल आपले नांवाचा जालनापूर सावकारांस व रयतेस पाठविला पाहिजे आणि पुढले दिवाळीस येथील रंग सर्व ध्यानास येईल. आम्ही चाकर लोक चाकरी करून दाखवावी. (पुढील बंद गहाळ)

***पत्रांक २३.*** (इ. स. १७९३) यादी डाकेच्या चौक्या महेश्वरापासोन पुण्यापर्यंत दहा कोसांचे टप्प्याने. मार्फत पदमसी नेणसी सावकार गुजरात भगवान काशीद नथे मानधाता मिरधा. सुरू सन सलासतिस्सैनमया अलफ :

काशीदजोड्या सुमारी २० प्रमाणें दरमहा मक्ता.

| | |
|---|---|
| १ नावडातावडीस जोडी १ | १ बलकवाडा जोडी १ |
| १ नागलवाडी जोडी १ | १ थोवरगडास जोडी १ |
| १ सांगवी जोडी १ | १ थालनेरास जोडी १ |
| १ कापडणे जोडी १ | १ ललिंग जोडी १ |
| १ टोकेस जोडी १ | १ मालेगांव जोडी १ |
| १ दहीगांव जोडी १ | १ पाटोदे जोडी १ |
| १ शेरास जोडी १ | १ संगमनेरास जोडी १ |
| १ आंबे धारगांव जोडी १ | १ आळ्यास जोडी १ |
| १ लोणीस जोडी १ | १ भीमेचेकाठचे गांवास जोडी १ |
| १ पुण्यास जोडी १ | १ सरबराइची जोडी १ |
| ---------- | ---------- |
| १० | १० |

एकूण जोड्या वीस दरमहा रोजमुरा भत्ता रुपये दोनशें चार दरमहाचे दरमहा पावत जाईल. पत्रें पुण्याहून महेश्वरीं येतील. पुण्यास साडे पांच-सहा दिवसांचे मुदतीने नेत आणीत जावीत. कदाचित सात-आठ दिवसांचे मुदतीत कागद येऊं जाऊं लागल्यास मक्त्यांत कमी

केलें जाईल. कागदपत्रांची गफलत होऊं देऊं नये. गफलत जाहल्यास पैका सावकार मजकुराचे विद्यमानें माघारा जाईल. येणेंप्रमाणें करार. सदरहू दोनशें चार रुपयांची चिठ्ठी पदमसी नेणसी याजवर करून देणें. छ.१ रमजान उर्फ अधिक वैशाख, मुक्काम महेश्वर.

***पत्रांक २४.*** श्रीमंत मातोश्री अहिल्याबाईसाहेबांच्या कारकीर्दीत जहागीर गांवें दिल्याबद्दल ताकीदपत्रें खालीलप्रमाणें :

| **अ. नं.** | **हल्लीचे वंशजाचे नाव** | **गांवचे नांव व उत्पन्न** | **जिल्हा व इ. स.** |
|---|---|---|---|
| १ | फूलबाई मर्द भगवतसिंग | मौजे दोडवा. उ.रु.१५९८ | नेमाड, १७६४ |
| २ | दौलतसिंग सबळसिंग | मौजे साला उ.रु. ३०९२ | नेमाड, १७६६ |
| ३ | हरीहर रामभाऊ | मौजे मेहताखडी व जामणिया ६५१ | नेमाड, १७६६ |
| ४ | श्रीनर्मदा नाभिस्थान श्रीसिद्धनाथ महादेव | मौजे मरझाल वगैरे गांवे ६ पूजा, नैवेद्य, अन्नसंतर्पण. उ. ८६०४ | नेमाड, १७७९ |
| ५ | मीर हुसेनअल्ली | मौजे कातरिया १५५ | नेमाड, १७८० |
| ६ | केशवभट औदीच्य | मौजे दौलतपुरा उ. ८३० इनाम धर्मादाय | इंदूर,पेटलावद, १७८१ |
| ७ | बैजनाथ अया जंगम इ.ध. | मौजे जेतपुरा प्र. सावेर उ. ११०० | इंदूर, १७८३ |
| ८ | पुरणगीर अमरगीर | मौजे बोधवाडा, प्र.चिखलदा उ. ६७६ | नेमाड, १७८५ |
| ९ | वेदमहर्षी गोपालकृष्ण व्यंकटराम शास्त्री, मंडलेश्वर | मौजे पिपरी, मलगांव उ. ७८४३ | नेमाड, १७८६ |
| १० | आबाजी काकाजी | मौजे गोराड्या उ. १७८७ | नेमाड, १७८७ |
| ११ | मोतीसिंग प्रतापसिंग | मौजे केदवा, पिपराड उ. २४१४ | नेमाड १७८८ |

| | | | |
|---|---|---|---|
| १२ | काळूसिंग नानाभाई पेमसिंग | मौजे भोरवाडा, नांदेड व गवलपुरा, उ. २०९२ | नेमाड १७८८ |
| १३ | रेवागीर बलरामगीर गुसाई | मौजे इटावदी, निगरणी उ. ३७९१ | नेमाड, १७९१ |
| १४ | साबाजी विठ्ठल सरमंडळ. | मौजे पागरी, वगैरादेह तीन उ. ४६४४ | नेमाड, १७९२ |
| १५ | दुर्गापूरण नाईक, पालखी वाहक | मौजे जलकोटी, उ. ८९८ | महेश्वर, नेमाड १७९३ |

एकूण पंधरा जहागिरी ह्या कारकीर्दीत उपलब्ध आहेत.

***पत्रांक* २५.** परकीय राज्यांत होळकरांचे वकील :

१ संस्थान उदेपूर, राजश्री भगवंतराव जगताप
२ संस्थान जयपूर, रा. मार्तंडराव अप्पाजी
३ संस्थान हैदराबादचा निझाम, रा. माधवराव लक्ष्मण
४ प्रांत अयोध्या, राजश्री खंडो जगदेवराव
५ श्रीमंत शिंदे, रा. यमाजी मोरेश्वर
६ पुणें दरबार, राजश्री अप्पाजी जाखदेव
७ नागपूर, राजश्री व्यंकाजी कृष्णराव
८ लखनौ, राजश्री मनोहर खंडेराव
९ भोपाल, रा. जिवाजी गिरमाजी
१० संस्थान कोटे, राजश्री बापूजी आनंदराव
११ दिल्ली, राजश्री बहादूरसिंग
१२ संस्थान डोंगरपूर, राजश्री व्यंकाजी शिवाजी
१३ सं. देवळे, प्रतापगड, रा. विनायक सदाशिव

ह्याशिवाय आणखीही वकील असले पाहिजेत. परंतु जितकी नांवें सरकारी रेकॉर्डमध्यें उपलब्ध झाली तितकी वर दाखविलीं आहेत.

***पत्रांक* २६.** होळकरांचे दरबारीं इतर संस्थानिकांचे वकील होते त्यांचा खुलासा:

१. केसो भिकाजी दातार, पुणें दरबाराकडून.
२. शिवाजी नारायण व भगवंत अनंत. श्रीमंत शिंदे यांजकडून.
३. जसकर्ण मेहता व दत्तराम. बिजेसिंग मारवाडकराकडून.
४. भगवंत गोविंद, भरतपूर संस्थानाकडून.
५. सवाईराम व शिवाजी, जयपूर संस्थानाकडून.
६. काशीनाथ पचोली, संस्थान उदेपूर राण्याकडील.

७. जगन्नाथ कृष्ण व कृष्णाजी जगन्नाथ, संस्थान जोधपूरकडील.

८. रामराव सदाशिव. राजमंडळ सातारा यांजकडील.

९. रावजी कचेश्वर व चिमणाजी बाबूराव. वकील निस्बत वानवळे.

१०. गोविंद, पुरषोत्तम मुनसी. फार्शी व उर्दूनवीस.

ह्याशिवाय दुसरें ठिकाणचेही वकील असले पाहिजेत. परंतु जळक्या रेकॉर्डात जे उपलब्ध झाले तेच वर दाखविले आहेत.

***पत्रांक २७.*** (सरकारी रेकार्ड) ज्या ज्या संस्थांनांचा कारभार मातोश्री अहिल्याबाईसाहेब यांचे सल्ल्याने चालत असे ती संस्थाने खालीलप्रमाणें :

१ संस्थान बडवाणी      १ संस्थान देवास

१ संस्थान झाबुवे      १ संस्थान सीतामहू

वरील पत्रांत सुभेदार तुकोजीरावांची जी पत्रें आहेत त्यात त्यांचा सरळपणा व आज्ञाधारकपणा स्पष्टपणें दिसतो. अडचणीचा गळाठा त्यांस जडभारी वाटून ते हातपाय गाळतात. पण अशाच प्रसंगीं कार्य साधकता, आशावादीपणा हे गुण उलटपक्षीं मातोश्रीसाहेबांच्या उत्तरांत दृष्टोत्पत्तीस पडतात. राज्यकारभाराच्या एकंदर कार्यात पैसावसुली हा महत्त्वाचा भाग आहे. त्या दृष्टीने पत्रांक ३ यांत उल्लेखिलेले पाहणीपत्रक व देहझाडा ही बाजू मननीय आहे. त्यावरून प्रत्येक प्रांतात ही रचना झाली असणार असें अनुमान काढतां येतें. त्याचप्रमाणें पत्रांक २१ यांत वसूल कसा होत होता, त्याजप्रमाणें फाजील झाल्यास त्यांची विल्हवाट कशी लागेल हेहीं त्या पत्रावरून दिसून येईल. तसेच, पत्रांक १७ वरून फडणीस हिशेबाचे कागद महेश्वर येथें गेल्यावर तेथें दरबाराकडून मंजूर होऊन शेरे कसे पडत हें दिसून येईल.

पैसा हवा होता तरी न्यायाकडे ओढा होता. पत्रांक १ यांत रावळकी संबंधानें दिलेला निकाल. पत्रांक १३ चारशें रुपये परत करण्यासंबंधाचा हुकूम. भारमलदादा अगदीं सान्निध्यातील, त्यानें चारशें रुपये दंड केलेला. पण खरी हकीगत कळताच मातोश्रीसाहेबांनीं ते रुपये परत देवविले. पत्रांक ४, ९, १०, ११, १५ व २३ ही लष्कराच्या व्यवस्थेची निरनिराळीं अंगें दाखवितात. बिनलष्करी इनामदार स्वारीबरोबर असत. तत्राप मागें त्यांची कामें बिनबोभाट चालावीं हे पत्रांक ९ वरून दिसेल. पत्रांक १० त डाकेची व्यवस्था व नुकसानीं झाली असतां भरपाईची न्याययुक्त दृष्टीही दाखविते. पत्रांक ११ वरून लष्करांतील शेठ सावकारांवर असणारी जबाबदारी व त्यांची कामगिरी दिसून येते. पत्रांक १५ वरून लष्करांत त्वरित हुंडणावळ कशी होई व एकंदर वराता कशा जात, ही जमाखर्ची बाजू दृष्टीस येईल. पण ह्या सर्व बाबीपेक्षांही अत्यंत महत्वाची जी बाब या पत्रांतून डोकावते ती नोकरांची वृत्ती, पत्रांक ८, १४, १६, १८ व २२ यांत दिसून येईल. 'आम्ही चाकर लोक चाकरी करून दाखवावी'. 'स्वामीकार्ये गत:प्राण अंते तिष्ठति माधव:' याच पत्रांत नोकरांची ही कदर स्वामी कशी व किती

पाळत हे पत्रांक २ वरून दिसून येईल. अशा ह्या परस्पर भावनांवरून पत्रांक २२ मधील उल्लेखिलेल्या पेठा वसवून उद्योगधंद्याची उन्नती झाली असणार. पत्रांक २४ वरून सनदा ताकीदपत्रें देऊन जहागिरी दिल्या त्याची यादी कळून येईल. तसेच पत्रांक २५, २६, २७ होळकर सरकारचे परकीय राज्यांत वकील व परकीयांकडील होळकर दरबारी वकील, यांची यादी. तसेच मातोश्रीसाहेबांच्या सल्ल्यानें जे संस्थानिक राज्यकारभार चालवीत त्या संस्थानांची नांवें, ह्यावरून राज्यकारभारांत मातोश्रीसाहेबांची दृष्टी किती दूरवर पोहचत असे हें सिद्ध होते.

**आधार ग्रंथ**

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें; भाग १, २
सरदार, जहागिरदार, दरखदार यांची दप्तरें



**प्रकरण २५ वें**

# देवी अहिल्याबाईंचा दानधर्म

मातोश्रींच्या धर्मादायाची कीर्ती त्रिभुवनांत आहे. त्यांच्या राज्यांत काय किंवा अखिल भरतखंडात काय ज्या धर्मादायासंबंधीं स्पष्ट टिप्पण नाहीं त्या ठिकाणीं बहुधा श्रीअहिल्या मातोश्रींचा उल्लेख सहज पण आदरपूर्वक करण्यांत येतो. याचा अर्थ इतकाच करावयाचा की त्यांचे नांव आणि निष्काम धर्मादाय ही भारताच्या हृदयांत एकजीव होऊन गेलीं आहेत.

**कै. चिंतामणराव वैद्य यांची सूचना**

विविध ज्ञानविस्ताराचे पुस्तक ४४ अंक १० वा यांत पुरुषोत्तमकृत अहिल्याबाईंचे चरित्र या ग्रंथावर वैद्यांची सविस्तर टीका आली आहे. त्या टीकेत ते म्हणतात, अहिल्याबाईनें बांधविलेल्या देवळांची, घाटांची व इतर इमारतींची, तसेंच तिनें चालविलेल्या अन्नछत्रांची व इतर धर्मकृत्यांची यादी कोणी तयार करील तर या पुण्यात्मा बाईनें सर्व हिंदुस्थानभर किती, कसा व कधी दानधर्म स्थायीस्वरूपांचा केला याचे चित्र वाचकांच्या समोर उभें राहील. अशी यादी होळकर सरकारच्या हुकमावरून त्यांचा कोणी अहवालकार तयार करूं शकेल असे आम्हांस वाटतें. (पृष्ठ ४०२)

ह्या सूचनेनंतर पण अर्थाअर्थी संबंध नसतां होळकर सरकारांनीं इ. स. १९२३ साली ‘देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट’ प्रसिद्ध केलें. ह्या ३५८ पृष्ठांच्या ग्रंथात शक्य तेवढ्या संस्थानांतील देवस्थानांचा व पीरस्थानांचा उल्लेख आलाच आहे, त्याप्रमाणें भरतखंडांतील मंदिरादिकांचाही निर्देश केला आहे.

ह्या प्रयत्नानंतर देवस्थान आफिसर यांची नेमणूक झाली. त्यांनीं मिळविलेली, गव्हर्नमेंट ग्याझिटियर मधून प्रसिद्ध झालेली आणि कांहीं ठिकाणीं व्यक्तिशः भेटून जमविलेली, माहिती ही सर्व संकलित करून आम्ही खाली देत आहोत. शक्य तितके आधारासह माहिती मांडू.

पहिली गोष्ट जी आपणास ध्यानीं घ्यावयाची ती ही कीं होळकरांचें घराणें शैव पंथी आहे. तेव्हां कुलाचाराप्रमाणें शैवपंथाकडे म्हणजे श्रीशंकराच्या मंदिरांकडे त्यांचें लक्ष जाणें हें साहजिकच आहे. ज्योतिर्लिंगे बारा प्रसिध्द आहेत. ही सर्व भरतखंडभर पसरलेली आहेत. त्यांच्या संबंधांत मातोश्रीसाहेबांकडून जी सेवा घडली तिचा काल व प्रकार साधार आम्ही खाली नमूद करितों.

| | ज्यातिर्लिंगाचे नांव | कोठें आहे | धर्मादायाचा प्रकार | आधार |
|---|---|---|---|---|
| १ | श्री सोमनाथ | काठेवाडांत | सन १७८५त देवाची पुनः स्थापना, जीर्णोध्दार | महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें |
| २ | श्री मल्लिकार्जुन | श्रीशैल पर्वतावर तेलंगणांत, | देऊळ बांधविलें | होळकर दप्तर |
| ३ | श्री ओंकारेश्वर | मध्य हिंदुस्थान | (१) श्रीचा चांदीचा मुखवटा, (२) पालखी, (३) नर्मदेस नाव यात्रेकरूचे सोईसाठी (४) गंगाबावडी नांवाची बाग जमीन श्रीचे बेलफुलांकरितां (५) नंदादीप नैवेद्यास रु.१३५ | होळकर दप्तर |
| | श्री ओंकारेश्वर येथील इतर देवालयें, वगैरे | ,, | (१) श्री त्रिंबकेश्वर शिवपुरींत (२) नगारखाना, घड्याळ, व नंदीगणाची डेरी (३) श्री गणपती मंदिर व बंगला (४) धर्मशाळा व श्री लक्षुमी नारायण मंदिर (५) अघोरेश्वर शिवालय व बगीचा (६) तलाव व गंगाबावडी (७) ज्योतिर्लिंग ममलेश्वर, ब्रम्हपुरींत | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | वैजनाथ | परभणीपासून १४ कोस दक्षिणेस परळी क्षेत्र आहे तेथें | इ. स. १७८४ त जीर्णोदार | भारत इतिहास मंडळाचा अहवाल शके १८३४ |
| ५ | श्री नागनाथ | श्रीचे पूजेसाठी नेमणूक रु. ८१ इ. स. १७८४ पासून चालू | | होळकर सरकारचे दप्तर |
| ६ | श्री विश्वनाथ | श्रीक्षेत्र काशी, बनारस | (१) श्रीमणिकर्णिकेचा घाट,<br>(२) दशाश्वमेध घाट बांधविले. इ. स. १७८५ पत्र<br>(३) श्री काशीविश्वनाथ जीर्णोध्दार इ. स. १७८५<br>(४) गंगामूर्ती मंदिर व घाटावर तीन मंदिरे<br>(५) श्री तारकेश्वर, मणिकर्णिका घाटावर<br>(६) जनाना, मणिकर्णिका घाट<br>(७) धर्मशाला, रामेश्वर<br>(८) धर्मशाळा, कपिलधारा<br>(९) मकानवाडे सुमारे ९<br>(१०) जमीन बाग, नंगवा पक्का कुवा<br>(११) मागील चौथरा, शीतलघाट दशाश्वमेध<br>(१२) उत्तरकाशींत धर्मशाळा | महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें, सरकारी दप्तर |
| ७ | श्री त्रिंबकेश्वर | नाशिक जिल्हा | कुशावर्त घाटांजवळील पूल दुरुस्त करविला. | होळकर दप्तर |
| ८ | श्री घृष्णेश्वर | वेरूळ जवळ | श्रीशिवालय तीर्थाचा जीर्णोद्धार इ. स. १७६९ त केला | भारत इतिहास मंडळाचा अहवाल शके १८३८ |

एकंदर भारतांत बारा ज्योतिर्लिंगें प्रसिद्ध आहेत. त्यापैकीं आठांची माहिती मिळाली ती साधार वरती सादर केली आहेत. इतर ठिकाणीं म्हणजे राहिलेल्या चार ज्योतिर्लिंगाच्या ठिकाणीं होळकरांनीं कांहींना कांहीं तरी सेवा चालू होती व आहेही. पण श्रीअहिल्या मातोश्रींकडूनच ती चालू होती असे दाखविण्यास आजमितीस हातीं आधार नाही. त्यांच्या उदाहरणानें प्रेरित होऊन कैलासवासी श्रीमंत कृष्णामासाहेब व कै. श्रीमंत महाराज तुकोजीराव द्वितीय यांनींही भरतखंडांत अनेक ठिकाणी स्थाईक दानधर्म केला. अशा स्थळीं पूर्व देणगीचा जीर्णोद्धार झाला असेल; अगर नवीनच देणगी सुरू झाली असेल. सारांश, देणग्या होळकरांच्याच पण व्यक्तित्व निश्चित होत नाहीं. अशा अनिश्चित झालेल्या ज्योतिर्लिंगांच्या देणग्या खालीं नमूद करीत आहोंत.

| | | |
|---|---|---|
| ९ श्री क्षेत्र गोकर्ण | : | येथें एक मकान श्रीदेवी अहिल्याबाई छत्र या नावानें प्रसिद्ध आहे. व श्रीरेवाळेश्वराचें मंदिर श्रीमंत महाराज तुकोजीराव होळकर यांनीं बांधविलें. |
| १० श्रीमहांकाळेश्वर उज्जैन | : | श्रीमहांकाळेश्वराची महाशिवरात्र पूजा. महापूजा रात्रौची असून त्या दिवशीं व श्रीचे अभिषेक वगैरे सर्व होळकर सरकारकडून केले जातात व दुसरें दिवशीं अन्नसंतर्पणही होळकर सरकारकडून केले जाते. अशी पूर्वापार वहिवाट चालू आहे. |
| ११ श्रीरामेश्वर | : | येथें अन्नछत्राची जागा व श्री अहिल्याबाईंची मूर्ती व श्रीराधाकृष्णाची मूर्ती असोन २ विहीरी आहेत. यांचा जीर्णोद्धार कै. सौ. महाराणी भागीरथीबाईसाहेब होळकर यांनीं केला. ह्याशिवाय बाग, पर्वकाठ, हनुमान बाग व मंदिर व धर्मशाळा आहेत. |
| १२ श्रीभीमाशंकर | : | येथें धर्मशाळा, इमारत, बावडी, वगैरे आहेत. |

होळकर हे शैवपंथी असल्यामुळें ज्योतिर्लिंगाकडे त्यांचें लक्ष वेधणें हें अगदीं साहजिक आहे आणि त्याप्रमाणें बारा ज्योतिर्लिंगाकडे स्थलकालमानानुसार कशी निरनिराळी व्यवस्था त्यांनीं केली हे आतापर्यंत साधार आपण पाहिले. छत्रपती श्रीशिवाजी महाराज, त्याचे समकालीन व अनुयायी यांनीं दोन शतकांत जी कामगिरी बजावली ती केवळ स्वराज्य संपादन एवढेंच नव्हे, तर त्याबरोबर स्वधर्माचे रक्षण व संवर्धन हेंही होय. त्यांच्या या दोन्ही चळवळीस डॉक्टर फ्रेझर यांच्या भाषेत 'रीआर्गनायझेशन' म्हणजे पुनर्घटना शब्द हा योग्य होय. इ. स. १००० पासून तो १६०० पर्यंत म्हणजे ६०० वर्षाच्या अवधीत परकीयांच्या आक्रमणामुळें अखिल हिंदू धर्माची अंगें-उपांगें नामशेष अगर खिळखिळी झाली होती. छत्रपतींच्या उपक्रमानंतर सर्व मराठे मुत्सद्यांचे लक्ष केवळ पंथ अगर उपपंथ यांजकडे वेधले न जातां हिंदुधर्माच्या व्यापक स्वरूपाकडे त्यांनीं लक्ष पुरविले, प्रस्तुत विषयासंबंधीं अहिल्या मातोश्रीनींच दिशा अंगिकारिली व अखिल हिंदु धर्माची बाजू त्यांनीं उचलून धरली.

अखिल हिंदु समाजास 'सप्तपुरी व चारधाम' ही प्रात:स्मरणीय आहेत. येथें पंथ उपपथांचा, वर्णाश्रमाचा प्रश्न उपस्थितच होत नाही. या सप्तपुरींत मातोश्रींचा झालेला धर्मादाय आता अवलोकूंया.

## सप्तपुरी

| | नांव | कोठें आहे | धर्मादायाचा प्रकार | आधार |
|---|---|---|---|---|
| १ | श्री अयोध्या | संयुक्त प्रांतांत | १ श्रीराममंदिर शरयूद्वार | चारिटेबल |
| | | | २ श्रीत्रेताराम मंदिर | क्लासिफिकेशन |
| | | | ३ श्रीभैरव मंदिर | लिस्ट |
| | | | ४ श्रीनागेश्वर मंदिर | |
| | | | ५ श्रीशरयू घाट | |
| | | | ६ धर्मशाळा व विहीर. | |
| | | | ७ अन्नछत्र वाडा सरकारी | |
| २ | श्री मथुरा वृदांवन | संयुक्त प्रांत | १ श्रीचैनबिहारी मंदिर | |
| | | | २ धर्मशाळा | |
| | | | ३ चीरहरण घाट | |
| | | | ४ कालियादेह घाट | |
| ३ | श्री क्षेत्र हरिद्वार | संयुक्त प्रांत | १ यात्रेकरूसाठी धर्मशाळा | |
| | | | २ सरकारी हवेली | |
| | | | ३ कुशावर्त घाटाचा जीर्णोद्धार | |
| ४ | श्रीक्षेत्र काशी सदरहूची माहिति ज्योतिर्लिंगाचे वर्णनांत दिलीच आहे. | | | |
| ५ | श्रीकांची (ह्याजबद्दल कांहीं माहिति उपलब्ध झाली नाही) | | | |
| ६ | श्रीक्षेत्र अवंतिका उज्जैन, माळवा | | १ श्रीजनार्दन मंदिर शिखरबंद असोन, एक कुंड आहे | |
| | | | २ श्रीबालाजी मंदिर, धर्मशाळा व अन्नछत्र | |
| | | | ३ श्रीचिंतामण गणपती मंदिर धर्मशाळा व बावडी | |
| | | | ४ घाट, कुंड व धर्मशाळा | |
| | | | ५ श्रीलीलापुरुषोत्तम मंदिर | |
| ७ | श्री जगन्नाथपुरी | बंगाल इलाखा | याचा उल्लेख ''धाम'' सदरांत आहे. | |
| ८ | श्रीक्षेत्र द्वारका | काठियावाड | १ अन्नछत्र | |

## चारधाम

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्रीबद्रीनारायण | हिमालय पर्वत | १ रागडचट्टी धर्मशाळा |
| | | | २ कुंडचट्टी कुंड |
| | | | ३ बंदरचट्टी कुंड |
| | | | ४ व्यासगंगा धर्मशाळा |
| | | | ५ देवप्रयाग राणीबाग |
| | | | ६ गौचर कुरण |
| | | | ७ तुंगनाथ धर्मशाळा |
| | | | ८ कुंड तुंगनाथ |
| | | | ९ गौरीकुंड केदारेश्वर |
| | | | १० धर्मशाळा पवालीदाडांत |
| | | | ११ उष्णोदक झीरी |
| | | | १२ श्रीकेदारेश्वर |
| | | | १३ विष्णुप्रयागांत श्रीहरी मंदिर |
| | | | १४ नैवेद्याचा घरवाडा |
| २ | श्री द्वारका | काठियावाड | १ अन्नछत्र (खुलासा वर आहे) |
| ३ | श्री रामेश्वर | ज्योतिर्लिंगात वर्णन आलेलेच आहे. | |
| ४ | श्री जगन्नाथ | बंगाल इलाखा. | १ श्रीरामचंद्राचे मंदिर |
| | | | २ अन्नछत्र व जागा |
| | | | ३ बाग |

वर उल्लेखिलेल्या सप्तपुरी यांचा संबंध पौराणिक काळाशी येतो. सनातन वैदिक धर्म स्थायी नसून प्रगतीपर आहे. श्रीरामायणाचा काल, श्रीमन्हाभारताचा काल, श्रीमद्भागवताचा काल व अठरा पुराणें यांचा काल, या सर्वत्रास मिळून पौराणिक काल असे संबोधिले जाते. त्या कालांत ज्यांची 'तीर्थक्षेत्र' म्हणून प्रसिद्धी झाली ती ही बारा ज्योतिर्लिंगे सप्तपुरी व चारधाम होत. यापुढें महानुभाव पंथ, वारकरी पंथ, श्रीसमर्थ सांप्रदाय, गांणपत्य व श्रीदत्त सांप्रदाय उत्पन्न झाले. त्या सर्वांची अभेद बुद्धीनें मातोश्रींनी वास्तपुस्त केली हें खालील यादीवरून दृष्टोत्पत्तीस येईल.

| | **नांव** | **कोठें आहे** | **देणगीचें स्वरूप** | **आधार** |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीविज्ञानेश्वर | मौजे अंबेगांव | नंदादीप | होळकर |
| २ | श्रीपरळी वैजनाथ. | निजामाचे राज्यांत | जीर्णोद्धार | सरकारचे |
| ३ | श्रीओंढा नागनाथ | ,, | पूजासाहित्य रु. ८१ | दप्तर |
| ४ | श्रीसिद्धेश्वर टोके, | मुंबई इलाखा | जीर्णोद्धार | ,, |
| ५ | श्रीममलेश्वर | मध्य हिंदुस्थान | नंदादीप खर्च रु. १३५ | ,, |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | श्रीशंभूमहादेवाचे डोंगर | जि. सातारा | विहीर | होळकर सरकार |
| ७ | श्रीचिंचवड | पुणें जिल्हा | देणगी रु. २०० | दप्तर |
| ८ | कोल्हापूर | मुंबई इलाखा | देणगी रु. ७०० | ,, |
| ९ | जामगांव | निजामाचे राज्यांत | दरोबस्त गांव श्रीसमर्थांकडे | ,, |
| १० | चित्रकूट | संयुक्त प्रांत | श्रीराम पंचायतन स्थापना | ,, |
| ११ | श्रीपुष्कर तीर्थ | राजपुताना | १ श्रीगणपती मंदिर,<br>२ सरकारी वाडा<br>३ सरकारी बाग<br>४ अन्नछत्र, सदावर्त | ,, |
| १२ | एलोरा | वेरूळनजीक | तांबड्या दगडाचें सुंदर मंदिर | '' |
| १३ | भुसावळ | खानदेश | चांगदेवाचे मंदिर, तापीपूर्णा संगमावर (बाँबे गॅझेटियर) | '' |
| १४ | पुणतांबे | नगर जिल्हा | श्रीगोदेस पक्का घाट | होळकर |
| १५ | भरतपूर संस्थान | राजपुताना | धर्मशाळा, देऊळ, विहीर व कुंड | सरकार |
| १६ | श्रीनाथद्वार | राजपुताना | धर्मशाळा, देऊळ, विहीरकुंड | दप्तर |
| १७ | राजापूर | रत्नागिरी जिल्हा | श्रीगंगेचे आगमनकाली सदावर्त | '' |
| १८ | टेहरी | बुंदेलखंड | धर्मशाळा | '' |
| १९ | बऱ्हाणपूर | मध्य प्रांत | घाट | '' |
| २० | वेरूळ | निजामाचे राज्यांत | १ श्रीगणपती मंदिर<br>२ श्रीपांडुरंग मंदिर<br>३ सुवर्णजालेश्वर<br>४ खंडोबा मंदिर<br>५ तीर्थराज<br>६ अग्निहोत्र मंदिर ह्या सर्व मंदिरांस वार्षिक देणग्या आहेत. | '' |
| २१ | श्रीकुरुक्षेत्र | दिल्लीनजीक | १ संवतकुंडावर घाट<br>२ लक्ष्मीकुंडावर घाट<br>३ शिवमंदिर, व<br>४ स्थाणूमहादेव मंदिर | '' |
| २२ | श्रीनैमिषारण्य | | चक्रतीर्थकुंड, धर्मशाळा, गौघाट व श्रीमहादेव मठी | '' |

| | | | |
|---|---|---|---|
| २३ श्रीसंबलग्राम | | श्रीकलीविष्णू मंदिर (येथें कली अवतार होणार अशी समजूत आहे.) | होळकर सरकारी दप्तर |
| २४ श्रीक्षेत्र प्रयाग | संयुक्त प्रांत | पक्का सरकारी वाडा. (यांत श्रीअहिल्याबाईंची मूर्ती आहे.) फलगून घाट, धर्मशाळा, बगीचा व श्रीविष्णूमंदिर | ,, |
| २५ श्रीअमरकंटक, नर्मदा उगम | मध्य प्रांत | १ धर्मशाळा, २ कोटीतीर्थ वंशकुंड ३ गौमुखी, ४ श्रीविश्वेश्वर मंदिर | ,, |
| २६ श्री पंढरपूरक्षेत्र | मुंबई इलाखा | १ सरकारी वाडा, तुळशीबाग, श्रीराम मंदिर, दोन सभामंडप व अहिल्यामातेची मूर्ती; शिवाय अन्नछत्र चालू आहे. | ,, |
| २७ श्रीचोंडी | बीड तालुका | श्रीअहिल्येश्वर मंदिर. (ह्यात श्रीशंकराची स्थापना केली आहे. व अहिल्याबाई पार्थिवपूजा करीत आहे, अशी मूर्ती आहे.) | ,, |
| २८ श्रीक्षेत्र जेजुरी | पुणें जिल्हा | श्रीमल्हार गौतमेश्वर तालीमखाना, सरकारी वाडा, यात श्रीदत्त पादुका आहेत व विहीर आहे व श्रीविठ्ठल-रखमाईचें मंदिर आहे. श्रीजेजुरी देवतांचे भोवती किल्ला, श्रीजनईचें कुरण, बाग, इमानी जमीन व मल्हार तलाव आहे. | |
| २९ श्रीसप्तश्रृंग गड | | १ धर्मशाळा आहे. | ,, |
| ३० संगमनेर | मुंबई इलाखा | १ श्रीराम मंदिर बांधविलें. | ,, |
| ३१ कुंभेर | राजपुताना | १ श्रीमंत कै. खंडेराव महाराज ह्यांची छत्री बांधविली, त्याचे खर्चास तीन गांव तमरेल, सेत गांगरसोली व मिठागराचे उत्पन्न. | ,, |
| ३२ पुणें | मुंबई इलाखा | १ खडकी, कै. मल्हाररावांचीं छत्री व पुणे शहरांत सरकारी वाडा. | ,, |
| ३३ निमगरान | जिल्हे नाशिक | विहीर पक्की | ,, |
| ३४ पिंपळस | | विहीर | ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| ३५ सकर गांव | तालुके निफाड | विहीर | होळकर सरकारचे दप्तर |
| ३६ कस्बे ओझर | जिल्हा नगर | विहीरी दोन व कुंड पक्के | ,, |
| ३७ वाफगांव | पुणे जिल्हा | विहीर पक्की. सरकारी वाडा | ,, |
| ३८ कर्मनाशिनी | बंगाल | ही नदी बंगाल व संयुक्त प्रांतातून नदी गंगेस मिळते. हिंदु मात्र हींत स्नान करीत नाहीत. हिचे पाणी अंगांवर येऊ नये, हें संकट टाळण्यासाठी मातोश्रींनी पूल बांधविला. ज्ञानकोश खंड १, पृष्ठ १२२) | ,, |
| ३९ सुलतानपूर | खानदेश | १ फौज उतरणेचे नेहमीच्या तळासमोर एक लहानसे मंदिर **(बॉम्बे ग्याझेटियर)** | ,, |
| ४० नाशिक | मुंबई इलाखा | १ श्रीराम मंदिर. यात अहिल्यामातेची मूर्ती आहे. गोरा महादेव मंदिरासमोर धर्मशाळा | होळकर सरकारचे दप्तर |
| ४१ रावेर | खानदेश | १ केशवकुंड | ,, |
| ४२ मीरी | नगर जिल्हा | १ श्रीभैरवाचे मंदिर इ. स. १७८० त बांधले. | ,, |
| ४३ बीड | निजामाचे राज्य | १ घाटाचा जीर्णोद्धार | ,, |
| ४४ चांगदेव | खानदेश | १ मंदिर | ,, |

ह्याप्रमाणें सनातन वैदिक धर्माच्या वाढत्या विस्तारास मातोश्रींकडून कालस्थलमानानुसार निरनिराळ्या तऱ्हांनी जी मदत पोहोचली तिचा साधार उल्लेख वर आलाच आहे.

सदरहू धर्माचा आजपर्यंत जो विस्तार झाला तो तीर्थक्षेत्रांच्या द्वारे निश्चित करितां येतो. म्हणजे भरतखंडातील तीर्थक्षेत्रे ही वैदिक धर्माची स्टेशनेच होत असे लौकिक भाषेत म्हणता येईल. ही स्टेशने त्या धर्माची विपुल विविधता व व्यापकता दर्शवितात. *व्यक्तिसंघ हे विशिष्ट पंथाचे अनुयायी असतात. पण राज्यकर्ती व्यक्ती ही सर्व धर्मास, सर्व पंथांस सर्व सांप्रदायांस समदृष्टीनें पाहणारी व्यक्ती असावी, हे आर्य राजनीतिचें एक अंग आहे. याप्रमाणें सम्राट अशोक, विक्रमादित्य, हर्षवर्धन, छत्रपती श्रीशिवाजी महाराज यांनीं वागणूक ठेविली. हिंदुमात्राचे कोणत्याही लहान अगर मोठ्या धर्मविधीचा संकल्प शालिवाहन अगर विक्रमादित्य यांच्या नामोच्चारणाशिवाय पूर्ण होत नाही. यांत राजेलोकांसही बोध*

*घेण्यासारखा आहे. सारांश, समानदृष्टीनें धर्मसंरक्षण व संवर्धन हे आर्य राजनीतिचें एक अंग आहे. अहिल्या मातोश्रींनीं तें अंग यथासांग पाळिलें याचे आणखी एक प्रत्यंतर आम्ही खाली देत आहोत. श्रीमहाशिवरात्री निमित्य श्रीगंगोत्री क्षेत्रनिहाय पाठविण्याचा उपक्रम त्यांनीं केला. त्यांच्या पश्चात् या उपक्रमात थोडीबहुत भर पडली असेल; तथापि ते सर्व श्रेय त्यांचेच आहे.* यासंबंधीचा संस्थानांतील धर्मादाय खात्यांतील उतारा पुढें सादर करतो.

| **अ.नं.** | **क्षेत्राचे नांव** | **कावडी संख्या** | **आकार रु. आ.पै.** |
|---|---|---|---|
| १ | श्रीक्षेत्र रामेश्वर | पांच | २६३-०१-९ |
| २ | श्रीक्षेत्र मल्लिकार्जुन | एक | ३५-०८-० |
| ३ | श्रीजनार्दन वासुदेव | ,, | ५३-००-० |
| ४ | श्रीपद्मनाथ जनार्दन | ,, | ५३-००-० |
| ५ | श्रीअभिशयनअनंत | ,, | ६-१२-० |
| ६ | श्रीबालाजीगिरी | ,, | २-०८-० |
| ७ | श्रीगोकर्ण महाबळेश्वर | ,, | २७-१२-० |
| ८ | श्रीसुब्रम्हणेश्वर | ,, | ३८-१२-० |
| ९ | श्रीपशुपतेश्वर, नेपाळ | ,, | ३५-०८-० |
| १० | श्रीद्वारकानाथ | ,, | २७-१२-० |
| ११ | श्रीडाकोरनाथ | ,, | १४-०८-० |
| १२ | श्रीउत्कंठेश्वर | ,, | १९-०८-० |
| १३ | श्रीआवंढ्या जगन्नाथ | ,, | १८-०८-० |
| १४ | श्रीपरळी वैजनाथ | ,, | २०-००-० |
| १५ | श्रीक्षेत्र त्रिंबकेश्वर | ,, | ११-१२-० |
| १६ | श्रीरामपंचवटी, नाशिक | ,, | ११-१२-० |
| १७ | श्रीमातृगण सिद्धेश्वर | ,, | १३-०८-० |
| १८ | श्रीभीमाशंकर | ,, | १७-१२-० |
| १९ | श्रीक्षेत्र पंढरपूर | ,, | १९-०८-० |
| २० | श्रीएकलिंग महादेव (उदेपूर) | ,, | १७-००-० |
| २१ | श्रीकपिलमुनी | ,, | १३-०८-० |
| २२ | श्रीकेदारेश्वर | ,, | १७-००-० |
| २३ | श्रीसोरटी सोमनाथ | ,, | २२-००-० |
| २४ | श्रीनाथद्वारा, काकरोली चतुर्भुजनारायण व यशवंतेश्वर | चार | २१-००-० |
| २५ | श्रीवृद्धेश्वर महादेव | एक | १७-००-० |
| २६ | श्रीघृष्णेश्वर, वेरूळ | ,, | ११-१२-० |

| | | | |
|---|---|---|---|
| २७ | श्रीलोटेश्वर महादेव | ,, | २६-००-० |
| २८ | श्रीक्षेत्र जेजूरी | ,, | १७-००-० |
| २९ | श्रीमहांकालेश्वर, उज्जैन | ,, | १८-०८-० |
| ३० | श्रीराजराजेश्वर (कार्तवीर्य) महेश्वर | तीन | १७-१२-७ |
| ३१ | श्रीओंकारेश्वर महादेव | ,, | १७-१२-० |
| ३२ | श्रीकाशीविश्वेश्वर | एक | १-१२-० |
| ३३ | श्रीबद्रीकेदारेश्वर | ,, | १-१२-० |
| ३४ | श्रीझारखंडी बैजनाथ | ,, | १-१२-० |
| ३५ | श्रीकावडीचे पूजेबद्दल | ० | २-०४-० |
| | | एकूण कावडी ४५ | ८७०-०४-० |
| | | | एकूण आकार |

**देवींच्या दानधर्माकडे इतिहास कोणत्या दृष्टीनें पाहील**

ही वरील नामावली अवलोकनांत घेतल्यास सनातन वैदिक धर्माचा वैदिक कालापासून मातोश्रींच्या कारकीर्दीपर्यंत प्रसार कसकसा होत गेला हें स्पष्ट होईल. ही तीर्थक्षेत्रे भरतखंडाच्या सर्व भाषांत व भागांत पसरलेली आहेत. नवविधा भक्तीचे दर्शक आहेत. यवनांच्या आक्रमणापूर्वी हिंदू राजे आपापल्यापरी आपापल्या प्रांतातील तीर्थक्षेत्रांची यथाशक्ती सेवा करीत. परकीय आक्रमणानंतर हिंदू राज्यें एकामागून एक विलयास गेली. साहजिक श्रीसमर्थ रामदास यांच्या भाषेंत बोलावयाचे तर 'तीर्थक्षेत्रें अवघीं बुडालीं कांहीं राहिलीं तुम्हांकारणे'. छत्रपतींस हा जो उपदेश झाला तो त्यांनीं व त्यांच्या अनुयायांनीं यथाशक्ती पाळिला. जो जो प्रांत मराठ्यांच्या अंमलाखालीं येई तेथें तेथें तीर्थक्षेत्रांची, जुन्या विद्येची व विद्यासंपन्न घराण्यांची वास्तपुस्त करून ते पुढें जात. *मातोश्रींनीं त्याहीपुढें पाऊल टाकिले. ताब्यांतील मुलखांत हा उपक्रम त्यांनीं पाळलाच, पण भरतखंड हें 'माझें घर' समजून त्यातील क्षेत्रांची व्यवस्था स्थलकालानुसार त्यांनीं कशी लावली हे वर आलेल्या यादीवरून स्पष्ट होईल. सारांश, सहाशें वर्षांच्या परकीय आक्रमणानें, आमच्या दौर्बल्यानें, आणि कालाच्या गतीनें हिंदुसंस्कृतीच्या प्रगमनशील दृष्य स्थानांवर जो मल सांचला होता तो केवळ तीस वर्षांच्या राजवटींत धुवून काढून हिंदुसंस्कृतीचा उज्ज्वल प्रवाह सर्व भरतखंडांत पुन: वाहता केला आणि तोही अगदीं शांततेच्या साधनानें. ही मातोश्रींच्या कर्तबगारीची दृष्टी मान्य झाल्यास त्यांच्या या कालखंडास 'विनयकाल' हे नांव सार्थ आहे, हें सर्वत्र मान्य होईल अशी आम्हांस उमेद वाटते.*

**दानधर्माने साधलेला अनुषंगिक फायदा**

आतां या वरील सर्व कार्याकडे दुसऱ्या एका दृष्टीनें आपण पाहूं या. 'चालूं द्या होळकरी टाकी' अशी एक म्हण जेजुरीच्या बाजूस अजून ऐकूं येते. ह्या म्हणीचा अर्थ

असा सांगण्यांत येतो कीं सुकाळ असो वा दुष्काळ असो, घडणीचे काम बंद पडू द्यावयाचे नाही. होळकरांची मंदिर, धर्मशाळा आणि घाट ही सतत चालू राहिल्यामुळें वरील वाक्प्रचार सुरू झाला. या त्यांच्या कृतीमुळें देशातील कारागिरी जिवंत राहिली. शिल्पशास्त्राचे निरनिराळे नमुने अस्तित्वांत येऊन कारगिरांच्या एक प्रकारच्या त्या शाळाच बनल्या. उत्तर नाशिक व दक्षिण नाशिक अशा दोन निरनिराळ्या शाळा उत्पन्न होऊन स्वदेशी शिल्पकलेचें विविध स्वरूप दृग्गोचर झाले. कलेवर चढलेला मोगली शह उतरला. या संबंधांतील कैलासवासी रावसाहेब वझे इंजिनियर यांचे मार्मिक तुलनात्मक विवेचन त्यांच्या ग्रंथातून मननीय झालें आहे.

### देवीचा 'धर्म' नॅशनल तसाच रॅशनलही आहे

ज्यावेळीं इंग्रज, फ्रेंच हे परकीय लोक मराठे, रजपूत, जाट, बुंदेले, हे हिंदु रोहिले आणि पठाण हे एकद्देशीय परके लढायांमध्यें मग्न होऊन सर्व देशांत कलह आणि मत्सर याचें ज्ञानत: पीक पिकवीत होते त्या वेळीं दुसऱ्या बाजूनें अखिल देशांत बंधुप्रेमाचें बीज व गोरगरीबांचे चरितार्थाचें साधन मातोश्री पेरीत होत्या. *'राष्ट्रीय' आणि 'विश्वबंधुत्व' हे शब्द त्यांस माहीत नसतील; पण त्यांचा अर्थ 'धर्म' हे सगळे शब्द पोटांत घेऊन 'दशांगुळे वरी उरला' अशा तऱ्हेचा होता. धर्माच्या 'राष्ट्रीय दृष्टीनें' म्हणजे 'नॅशनल दृष्टीनें' पाहिलें तरी हे सर्व त्यांचे कार्य त्या सदराखालीं खचित येऊं शकेल. धर्माला जशी नॅशनल साइड आहे तशी आणि त्याहूनही अधिक श्रेष्ठ अशी 'रॅशनल साइड' असते. आतां या दृष्टीनें मातोश्रींच्या कामगिरीकडे पाहू या.*

मुसलमानाचे आक्रमण सहाशें वर्षात जनतेस अत्यंत असह्य झाले होते. यामुळें मराठ्यांस सशस्त्र प्रतिकार करणें भाग पडलें. पण एकदां प्रतिपक्षाचा पराभव झाल्यावर अपकाराची फेड मराठ्यांनीं उपकारानींच केली. आपल्या प्रांतातील दर्ग्यास, पीरस्थानास ज्या पूर्वापार देणग्या चालू होत्या त्या तशाच अप्रतिहत चालविण्याचें उदार धोरण मराठ्यांनीं सर्वत्र ठेविलें आणि तेच मातोश्रींनींही माळव्यांत चालविलें. एक दोन ठिकाणीं दुय्यम अधिकाऱ्यांनीं थोडीशी ढवळाढवळ करतांच त्यास मातोश्रींची ताकीदपत्रें गेली. उदाहरणार्थ, मीरहुसेनअल्ली नेमाड प्रांत मौजे कातरिया गांव यांच्या संबंधात ताकीदपत्र इ. स. १७८० इ. स. १७८५ ता. १८ जानेवारी रोजीं शहासुफी पीरज्यादे हैद्राबादकर यांस रु. १००० देणगीखातर दिल्याचा उल्लेख त्यांचे जमाखर्चांत आहे.

### सर्वांभूतीं विश्वंभर

पशुपक्षी व मुंग्यांसारखे लहान कीटक या सर्वांची त्यांनीं खाण्यापिण्यासंबंधात केलेली व्यवस्था अजूनही क्षेत्रानिहाय चालू आहे. बद्रीकेदारेश्वराच्या रस्त्यावर अंतराअंतरावर पांथस्थांची खाण्यापिण्याची व्यवस्था अगदी नियमबद्ध अजून चालू आहे. या संबंधाचा खर्च अगर दाखल संस्थानी दप्तरांत नाहीं. तत्रस्थ व्यवस्थापकांस वंशपरंपरेनें दिलेल्या स्थानिक देणग्यांतून ही व्यवस्था आजपर्यंत प्रामाणिकपणें अबाधित चालू आहे.

रानावनांतून पाणपोयींची, डोंगरापठारावरून गाईंच्या चराईची केलेली व्यवस्था अजून अबाधित चालू आहे. यातील कांहीं प्रकार कैलासवासी श्रीमंत महाराज तुकोजीराव द्वितीय यांस त्यांचे प्रवासांत दिसून आले आणि जमलें तेथें मातोश्रींच्या देणग्यांचा त्यांनीं जीर्णोद्धार केला.

सारांश, *''हें विश्वचि माझें घर'' ही श्रीज्ञानेश्वरांची वाणी मातोश्रींच्या वृत्तींत बाणल्यामुळें त्यांनीं ''धर्म'' म्हणून जे काम केले ते आधुनिक भाषेंत सांगावयाचे तर नॅशनल रिलिजन, रॅशनल रिलिजन आणि युनिव्हर्सल ब्रदरहूड ह्या सर्व शब्दांत प्रविष्ट होऊन आणखी कांहीं उरतेच. जीजस ख्राइस्ट यांचे शब्दांत ''ब्लेसड् आर् दि पीसमेकर्स.''* (Blessed are the peacemakers.)

कारकीर्द श्रीमंत मातोश्री अहिल्याबाईसाहेब होळकर संस्थान खासगीकडील शेरी नजराणा वगैरेबद्दल (इ. स.१७८०)

खाली एक वर्षाचा जमाखर्च दिला आहे तो एक नमूना आहे. त्यावरून संबंध कारकीर्दीचा अंदाज करिता येईल.

**शेरी नजराणा :**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २४,१४५-९-० | प्रांत स्वदेश पैकीं. | | | |
| | ७०००-०-० | परगणे अंबाड | २३००-०-० | परगणे सेवगांव |
| | १५००-०-० | तालुके देपूर | ३००-०-० | परगणे चांदवड |
| | ४०००-०-० | परगणे सुलतानपूर | ३००-०-० | परगणे गाळणे |
| | ४०००-०-० | परगणे नंदुरबार | ५००-०-० | परगणे उतराण |
| | १०००-०-० | परगणे अडावद | २४६-८-० | परगणे वडेल |
| | १०००-०-० | परगणे रावेर | १४९९-१-० | परगणे थालनेर |
| | ५००-०-० | परगणे कोरहाळे | | |
| | एकूण रु. २४१४५-९-० | | | |
| ८८६६-११-० | प्रांत नेमाडपैकीं. | | | |
| | १००-०-० परगणे कानसूळ. ५०० परगणे अंबे २०० व सेंधवे ३०० | | | |
| | ३०० | परगणे नागलवाडी | २०० | परगणे ब्राह्मणगांव |
| | ५०० | ,, बागदारा | ४००० | सरकार बिजागड |
| | १००० | ,, कोठडे, चिखलदे निसबत बुळे | १००० | परगणे महेश्वर |
| | | | ६०० | चोळी |
| | २६६-११ करही रु. ४०० पैकीं वजा शितोळे यांचे हिश्श्यांचे १३३-५.० | | ७८६६-११-० | |
| ५७,२९७ | प्रांत माळवा : | | | |

| | | | |
|---|---|---|---|
| ६००० | परगणे इंदूर ऐवजी राहूगांव | ५४७ | परगणे देपाळपूर शेरी व नजराणा |
| ७५०० | परगणे रामपुरा | ४००० | रु. पैकीं वजा मौजे अटाहेडा गांव |
| ३००० | परगणे पिढावे | | खासगीकडे ठेविले. |
| ४००० | परगणे मल्हारगड | ४५० | परगणे झार्डा, कंजरडा |
| १००० | परगणे जावरे, खटके, | ३०० | प. नंदवाई |
| | भागवत | ६०० | परगणे रायपूर, निस्बत |
| १५०० | परगणे झाबुवे, निस्बत बुळे | | नलगे |
| ११०० | परगणे हसलपुर, नि. राजोळे | ९०० | परगणे संधारा, नि. वाघमारे |
| १२०० | महतपूर परगणा, नि. वाघ | १००० | अंतूर, निस्बत ढमढेरे |
| १२०० | परगणे पाटण, नि. बुळे | ४५० | प. बेटमे, वाघ |
| २००० | परगणे जिरापूर व माचलपूर, नि. लांभाते | २०० | प. सुंदरशी |
| ११०० | परगणे कायथे | ५०० | परगणे पिंपळदा, महाडिक |
| १६०० | परगणे देवळे | ५००० | प. कोंच |
| ४००० | परगणे सिरोंज | ५००० | प. कोटे |
| ४००० | परगणे टोंक रामपूर किल्ले | २००० | शेरीचा गल्ला. इंदूर व सावेर |
| १५५० | परगणे निंबाहेडा ऐवजी पिंपळ्या गांव ६०० चा | | |

---

५७,२९७-०-०

८९,३०९-४-०

गांवगन्ना रुपये.

शेरी नजराण्याऐवजी गांवे.

११६६-११-० प्रांत दक्षिण परगणे थालनेर येथील मौजे भामटे, उखलवाडी गांव दोन.

२६,१५०-०-० प्रांत हिंदुस्थान

१३००० परगणे देपाळपूर मौजे आटाहेडा वगैरे देह ५

४००० शेरी नजराणा ऐवज. ९००० खासगीचे. परगणे मानपूर दुमालेगांव शिंदे वगैरे जहागीर.

१५० परगणे करही येथील बेलबावडी गांव शितोळे यांचे हिश्श्याबद्दल लावून घेतला मक्ता रु. ३००

११००० परगणे तराणे व तालुके माकडोन.

२००० परगणे नेमावर व तालुके हरणगांव.

२६,१५०-०-०

२७,३१६-११-०

चोळी ऐवजी फुटगांव.

२६,३०० प्रांत दक्षिण.

७७०० प्रगणे चांदवड, मौजे सिवडी वर्षासन रु. ६०० व ऐन १५०० व नांदूर मध्यमेश्वर वर्षासन नेमणूक ३६०० व ऐन २०००

३०० मौजे तलवडे व सावरगांव मोकदमीबद्दल निमे.

१००० मौजे बाहोळी, परगणे कासेगांव, पंढरपुरीं अन्नछत्राकडे नेमणूक परभारें.

८०० मौजे थालनेर, परगणे नंदुरबार.

२००० मौजे बालदे हंतोड गांव दोन प्रगणे सुलतानपूर बारगळांकडील.

१३००० परगणे वेरूळ ९००० वर्षासन व दुमाले गांव खर्च खालसा ४०००

१५०० कस्बे थालनेर १००० पेठ अहिल्यापुरा, कस्बेवाडी ५००

२६,३००

८७,५०० प्रांत हिंदुस्थान.

१९००० परगणे इंदूर.

४००० मौजे कनाड्या   ४००० मौजे खजराणा
५००० मौजे तिल्लोर   २७०० मौजे कळमनेर
२००० मौजे पिंपलोदा   १००० मौजे चोरड्या
१०० मौजे अहिल्यापुरा   २०० मालगंज (मल्हारगंज)

१९०००

१९००० परगणे देपाळपूर.

७००० मौजे हातोद   १०००० मौजे बनेड्या
२००० मौजे सगडोद

१९०००

१३५०० परगणे सावेर.

१००० मौजे पालाखेडी　　१५०० मौजे दर्जी कराड्या

११००० मौजे बरलाई, डकाच्या

१३५००

७००० तालुके केलीबिजोता परगणे निंबाहेडा.

१००० तालुके मोमानी प्रांत नरवर.

१००० मौजे दूर्जजनपुरा परगणे हसलपूर.

१०००० परगणे कसेरीया.

१५००० परगणे चोरूपिंपळी प्रांत जैपूर गांवे सुमारी ४.

२००० मौजे सेत, गांगरसोली, तमरेल, वृंदावनाचे अन्नछत्राकडे तालुके काटकूट येथील गांव.

८७,५००

१,१३,८००

तेरीज एकंदर जमेबद्दल.

८९,३०९-४-० शेरी नजराणा.

१,१३,८००-०-० गांवगन्ना चोळी व फुटगांव जहागीर

२७,३१६-११-० प्रांतवार गांवगन्ना.

२,३०,४२५-१५-०

शिवाय भेटी व नजराणे व भेटीची पातळे व बागांपैकीं उत्पन्न पैकीं खर्च रुपये वगैरे.

१,१५,०५५ धर्मादाय खर्च.

१२०० इच्छा भोजन.

३०००० श्रावणमास निस्बत अन्नसंतर्पण वगैरेकडे.

५०० देवस्थान उत्साह (= उत्सव) वगैरे.

१५०० आगंतुक ब्राह्मण बिदागी वगैरे.

१००० श्रीरामेश्वराच्या कावडी वगैरे.

३१३३० अन्नछत्राकडे खर्च बीतपशील ३१,३००

२२५०० भोजन दक्षिणा. १३५०० नित्याची माहे १० दररोज आसामी १५०० श्रावणमास ९०० माहे २ दररोज ब्राह्मण सुमारी ५०००

५००० गोकुळअष्टमी व राखी वगैरे दर ८ आणे प्रो।।.

१५०० खरेदी पत्रावळी शिवाय फरमासी यांस.
३०० खरेदी विड्याची पानें.
२००० शाकभाजी, सरपण, शिवाय फरमासी बागापैकीं.

३१,३००

१५०० गोवर्धन उत्सवाबद्दल दक्षिणा.
५०० आषाढ कार्तिकीचे उत्सवाबाबत दक्षिणा.
५००० वसंतपूजा वैशाखी पौर्णिमेस दक्षिणी व रांगडे ब्राह्मण.
३००० नागपंचमी बाबत.
३०० व्यतिपात.
३०० संक्रांती.
१००० उभयतो मुखी.
७२०० नित्य सोमवार वगैरे.
४०० श्रीतुळसी विवाह.
७०० श्रीभागवत सप्ताह.
१०० श्री शिवरात्री, हुताशनी, रामनवमी.
६०० ग्रहणाबाबत.
२५ घाटावरील पोरे.
१००० गोसावी, बैरागी, रमतेराम व काशी यात्रेकरू वगैरे.
३७,०३० तीर्थक्षेत्रें, देवस्थानें, अन्नछत्रें वगैरे.
१८०० श्रीक्षेत्र द्वारका.
३०० श्रीक्षेत्र रामेश्वर.
४००० श्रीक्षेत्र गया.
३५०० श्रीक्षेत्र काशी.
७००० श्रीक्षेत्र प्रयाग.
२००० श्रीक्षेत्र अयोध्या.
१००० श्रीक्षेत्र पुष्कर.
३००० श्रीक्षेत्र वृंदावन.
२००० गांवें तीनचे उत्पन्न. भरतपूरपैकीं मौजे गांगरसोली सेत व तमरेल प्रगणे.
१००० हुंडी सरकारांतून.

३०००

५००० श्रीक्षेत्र पंढरपूर ऐन ४००० व बोहली १०००
१२०० श्रीक्षेत्र हरिद्वार.
२००० श्रीक्षेत्र चित्रकूट.
५०० कोरेगांव भीमातीर.
६२५ श्री भीमाशंकर.
७०० श्री जगन्नाथराय.
३२५ श्री परशराम क्षेत्र.
२५० श्री कालहस्ती प्रांत कर्नाटक.
३० श्री व्यंकटेश गिरी कापूरआरती.

---

३७,०३०

---

१,१५,०५५
१००० गवतकटाई गाईकडे.
१२५ खरेदी मिठाई.
६००० बद्दल मुशाहिरा. आश्रित, कारकून व बाजेलोक आचारी, पाणके व देवपूजा वगैरे.
८००० महाल परगणे इंदूर, देपाळपूर व सावेर येथील गांवखर्च, वर्षासन नेमणूकी वगैरे.
१२०० दामी जमीनदार परगणे इंदूर वगैरे खासगी गांवापैकीं दरसाल
५५६ नगारखाना श्रीओंकारेश्वर वगैरे.
५३६ श्रीओंकारेश्वर, नगारची, घड्याळची, रोजमुरा.
२० श्रीकृष्ण मंदिर, महेश्वर यांजकडे.

---

५५६
५५०० गांवगन्नाचे कमजास्तीमुळें.
४००० हुंडणावळ सर्व क्षेत्री हुंड्या पाठविणें लागतात सबब.
५५,५१६-०-० कोठीकडेस खरेदी जिनसा बितपशील.
१६१३२-८-० गहू इंदूरमापे माणी १७२९२ दर ९ प्रमाणें.
९९२२-८-० तांदूळ इंदूरमापे माणी ८२७ दर १२ प्रमाणें.
४५८१-०-० दाळ तुरीची महेश्वरमापी माणी १९१ दर २४
१३,१६२-८-० तूप वजन खंडी ५० दरमणी १३
६७५-०-० मीठ वजन खंडी २५

| | | |
|---|---|---|
| | ४८०-०-० | हरबरे इंदूरीमाप माणी ६० दरमाणी ८ |
| | ४५०-०-० | ज्वार इंदूरी माणी ७५ दर ६ |
| | ८४०-०-० | तेल वजन खंडी १० |
| | ७८०-०-० | साखर वजन खंडी ३ दरमणी रु. १३ |
| | ३७५-०-० | उडीद व मूग महेश्वरी चौकीमापे माणी पंधरा दर २५ |
| | २७०-०-० | कापूर दीपदानास वजन दीडशेरप्रमाणें. |
| | १५००-०-० | किराणा हळद, हिंग, जिरे, मिरे, खोबरे, खारीक, सुपारी, वगैरे मिळोन. |
| | ८४०-०-० | गूळ खंडी १० |
| | ५५०८-०-० | इंदूरीहून जिन्नस आणावयास भाड्याबद्दल. |
| | ५५,५१६-०-० | |
| २,०५,९५२-८-० | | |
| | २९,५०० | देहनगी १००, बाजेखर्च ओवाळणी १००, दप्तर खर्च कागद खरेदी ३००, बागाकडे लागवडीचा खर्च ४०००, इतर बद्दलमुशाहिरे खर्च, कारखाना, इमारती, बावड्या वगैरे निस्बत आकार २५०००, एकूण आकार रु २९५०० |
| | २,३५,४५२-८-० | दोन लक्ष पस्तीस हजार चारशें बावन्न आठ आणे बाकी रुपये. |
| | फाजील रुपये | ५,०२६-९-० |

**सरकारी अकौंट दप्तर (हुजूर फडणीसी रेकॉर्डपैकीं नक्कल असे)**

**आधार ग्रंथ**


१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
२. चारिटेबल डिपार्टमेंट क्लासिफिकेशन देवस्थान लिस्ट
३. बाम्बे ग्याझेटियर
४. ज्ञानकोश
५. श्री विश्वनाथ दर्शन (पुस्तक)




## प्रकरण २६ वें

# मातोश्री अहिल्याबाईंचा नैमित्तिक धर्मादाय

देवी अहिल्याबाईच्या नित्य स्वरूपांचा धर्मादाय मागील प्रकरणांत आला आहे. आतां त्यांच्या नैमित्तिक धर्मादायाकडे वळूं या.

ज्या 'खासगी' खात्यांतून हा सर्व दानधर्म झाला त्या खात्याचा प्रारंभ व भर दाखविणारे सरकारी कागद खालीं दिले आहेत.

**शिक्का मुख्य प्रधान इ. स. १७३३**

(१) राजश्री मल्हारजी होळकर यांसी अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित बाजीराव बल्लाळ पेशवे पंतप्रधान अनेक आशीर्वाद. माळवे प्रांतीं वाटण्या होळकर २, शिंदे २ व पवार १ असे पांच हिश्शानें प्रागणे जिल्हेनिहाय सन गुदस्त सालीं सनद दिली गेली. त्याजवर तुम्ही परगणेनिहाय खासगीचा हिस्सा काढून सरंजामेतून वजा करून आपले कुटुंबास इनाम लावून देणेंविषयीं चिमणाजी बल्लाळ पेशवे यांचे नावें पत्र लिहिले. त्यास दफाते पत्रांचे पोटीं सरंजामेंतून वजा करून इनाम मखलसीची याद पेश झाल्यावर तुम्हांस लिहिण्यांत येतें कीं तुमचे ताब्यांत खासगी व दौलत असे दोन्ही प्रथक प्रथक कायम करून तुमचे कुटुंब सौभाग्यवती गौतमाबाई नांवें इनाम देऊन सनद व कपडे पाठविले आहेत. तरी खासगीकडे इनामी तालुके निरंतर चालविणें. तपशील येणेंप्रमाणें.

२,६३,००० परगणे महेश्वर, चोळी व परगणे हरसोला, परगणे सावेरपैकीं बरलाई तालुका व परगणे देपाळपूरपैकीं तालुके हातोद व प्रगणे महतपूरपैकीं जगोठी, करंजमाकडोन वगैरे बरहुकूम यादी मखलसीची. ३६,०१०-१०-० दक्षिण प्रांतीं चांदवडपैकीं गांवे व

अंबाडपैकीं कोरेगांव वगैरे मोगलाईकडील बरहुकूम याद. २,९९,०१०-१०-० एकूण इनाम कुलबाब कुलकानू दरोबस्त खासगीकडेस नेमून दिले आहे. तरी निरंतर उपभोग घेऊन नवीन सनदेचा आक्षेप न घेणें जाणिजे. चंद्र २५ साबान. बहुत काय लिहिणें.

**शिक्का माधवराव बल्लाळ मुख्य प्रधान**

**इ. स. १७६७**

(२) राजश्री अहिल्याबाई होळकर गोसावी यांसी अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य. स्नेहांकित माधवराव बल्लाळ पेशवे पंतप्रधान अनेक आशीर्वाद. तीर्थस्वरूप राघोबादादा पेशवे फौजेची तयारी करून नजराणा घेण्याकरितां किल्ले महेश्वरास येत आहेत. म्हणून समजलें. त्यांस विनंती आहे कीं माझे सासरे मल्हारराव होळकर यांनीं एकनिष्ठपणें धन्याची सेवा करून सर्व आयुष्य मुलूख सर करण्यांत घालविलें. माझा नवरा खंडेराव होळकर यांनींही सरकारी कामगिरींत देह सोडला. चिरंजीव मालेराव होळकर मृत्यु पावले. मी खासगी व दौलत असे दोन्ही अधिकार आजपावेतों चालवून होळकरांचे नांव कायम ठेविलें असून तुकोजी होळकर सरकार चाकरीचे उपयोगी समजून यांचे नांवे वस्त्रें यावीं म्हणून विनंती करितां दादासाहेब पेशवे नजराण्याचे निमित्यानें नाशास प्रवृत्त होऊन येत आहेत. म्हणून पत्र आल्यावरून लिहिण्यांत येतें कीं महेश्वर वगैरे ही जागा खासगीची होळकरांचे कुटुंबास इनाम जहागीर दिलेली असल्यानें तुमचा पूर्ण हक्क आहे. म्हणून ती।। दादासाहेबांस निक्षून ताकीद झाली आहे व तुकोजी होळकर यांचे नांवें सनद व कपडे तयार होऊन येत आहेत. आतां काडीमात्राचा अंदेशा न धरितां सुरळितपणें चालत आल्याप्रमाणें चालविलें जाईल. जाणिजे चंद्र १९ माहे रजब. बहुत काय लिहिणें. लेखन सीमा.

**इ. स. १७७०**

(३) माधवराव रघुनाथ कमाविदार परगणे नंदुरबार यांस पत्र कीं परगणे मजकूर येथील गांव सालमजकुरापासून खासगीकडे ठेविले असे.

| | |
|---|---|
| १ मौजे धामरे, तालुके नंदुरबार | १ मौजे विखरण, तालुके कोरीट |
| १ मौजे बारद, तालुके नंदुरबार | १ मौजे आमलथे, तालुके चिकणे |
| १ मौजे दुखे, तालुके चिकणे | १ मौजे नांवखेड, तालुके निंबगुण |
| १ मौजे धुकेद, तालुके बेलदे | १ मौजे शिंदे, तालुके निस्सार |
| १ मौजे पाटण, तालुके शिंदखेड | १ मौजे बाराके, तालुके कोरट |
| १ मौजे ब्राह्मण, तालुके चाकण | १ मौजे मथुराई, तालुके निझर |
| १ मौजे लोणखेड, तालुके हवेली | १ मौजे कोठली, तालुके निझर |
| १ मौजे बयावल, तालुके कोरठ | १ मौजे समसेरपूर, तालुके मैतेन |
| १ मौजे दाऊ, तालुके मैतेन | १ (नांव लागलें नाहीं) |

एकूण अठरा गांवची लावणी आबादी उत्तम होणेचा बंदोबस्त करणें. सदरहू गांवचा तालुका अलाहिद केला असे. तेथील कामकाज तहसील वगैरे निराळी दाखवीत जाणें.

(१) ''पूर्वी कैलासवासी सुभेदार मल्हारराव होळकर यांचे वेळेस पादशाही दौलतीतील जिन्नस त्यापैकीं सांप्रत बाईंनीं जडावाची चोळी काढून त्याचे हिरे व माणकें काढून श्रीपांडुरंग मूर्तीस टोपी केली. त्याची किंमत परस्परें ऐकिली रुपये पांच हजार. हे वर्तमान ऐकिलें ते लिहिलें. असे.'' (श्रीपंढरपूर येथील पांडुरंग)

(२) श्री पंढरपूर येथीळ समस्त उत्पात यांचे नांवें ताकीदपत्र कीं श्री मातोश्री रुखमाबाई चरणीं पायाचे रमझोन (सोन्याच्या तोरड्या) ह्या सदैव श्रीचरणीं घालीत असावें. अंतर पडूं नयें.

(३) श्री पांडुरंगाचे महानैवेद्याकारणें रुपये ४५ पंचेचाळीस प्रतिवर्षी महानैवेद्य करून यजमानाचे त्रिकाळ अभिष्ट चिंतित असावें.

(४) पुणें येथील तुळशीबागांत राजश्री नारो अप्पाजी यांनीं श्री रामचंद्रजीच्या मूर्तीची स्थापना केली आहे. त्याच्या पूजानैवेद्याच्या खर्चाकरितां सालमजकुरीं सरकारांतून वर्षासन तालुके पाबळपैकीं लाखण गांवाचे उत्पन्नातून ऐवजीं रुपये १०० शंभर करार करून हे सनद सादर केली असे.

(५) श्री जगन्नाथ सरकारचे कारकुनांनीं मंदिर श्री रामचंद्रजीचें व अन्नछत्र बांधिलें व बागही लावविला. पुढें सत्र चालू झाल्यावर त्याचे खर्चास जगन्नाथचे राजांनीं मौजे शिवपूर, रघुनाथपूर व गोपाळपूर तीन गांवे लावून दिलीं. त्याबद्दल एक रुपयाही घेतला नाही. गांवें छत्राकडे लाविलीं त्यावेळीं गांवची जमा रु. ७००० सात हजार येत होती. गांवची सोप अहिल्याबाईसाहेबांनीं गौरंग पंड्याकडे केली. पुढें गांवची आबादी उस्तवारी पंड्यांनीं केल्यावर रु. १२००० बारा हजार बंद बसूं लागला. हा ऐवज अन्नछत्राकडे वगैरे लागत आला. गांवे इनाम राजांनीं अहिल्याबाईस दिल्या दिवसापासून चाळीस वर्षे चालत आली. पुढें इंग्रजाचें राज्य झाल्यापासून पंचवीस वर्षे कमकसर, राजा कायम पांच वर्षे होते, तोपर्यंत चालले. नंतर राज्य जाऊन पूर्ण अंमल इंग्रजांचा झाला. त्यामुळें गांवची वहिवाट बंद व अन्नछत्रही बंद.

(६) श्रीक्षेत्र ओंकारेश्वर मानधाता राजश्री राजे ओंकार मानधाता यांस कीं श्रींचा मुखवटा कैलासवासी तीर्थस्वरूप मातोश्री अहिल्याबाईसाहेबांनीं वेदमूर्ती राजश्री देवराम दीक्षित यांचे वडिलांचे जिम्मेस केला आहे. हल्लीं तुम्ही हर बहाण्यानें मागतां म्हणून विदित झाल्यावरून हें पत्र तुम्हास सादर केले असे. तरी मुखवटा तुम्हांकडे भटजी देणार नाहीत. तिथी पर्वणीस वगैरे कैलासवासी यांचे पत्राअन्वयें देवावर घालीत जातील. नवीन कांहीं होणार नाहीं. तुम्ही मागूं नये. त्यांचे तेथें आहे तसाच राहील.'

(अ) श्रीओंकारेश्वराची पालखी : श्रीमंत मातोश्री अहिल्यामासाहेब होळकर यांनींच श्रींचे सेवेत अर्पण केली. पुढें श्रीमंत महाराज दुसरें मल्हारराव होळकर यांचे कारकीर्दीत (सन १८३०) मध्यें त्या पालखीस नवीन बन्नात व दांडी बसविली.

(७) श्रीक्षेत्र गया : येथें कारखाना सभामंडप, दासा व जागेवर पथ्थर पाडले जातात. बरसातीमुळें भारबदारी राहिली. कांहीं दिवसांत भारबदारी चालेल. सभामंडप उत्तम मजबूत प्रकार योजना अपूर्व. (इ. स. १७८२)

**दानधर्म व सहृदयता**

***पत्रांक १.*** श्रीमंत अहिल्याबाई होळकर व मालेराव होळकर यांनीं वे.शा. संपन्न रा. साहेबराम विद्यमानें अमृतराव वैद्य गौत्र वत्स शाखा माध्यंदिनी सूत्र कात्यायन वास्तव्य कपित्थल कुरुक्षेत्र यांस छ. ५ सवाल फाल्गुन शु. ७ संवत १८२३ रोजीं मौजे बासवाडा परगणे लाखेरी प्रांत हडोती वंशपरंपरेनें इनाम धर्मार्थ दिला. (इ.स. १७६७)

***पत्रांक २.*** ता.२७ फेब्रुवारी इ. स. १७६८ देवपूजेकडील कपिल गाईस दररोज पुळे १५० व वासरें ह्यास दररोज पुळे ७५ (नित्यनेम).

***पत्रांक ३.*** ता.९ जून इ. स. १७७० पाटलीण मौजे चिचोर तालुके राहुरी. मायलेकरांचा मेळ करून द्यावा. माझा अवघा जीव लागला आहे. रात्रंदिवस चिंता आहे. (म्हणोन अप्पाजी गीते यांस पत्र)

***पत्रांक ४.*** विष्णु महादेव गद्रे यांचे नांव सनद इ. स. १७७४ कीं तुम्ही सरकार पदरचे आणि सरकारचाकरी माणूस जाणून परगणे शेवगांव येथील मौजे दहीगांव वगैरे गांवें १० हजार वसूलीचे खेरीज हक्कदार, इनामदार, मोकासा, सरदेशमुखी, बाबी करून बाकी अंमल दरोबस्त इनाम करून दिल्हा.

***पत्रांक ५.*** रा. खंडो बाबूराव कमाविसदार परगणे इंदूर यांसी राजश्री आनंदराव यादव कारकून निस्बत सरकार याजसमागमें श्रीराम पंचायतनाच्या मूर्ती चित्रकूटीं स्थापनेकरितां व बाण एक श्रीकाशीस स्थापावयानिमित्य पाठविला आहे. त्यासी मशारनिल्हेचे चौकीपहिऱ्याचा बंदोबस्त करून समागमें माणसें देऊन तराण्यापावेतों सुरक्षित पोहोंचवून मशारनिल्हेचे हातचें उत्तर आणून हुजूर पाठवून देणें. (इ. स. १७७८)

***पत्रांक ६.*** पांडुरंग नारायण कमाविसदार सरकार बिजागड ह्यांस पत्र इ. स.१७८०. स्वारी (अहिल्याबाई) श्रीओंकारेश्वर यात्रेस गेली होती. तिकडून येताना मर्दान्याचे मुक्कामीं अठ्ठावन रुपयाचा जिन्नस आला. हा ऐवज तुम्हांकडून देवविला तो खर्ची लिहिणें.

***पत्रांक ७.*** रा. कमाविसदार मौजे खजराणा महाल खासगी यांसी कीं तारशाह फकीर मदारी आवलिया याजकडे मौजे मजकुरी पीर नाहर शहासयद याची मुजावरी घेत आला. मौजे मजकुरीं इनाम जमीन बिघे १५ पूर्वापार चालत आली. परंतु वहिवाटीस सनदपत्र कृपा करून दिले जावें म्हणोन. दौलतीस श्रेयस्कर जाणोन इनाम जमीन बिघे १५ देण्याचें ठरून हे सनद सादर केली असे. प्रतिवर्षी नवीन पत्रास आक्षेप न घेणें. (इ. स. १७८०)

***पत्रांक ८.*** श्रीऔंढा नागनाथाचे पूजनाचें काम सरकारांतून वेदमूर्ती राजश्री विठ्ठलभट बिन त्रिंबकभट उपनाम भोपी वास्तव्य अमरपत हे क्षेत्रमजकुरीं सरकारी तीर्थपुरोहित. यांजकडे सांगून बारमाही नेमणूक पूजासाहित्य १८, नंदादीप १०, नैवेद्य देवास व ब्राह्मण भोजन ४१, दक्षिणा देवापुढें व ब्राह्मणास १२, एकूण रुपये ८१ एक्यांशीं रुपयांची नेमणूक करून

परगणे अंबाडपैकीं माल ऐवजी देणें मंजूर आहे. (इ. स. १७८४)

***पत्रांक ९.*** (इ. स. १७८५) आषाढ शुद्ध ५ शके १७०७ शहासफी पीरजादे हैद्राबादकर यांस देविले रुपये १००० एक हजार.

***पत्रांक १०.*** (इ. स. १७८५) सजनाजी भगोरे यांचा अर्ज कीं भागोजी गवारी, कै मालेरावबाबाचे खिदमतगारीत होते. त्यांचा काळ झाल्यावर ते न पुसतां गेले. यास्तव अंतर पडले. धरमपुरी मुक्कामीं साहेबांनीं धरून शासन केले. आतां अंतर पडणार नाहीं. जामीनाविषयीं आज्ञा जाहली. त्यास मी जामीन जाहलों. आतां वावगी वर्तणूक करणार नाहीं.

***पत्रांक ११.*** इ. स. १७८६ ता. ६ नोव्हेंबर. रा. केसो गणेश कुंटे, मुक्काम पुणें यांस कीं, गणपतराव विष्णु यांनीं आपले पदरची माणसे न दुखवितां त्यांचें त्यापरी संरक्षण करून ठेवावीं हे उचित आहे. कैलासवासी विष्णु महादेव यांनीं आपलें पराक्रमानें सर्व मिळविले, परंतु माणसें तोडिलीं नाहीत. त्याअर्थी यांनीं वडिलांचे हातचीं माणसें राखून ठेवल्यास उपयोगी पडून स्वरूपच राखतील याचा विचार त्यांस न समजावासें नाही.

***पत्रांक १२.*** इ. स. १७८६ ता. ६ नोव्हेंबर रा. गणपतराव विष्णु गद्रे मु. पुणें यांसी कीं वडिलांचे हातची माणसें ज्याचे त्यापरी सरंक्षण करून ठेवावें यातच चांगलें आहे. कैलासवासी विष्णु महादेव यांनीं आपले कर्तृत्वानें जरी सर्व मिळविलें तरी माणसें तोडली नाहीत. तेव्हां तुम्ही तोडूं नये हें उचित असे.

***पत्रांक १३.*** इ. स. १७८९. जयराम जोशी मुरूडकर मुक्काम थेऊर यांस कीं अरीसिंह राणा यांनीं इनामगांव बांगरोडा बुद्रुक परगणे खोहर हा करून दिला आहे. मुलखाचे बदलाबदलींत तो आपणाकडे आला आहे. तरी जप्ती बसलेली उठवून, गांव मला परत मिळावा. (अहिल्याबाईकडून उत्तर कीं) आम्ही त्या प्रांतीं गेल्यावर सुभेदारांची भेट घेऊन बाबाचा गांव सोडून देऊं. (तुकोजीरावांनीं उत्तर केलें कीं,) आम्ही प्रांतीं गेल्यावर मातोश्रींची भेट जाहल्यावर गांवची मोकळीक होईल असें त्यांचेही वचन आहे. सहस्त्रावधीं ब्राह्मणांचें आपण चालवीत आहात. तर आम्ही पदरचे असतां चालवणें अगाध काय?

***पत्रांक १४.*** इ. स. १७८९. नेमणूक सरकारांतून क्षेत्र करवीर उर्फ कोल्हापूर येथें श्रीमहालक्ष्मीस नैवेद्य व ब्राह्मण भोजन यामुळें साहित्य वगैरे बारमाही नैवेद्य, ब्राह्मण भोजन, साहित्य एकादशीचे भोग वजा होऊन बाकी श्रीनैवेद्यास आसामी १ ब्राह्मण असाम्या ६ यांशी नेमणूक भोजनखर्चाकडे २३४. भोजनदक्षिणा ३२-१०-० बारमाही तैवजखर्च पानसुपारी २-६-०. श्रीमहालक्ष्मीकडे पूजासाहित्य ६-०-० हळद, कुंकू व चोळी-पातळाबद्दल. एकूण आकार रुपये २७५-०-० सालिना नेमणूक.

***पत्रांक १५.*** इ. स. १७९१ मार्च ह्या महिन्यांत मातोश्री अहिल्याबाई होळकर खालील ठिकाणीं गेल्या होत्या. (१) विष्णुपुरीनजीक मांधाता. रजब छ. १ इ. स. १२०० फसली. (२) श्रीओंकारेश्वर नजीक सनावद. रजब २, १२०० फसली (३) भोगांव परगणे कान्हापूर नर्मदा दक्षिणतीर छ. ३ रजब. (४) मर्दाना लगत मंडलेश्वर. छ.४ रजब.

(५) मुक्काम महेश्वरीं छ. ७ रजब.

***पत्रांक १६.*** इ. स. १७९३ ता. २५ मार्च. रामभट बिन केशवभट वगैरे अंबाड्यांस की, धर्माचे कामांत सरकारांतून दिक्कत करावयाची नाहीं. जशी मागून वहिवाट चालत आली असेल, तशी पुढें चालविणें. येविषयींचा बोभाट येऊं न देणें.

***पत्रांक १७.*** वर्तमान भावी कमाविसदार चांदवड यांसी कीं, यशवंतराव फणसे शके १७१३ त पंचत्व पावले. ते समयीं सौ. मुक्ताबाई फणसे यांनीं सहगमन केलें. ते काळीं वे. मू. चिमणभट बाळंभट व बाबादेवभट बिन नारायणभट उपासनी गोत्र सेंधवान सूत्र कात्त्यायन हे आपले उपाध्ये कुटुंबवत्सल यांचे चालविल्यास श्रेयस्कर जाणोन एक गांव मौजे उसाड परगणे मजकूर हा गांव फणसे यांजकडे चालत होता. तो गांव इनाम द्यावयाचा संकल्प करून ती मातोश्रीसाहेबांस बोलली होती. तो संकल्प पूर्ण केला पाहिजे. यास्तव शके १७१८ श्रावण वद्य अमावस्या सूर्यग्रहण पर्वकाळीं मौजे उसाड भटजीकडे दानपत्रांसह सनद सादर केली असे. अंमल त्रिवर्गबंधूंनीं पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें घेणें.

***पत्रांक १८.*** इ. स. १७८७. ताकीद पत्र खाटीक क्षेत्र जेजूरीकरास. तुझें दुकान क्षेत्र मजकुरीं कारखान्यावर आहे. त्याचें प्रयोजन नाही. तरी तू देखत चिठ्ठी दुकान उठवून घेणें. राहिल्यास पारिपत्य केले जाईल छ. २२ रविलाखर.

***पत्रांक १९.*** इ. स. १७९४ ता. ९ जून. राजश्री सिद्धेश्वर दादाजी पुरचुरे यांचे मातोश्रीसाहेबांस पत्र कीं, आपली मूर्ती श्रीरामचंद्र चरणीं अयोध्येस आहे ती पाहून बहुत समाधान झाले.

***पत्रांक २०.*** इ. स. १७९४. रा. वामनाजी हरी कमाविसदार परगणे अंबाड्यांसी कीं, हरिभक्तपरायण चिमाबाई हरदासीण इजला समाईक ऐवजपैकीं वर्षासन रु. १०५ पेशजी पासून चालत होते. तिचा काळ झाल्यावर जप्त झाले. चिमाजीचे शिष्य देवबा व कन्या मुक्ताबाई यांनीं सरकारांत विनंती केली कीं, आम्ही उत्सव वगैरे करितों; तरी वर्षासनाचा आकार मिळाला पाहिजे म्हणोन. त्यावरून हें पत्र सादर केले असे. तरी तुम्ही सालगुदस्ताचा ऐवज देऊन पुढें सालमजकूर पासोन रु. १०६ चिमाबाईंची कन्या मुक्ताबाई व देवबा शिष्य यांजला देऊन पावती घेत जाणें.

***पत्रांक २१.*** इ. स. १७७६. राजश्री आप्पाजीपंत पळसीकर यांसी. तुमचे पत्र पावलें. 'आम्ही महेश्वरी येणार. याजकरितां संताजी होळकर यांस सेंधव्यास लिहून मार्गाचा जाप्ता व्हावा म्हणून लिहिलें.' ऐसियास चिरंजीव संताजी होळकर, रा. मणीराम नागनाथ कमाविसदार थालनेर यांस लिहिलें असे. तुम्ही थालनेरीं आलियावरी मशारनिल्हे घाटाची खबरदारी घेतील.

***पत्रांक २२.*** इ. स. १७७७. रा. अप्पाजीराम (पळसीकर) यांस. प्रस्तुत तुमचे शरीरी समाधान नाहीं. म्हणून परस्परें ऐकिलें त्यावरून रामाजी त्रिंबक कारकून पाठविले आहे. सविस्तरें सांगतील. शरीर प्रकृतीची भावना लिहून पाठवितील. आमचे विचारें चांगला मुलगा पाहून दत्तपुत्र जरूर घ्यावा. दत्तपुत्र लाभदायक होऊन पुत्रोत्पत्ती जाहलिया अती उत्तमच

आहे. संशय न घेतां लिहिणेप्रमाणें करावें. औषधउपाय चांगला करून प्रकृती चांगली होय ते करणें. हगवण राहिली म्हणजे चिंता नाही. कोणेविसीं घाबरे न होणें. श्री बरेंच करील.

***पत्रांक २३.*** २२-१०-१७७७. गंगाजलनिर्मल सकुबाई (पळसीकर) यांसी. तुम्ही पत्र पाठविलें तें पाहून लेखनार्थ अवगत झाला. चिरंजीव रामरावाचे पत्रावरून सर्व कळलें. ऐसियास तुम्ही वडिलपणाचे रीतीनें ज्याचे त्याजपरी सर्वास राखून घरचे चालीप्रमाणें चालावें. मशारनिल्हेनीं तुमचे आज्ञेत राहून सरकार चाकरी आधीं करून बाहेरील प्रकारास जपत जावें हे उचित. तूर्त त्यांचेंही पाऊल असेंच आहे. याप्रमाणें सर्वकाळ असावे. येविसीं येथून लिहावयाचें ते लिहिलें आहे आणि तुमचीही ताकीद असावी. सर्वदा पत्र पाठवून कुशलार्थ लेखन करीत जाणें. चंद्र १९ रमजान. हे विनंती.

***पत्रांक २४.*** ता. २१-६-१७७८. चिरंजीव तुकबास आशीर्वाद विशेष. अप्पाजीराम (पळसीकर) मृत्यु पावले. वर्तमान ऐकून चित्तास परम श्रम झाले. ईश्वरगतीस उपाय नाही. मशारनिल्हे येथें आले त्यावेळीं दत्तपुत्र घ्यावयासी समक्ष सांगितलें होतें. परंतु अवसर न फावल्यामुळें तेही गोष्ट तैशीच राहिलीं. ते आपल्या पदरचें संस्थान चाललें पाहिजे, याजकरितां लिहिलें आहे. तर त्यांचे गोत्रपुरुषाचे लहान मूल उत्तम चांगले ते त्यांजकडून आणवून दत्तविधान करून संस्थान चालेल तें करावें. र. चंद्र १६ जमादिलावल.

***पत्रांक २५.*** इ. स. १७८९. बाळाजी लक्ष्मण यांचे श्रीदेवी अहिल्याबाईंस पत्र. श्रीक्षेत्र काशी येथें आपले कृपावलोकनें करून यथास्थित असो विशेष. ह्या क्षेत्रीं श्रीमणिकर्णिकेचे घाटाचे काम व तारकेश्वराचे काम आपल्या नांवाप्रमाणें झाले. मणिकर्णिका काशींत, पुराणांत उत्कर्षता असतां येथील काम ईश्वरानें आपल्याकडून करवून यश आपल्यास दिलें ही मोठीच गोष्ट झाली. मणिकर्णिकेचे घाटावर आपल्याकडील चौघडा व घडियाळ असल्यास फार उत्तम आहे. कोंच वगैरे इकडील महाल आहेत तेथें नेमणूक करून द्यावी.

***पत्रांक २६.*** ता. ९ डिसेंबर इ. स. १७८६. यशवंतराव फणसे यांचे मुक्काम पंढरपूराहून मातोश्रींस पत्र. कार्तिक शुद्ध द्वितीया मंगळवार. शुद्ध प्रतिपदेस लासलगांवींहून स्वार होऊन येथें आलो. देवदर्शन करून श्रींचा निरोप घेऊन आज श्रीनरसिंहपूर, जेजुरी देवदर्शन करून निफाडीं येऊन वडिलांचे भेटीस आज्ञेप्रमाणें येऊं. श्रींचा प्रसाद-बुक्का, गोपाळकाल्याचा प्रसाद लाह्या, पायांवरील बुक्का व श्रीवैकुंठ स्वामींनीं प्रसाद खडीसाखर पुडीत घालून वडिलांकरितां दिला, तो पाठविला आहे. प्रविष्ट झाल्याचें आशीर्वादपत्र यावें. कर्नाटकी घोगड्या पांढऱ्या दोन पाठविल्या आहेत; पावतील. सौभाग्यवती रखमाबाई होळकर (तुकोजीबाबांचे कुटुंब) कार्तिकेचे यात्रेस आल्या. भेट झाली. लष्करांत सरंजामासुद्धां जावे म्हणोन बोलल्या. ऐसियासी पागा टोकेस कामगिरीस आहेत. त्यास मातोश्री बाईसाहेबांस लिहून पाठवूं. तिकडून सरंजाम आल्यास लष्करात सरंजामासुद्धा जाणें घडेल. येविषयीं वडिलांचें उत्तर येईल तशी वर्तणूक घडेल.

***पत्रांक २७.*** रा. चिमणाजी गोविंद कमाविसदार पाटण यांस. अंबाराम सुखराम भट

उपनाम जयानी प्रयागकर वास्तव्य. श्रीत्रिवेणीच्या नैवेद्याकरितां सालिना सरकाराकडून वर्षासन रुपये १५० आहेत. तो ऐवज इहिदेसितेन तागाइत सन मजकूर चारसालेचा आकार रु. ६०० तुम्हांकडून देविले असेत. तरी हे रुपये वेदमूर्तीस पावते करून कबज घेणें जाणिजे.

***पत्रांक २८.*** ब्रम्हगिरी महादेव यांसी अहिल्याबाई होळकर देशमुख चांदवडाकडून पत्र की, कसबे मजकुरीं आपली हवेली देशमुखी व मुकदमीची आहे. त्या हवेलीच्या शेजारी दुसरें घर कोठाराकरितां बांधले होते. ते हल्लीं वेदमूर्ती चंद्रभट कस्बे मजकूरास दान दिलें. याजकरितां दक्षिणा रुपये ४९५० तुम्हाकडून देविले असे. तरी सदरहू आकार पत्रदर्शनी वेदमूर्तीस देऊन कबज घेणें. जाणिजे. छ. ४ रविलावल.

***पत्रांक २९.*** इ. स. १७६९. कमाविसदार परगणे अंबाड यांस. हरिभक्तिपरायण अनंतरूपी बिन नागेश गोत्र काश्यप कात्त्यायन वाजसनेय प्रतिष्ठान यांनीं कस्बे महेश्वरी येऊन विदित केलें कीं, क्षेत्र मजकुरीं श्रीगोदातीरी मठ बांधून आल्या ब्राह्मणांस अन्न द्यावे हा हेतू, याकरितां वर्षासन करून द्यावे म्हणून मनास आणितां हे ब्रम्हचारी थोर हरी भजनी तत्पर, यांचे चालविल्यास श्रेयस्कर जाणून परगणे मजकूर नतून इनाम नूतन वर्षासन धान्य ज्वारी, बाजरी, कैली थोरगांवी एक मण, लहानगांवी अर्धामण, सालमजकूरापासोन सुरू केले आहे. तरी गांवगन्ना धान्य ब्रम्हचारी बाबा यांजकडे दरसाल चालवीत जाणें. नवीन पत्रांचा आपेक्ष घेऊं नये.

***पत्रांक ३०.*** इ. स. १७८९. रा. निळो परशराम परगणे इंदूर यांसी. मौजे खजराणा परगणे मजकूर येथें नातरे लागतात. त्याचे पाटदामाचा ऐवज पहिल्यापासून खासगीत जमा होतो. असे असतां सांप्रत तुम्ही तेथील पाटदामाविसी खटपट आरंभिली आहे म्हणून विदित झाले. तरी अत:पर पाटदामाविसी दिक्कत न करणें. जुनी रीत मोडून नवी करणें योग्य नाहीं.

***पत्रांक ३१.*** यादी अनुष्ठानास ब्राह्मण असाम्या यांसी दक्षिणेबद्दल.

३० राजाराम दिक्षित नाशिककर शिवकवचाचा पाठ रोज १११ प्रमाणें ३३३०
३० गौभट बार्शीकर (नाशिक) हनुमंतकवचपाठ दररोज १११ प्रमाणें ३३३०
३० विठ्ठलभट पुणतांबेकर मल्हारीसहस्त्रनामपाठ दररोज १११ प्रमाणें ३३३०
३० रेणुकादार आदित्यहृदयपाठ रोज १११ प्रमाणें ३३३०
३० यशवंतभट अर्ध्यप्रदान दररोज मंडले ४८ प्रमाणें मंडलें सुमारी १४४०
३० गंगारामभट नवग्रहजप दररोज ८३ प्रमाणें २५००००
३० शेशंभट नवग्रहजप दररोज ८३ प्रमाणें २५००००
३० दादंभट चांदवडकर नारायणकवचाचा पाठ दररोज १११ प्रमाणें ३३३०
३० आत्मारामभट नमस्कार दररोज १००० प्रमाणें
----------
२७० येणेंप्रमाणें.

***पत्रांक ३२.*** इ. स. १७९१. ता. १६ एप्रिल. हैद्राबादचे वकील माधवराव लक्ष्मण

यांचे पत्र मातोश्रींचे नांवें : हिंदुस्थान, दक्षिण वगैरे सर्वत्र तीर्थी व राज्यांत महाराजांनीं थोडे बहुत घाट, देऊळे, हरएक कामें केलीं. मल्लिकार्जुनाजवळ कांहीं काम न ऐकिलें. तेथेंही एक-दोन कामें घडून यावी. मोठी-लहान हे आज्ञा आलियापुढें त्याचा नक्षा सेवेशीं पाठवीन. आज्ञा नसल्यास कळेल कीं महाराजांचे मर्जीत तेथें काम करावयाचे नसेल, म्हणून आजपावेतों काम न झालें. मोठ्या श्रमाची यात्रा, महाराजांचे आशीर्वादें कुटुंबासहित घडली. हा धर्म महाराजांचे प्रतापांचा आहे. मल्लिकार्जुन ज्योतिर्लिंगांत कैवल्यांत जाऊन तेथेंच आनंदात आहे. वर्षात २-३ महिने पूजा होते. मग ९ महिने एक वतनी ब्राह्मण आहे तो ब्रह्मचर्य व्रत करून एक नैवेद्य करून मल्लिकार्जुनांस व देवीस अर्पण करून मग आपण भक्षितो. पूजा जंगमाची आहे. सालिना पन्नास हजार उत्पन्न येते ते कर्तुळकर पठाणाकडे जाते. येथून शंभर कोसांवर श्रीव्यंकटेश दैवत आहे. तें शेषाचे फणांवर आहे. एकच पर्वत आहे. क्षेत्र मनरथ येथें पूर्वी एक घाट तयार झाला, त्याच घाटावर एक शिवालयाचें देऊळ तयार करावयास एक कारकून रा. गोपाळ नारायण आले. त्याबरोबर सरकारांचे आज्ञापत्र व नबाबास थैली किनखाबाची त्यांत पत्र पाठविलें ते या महिन्यांत छ.१२ रजबीं पावून त्यांतील एक नक्षा देवळाचा लिहिला आहे, त्याचा उपराळा या दरबारांतून करवितों.

***पत्रांक ३३.*** ता. ८-७-१७८१. रा. आबाजी विष्णु कमाविसदर रामपुरा यांसी. मौजे खजूरी परगणे मजकूर हा गांव पूर्वीपासून कैलासवासी अप्पाजीराम (पळसीकर) यांजकडे होता. अलीकडे सरकारांत जप्ती केली होती; परंतु मशारनिल्हे पुरातन पदरचे, त्यांजकडील गांव त्यांचे पुत्र राजश्री रामराव अप्पाजी यांजकडे चालवावा, ऐसा करार करून हें पत्र सादर केलें असे. तरीं मौजे मजकुरीं दखलगिरी न करतां मशारनिल्हेकडील कारकूनाचे स्वाधीन करणें जाणिजे.

***पत्रांक ३४.*** रा. रामराव अप्पाजी यांसी. तुमचे पत्र पावलें. तीर्थरूप अन्याबाचे उत्तरकार्य केलें. आता वडिलांचे रीतीनें चालून, सरकार चाकरीस जपून, घराचा बंदोबस्त वडिलांचा लौकिक जतन करून, ज्यांनीं घेतले त्यांचे आज्ञेंत राहून, वरकडांसही ज्यांचे त्यापरी राखून वहिवाट करणें. म्हणजे यांत सर्व गोष्टी आहेत. तूर्त तुमचें पाऊल असेच दिसतें. पुढें सदोदित याप्रमाणेंच असल्यास कांहीं जड पडावयाचें नाहीं. सर्वदा पत्र पाठवून आपले वर्तमान सविस्तरें लेखन करीत जाणें. र. चंद्र २१ रमजान सीतसमानेनमया व अलफ.

***पत्रांक ३५.*** ता. २१-१०-१७८५ रा. रामराव अप्पाजी यांस. रा. पांडुरंग कोकजी यांजकडून अंतर पडल्यामुळें तुम्ही मशारनिल्हेस कैद केलें म्हणोन विदित झाले. ऐसियासी कोकजी महादेव पूर्वीपासून पदरचे. त्यांनीं तुमचे वडिलांची एकनिष्ठपणें सेवा केली आणि तसाच लोभ करून चालविले. अलीकडे त्यांचे पुत्रापासून अंतर पडलें, त्यांचे फलही पावलें. यास्तव हें पत्र लेखन केलें असे. तरी अत:पर तुम्हीं मशारनिल्हेविशीं आग्रह न धरितां पुढें त्यांनीं आपले रीतीनें चालावें. येविशीं बंदोबस्त करून घेऊन मुक्त करणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. रवाना चंद्र १७ जिल्हेज.

***पत्रांक ३६.*** ता.१-१-१७८७. रा. रामराव अप्पाजीस पत्र. तुम्हांकडून एक-दोन

पत्रें मळी रोकडा यांचे विद्यमानें आली व एक पत्र हल्लीं सरकारचे कासिदासमागमें आले ते पावून लेखनार्थ अवगत झाला. महेश्वरीं रेवासन्निध आमची हवेली आहे तेथें सुखवस्तु बिऱ्हाडकरू राहतात. ते जाग्याची खराबी करून मळी रोकडा आमचे तर्फेनें तेथें राहतो. त्यासी कजिया करितात. वाड्याचे पश्चिमेस सरकारी अन्नछत्राची खिडकी किल्ल्यावरून रेवातीरीं जावयाची आहे. कारखान्यामुळें आमचे वाड्यास उपसर्ग लागत आहे. येविषयीं कारखान्याचे दरोग्यास ताकीद असावी. वाड्यापुढें उत्तरेस श्रीराजराजेश्वराचे भिंतीअलीकडे आमचे जागेवर गोळक पंतोजी शाळा घालून राहिला आहे. त्या जागेवर धर्मशाळा बांधविण्याची आहे. सरकारांतून आज्ञा झाली पाहिजे.

आमचा गांव रामपूर परगण्यांत असून तेथें गरोठचे गांवचे काकडाचा कज्या लागला आहे. येविषयीं मामलेदारास फडशा व्हावा. आज्ञा करणार साहेब समर्थ आहेत.

१. रा. पांडुरंग कोकजी यांनीं जामीन देऊन सुटावें. जामीन न द्यावा हा त्यांचा आग्रह. तेव्हां आमचेकडे दोष काय? जामीन दिल्यास गुंता नाही म्हणोन ऐसियासी तुमचे वाड्यांत बिऱ्हाडकरू राहून तुम्हांकडील माणसांसीं कजिया करतील ऐसें घडणार नाहीं. तथापि बोभाट आल्यास ताकीद केली जाईल. खिडकीचें काम बहुतकरून आटोपत आले, तेव्हां तुमचे वाड्यास उपद्रव लागणार नाहीं. वाड्यापुढील जागा तुमची आहे ऐसें नाही. मैदान पडले होते त्यामुळें तुमचेकडील भोई मात्र राहत. तुम्हांस दिल्यास आणखीं दुसरें वाडे गोसावी यांचे आहेत तेही मागूं लागतील. याजमुळें कोणासच देतां येत नाहीं.

२. काकडाचे जाग्याबद्दल ताकीदपत्र कमाविसदार रामपुरा यांस दिलें आहे.

३. पांडुरंग कोकजीबद्दल पेशजी अर्थ समजलाच आहे. ते बहुत दिवसाचे पदरचे, त्यांजकडून अंतर पडलें त्यांचे फळ ते पावले. अत:पर जामीन घेऊन सोडावें. त्यांनीं जामीन न द्यावा हा त्यांचा आग्रह चांगला नाहीं. मशारनिल्हेचे स्त्रीस निक्षून ताकीद केली आहे. ती जामीनाचे तजविजीस लागली आहे. त्याप्रमाणें मुक्तता करणें. राजकीय वृत्त झालें ते समजलें.

**पत्रांक ३७.** इ. स. १७७३. राजश्री सिदो बापूजी निस्बत कारखाना जेजुरी यांस. तुम्ही पत्र पाठविलें ते पावून लेखनार्थ अवगत जाहला. त्यांची उत्तरे येणेंप्रमाणें.

१. श्रीमल्हारेश्वराचे देवालयाचें काम होऊन सभामंडपांचेही काम आटोपत आले. दोन थर मात्र राहिले ते सत्वरींच होतील म्हणोन लिहिलें त्यास सभामंडपांचे काम कापणीपर्यंत जालेच पाहिजे. राहिले ते सत्वर आटोपून घेणें.

२. नंदीचे चौथऱ्याचे काम चांगले व लौकर आटोपे असें करणें.

३. नंदीकरितां पाषाण तीनचार काढले ते फुटके निघाले. याजकरितां दुसरा दगड अडीच गज उंचीचाच काढला आहे. आणावयास आटाहास्य लागेल. आला म्हणजे नंदी तयार करवितो म्हणोन लिहिलें. त्यांस आणावयासी तजवीज करून नंदी सत्वर सिद्ध होय ते करणें.

४. डोंगराचे पाणी तळ्यांत येतें त्याजला कोरडी पाळ बांधावयास आज्ञा जाहली. त्याप्रमाणें बांधली असतां पाणलोटाचे भरानें वाहून गेली. संगीन बांधलेखेरीज टिकणार नाहीं म्हणोन लिहिले. त्यांस संगीनकामाचें प्रयोजन नाही. पाळ रूंद चांगली आठ-दहा हात धरून भोईंत मात्र चुन्यांचे दगड जमवून बसविणें म्हणजे ते वाहून जाणार नाहींत आणि गाळही येऊं पावणार नाही. इकडे जांबेस वगैरे याप्रमाणेंच तळ्यांचीं कामें केलीं आहेत.

एकूण चार कलमें मनन करून लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. सर्वदा पत्र पाठवून कारखान्यासंबंधीं वगैरे सविस्तर लेखन करीत जाणें. जाणिजे. छ. २७ रविलाखर.

***पत्रांक ३८.*** ता. २३-६-१७७५. राजश्री रामराव अप्पाजी यांस. तुम्ही बलकवाड्याहून कूच करून गेल्यावर मार्गी पाऊस लागला. तेणेंकरून दप्तरच्या कंठाळीस कांहीं पावसाचा असार लागला म्हणोन विदीत झाले. त्यावरून हें पत्र लेखन केलें असे. तरी तुम्ही एक मुक्काम करून कागद भिजले असतील ते वाळवून व मार्गाचा जाप्ता चांगला करून पुन्हा न भिजेत ऐसें करणें व स्वारीकरितां एक उंट आणावा व बुरणीस व मोमजामे सुमारी चार पाठविले आहेत. सांभाळून घेऊन उत्तर पाठविणें. रवाना चंद्र ५ जिल्हेज.

***पत्रांक ३९.*** ता. २३-७-१७७५. रा. रामराव अप्पाजीस तुमचे पत्र वाचून लेखनार्थ अवगत झाला. तुम्ही पळसीस पाऊन उंटें माघारीं पाठविली ते सफर ११ सरकारांत पावले. सत्तर रुपये तुमचे विद्यमानें देणें त्याची चिठ्ठी राजश्री पदमसी राजसी यांजवर दिली. त्याप्रमाणें ऐवज घेऊन राजश्री बाबाजीराम तुम्हांकडे पाठवितील. शरीर प्रकृती अद्याप नीट झाली नाहीं. औषध उपाय होतच आहेत. आरोग्य होईल. सर्वदा पत्र पाठवून सविस्तरें लेखन करीत जाणें. रवाना चंद्र ६ मोहरम.

***पत्रांक ४०.*** (इतरत्र मिळालेली माहिती) अहिल्याबाईंच्या माहेर घराण्यापैकीं तुकाराम शिंदे यांजकडून मिळालेली माहिती.

१. इंदूरनजीक केवडेश्वर येथून क्षिप्रा निघाली, त्या ठिकाणीं मातोश्रींनीं सदावर्त कायम केले.
२. अमरकंटक नीळकंठातून नर्मदा निघाली त्या जागीं सदावर्त कायम केले.
३. उमरावती तापीचे कांठीं सदावर्त कायम केले.
४. मुळा, पेरा, गोदावरी ह्या नद्यांचे कांठीं काळेगांव, टोके, पेरसे, जामगांव येथें सदावर्त ठेविले होते.
५. टोकें येथें प्रवरा संगमावर घाट बांधविला.
६. काळेगांव गंगापूरचे रानांत बावडी बांधली आहे.
७. मांडणगांव जिल्हा नगर येथें सिद्धेश्वर महादेवाचे मंदिर आहे तेथें चौघडा, झेंडा, आणि फत्तराची घंटा दिली. ह्या मंदिराची व्यवस्था चांदवडकडून होते. मांडणगांवीं होळकरांचा वाडा आहे तो हल्लीं जीर्णावस्थेंत आहे.
८. चंदनपूर, गवाली, जामगांव येथें गरुडाचे मंदिरास इनाम दिलें आहे.

९. चोराखेडी बारशीजवळ हें अहिल्याबाईंचे आजोळ. येथें पहाडावर बुरूज बांधिला. पापविनाशी मंदिर बांधिलें. पहाडात तळे खणले. ह्या स्थानाची व्यवस्था तेथील पाटलांकडून होत असते.

१०. श्रीसमर्थ रामदासस्वामी यांजकडे मौजे जाम परगणे अंबाड हा गांव दरोबस्त धर्मार्थ चालत आहे. तसेंच अष्टावधानी बाबाकडे मौजे मुरशतपूर परगणे शेवगांव धर्मार्थ आहे.

***पत्रांक ४१.* (सरकारी रेकॉर्ड वरून)** वासुदेव दीक्षित खरें, कमाविसदार, वडझिरे यांस ताकीदपत्र कीं गोपाळभट पुजारी धर्माधिकारी श्रीसुंदर नारायण संस्थान नाशिक. श्रींचे पूजा साहित्यास चिरंजीव तुकोबांनी मौजे मजकुरपैकीं वर्षासन रु.२०० करार करून दिले असतां पावत नाही, म्हणोन माधवराव भागवत यांनीं हुजूर विदित केले त्याजवरून हें पत्र लिहिले आहे. तरी बिनहरकत वर्षासन पावतें करीत जावें. पुन्हा बोभाट न येणें. माहे भाद्रपद मास (सालाचा कागद जळाला म्हणोन नाईलाज आहे.)

वर जीं पत्रें नमूद केलीं आहेत ती सारांशरूपानें आहेत. मातोश्रीसाहेबांच्या प्रापंचिक व पारमार्थिक कृत्यांचा निरनिराळ्या दिशांनीं होणारा व्याप दृग्गोचर व्हावा अशा दृष्टीनें ही पत्रें निवडली आहेत. पत्रांक आठ व चौदा यांवरून त्या वेळची धारण दिसून येईल. पत्रांक अकरा व बारा ह्यावरून तत्कालीन थोर माणसांची वागणूक दृष्टीस येईलच, पण मातोश्रीसाहेबांची उपदेश करण्याची पद्धतही लक्षांत येईल. पत्रांक एकोणिसावरून मातोश्रीसाहेबांची समकालीन कारागिरांनीं काढलेली मूर्ती श्रीक्षेत्र आयोध्येस आहे हें स्पष्ट होते. फोटो हवाच तर त्यावरून काढलेला विश्वसनीय होईल, हे सांगणे नकोच. पत्रांक अठरावरून क्षेत्रानिहाय कोठचा निषेध असे तें दिसून येईल. पत्रांक सोळावरून 'जशी मागून वहिवाट चालत आली असेल तशी पुढें चालविणें हें धोरण दिसून येईल. राजश्री अप्पाजीराम पळसीकरांस लिहिलेली पत्रें बरींच आहेत. त्यावरून राज्यकारभाराचें धोरण, जातायेतांची सरबराई, लष्करांचा बंदोबस्त इत्यादि प्रकरणांवर, बराच प्रकाश पडतो. हैद्राबादचे वकील माधवराव लक्ष्मण ह्यांनीं तीर्थयात्रा केल्यावर कांहीं नवीन कल्पना सुचविल्या. 'जनाचें ऐकावें परी मनाचें करावें हा क्रम मात्र मातोश्रींनीं अखेरपर्यंत चालविला. तुकोजीरावांचीं कांहीं पत्रें नमुन्यादाखल यांत प्रविष्ट केली आहेत. मातोश्रीसाहेबांसंबंधीं त्यांचा आदर व आज्ञाधारकपणा विशेष दिसोन येतो. श्रीक्षेत्र महेश्वरीं श्रीमंतांच्या आसपास सरदार लोकांचे वाडे होते. त्या काली जागा कदाचित् मोजून मापून दिल्या नसतील. पुढें वस्ती वाढल्यावर मोजमाप लक्षांत येऊं लागले असणार अशा स्थितीत पळसीकरांची पत्रें व त्यांस गेलेलें उत्तर मननीय आहे. पत्रांक ३६,३७ वरून मातोश्रीसाहेबांचा बांधकामातील अनुभव दिसून येतो. पत्रांक ४०, ४१ हे धर्मादायाचा विस्तार दर्शवितात.

इ. स.१७७५ देवी अहिल्याबाईसाहेबांचे नित्याचे पंक्तीचा व नित्याची पंगत **(सरकारी रेकॉर्डवरून)** थाळेकरी वगैरेचा भोजनखर्चाचा अंदाज.

३०० एकंदर रोजीना. पंक्तीस, थाळेकरी, खिजमतगार, लेकावळे व बायका, कुणबिनी, कोठावळे,सिधेकरी व जासूद, मशालची वगैरे तपशील खालीलप्रमाणें :

६ थाळेकरी : १ सौ. उदाबाई, १ सौ. काशीबाई, १ गोविंदराव व राजोळे, १ मक्काजी लांबहाते, १ गंगाभारती, १ रामजी अघोड

२० पंक्तीस जेवणारे :

| | | |
|---|---|---|
| १ तुकोजी कडू, | १ हनमंतराव फडके, | १ माधोरणसिंग, |
| ३ सजनाजी मोगुरे व इसम | ४ कान्होजी होळकर व इसम | २ कृष्णाजी जामदार व इसम |
| १ अंताजी कोकाटे | ३ नथूजी कारले खुद व इसम | २ अनसुजी गौळी व इसम |
| १ कल्लुभाई स्त्री | १ शरीफभाई | |
| ---------- | ---------- | ---------- |
| ६ | ९ | ५ |

**१३ खिजमतगार मंडळी :**

१ खंडू मंडलिक, १ जावजी, १ लिंगोजी जाधव, १ बेहरू काळू, १ कुमाजी भोसले,१ भिवजी शिंदे, १ बेहरू गायके, १ पुंजाजी, १ जेतू, १ नानकू माळी, १ रामा गाढवे, १ खंडू लेडे, १ जाखू

५९ लेकावळे व बायका.

| | पुरुष | बाया | पोरे | एकूण |
|---|---|---|---|---|
| २ भवानीकुंवर | १ | १ | ० | २ |
| २ सटवाजी | १ | १ | ० | २ |
| २ भिकाकुंवर | १ | १ | ० | २ |
| २ रघुजी केसरे | १ | १ | ० | २ |
| २ सुभानजी होळकर | १ | १ | ० | २ |
| २ भागूजी म्हसके | १ | १ | ० | २ |
| २ भागिर्थी | ० | १ | १ | २ |
| ३ नवलकुंवर | १ | १ | १ | ३ |
| २ भारमल होळकर | १ | १ | ० | २ |
| २ मानाजी होळकर | १ | ० | १ | २ |
| २ केसरा | १ | १ | ० | २ |
| २ आश्रफा | १ | ० | १ | २ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ जीवजी होळकर | १ | १ | ० | २ |
| २ येसू कुंवर | १ | १ | ० | २ |
| १ धनसिंग | १ | ० | ० | १ |
| १ कान्हा | १ | ० | ० | १ |
| १ काशीजी कुंवर | १ | ० | ० | १ |
| १ भिवबाई | ० | १ | ० | १ |
| १ खुशाला | १ | ० | ० | १ |
| १ आनंद्या | १ | ० | ० | १ |
| ३ गंगू होळकर | १ | १ | १ | ३ |
| १ साळी, त्रिंबका | ० | १ | ० | १ |
| १ सटवाजी | १ | ० | ० | १ |
| १ बाळ्या खेमलीचा | १ | ० | ० | १ |
| १ बाळ्या चंपीचा | १ | ० | ० | १ |
| १ (नांव फाटले) | १ | ० | ० | १ |
| १ बाळ्या, गंगीचा | १ | ० | ० | १ |
| १ लक्ष्मण निसबत सीता | १ | ० | ० | १ |
| १ हरी निस्बत केसरी | १ | ० | ० | १ |
| १ रामा बख्तीचा | १ | ० | ० | १ |
| १ खुशालीची पोरगी | ० | ० | १ | १ |
| १ नागूजी | १ | ० | ० | १ |
| ३ शिवजी होळकर | १ | ० | २ | ३ |
| २ पीरबक्ष | १ | १ | ० | २ |
| ३ शिवा, राधीचा | १ | ० | २ | ३ |
| १ रूपीचा पोर | ० | ० | १ | १ |
| १ गोविंदा | १ | ० | ० | १ |
| ..... | ..... | ..... | ..... | ..... |
| ५९ | ३२ | १५ | १२ | ५९ |

२४ कोठावळे, अन्नछत्रांसुद्धां

१ सकोजी, १ दयाराम, १ चेना, १ फकीरा, १ भिवा, १ हुसेन्या, १ गंगूचरण, १ धन्ना, १ राघवचरण, १ शामा, १ रामशेट, १ रघु, १ अप्पा, १ गोविंदा, १ गोमाजी, १ छीतर मुसलमान, १ रामा, १ काळू, १ पिराजी, १ पुंजाजी, १ शामा, १ काशी, १ निंबा, १ देवजी वणजारे. **एकूण २४**

४ किरकोळ : १ बाजी शिंपी, १ नन्ही परटीण, १ गोसावीण, १ पदाजी जिनगर. ३ मशालची : १ पुंजा, १ मोहन, १ भिका.

२० जासूद २ पखालची, २ म्हसके, गायके इसम १६

**एकूण २०**

१०५ कुणबिया बाया एकशे पांच

३१ शिधेकरी :

४ गोपाळजी नाईक खेडकर माणसांसुद्धा. १ गोधाई होळकर. २ चोपदार इसम १ कुकूजी जामदार, १ राई जामदारीण, २ सेटी जामदार, १ परशुराम निस्बत देवपूजा, ३ बापूजी शामराज, २ खंडो यशवंत कारकून जामदारखाना, १ जीवनराम खासबरदार, १ दप्तरबंद कारकून, २ भटंभट सिधे दोन, १ फिरंगोजी भागवत, १ तुळसाऊ, २ चंदी तलब कारकून २ शांताप्पा, १ खंडूलेडची बायको, १ माणूस भटंभट. **एकूण ३१**

३ भंगी इसम

१२ परवानगीचे इसम (ही नांवनिशीं, नित्य मातोश्रींच्या हुकूमानें बदल होणेंची असे.)

.............

३००

एकूण तीनशेंचा नित्यक्रम असे.

हिशेब बापू महाजन सुा सलास तिसेन मयावअलफ (सन १७९२ जून) रोशनाईकरितां तेल दररोज वजनी :

८८७।।. सरकारांत, ८८।।. नारो गणेश, ८८२ गंगाजलनिर्मळ हरकाबाई, ८८१ जामदारखाना, ८८।।. यशवंतराव गंगाधर, ८८।९ गोविंद रघुनाथ गानू. ८८।।. मल्हारराव फडणीस, ८८।।. गणेश व्यंकटेश, ८८।. लेखराज मुनशी, ८८।. बभूत भारथी, ८८।. मुकुंद जिवाजी, ८८।. आप्पाजी मेघ:श्याम, ८८।. त्रिंबक विश्वनाथ, ८८।. भोगाजी खंडेराव, ८८।. नीळकंठ भगवंत. ८८८९ शिंद्यांची हवेली, ८८। सदाशिव भट उपाध्ये, ८८८४।।. पीरबक्ष होळकर, ८८८४।। देवपूजेचे गाईकडे, ८८८९ भिकाजी जामदार, ८८८४।।. तोफखान्याकडे, ८८८९ थट्टीकडे, ८८।।। वाड्याचे दरवाजे तीन, ८८। रथखान्याकडे, ८८८९ पीलखान्याकडे, ८८८२।. मंडळखोरचे खिडकीकडे, ८८।. घड्याळचीकडे, ८८।।. दप्तरखान्याकडे, ८८८२।. विठ्ठल खिडकीकडे.

१६।।।८ एकूण तेल वजन पक्के पावणे सतरा शेर आठ छटाक. इस्तकबील छ.१३ रोज तागाइत छ.३० मिनहूपावेतों अठरा रोज देणें. म्हणोन हुकूम छ ७ जिल्काद.

### वर्षप्रतिपदेस आश्रितांचा बहुमान

यादी संवत्सरप्रतिपदेमुळें वस्त्रें सु।।. इहिदेतीसैनमया व आलफ चैत्र शुद्ध १ छ २९ (ता. ४ एप्रिल इ. स. १७९१) **(सरकारी रेकॉर्ड जळाले त्यापैकीं)** मुक्काम महेश्वर आश्रित,

**कामगार, कारकून मंडळी व शिलेदार मंडळी :**

११ आश्रित मंडळी :

१ उपाध्ये, १ अंबारामशास्त्री पुत्र, १ धोंडदीक्षित, १ महिपत भट, १ गंगाधर पुराणिक,१ दादा शास्त्री, १ गदाधर भट केशीकर, १ अनंत अप्पा पुराणिक, १ भटंभट पुराणिक, १ सांब सदाशिव भट, १ (कागद जळाला)

**कामगार, कारकून मंडळी :**

| | | |
|---|---|---|
| १ मुकूंदराव हरी, | १ यशवंतराव गंगाधर, | १ मावशीबाईकडील, भगवंतराव |
| १ दादा यादव, | १ विनायक बाजीराव, | १ बापू बल्लाळ, |
| १ नानाजी गंगाधर | १ खंडोजी बाजी, | १ रक्तवल्लभ, |
| १ गोपाळ गिरमाजी, | १ छितरमल कानगो, | १ त्रिंबक बाबूराव देशपांडे, चांदवड |
| १ बापू शामरावजी निस्बत कोठी | १ व्यंकाजी जिवाजी, | १ भगवंत दिनकर याचा पुत्र |
| १ लेखराज मुनशी, | १ व्यंकाजी शिवराज | १ बापूजी बल्लाळ, तोफखाना |
| १ सदाशिव प्रल्हाद, | १ काकाजी हरीहर, | १ रंगो भोजराज (विभूते) |
| १ रामदास बल्लाळ, | १ गणेश बाळाजी, | १ यशवंत माणकेश्वर, |
| १ बाळाजी त्रिंबक, | १ आनंदराव अप्पाजी, | १ भिवरावजी, |
| १ बाळाजी बाळकृष्ण, | १ गोपाळ बाबाजी, | १ अंबाजी गोविंद, |
| १ बापु नारायण शालिग्राम, | १ तात्या नांदुरकर, | १ बाळकृष्ण विठ्ठल, |
| १ भिकाजी पंत, | १ गंगाधर पंत, | १ कृष्णराव, |
| १ लक्ष्मण मल्हार खाशे व पुत्र, | १ धोंडो त्रिंबक, | १ बाळाजी कृष्ण, |
| १ शामराव पांडुरंग, | १ बापुजी हरी, | १ गोपाळ गोविंद, |
| १ विठ्ठल रामचंद्र, | १ रामरावजी, | १ बाळाजी शामराज, |
| २ गिरमाजी व्यंकटेश उभयतां बंधू, | १ त्रिंबक विश्वनाथ, | १ परशरामपंत, |
| १ बापुजी आनंदराव, | १ अप्पाजी मेघ:श्याम, | १ हैबतराव, |
| ३ मुकुंद जिवाजी, खुद व पुत्र, | १ कृष्णाजी माधवराव, | १ माधवराव करमलकर |
| १ पदमसी तिलोकसी सावकार, | १ गणेश नारायण, | २ अप्पाजीपंत व बंधू, |

| | | |
|---|---|---|
| १ आत्माराम जानकीदास, | १ नानाजी यादव, | १ लक्ष्मण होंगाडे गुमास्ते, |
| १ जर्नादन अप्पाजी कारकून, | १ खंडो येसाजी, | १ चिमणाजी निस्बत भ्राा. मावशीबाई, |
| १ कचेश्वर, | १ बालाजी रावजी, | १ बापू महाजन, |

(ह्याशिवाय आणखी नांवें होती; परंतु कागद जळाल्यानें नाइलाज)

**शिलेदार मंडळी**

| | |
|---|---|
| ३ यशवंतराव फणसे व कारकून | ५ चिमाजी बुळे, पुत्र, फडणीस, कारकूनसुद्धां |
| ३ हैबतराव बोराडे पुत्रासह | १ गोविंदराव पिंगळे |
| ५ चोंडीकर शिंदे मंडळी | १ पोखराजी बोराडे |
| ४ खंडोजी लांबहाते पुत्रासुद्धां | ४ अवचितराम मोरे पुत्रासुद्धां |
| १ सोमाजी लांभाते | १ नानाजी लांभाते |
| २ मोत्याजी कालगावडे व पुत्र | १ सदाशिव भेंदाड |

(वरीलप्रमाणें यादी जळाली असल्याने कांहीं नावें राहिली असणार.)
ह्या एकंदर वरील माहितीप्रमाणें मातोश्रींची सहृदयता दृग्गोचर होते.

**आधार ग्रंथ**

होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
सरकारी दप्तरांतील उतारे
दिवाण पळसीकर यांचें दप्तर



**प्रकरण २७ वें**

# सुभेदार तुकोजीराव होळकरांच्या स्वाऱ्या

## इ. स. १७६७ – १७८७

थोरले सुभेदारांनीं विजय संपादून राज्य कमाविले. या राज्याची जी सर्वतोपरी सुव्यवस्था लाविली गेली तिचे वर्णन आतापर्यंतच्या प्रकरणांत येऊन गेलेंच आहे. स्वराज्याचें उत्तम उदाहरण असाच हा काल होऊन गेला. म्हणून 'विजया' नंतर 'विनयकाल' असें नांव दिल्यास उचित होणार आहे. सर्व भरतखंडानें-हिंदु व मुसलमान यांनीं ज्या कालाची स्तुतिस्तोत्रे गाइली, मालकमसारख्या परस्थालाही ज्या कालाचें कौतुक वाटलें त्या कालाचे वर्णन आतापर्यंत आम्ही यथाशक्ती केलें आहे. राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें पाहतां हे वर्णन अंतर्व्यवस्थेचे आहे. राज्यव्यवस्थेच्या दृष्टीने पाहतां हे एकच अंग होय. त्याच व्यवस्थेचे दुसरें अंग बहिर्व्यवस्था होय. इंग्रजीत ही दोन्ही अंगे 'होम' आणि 'फारेन' पालिसी या नांवानें संबोधिली जातात. आपण अंतर्व्यवस्थाच पाहिली, आणि तिचे श्रेय सर्वस्वीं मातोश्रीसाहेबांसच आहे ह्यात संशय नाहीं.

आता बहिरंगाकडे वळावयाचे. होळकर हे पेशव्यांचे आश्रित होते. साहजिक पेशव्यांची जी 'फारेन पालिसी' तीच यांस अंगिकारणें प्राप्त होय आणि तसें पत्करल्यावर या पद्धतीच्या चांगल्या वाईट परिणामाबद्दल अगर स्वरूपाबद्दल होळकरांवर तादृश जबाबदारी पडत नाहीं. पेशव्यांच्या या कार्यात होळकरांवर येणारी जबाबदारी पार पाडण्याकरितां सुभेदार तुकोजीरावांची इसवी सन १७६७ पासून योजना झाली होती. ती जबाबदारी त्यांच्या अखेरच्या घटकेपर्यंत त्यांचे शिरावर होती. म्हणजे इ. स. १७६७ ते १७९७ एकूण तीस

वर्षे पेशव्यांनीं ज्या ज्या स्वाऱ्या केल्या आणि ज्यांत होळकरांस काम करण्यास त्यांनीं लाविलें त्यांत तुकोजीरावांनीं जें कार्य केलें तें या प्रकरणांत आपणास पाहवयाचें आहे. आपण वरती पाहिलेंच आहे कीं या सर्व स्वाऱ्यांत प्रमुख भाग पेशव्यांचा आणि दुय्यम भाग इतर सर्व सरदारांचा. त्याच मानानें यशापयशाची वाटणी अव्वल आणि दुय्यम याप्रमाणेंच व्हावयाची. इतके हे सारे विचार ध्यानीं बाळगूनच पुढील विवेचन विचारांत घ्यावयाचें आहे.

या प्रकरणाचा काळ इ. स. १७६७ पासून १७९७ असा धरला आहे. तरी त्यांचीं पाळेमुळें इ. स. १७६१ पर्यंत जाऊन पोहचतात. पानिपतानें मराठेशाहीची बाजू उघडी पाडली. त्यामुळें इ. स. १७०८ पासून ते १७६१ पर्यंत अर्ध शतकांत मराठ्यांनीं स्वराज्याचें व साम्राज्याचें जें कार्य केलें होतें तें सगळे उघडें पडलें, कर्तेसवर्ते पुरुष पानिपतांत पतन पावले. उघडी पडलेली बाजू पुन्हा सावरून धरण्याचें कार्य तरूण पिढीकडे आले. पानिपतानें हताश न होतां मराठ्यांनीं पुन्हा कंबर बांधली. घरचे कज्जे सांभाळून पुन्हा नव्या दमानें ते कामास लागले. या कामांत श्रीमंत थोरले माधवरावसाहेब व सुभेदार मल्हारराव होळकर हे अग्रगण्य होत. माधवरावसाहेबांनीं दक्षिण पत्करली आणि सुभेदारांनीं उत्तर हातीं धरली. इ. स. १७६१ पासून तो १७६६ च्या मध्यापर्यंत, म्हणजे आयुष्याच्या शेवटच्या घडीपर्यंत, ते उत्तरेत वणवण फिरत होते. त्या मुदतींत त्यांनीं मराठ्यांची घडी पुन्हा पूर्ववत् बसवून दिली. नाही म्हणावयास एका नवीन शत्रूबरोबर त्यास लढणें भाग झाले आणि त्यात त्यांस अपयश आलें आणि हे अपयश पहिलेंच तसे शेवटलें होय. हे शत्रू दुसरें कोणीही नसून कंपनी सरकार होत.

याप्रमाणें पुन्हा मराठ्यांचे वर्चस्व उत्तरेत स्थापून सुभेदार मल्हारराव कैलासवासी झाले. त्यांची कामगिरी अपुरीच राहिली. ती पुरी करण्याचें राघोबादादा पेशवे, सुभेदार मालेराव व दिवाण चंद्रचूड ह्यांनीं ठरवून प्रथम प्रत्येकजण आपआपल्या स्थानीं गेले. पुढें वर्षाचे आंतच सुभेदार मालेराव स्वर्गवासी झाले. फारसा घोळ न पडतां सुभेदारीचीं वस्त्रें तुकोजीरावांस मिळाली. साहजिकच वर्षापूर्वी राघोबादादा पेशवे, सुभेदार मालेराव व दिवाण चंद्रचूड या त्रिवर्गानें ठरविलेलें कार्य सुभेदार तुकोजीरावांवर येऊन पडले. म्हणजे उत्तरेंतील कामगिरी ह्यांचेचकडे आली हें सांगणें नकोच.

पुणें दरबारांतील चुलत्यापुतण्याचा वाद नमल्यावर पेशवे माधवरावसाहेब ह्यांचे हात आणि मन कार्यास मोकळे झाले. माधवरावांनीं दक्षिणेंतील काम आपल्या स्वत:च्या देखरेखीखालीं घेतलें आणि उत्तरेंतील कार्य होळकर आणि शिंदे हे पूर्वीचे माहितगार म्हणून यांजवर सोपवून त्यांचे संगतीं कानडे व बिनीवाले यांस नेमून दिलें. तथापि चौघांनीही पेशव्यांच्या हुकमतीखालीं काम करावयाचें असें ठरवून दिलें. सर्व उत्तरेचा मामला स्थळीं लावून द्यावयाचा हे कार्य या चौकडीकडे आलें. बिनीवाले व कानडे हे दक्षिणेंतून यावयाचे होते आणि होळकर शिंदे, यांचे गुंते मोकळे करावयाचे होते. इ. स. १७६७ त होळकरांची जप्ती सरकारी हुकूमानें उठली. पेशव्यांचें कर्ज फेडण्याबद्दल होळकर आणि शिंदे ह्यांचा

करार इसवी इ. स. १७६७ चे अखेरीस झाला. इ. स. १७६८ मध्यें होळकरांची 'मागील सालोसालची बाकी, खंडण्या, कर्जपट्टी, वगैरे माफ केली. याउपर तुम्हांकडे गुंता नाहीं.' हे सर्व कागद पेशवे रेकॉर्ड पुणें यातील उताऱ्यासह आम्ही सोबत जोडले आहेत. त्यावरून माधवरावसाहेबांची काम करण्याची शिताफी व माणसें जोडण्याची कला लक्षांत येईलच.

ही सर्व तयारी केल्यावर इ. स. १७६८ च्या आक्टोबरमध्यें पुण्याहून मराठी लष्कर निघाले.

(१) पुणें पेशवे दप्तर ता.२१-५-१७६७ (रोजकीर्द) कैलासवासी मल्हारजी होळकर यांजकडे सरंजाम महाल वगैरे होते त्याची जप्ती सरकारांत केली होती. त्यास पूर्ववत प्रमाणें तुकोजी होळकर यांजकडेन सरंजाम करार करून जप्ती मोकळी केली असे. तरी दखलगिरी न करणें म्हणोन महालवार व प्रांतवार पत्रें रवाना.

(२) पुणें पेशवे दप्तर ता. ११-१२-१७६७ इ.यादी करारनामा राजश्री तुकोजी होळकर व महादजी शिंदे यांनीं सरकारचें कर्ज श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे वारावयाबद्दल करार कार्तिक शुद्ध प्रतिपदेस करार.

रुपये ५००००००

तपशील

| होळकर यांजकडे रुपये | शिंदे यांजकडे रुपये |
|---|---|
| २५००००० | २५००००० |

करार यांसी हप्तेबंदी.

| | |
|---|---|
| १६५०००० | कार्तिक शुद्ध प्रतिपदेस. |
| १६५०००० | अश्विन शुद्ध दशमीस. |
| १७००००० | कार्तिक शुद्ध प्रतिपदा. |
| ५०००००० | |

सदरहू पन्नास लाख रुपये हप्तेबंदीप्रमाणें घ्यावे.

१ ऐवज कांहीं हिंदुस्थानांत व कांहीं वराता कराव्या. कांहीं ऐवज देशी देऊं त्यांची हुंडणावळ सरकारांतून द्यावी ऐवज मागील कर्जदारास देत जावा.

१ सरकारांतून कलम करार करून घ्यावे. वाटणी हिंदुस्थान येथील तह सेकडा बरहुकूम तह पेशजीचा तह आहे. तूर्त आठवणीनें लिहिला आहे, परंतु पेशजीचा तह प्रमाण रु. १०० तपशील.

| | |
|---|---|
| ३०-०-० | सरकार-स्वारी प्रधान २५, स्वारी दादा ५ |
| २३-५-० | होळकर |
| २३-५-० | शिंदे |
| २३-०-० | सरकारी फौज स्वारीस जाईल त्याची वाटणी. |
| १००-०-० | |

१ यांसी सरकारचे वाटणी फौज, पैका तेवीस रुपये सहा आणे. कार्तिक शुद्ध १ ता. आश्विन शुद्ध १० पर्यंत वाटणी येईल ते ऐवजांत घ्यावी. येणेंप्रमाणें एक साल मात्र ऐवजांत घ्यावी. पुढें पेशजीच्या कराराप्रमाणें चालावें. तीस रुपये सरकारचे आहेत ते सरकारांत द्यावे.

सदरहू लिहिल्याप्रमाणें राघोराम व बाजी नरसी सई करार छ. १९ रजब. मार्गशीर्षमास मुक्काम पुणें.

सिक्का होळकर सिक्का शिंदे

(३) पुणें पेशवे दप्तर ता. १२-५-१७६८ इ. यादी राजश्री तुकोजी होळकर सु।। समान सितेनमयावअल्लफ. मशारनिल्हे यांजकडे सरकारचा ऐवज. खेरीज बुंदी मागील सालसनाचा, खंडण्या, कर्जपट्टीची वगैरे बाकी ओढत आहे. सनसबा अखेर त्यास मल्हारजी होळकर यांचा काळ जाहला. सरदारी ओढगस्त जाहली. याजकरितां मागील फडशा करावा म्हणोन विनंती केली त्याजवरून मशारनिल्हे थोर सरदार व मल्हारजी होळकर मृत्यु पावले याजकरितां खेरीज बुंदी मागील सालोसालची बाकी खंडण्या कर्जपट्टी वगैरे येणे ते माफ केली असे. याउपर तुम्हांकडे गुंता नाही. बुंदीचा हिशेब सरकारांत द्यावा व पुढें देत जावा. येणेंप्रमाणें करार करून मशारनिल्हेचे नांवें सनद देणें. छ. २४ जिल्काद चैत्र शुद्ध मुक्काम पुणें.

दक्षिणेंतून जें लष्कर निघालें त्यास जानोजी भोसल्यांचें पारिपत्य करणें अवश्य होतें त्याकामांत चार-सहा महिने लोटले. इ. स. १७६९ त दक्षिणेत निर्वेध झाल्यावर कानडे, शिंदे व होळकर ह्यांस माधवरावसाहेबांनीं हिंदुस्थानांत रवाना केलें. त्यापूर्वी तिकडे होळकरांची फौज कामावर लागली होती. माधवसिंग निवर्तला होता त्याचे पुत्रास मातोश्रीसाहेबांनीं (अहिल्याबाईनीं) राज्यावर स्थापून तेथील बंदोबस्त केला होता. या वेळची उत्तर हिंदुस्थानची स्थिती अप्पाजी मैराळ यांनीं पेशव्यास कळविली आहे ती येणेंप्रमाणें- 'गंगाधर गोविंद सूपे कछोरकर बुणग्यांत होते. सडी फौज पुढें एक मजल होती. गौराचे गांव मेहरा वगैरे जाळले, लुटले त्यासी परस्परें गांवातून लढाया झाल्या. गुजराचे गांव प्यादे स्वार येऊन धूम करितात.' याच सुमारास जाट आणि सुजाउदौला एक झाले होते. शहर खराब. जाटांनीं जातेसमयीं निराशा जाणून लुटले. यास्तव लहानथोर रयतेची दिलवारी करून सत्वरीच कौल लाऊन महालांची ठाणीं बसवावी लागतात. आम्ही श्रमेंकरून स्थळें घेतो त्याचे कामकाज आमच्या हातें घेऊन लौकिकास अधिकोत्तर स्वामी वाढवितील. या प्रांतीं दर ठाणियास जाटाकडील वगैरे मवासे ठाणीं यांनीं मातब्बर जमाव व सरंजाम पोक्ता. त्याजकरितां तजवीजीनें कार्य करावें लागतें.

पानिपतानंतर मराठे व अब्दाली दोघेही दिल्लीच्या प्रकरणांतून निवृत्त झाल्याबरोबर रोहिले, जाट व वजीर सुजाउदौला यांची एका बाजूनें मराठ्यांस उडविण्यासंबंधीं आणि दुसरें बाजूनें आपापले वर्चस्व स्थापण्याची खटपट सुरू झाली. अशा स्थितींत मराठ्यांचा कार्यक्रम

एकविध राहणें शक्य वा इष्ट नव्हतें. पेशव्यांची आज्ञा तडक दिल्लीस जाऊन दिल्ली हस्तगत करावी. सरदारांनीं स्थानावर आल्यावर परिस्थिती अवलोकिली आणि त्यांनीं एकदम दिल्लीस न जातां बादशहा नजीबखान वगैरे निरनिराळ्या मंडळींशीं बोलणीं करून मग दिल्लीस जावें असें ठरविलें. तिघा सरदारांनीं तीन कार्यक्रम वाटून घेतले. कानडे बुंदेलखंडाकडे वळले, शिंदे उदेपुराकडे व होळकर बुंदीकोट्याकडे आपआपल्यापरी खंडणी वसूलाकडे ही मंडळी गुंतली होती. होळकरांचा सरदार खंडूजी अरगडे ता. ४-१२-१७६९ रोजीं लिहितो- 'बुंदी कोट्याचे प्रकरण बारा लक्षपर्यंत चुकणार आहे. पुढें जाटाचे मुलुखांत जाऊ. जाटाचे पारिपत्य केल्यास माधवसिंग पन्नास लाख व बादशहा पन्नास लाख इतके देण्यास तयार आहे. जाटानें आमचे तोंडावर दहावीस हजार फौज पाठविली आहे.' या जाटाचे पारिपत्य करण्यासाठीं सतराशें एकूणसत्तरचे अखेरीस सर्व फौजा निरनिराळ्या कामगिऱ्या आटपून चंबलवर एकत्र होऊन जाटाचे मुलूखांत शिरल्या. त्यांनीं नवलसिंगास गाठिलें. हा नवलसिंग जवाहीरमलचा भाचा होय. त्यांचे विरूद्ध त्याचा भाऊ रणजीतसिंग मराठ्यांस मिळाला. पूर्वीची चुरस तर खरीच पण हे निमित्य लढाईस पुरें झाले. जाटाचा मोड झाला. फौज लुटली गेली. ही लढाई इ. स. १७७० ता. ५ एप्रिल रोजीं गोवर्धन येथें झाली. नवलसिंगाकडे मिस्टर सुमरू व फ्रेंच जनरल माडेल हे युरोपियन अंमलदार होते. त्यांचा सुभेदार तुकोजीराव होळकरांनीं पराभव केला. याप्रमाणें जाटांचा मोड केल्यावर ठिकठिकाणीं ठाणीं बसवून मराठी फौजांनीं पुढें चाल केली आणि आगरा काबीज करून मराठ्यांच्या फौजा यमुना उतरून पावसाळ्यांत अंतरवेदींत छावणी करून राहिल्या. तेथें नजीबखान त्यांस येऊन भेटला. त्यांच्याशीं धोरण कसें धरावें याबद्दल सरदारांत दुमत झाले. शेवटीं पेशव्यांचे विचारें ठरलें कीं 'नजीबाशीं कायमची दोस्ती करूं नये, दिल्लीच्या मसलतींत त्याचा शक्य तितका उपयोग करून घ्यावा आणि मागाहून त्यास जेर करावें.' यावर नजीबनें पानिपतापूर्वी दुआबांतील जितका प्रदेश मराठ्यांचे ताब्यांत होता तेवढ्याच्या सनदा शहाजाद्याकडून आणवून मराठ्यांस दिल्या आणि मराठ्यांच्या छावणींत त्यांचे आणि त्याच्या पुत्राचे जाणेंयेणें निर्धास्त होऊ लागलें.

मराठ्यांच्या या व पूर्वीच्या विजयानें उत्तर हिंदुस्थानात वर्चस्व वाढू लागलें. कंपनी सरकारच्या पोटांत त्यामुळें धास्ती वाटूं लागली. बादशहास आशा वाटून त्यानें इंग्रजांकडे निकडीचें बोलणें सुरू केले. इकडे मराठेही बेसावध नव्हते. त्यांच्या प्रयत्नानें बादशहाचा वकील मराठ्यांचे छावणीत येऊन बादशहाबद्दल रदबदली करीत होता. तिकडे दक्षिणेंतून पेशव्यांनी सरदाराबरोबर नजराणा पाठवून कंपनी सरकारास आपला स्नेहसंबंध दर्शविला. अशा तऱ्हेनें मराठ्यांनीं एका बाजूस जाट इत्यादि उत्तरस्थ राजेरजवाड्यांस नरम केलें. कंपनी सरकारास स्नेहसंबंध दाखवून तटस्थ केलें. दिल्लीच्या बादशहाकडे अनुसंधान बांधून आपली शक्ती व युक्ती त्यास पटवून दिली आणि रोहिल्यांसही एकटेच करून सोडलें.

रोहिल्यास नरम करण्यासाठीं मराठी फौजा अंतरवेदींत गेल्या. बंगशकडे पानिपतपूर्वी

असलेले साडेसोळा प्रगणे मराठ्यांनीं मागितले. बंगश लढाईला उभा राहिला. मराठ्यांची छावणी गंगेच्या काठीं रामघाट येथें होती. नद्यांना पूर सपाटून आला होता. बाजूचा मुलूख शत्रूचा होता. सूजा व इंग्रज टपलेलेच होते. अशा स्थितींत मराठ्यांनीं युक्तीने यमुनेअलीकडे आपलें लष्कर हालविलें. नजीबखान मरण पावला. नद्यांचें पाणी ओसरले आणि मराठ्यांना कूच करणें सुलभ झाले. बंगशची फौज समोरासमोर आली. झटापटी तीन-चार महिने चालू होत्या. दरएक प्रसंगीं मुसलमानांचाच पाडाव होत गेला. ता. १५-१२-१७७० रोजीं मराठ्यांनीं इटाव्याचा किल्ला हस्तगत करून फरकाबादेवर चाल केली. तेव्हां बंगश शरण आला आणि त्याने मराठ्यांच्या सर्व अटी कबूल केल्या आणि तोही पुढें थोड्याच दिवसांनीं मरण पावला.

याप्रमाणें जाट व रोहिले नामोहरम झाले. नजीबुदौल व बंगश मृत्यु पावले. कंपनी सरकार तटस्थ राहिलें आणि मराठ्यांसमोर उभें राहण्यास कोणीही राहिला नाही. साहजिक दिल्लीच्या बादशहास एकच मार्ग राहिला आणि तो त्यानें स्वीकारला. पण तो बादशहा कच्च्या दिलाचा होता. तेव्हां मराठ्यांनीं इ. स. १७७१ च्या फेब्रुवारीत दुसराच इसम तख्तावर स्थापण्याचा धाक घातला. ता. १० रोजीं बेगमेनें मराठ्यांचे ताब्यांत किल्ला देण्याचें नाकारलें तेव्हां तोफा चालवून किल्ला हस्तगत केला. शहर व किल्ला हस्तगत करून अंमल बसविला. ता. १२ एप्रिल रोजीं मराठ्यांचा व बादशहाचा करार झाला आणि त्याप्रमाणें ता. १ एप्रिल रोजीं बादशहा अलाहाबादेहून निघाला आणि ता. २५ डिसेंबर रोजीं मोठ्या समारंभानें दिल्लीत येऊन त्यानें सिंहासनारोहण केलें.

येणेंप्रमाणें माधवराव पेशव्यांचा हेतू सिद्धीस गेला आणि सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचा दबाव बसला. यावेळीं दिल्लीत नवी सृष्टी बनली. ह्यावेळीं माधवराव पेशवे लिहितात, ''सर्व गोष्टींची गोष्ट सरकारची फौज खराब झाली. त्याप्रमाणें पैका व मुलूख तो साधलाच पाहिजे. प्रयाग व काशीचे मतलब होऊन यावे ते तुम्ही करून घेतलेच असतील. त्यापक्षीं राज्याच्या बंदोबस्ताचा हवाला तुम्हांकडे लागला. तेव्हां फौजेची उस्तवारी कर्जपरिहार करणें तुम्हांस अगाध नाही. सरकारांत खजाना पाठवून द्याल ऐसें दिसतें व तुम्ही या तरतूदी साधणेंत असालच. कसकसें योजिलें तें लिहून पाठविणें.''

माधवरावांनीं जो हेतू मनीं धरला होता तो आम्ही वरती नमूद केलाच आहे. पानिपतनें उत्तर हिंदुस्थानांत प्रत्यक्षपणें आणि दक्षिणेत अप्रत्यक्षपणें मराठी साम्राज्याची घडी विस्कळीत केली होती, ती घडी पुन्हा नीट बसवून हिंदुपदपादशाहीची स्थापना अखिल भरतखंडांत करावयाची हा त्यांचा संकल्प. दिल्लीच्या तख्तावर पादशहास आणून बसविला म्हणजे इ. स. १७७१ मध्यें त्यांचा संकल्प सिद्धीस गेला असें म्हणण्यास हरकत नाही. तथापि आपला दबाव कायम बसावा असें उत्तरेतील सरदरांस वाटणें साहजिक होते. रोहिले अगदींच स्तब्ध झालेले नव्हते. इ. स. १७७२ त मराठे रोहिल्यावर चालून गेले. शिंद्यांचे तोफांचा मारा अजब झाला. मराठ्यांनीं तो प्रांत सर्व हस्तगत केला. फत्तरगड येथें पानिपतावरून

नेलेली मराठ्यांची अपार संपत्ती होती ती मराठ्यांनीं संपादिली. याप्रमाणें इ. स. १७७२ त सर्व रोहिलखंडांत आपला अंमल बसवून मराठी फौजा छावणीसाठीं दिल्लीस परतल्या. मराठे मंडळांत फूट पाडण्याचा सुजा व इंग्रज ह्यांचा प्रयत्न सारखा चालूच होता. बादशहाच्या मिरबक्षीगिरीबद्दल होळकर आणि शिंद्यांत मतभेद झाला. यामुळें मराठी सरदारांत दोन पक्ष दिसूं लागले. कानडे दक्षिणेंत निघून गेले. मोंगल फौजेस बादशहानें मराठ्यांवर हल्ला करण्यास उत्तेजन दिलें. होळकर व बिनीवाले ह्यांच्या फौजांवर बादशाही पंधरा हजार फौज चालून गेली. मराठ्यांनीं त्यांचा पराभव केला. तेव्हां बादशहाने १७७२ च्या डिसेंबरांत मराठ्यांशी तह केला. इ. स. १७७३ च्या प्रारंभास रोहिले पुन: उठले. सुजा व इंग्रज ह्यांची त्यांस मदत होती. माधवरावांचा मृत्यु ह्यापूर्वी घडून आला असल्यानें मदतीची अपेक्षा न राहिल्यानें इ. स. १७७३ चे जून महिन्यांत होळकर व बिनीवाले यांनीं रोहिलेखंड सोडला. नारायणराव पेशव्याच्या खुनानंतर बिनीवाले दक्षिणेंत गेले. बारभाईला आपला घरचाच संसार सांभाळतां सांभाळतां नाकीं नऊ आले. याप्रमाणें इ. स. १७६८ त हातीं घेतलेले कार्य स. १७७३ पर्यंत येऊन ठेपलें. पुढें बारभाई, राघोबादादा आणि इंग्रज ह्यांच्या कारभारांत दहा वर्षे गेली. त्यामुळें उत्तर हिंदुस्थानांत लक्ष घालण्याचें सरकारास आणि सरदारांस कोणासच जमलें नाहीं.

आम्हांस होळकरशाहीचाच इतिहास पाहण्याचे मुख्य कर्तव्य असल्यामुळें ज्या गोष्टीचा संबंध प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष होळकरशाहीच्या घटनेवर परिणामकारक झाला असेल त्याच नमूद करणें आहे. तेव्हां सुभेदार तुकोजीरावांचा उत्तर हिंदुस्थानातील ह्या पांच वर्षाच्या कारकीर्दीत जो कांहीं भाग दिसला तो वर नमूद केला आहे.

ह्या पांच वर्षाच्या मोहिमेत मराठ्यांचा जाटांवर, रोहिल्यांवर व प्रत्यक्ष दिल्लीपतीवर शह बसला. कामकाज करीत असतां मतभेद हे होतेच. तथापि श्रीमंत पेशव्यांनीं सर्वांस सांभाळून घेतल्यामुळें मराठ्यांस विजय प्राप्त होऊन दिल्लीवर भगवा झेंडा स. १७७१ त फडकला. प्रत्यक्ष थोरले माधवरावांनीं ही गोष्ट पाहिली नाहीं तरी ऐकिली खास. या मोहिमेत सुभेदार तुकोजीरावांनीं रोहिल्यांची फौज फोडून मोडून फस्त केली. खुद सेनानायक अहमदखानास पकडून कैद केलें. सर्व मुरादाबाद जिल्हा ताब्यांत घेतला. ह्या वेळीं सुजाउदौला व इंग्रज विरुद्ध बाजूस सज्ज होतेच. त्यांनीं बिनीवाले व होळकर एक होऊं नयेत म्हणून खटपट चालविली. एवढ्यांत पेशवे माधवरावांच्या मृत्युची बातमी येऊन पोहचली. एकंदर स्थितीचा विचार करून सुभेदार तुकोजीराव मुरादेबादेंतून निघून दिल्लीस आले. नंतर नवलसिंग याच्याशीं होळकरांची लढाई भरतपूर व डिग ह्यांच्यामध्यें होऊन जाटांचा पूर्ण पराभव झाला. या युद्धांत खुद्द तुकोजीराव हजर होते. लढाई होळकरांनीं मारली. तिन्ही लष्करांची लूट एकत्र करून जबरदस्तीनें बरहुकूम हिस्सा वाटून दिला. फौज माघारा फिरोन जाटांपासून खंडणी वसूल करून सुभेदार इसवी इ. स. १७७३ त इंदुरास आले. या स्वारीस फत्तरगडची स्वारी असे म्हणतात.

माधवरावांच्या मृत्युचे परिणाम उत्तर दक्षिणेंत पसरले. उत्तरेची मोहीम रंगांत आली होती. सुजा व इंग्रज यांचे डाव अजून चालू होते. इतरत्र विजयी झाल्यामुळें मराठ्यांस नवीन उमेद चढली होती. अशा वेळीं त्यांस दक्षिणेंत येणेंचा हुकूम झाला. उत्तरेचें प्रकरण जें येथें थबकलें तें आठ दहा वर्षेपर्यंत अगदीं स्तब्ध राहिलें.

हैदरखानाच्या मनावर जो मराठ्यांच्या दरारा होता तो माधवरावांच्या मृत्युमुळें नाहीसा होऊन, मागच्या स्वारीत (म्हणजे तिसरें स्वारींत) झालेल्या नुकसानीचा वचपा काढण्यासाठीं लढाईची तयारी तो झपाट्यानें करू लागला. तेव्हां पेशव्यांसही स्वारी करण्याची तयारी करावी लागली. राघोबांनीं हैदराची याचना केलेली होती. तेव्हां हैदरास समूळ उखडावा म्हणून पेशव्यांनीं फौजेची तयारी मोठ्या प्रमाणावर चालविली. हिंदुस्थानच्या फौजेस जरूरीचीं पत्रें गेलीं. ही फौज परत बोलविल्यानें अंतरवेद, रोहिलेखंड. आगरा, दिल्ली, मथुरा व कनोज येथील आपला दबाव सैल होतो, काशी व प्रयाग या क्षेत्रांबद्दल बादशहापासून मिळविलेल्या सनदा व्यर्थ होतात, हे त्या गर्दीच्या वेळीं तरुण पेशव्यांच्या लक्षांत आलें नसणार.

थोड्यांच अवधींत नारायणराव पेशव्यांचा खून झाला. राघोबादादा गादीवर बसतात न बसतात तोंच बारभाईचें कारस्थान उभें राहिलें. सवाई माधवरावांचा जन्मही होऊन त्यांचे नांवें द्वाही फिरली. दादासाहेबांचा पाठलाग करण्यांत बारभाई गुंतले.

फडके हे दादासाहेबांच्या पाठीस लागले. फडक्यांच्या पुढें आपला टिकाव लागणार नाही असें पाहून दादासाहेब शिंदे-होळकरांकडे जावे या हेतूने नर्मदा उतरूं लागले. त्यांच्या बरोबरची बरीचशीं फौज फुटून गेली. दादासाहेब कसेबसे इंदुरास येऊन पोहोचले. सुभेदार तुकोजीराव यावेळीं रोहिलेखंडाच्या स्वारीहून परतून इंदुरास राहिले होते. ते तीन कोस सामोरें येऊन त्यांस मोठ्या आदरानें शहरांत घेऊन गेले. येथपासून सुभेदार तुकोजीराव दक्षिणेच्या कारभारांत जे गुरफटले गेले ते आठ दहा वर्षे तिकडेच गुंतले. तो प्रकार आतां येथें वर्णावयाचा आहे.

सुभेदार तुकोजीराव होळकर व महादजी शिंदे ह्यांस थोरल्या माधवराव पेशव्यांनीं सरदाऱ्या दिल्या होत्या. दादासाहेब याविरुद्ध होते. असा हा मागचा इतिहास असता साहजिक अपेक्षा होती कीं हे उभयतां सरदार दादासाहेबांविरुद्ध बारभाईस मिळावे आणि त्याप्रमाणेंच दोन्ही पक्षांकडून (म्हणजे या सरदारांकडून व पुणें दरबाराकडून) एकमेकांकडेस पत्रव्यवहार सुरू झाला. दादासाहेबही काळवेळ पाहून उभयतां सरदारांची कुमक मागूं लागले. उभयतां सरदारांत यावेळीं एकमत होते ही गोष्ट आरंभीं तरी दिसते. दादासाहेब आणि त्यांचे मागोमाग फडके असे युद्ध करीत नर्मदेकडे आले. त्यावेळीं फडक्यांस सरदारांकडून पत्र गेलें कीं, ''श्रीमंत येथें आले आहेत. तुम्ही नर्मदा उतरून इकडे आल्यास आमचा मुलूख खराब होईल व श्रीमंतांसही भय उत्पन्न होऊन ते भलतीकडे जातील. याकरितां तुम्ही आहात तेथेंच असावे. आम्ही लौकरच श्रीमंतांची समजूत करून त्यांस देशीं घेऊन येतों.'' शिंद्यांच्या

म्हणण्याप्रमाणें फडक्यांनीं दादासाहेबांकडे सात लाख रुपये श्रीमंतांचे लष्करी कर्ज म्हणून पाठवून दिले. ते रुपये हातीं पडताच शिंदे-होळकरांशीं कुरापत काढून दादासाहेब भोपाळच्या रोखें कूच करून चालले. शिंद्यांनीं निग्रह करितांच दादासाहेब खाली वळले. तेव्हां दादासाहेबांचा बंदोबस्त करण्यासाठीं वाटाघाटी व्हाव्या म्हणून उभयतां सरदारांनीं आपले वकील पुरंदरास पाठविले. पुणें दरबारनें शिंदे-होळकरांस या गोष्टींत पूर्ण अखत्यार देऊन त्यांच्या ज्या खासगी मागण्या होत्या त्याही पुणें दरबारानें मान्य केल्या.

येथेंही दादासाहेबांनीं आपली धरसोड चालविली. पुणें दरबारचा शिंदे-होळकरांनीं घडवून आणलेला हा तह त्यांनीं चकविला आणि पुन्हा पळवाट काढली. त्यांच्यामागें शिंदे-होळकर, पटवर्धन, फडके हे लागले. ही पळापळ नर्मदेपर्यंत चालली. इतक्यांत मुंबईच्या इंग्रजांनीं साष्टीस वेढा घातल्याची खबर या सरदार मंडळीस लागली. तेव्हां पाठलागाचे काम फडक्यांवर सोपविलें.

दादासाहेबांनीं आतां अगदी निराळाच मार्ग काढला. सूरत व भडोच येथील इंग्रजांच्या आश्रयास जाण्याकरितां व गोविंदराव गायकवाडाचे साहाय्य मिळविण्याकरितां दादासाहेबांनीं इ. स. १७७५ च्या प्रारंभीं गुजराथेकडे पळ काढिला. या वेळीं गोविंदराव गायकवाडाचे बंधू फत्तेसिंग फडक्यांस सामील झाले. शिंदे-होळकर फडक्यांच्या लष्करांत राहून दादासाहेबांकडे पत्रें, निरोप पाठवीत होते. दोन्ही पक्षांची लढाई जुंपली. मही उतरून दोन्ही लष्करें तोफातोफीनें लढत होती. पण निष्पन्न कांहीं झालें नाहीं. दोन्ही पक्षांकडून तहाची बोलणीं चालूं झाली. पण कोणचेंही कलम कायमचें ठरेना. तेव्हां सरदारांनीं फडक्यांस कळविलें कीं आम्ही पुढाकार घेऊन लढाईस तोंड देतो. ता. १७-२-१७७५ रोजीं दादासाहेबांची आणि सर्व मराठी फौजेची मही नदीवर मोठी लढाई झाली. दादासाहेबांचा पूर्ण पराजय होऊन त्यांच्या तोफा, हत्ती निशाणें या दोन प्रमुख सरदारांचे हाती लागली. दादासाहेब खंबायतकडे पळाले. तेथील नबाब त्यांस आश्रय देईना. तेथील इंग्रजी अधिकाऱ्याने दादासाहेबांस सुरतेस पोहोचविलें. इंग्रज अधिकाऱ्यानें त्यांस आश्रय दिला आणि येथून इंग्रजांची व मराठ्यांची लढाई सुरू झाली.

मुंबईहून कर्नल किटिंग दादासाहेबांच्या मदतीस आला. ता. १८ मे रोजीं मही नदीवर नापारचे पुढें फडके आणि किटिंग ह्यांमध्यें निराकारची लढाई झाली. पावसाळ्यामुळें दादासाहेब आणि किटिंग यांची छावणी भडोचेस झाली आणि फडक्यांनीं खानदेशांत कोंडाईबारीजवळ छावणी केली.

ह्यावेळीं पुणें दरबारास होळकर-शिंद्यांची जरूरी विशेष भासूं लागली. बोलणें-चालणें होऊन असें ठरलें कीं, हिशेब दाखविण्याचें व सवाई माधवराव याची इमानपूर्वक मनापासून चाकरी करण्याचें शिंदे-होळकर ह्यांनीं कबूल केलें. पुणें दरबारने त्यांस पुण्यास आणण्याकरितां कारकून पाठवावे व त्या उभयतांनीं दसरा झालेवर देशीं निघून यावें.

साष्टी बेट इंग्रजांनीं स्वाधीन करून घेतलें होतें. गुजराथेत थोडीबहुत त्यांची सरशी

झाली होती. तथापि त्यांच्या या हालचालीस कलकत्तेकरांची संमती हवी होती ती त्यांस मिळाली नाही. कलकत्तेकरांनीं मुंबईकरांचा निषेध करून इ. स. १७७६ चे मार्चात पुरंधर येथें पुणें दरबाराशी तह केला. यामुळें दादासाहेबांस स्वस्थच राहावें लागले. याप्रमाणें थोडा वेळ तरी घरचा बंदोबस्त होऊन पुणें दरबारास थोडी बहुत विश्रांती मिळते न मिळते तोंच तोतयाचे बंड उभें राहिलें. पुणें दरबारनें कांहीं पायदळ व तोफा देऊन भिवराव पानशे यांस बंदोबस्तावर पाठविलें व शिंदे होळकरांस त्यांस कुमक करण्यास सांगितलें. शिंद्यांनीं सिंहगडाखाली तोतयाकडील अरबाची चौकी होती ती मोडून पुष्कळ अरब मारिले व बाकीचे उधळून लाविले. किल्लेदारास वठणीस आणण्याचें काम होळकरांवर सोपवून शिंदे बोरघाटाकडेस तोतयाचे मागें गेले.

पुणें दरबार चारी बाजूंनीं अडचणीत आहे असे पाहून, दक्षिणेतील निरनिराळ्या ठिकाणचे पुंड पाळेगार लोक यांनीं आपआपल्या प्रांतांत बंडाळी करण्यास प्रारंभ केला. सोलापूर प्रांतीं नरसो गोविंद हा एक बंडखोर उभा राहिला. त्याने पटवर्धनांचे करकंभ हें ठाणें ता. २५ मे इ. स. १७७७ रोजीं शिड्या लावून घेतलें. त्यास शिक्षा करण्याचे काम तुकोजीराव यांजकडेस आले. ता. २३ जुलाई १७७७ रोजीं तुकोजीरावांनीं वेढा घालून ठाणें घेतलें. त्याचीं घोडीं, उंटें लुटून घेतली व तो पळून जात असतां पाठलाग करून त्यास कैद केलें.

पुरंधराच्या तहानें मुंबई सरकार फिकें पडलें. तरी पण त्यांनीं आपला हट्ट सोडला नाही. तहाच्या अटीविरुद्ध दादासाहेबांस त्यांनीं आपले जवळ ठेवून घेतलें. याचवेळीं फ्रेंचांचा वकील पुणें दरबारीं आला. दोन्ही पक्षांत साशंकवृत्ती उत्पन्न झाली आणि यांत मोरोबा दादाच्या कारस्थानाची भर पडली. मोरोबादादा हे नाना फडणीसाचे चुलत बंधू. नानांची सरशी त्यांस पाहवेना. तेव्हां पुणें दरबारांत दोन पक्ष उभे राहिले. फडके, पटवर्धन आणि शिंदे हे नानांकडे राहिले. मोरोबाने इंग्रज, दादासाहेब व हैदरअली यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू केला आणि नारो गणेश ह्यांचे मार्फत सुभेदार तुकोजीराव यांस आपणाकडेस ओढण्याचा प्रयत्न चालू केला. पण नानांच्या पक्षात शिंदे आहेत हें पाहून शिंद्यांचे मार्फतीनें नानांशी समेटाचे बोलणें लागलें. अडचण राहिली ती होळकरांच्या नवीन फौजेचा खर्च कोणी द्यावा. नानांनीं ती अडचण दूर केली. नानांची सरशी होऊन मोरोबास काराग्रहवास मिळाला. याप्रमाणें इ. स. १७७८ च्या एप्रिलांत पुणें दरबारांत नानांचे वर्चस्व शिंदे होळकरांच्या साहाय्यानें कायम झालें.

फ्रेंच वकिलाचा पुणें दरबारांत मानमरातब झाला खरा; पण इंग्रजांस दहशत बसावी हा हेतू बाजूस राहून परिणाम असा झाला कीं, मुंबईकर आणि कलकत्तेकर एक होऊन पुण्यावर मोहीम करण्याचे त्यांचें निश्चित झालें. इ. स. १७७८ च्या डिसेंबरांत कॅप्टन स्टुअर्ट बोरघाट चढून वर आला. त्याचा मुकाबला घेण्यास पुणें दरबारांकडून भिवराव पानश्यांची रवानगी झाली. घाटमाथ्यावर युद्ध सुरू झालें. तेव्हां स्टुअर्टच्या मदतीला सारे

इंग्रजी लष्कर घाट चढून वर आले. शिंदे, होळकर, फडके वानवडीस होते ते तळेगांवच्या रोखें आले. पानश्यांशी लढत लढत इंग्रजी लष्कर पुण्याकडे येत असतां खंडाळ्यास कर्नल के बाण लागून जखमी झाला व कार्ल्याचे मुक्कामीं तोफेचा गोळा लागून स्टुअर्ट ठार झाला. ता. ९ जानेवारी १७७९ रोजीं रात्रीं इंग्रजी लष्कर मुंबईस परत जाण्यास निघालें. तो मराठी फौजा चहूंकडून धावून येऊन त्याला बिलगल्या. त्या गर्दीत इंग्रजांचें बरेचशें सामान मराठ्यांकडे आलें. इंग्रजी फौज वडगांव गाठीपर्यंत उजाडलें. मराठ्यांनीं चोहोंकडून घेरल्यामुळें इंग्रजी सैन्यास वडगांवांत शिरावे लागले. लढाई जोराची झाली शेवटी मराठे घालतील त्या अटीवर तह करून सुटका करून घेणें इंग्रजांस प्राप्त झाले. या तहास वडगांवचा तह म्हणतात. या लढाईत सुभेदार तुकोजीराव आपल्या सहा हजार फौजेनिशीं व सर्व मुलांसह हजर होते. या लढाईत सुभेदारांचे पुतणे बापू होळकर यांनीं चांगली मर्दुमकी केली. तो प्रकार येणेंप्रमाणें : इंग्रज घाट चढून वर आल्यावर लढाई बरेच दिवस चालली होती. यावर श्रीमंतांकडून सुभेदारांस चिठ्ठी आली कीं आपण जातीने व ऐंशीं हजार फौज असतां एका पलटणाचे पारिपत्य होत नाही व फौज हवा खाऊन राहिली आहे; तेव्हां आम्हास जातीने येणें लागेल की काय? आपलें उत्तर आलें म्हणजे तसाच बेत करावयास येईल. ही चिठ्ठी वाचून सुभेदार विमनस्क होऊन डेऱ्यास आले आणि म्हणाले, ''उदईक मजला मरावयाचे.'' या भाषणानें बापू होळकर यांचे काळजास धक्का बसून त्या प्रसंगीं कांहीं एक उत्तर न करितां तेथोन बाहेर आल्यावर पागे, बारगीर, शिलेदार सरदार ह्यांस प्रसंगास उपयोगी तितक्याच्या पालोपाल हिंडून पदर पसरून पायावर डोके ठेवून मागणें मागितलें कीं आमचे मरणाचे सोबती व्हावयाचे असल्यास चौघडा अखेर झाल्यावर अमूक जागी घोडे न घेतां पादचारी ढाल तरवारीनिशीं त्या ठिकाणीं हजर व्हावे. ज्यांनीं रुकार दिला त्यांची नांवें यादीवर टिपून घेतली. असे अठराशें १८०० इसम सिद्ध झाले. सकाळीं एकत्र होऊन चाल केली. घाटाचे तोंडीं गेले तोंपर्यंत पलटणवाल्यांस ही खबर नव्हती. तोफेपासून गोळीच्या पल्ल्यावर बिकट पहारे होते. त्यांनीं चाहूल ऐकतांच झडपून पहारे कापून टाकिले. तेथून हजार बाराशें बंदुकीचा एकदाच ताशेरा दिला. तरवारीनिशीं हल्ला सुरू केला. शत्रूनीही गोळे मारण्यास कमी केले नाही. अखेरीस १८०० पैकीं ६०० राहिले. त्यांनीं तरवार करून, पलटण दरोबस्त बुडवून चारी तोफा घेऊन अडीचशें माणूस परतून आलें. चोवीस पालखीनवीस व तेरा हत्तीनवीस कामास आले. याशिवाय पागे बारगीर यांची संख्या नाहीं. मेले, गेले, राहिले, तितक्यांचे घरोघर जातीनें सुभेदार हिंडोन सर्वांची दिलजमाई केली व श्रीमंतांस पत्र लिहिलें कीं आज्ञेप्रमाणें पलटण कापून काढिली, यावर तह झाला हें वरती आलेंच आहे.

सुभेदार पुण्यास आले, श्रीमंत जातीनें तीन कोस सामोरे आले. भेटीचे समयीं श्रीमंतांकडील व सुभेदारांकडील तोफखाना सुरू जाला. शनिवारवाड्यांत स्वारी आली. नाना फडणीस यांनीं शिरेदरबार भरवून चार सुभेदारांचे स्तुतिस्तोत्र केलें. सुभेदारांनीं एकच

उत्तर केलें कीं 'चाकरी चाकरांनीं केली, त्यांचा बडीवार इतका कशास पाहिजे!' इतकें बोलून विडे घेऊन मुजरा करून निघणार तों आज्ञा झाली कीं बापू होळकरांस भेटीस पाठवावें. मी येईन तेव्हां बरोबर घेऊन येईन, असें सुभेदार म्हणाले. मग दो-चौ दिवसांनीं सुभेदार पुन्हा भेटीस गेले. बरोबर बापूही गेले. तेथें गेल्यावर सुभेदारांच्या पाठीमागें दोघे खिजमतगार होते त्यांत आपण उभे राहिले. नानांनीं सुभेदारांस विचारलें कीं 'बापू कोठें आहेत?' तेव्हां बापूंनीं हात जोडून विनंती केली की मी हा हजर आहे. नाना म्हणाले 'पराक्रम तो ऐकला, आचार हा पाहिला!' सरकारांची स्वारी होळकरांच्या पराक्रमानें प्रसन्न होऊन जी देणगी दिली तिचा सवाई माधवरावसाहेब पेशवे ह्यांच्या रोजनिशीवरून खालील उतारा दिला आहे.

१ परगणे रावेर प्रांत खानदेश येथील आकार रु.१९४०१६ पैकीं पेशजी मशारनिल्हेकडेस ९७००० आहेत व सरकारांत अंमल होता तोही दिला. आकार रु. ९७०१६

१ परगणे कोंच जमेचा आकार रु. २७५३३६

एकूण आकार रु. ४,६९,३५२ चे महाल तुकोजी होळकर यांचे दुमाला करून देण्याबद्दल नारो कृष्ण सुभा प्रांत यांचे नांवें पत्र. सनद तुकोजीरावांचे नांवें.

बापूच्या या पराक्रमानें होळकरांची दौलत तर वाढलीच, पण दुसरा मोठा लाभ झाला तो हा कीं, या वेळेपासून नानांच्या मनांतील होळकरांविषयींचा संशय दूर होऊन पूर्णपणें मिलाफ झाला.

वडगांवच्या तहाप्रमाणें दादासाहेब पुणें दरबारच्या स्वाधीन झाले. त्यांनीं झांशी येथें रहावें असे ठरून त्यांच्याबरोबर शिंदे-होळकरांची व थोडी पेशव्यांची अशी पांच हजार फौज सोबत दिली होती. बऱ्हाणपुरापर्यंत ह्या स्वाऱ्या पोंहचल्या. शिंद्याकडील हरी बाबाजी हा सरदार होता आणि होळकरांकडील जीवनराव पागनीस हा सरदार होता. मार्गांत हरी बाबाजीचा जांच फार होऊ लागला. श्रीमंताच्या फौजेनें त्याच्या गोटावर हल्ला केला व हरी बाबाजी जखमी झाले, ही संधी पाहून दादासाहेबांनीं जी झुकांडी मारली ती सुरतेस जाऊन इंग्रजांचा आश्रय धरला. या वेळीं कलकत्तेकरांकडून गोडार्ड हा सेनापती आलेला होता. त्यानें पुणें दरबाराशीं तहाचें बोलणें लावलें. एवढ्यांत तेथें दादासाहेब गेल्याचें पुणें दरबारास कळलें. 'साष्टीचा टापू व दादासाहेब यांस आधीं हवाली केल्याशिवाय आम्ही तहाचें बोलणें बोलत नाहीं,' असें पुणें दरबारांने कळविलें. तेव्हां इंग्रजांस लढाईशिवाय गत्यंतर राहिले नाही. इ. स. १७८० च्या प्रारंभीं त्यांनीं दभाईवर चाल केली. तेव्हां मराठे यांसही युद्धास उभें राहावें लागलें. या युद्धास दुसरें मराठी युद्ध असें म्हणतात.

शिंद्यांच्या हयगईमुळे दादासाहेब निसटले असें सांगून नानांनीं शिंद्यांवरच या युद्धाची जोखीम टाकली. त्यांच्याबरोबर सुभेदार तुकोजी होळकरांसही जाणेची आज्ञा झाली. इ. स. १७८० च्या ता. १५ जानेवारीला अहमदाबादेवर युद्ध झालें. या युद्धांत इंग्रजांस विशेष फायदा झालेला नाहीं. गोडार्डने कांहीं सैन्य हार्टले याजबरोबर देऊन कोंकण सर

करण्याकरितां त्यास पाठविले. एवढ्यांत पावसाळा सुरू झाला.

पावसाळ्यानंतर हार्टलेनें मुंबई सरकारच्या साहाय्यानें कल्याणचें ठाणें घेऊन बोरघाटापर्यंत चौक्या बसविल्या. त्या चौक्या उठवण्यासाठीं व कल्याण परत घेण्यासाठीं नानांनीं बाजीपंत अण्णा यांजबरोबर फौज पाठविली. प्रथम बाजीपंतांस यश आलें आणि कल्याण घेण्यासाठीं ते तयारींत असता हार्टले आला. ता. २४ मे इ. स. १७८० रोजीं बाजीपंतास परत जावें लागलें. आतां युद्धास चारी बाजूंनीं तोंड लागले. ता. ११ डिसेंबर रोजीं गोडार्डने वसई काबीज केली. ता. १२ डिसेंबर रोजीं रामचंद्र गणेश मारले जाऊन मराठी फौज मागें हटली. जी पुढें लढाई झाली तीस बोरघाटची लढाई असें नांव आहे. जनरल गोडार्ड याची इच्छा बंदर किनाऱ्यावर ठाणीं घेण्याची, असा तर्क मराठी सैन्यानें (सरदारांनीं) केला होता. इतकी फौज तोंडावर असतां तिला न जुमानतां इंग्रज पुण्यावर चालून येतील असें कोणासही वाटलें नव्हतें. परंतु ही अत्यंत धाडसाची मसलत करून पाहण्याचें जनरल गोडार्डनें मनांत आणिले आणि तीस अनुसरून, मराठी फौजा वारंवार अडवीत असतांही त्यांस मागे हटवीत बोरघाटाच्या पायथ्यापर्यंत त्यानें चाल केली. इंग्रजांस तोंड देण्यासाठी नानांनीं बोलविल्यावरून परशराम भाऊ कर्नाटकातून व सुभेदार तुकोजीराव होळकर खानदेशांतून आले. ता. २९ जानेवारी १७८१ रोजीं श्रीमंतांच्या व होळकरांच्या दरबारी भेटी झाल्या. श्रीमंतांनीं सुभेदारांस आपली तिरंदाजी दाखविली आणि नंतर कुस्तीही दाखविली. श्रीमंतांनीं होळकरांस वस्त्रें देऊन निरोप दिला.

हरीपंत व बाजीपंत ह्यांस न जुमानतां इंग्रज घाटाच्या सुमारें येतात असें पाहतांच नानांनीं तुकोजी होळकर ह्यांची रवानगी घाटाखालीं केली. थोड्या अवधींत हरीपंत तात्या, बाजीपंत अण्णा व होळकर या सर्वांची मिळून चौपट फौज असतां त्यांस धुडकावून लावून जनरल गोडार्ड बोरघाट चढून ता. १० फेब्रुवारी इ. स. १७८१ रोजीं वर आला. नानांच्या पत्रास उत्तर देताना पंतांनीं व होळकरांनीं आपली चूक प्रांजळपणें कबूल केली.

घाटाच्या माथ्यावर खंडाळे येथें इंग्रजी सैन्याचा मुक्काम झाला. त्यांच्या तोंडावर कार्ले येथें पंत व सुभेदार राहिले. त्यांनीं रोज इंग्रजांच्या छावणीवर तोफा मारण्याचा क्रम चालविला होता. कांहीं काळानें परशराम भाऊही त्यांस येऊन मिळाले. सर्व टेहळणी करून या त्रिवर्गाने ठरविलें कीं घाटाखालून इंग्रजांस रसद वगैरे रोज पोंहचत असे ती बंद झाली पाहिजे. असें ठरल्यावर हे काम भाऊंनीं पत्करलें. त्याप्रमाणें घाटाखालीं भाऊ मालवडी येथें जाऊन पोहचले. त्यांच्या फौजेच्या टोळ्या कल्याण पनवेलपर्यंत हिंडूं लागल्या. ता. १६ मार्च रोजीं दोन्ही फौजेची गांठ चौक गांवीं पडून लढाई झाली. कप्तान म्याके याचे पारिपत्य झालें. ता. २९ मार्च रोजीं चार हजार बैल हिसकाऊन घेतले. म्याके आणि ब्राऊन यांचा पराभव झाल्यानें पुन: रसद आणावयास घाटाखालीं जाण्यास कोणी इंग्रज धजेना. तेव्हां स्वत: गोडार्ड पनवेलीस जाणार अशी नानास बातमी लागली. तेव्हां भाऊचे मदतीसाठीं सुभेदार होळकर एप्रिलांत तिकडे गेले.

ता. १२ एप्रिल रोजीं इंग्रजी फौजेनें पनवेलीहून मुक्काम हलवून ती बारवई येथें आली. दुसरें दिवशीं इंग्रजांची रसद चौक गांवापुढें एक कोसावर येऊन उतरली. आघाडीस पटवर्धन व पिछाडीस होळकर याप्रमाणें चिकाटी वासून वाटभर लढाई होत होती. आघाडीची जागा अडचणीची म्हणून पटवर्धनाच्या हातें कांहीं विशेषसें झालें नाहीं. पण पिछाडीस होळकर होते त्यांनीं एकदोन वेळां चांगलीच हुल्लड उठविली.

याप्रमाणें रसद बंद तर झालीच. गोडार्ड यांस वाटल्याप्रमाणें पुणें दरबार घाबरला नाहीं. याप्रमाणें दोन्हीकडून घसरल्यामुळें गोडार्डने आपला मोर्चा फिरविला. ता. २१ एप्रिल रोजीं पटवर्धन व होळकर आघाडीवर हल्ले करीत होते. हरीपंताने पिछाडीवर तोफा चालविल्या. त्या झटापटींत दोन्ही पक्षांचे लोक बहुत जाया झाले. चौक येथें ता. २३ एप्रिल रोजीं मोठे स्वरूप प्राप्त झाले. प्रथम होळकर व पटवर्धन यांनीं प्रारंभ केला. त्यांतच गारदी व रोहिले व पायउतार झालेले बंदूकस्वार मिसळले. त्यांनीं बंदुकांचा मारा केला. मागून हुजूरातीचे लोकही लढाईंत सामील झाले. तोफांचा भडिमार सुरूच होता. याप्रमाणें चौकपासून बारवईपावेतों तीन कोस लढाई होत होती. लढत लढत इंग्रजी सैन्य पनवेलीस येऊन तेथून मुंबईस गेले. या तीन दिवसांचे लढाईत मराठ्यांची माणसें गेलीं. पण इंग्रजांचीं माणसें व सामानसुमान तर गेलेंच; पण गोडार्ड ज्या उमेदीनें आला होता तो अपेश घेऊन त्यास मुंबईस माघारें जावें लागलें.

मुंबईस गेल्यावर गोडार्डनें नानांकडे तहाचें संधान लावलें. मद्रासकरांचें तेंच मत पडलें. उत्तर हिंदुस्थानांत शिंद्यांनीं म्यूरचा पराभव केल्यामुळें तिकडूनही शरणागत्वाची चिठ्ठी आली. शेवटीं इ. स. १७८२ च्या ता. १७ मे रोजीं पुणें दरबार व इंग्रज सरकार ह्यांच्यामध्यें शिंद्यांचे मध्यस्थीने सालवीचा तह घडून आला. या तहामुळें दोन गोष्टी घडून आल्या.

१ शिंदे पुढें सरसावले.

२ युरोपियन अंमलदार ठेवून नवीन कवायती फौज तयार करण्यास त्यांनीं प्रारंभ केला. होळकरांनीं अनुकरण केलें.

सन १७८३ सालीं ता. १० फेब्रुवारी रोजीं श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचा विवाह मोठ्या थाटानें झाला. मातोश्रीसाहेबांस आमंत्रण गेलें होतें. त्यावर त्या बोलल्या, ''माझ्या चितांत लग्नात येण्याचें होतेंच. परंतु पूर्व सूचना असती तर खामखां येणें न होतें. तेथें गेल्यानें माझींही कामें फार होतीं. परंतु दिवस थोडे राहिले. असो. मुख्य गोष्ट श्रीमंतांचें लग्न शुभकार्य झालें, यात आम्हांस समाधान आहे. जेथें तुकोजीबाबा आहेत तेथें आम्हीच आहोंत.'' पुणें दरबारहून आलेला वस्त्रें बहुमान मातोश्रींनीं ''बहुत संतोषानें घेतला. विडे सर्वांस दिले.''

सालवीच्या तहानंतर इंग्रजांनीं दादासाहेबांस रुखसत दिलीं. दादासाहेबांचा विचार गोदातीरीं राहावे असा होता. नानांनींही त्या अर्थी त्यांस पत्रें लिहिली होती. तरी पण श्रीमंत दादासाहेबांनीं परशराम भाऊ, हरीपंत फडके ह्यांच्यापासून पृथक पृथक इनामपत्रें

व बेलभंडार घेऊन ते सन १७८३ च्या जुलाई महिन्यांत खानदेशांत आले. त्यांस आणावयास तुकोजी होळकर, फडके व रास्ते गेले होते. त्यांचीं व दादासाहेबांची बोलणीं झालीं. ते गोदावरीतीरीं कोपरगांवीं दरमहा २५००० रुपये नेमणूक घेऊन राहिले. इ. स. १७८३ सालीं डिसेंबर ता. ११ रोजीं ते स्वर्गवासी झाले.

याप्रमाणें इ. स. १७७४ त उभारलेलें बारभाईचे कारस्थान इ. स. १७८३ सालीं निष्कटंक झालें आणि तेथें इ. स. १७७४ पासून १७८३ पर्यंत गुरफटलेले तुकोजीराव कांहीं काळपर्यंत मोकळे झाले.

या वरील नऊ वर्षांत मराठेशाहीचे दुष्मन स्वस्थ बसले नव्हते. डोक्याशीं निजाम तर पायाशी हैदर मराठी राज्याचे लचके काढीत होते. नानांस हे अवगत होते; तरी पण चारी बाजूंनीं शत्रूस तोंड देणें साहसाचे होईल हे जाणून घरच्या अडगळी आणि त्यामुळेंच उद्भवलेलें इंग्रजांशीं युद्ध हें मिटविण्यासाठीं त्यांनीं आपली सगळी शक्ती आणि युक्ती एकवटली होती. उत्तरेंतील शिंदे-होळकर, दक्षिणेंतील फडके-पटवर्धन यांस एकत्रित करून घरच्या आणि दारच्या शत्रूंस तोंड दिले. या सर्व परिश्रमाचें फळ सालवीच्या तहानें मिळवून दिले. दादासाहेब लवकरच निवर्तले आणि इंग्रज स्वस्थ बसले. याउपर निजाम आणि हैदर यांजकडे वळण्यास संधी प्राप्त झाली. त्यांतच दोघांकडेही झुंज घेण्यापेक्षां गरम नरम पाहून नानांनीं दक्षिणेकडे मोर्चा फिरविणें अधिक सुलभ व श्रेयस्कर असें ठरविलें. हैदर या सुमारास मृत्यु पाऊन त्याचा मुलगा टिपू हा सत्ताधीश झाला होता. गादीवर येतांच त्याची इंग्रजांशीं गांठ पडली. बिदनुरास इंग्रजी फौज त्यानें कैद केली होती आणि इंग्रजांस त्यानें आपलें म्हणणे मान्य करावयास लाविलें. यामुळें त्यास आपल्या सामर्थ्याची घमेंड चढली.

इ. स. १७८० च्या तहानें नरगुंद व कित्तूर या संस्थानावर मराठ्यांचें सार्वभौमत्व असे आणि संस्थानाकडून मिळणारी खंडणी मात्र हैदरनें घ्यावयाची होती. टिपूच्या मनांत या अटीचें अतिक्रमण करून दोन्ही संस्थानें शक्यतर आपल्या राज्यांत सामील करावीं असा विचार झाला. पोटांत हा डावपेंच आणि बाहेर प्रकार दुसरा, म्हणजे पेशव्यांचे दरबारीं मित्रत्वाच्या नात्यानें वकील पाठविला. हें सर्व ओळखून नानांनीं तुकोजी होळकरांसह यादगीर येथें निजामाची ता. २१ मे इ. स. १७८४ रोजीं भेट घेतली. भेटींत टिपूवर स्वारी करण्याची मसलत कांहींच सिद्ध झाली नाहीं. मात्र मोगलाईत असलेली मराठ्यांची ठाणीं जीं निजामाकडून उठविलीं गेलीं होतीं तीं ठाणीं पुन: वसवूं देण्याचें निजामानें या भेटींत कबूल केलें. पुढील सालीं म्हणजे इ. स. १७८५ त टिपूवर स्वत:च एकट्यानें मोहीम करण्याचें नानांनीं ठरविलें.

एवढ्या अवधींत नरगुंद व कित्तूर ही संस्थानें बळजबरीनें काबीज करून टिपूनें आपल्या राज्यांत सामील केलीं. इतकेच नाहीं तर घटप्रभा व मलप्रभा या दोन नद्यांमधील व बेळगांवचें आसपासचा मुलूख घेऊन मिरजेच्या किल्ल्यावर जाण्याचा रोख दाखविला.

टिपूने नरगुंद घेतलें हे कळतांच सुभेदार तुकोजी होळकर व फडके बारामतीवरून पंढरपूराकडे निघाले. नाना व मुधोजी भोसले पेशव्यांची हुजरात वगैरे घेऊन निघाले.

पटवर्धन, रास्ते व अक्कलकोटकर हेही येऊन मिळाले. कित्तूराकडे पंचवीस हजार पायदळ व तोफांनिशीं टिपूचा सरदार सैय्यद बुराण हा होता. एकट्या बेहऱ्यास काम झेपणार नाहीं म्हणून मुख्य फौजेंतून सुभेदार होळकरांची तिकडे योजना झाली. फेब्रुवारी इ. स. १७८६ त होळकर व बेहरे एकत्र झाल्यावर कित्तूराखेरीज तिकडची सर्व ठाणीं त्यांनीं काबीज केली. इतकेच नाही तर खुद्द टिपूला सुद्धां घेरा घालण्याचा आपला इरादा त्यांनीं जाहीर केला. या इराद्यास भिऊन सैय्यद बुराण यानें कित्तूरांत तीन हजार कवायती पायदळ व तोफा ठेवून तो जवळच डोंगरझाडीच्या आसऱ्यास जाऊन राहिला. पण ही सगळी कित्तूरावरची स्वारी मराठ्यांनीं उठवलेली हूल होती. कित्तूरावर त्यांचा रोख नव्हता. त्यांचे सारें लक्ष सावनुराकडे वेधून राहिले होते. तेथील नबाब टिपूचा खंडणीदार होता. त्यास होळकरांनीं कळविलें कीं तुम्ही टिपूस खंडणी देऊं नका. आम्ही तुमचा बचाव करूं. यावर टिपूनें राघवेंद्र नाईक यांस ससैन्य सावनूर येथें पाठविलें. ही हकीकत कळतांच होळकर व बेहरे एकदम चाळीस कोसांची दौड एका अहोरात्रींत करून सावनुरास गेले. ही बातमी कळतांच राघवेंद्र पळून गेला. तेव्हां सावनूरचें रक्षण करावे व पटवर्धनांच्या लक्ष्मेश्वर परगण्यांत टिपूचा अंमल होता तो उठवावा, या दोन कामाकरितां बेहरे यांजबरोबर पंधरा हजार स्वार नेमून त्यांस बंकापूरास सावनूर नजीक ठेविलें. धारवाड प्रांतीं अंमल बसविण्याकरितां बेहट्टी येथें बापू होळकर व आपले दिवाण पाराशरपंत यांस दहा हजार फौजेनिशीं ठेविलें आणि माहे मे इ. स. १७८६ त सुमारें पंधरा हजार फौज घेऊन आपण स्वर: कित्तूराजवळ सय्यद बुराण याचे तोंडावर येऊन राहिले.

बेहरे व बापू होळकर यांच्या फौजेच्या जरबेमुळें लक्षमेश्वर परगण्यांत पांच सात ठिकाणी मराठ्यांची ठाणीं बसली. जुनी व नवी हुबळी मिळविण्याचा प्रयत्न बापू होळकर व पाराशरपंत यांनीं चालविला. नवी हुबळी ताब्यांत आली आणि जुन्या हुबळीवर मराठ्यांनीं मारा सुरू केला हे वर्तमान ऐकून सैय्यद बुराण तुकोजी होळकरांस सोडून हुबळीकडे निघाला. तेव्हां मराठ्यांनीं हुबळीचे मोर्चे उठवून बेहट्टीस आले आणि ही सगळी मराठी फौज हुबळीस वेढा देऊन बसली.

इकडे हरीपंतांवर टिपूनें दोन वेळा रात्री छापे घातले, पण दोन्हीं वेळां त्यास परतावें लागले. इकडे बुराणुद्दीन कलघट्टीवर होता. त्याचे तोंडावर तुकोजीराव होळकर व बेहरे हुबळीस राहिले होते. बुराणाच्या सैन्यांत फितुर करून मराठ्यांनीं पांचशें घोडेस्वार व दीडशें पायदळ फोडून आपणाकडे आणलें होतें. रोज कटकटी चालत, पण निकालास कांहीं येईना. अशा स्थितीत बुराणुद्दिनास टिपूनें आपणांजवळ बोलावून घेतलें. तेव्हां तुकोजीराव व बेहरे हुबळीहून निघून फडक्यांस बनीकोप येथें येऊन मिळाले.

ता. १ आक्टोबर रोजीं रात्रीं टिपूनें मराठी लष्करावर छापा घातला तेव्हां हुजरात सुद्धां उभे राहून इकडील तोफा झाडून काढिल्या. शत्रू मारगिरी करीत आला. ही मारगिरी अडीच प्रहरपर्यंत होत होती. इकडील तोफा थोड्या व लहान यामुळें तोफा माघाऱ्या

काढल्या. छाप्याचें समयीं होळकरांकडील कांहीं पिंढारी व बापू होळकर शत्रूचे पाठीमागील बाजूस गेले होते. तिकडील हत्ती, बैलांचा माळा, कांहीं तोफा व वीस पंचवीस घोडीं आणिलीं. (आक्टोबर इ. स. १७८६)

टिपू अडचणीची आणि बळकट जागा धरून बसला होता आणि पायदळाच्या व तोफांच्या जोरावर छापे घालून तो मराठ्यांची नासाडी करीत होता. त्याला मैदानांत आणून चोहोंकडून वेढून त्याचा कोंडमारा करावा अशा उद्देशाने फडके रोज थोडेथोडे मागें सरकत शिरहट्टीपर्यंत आले. तो किल्ला टिपूचा होता. ता. १४ नोव्हेंबर रोजीं मराठ्यांनीं तो काबीज केला. त्या किल्ल्यास कुमक करण्याकरितां तरी टिपू आपली जागा सोडून येईल असें मराठ्यांस वाटत होतें; पण मोहरममुळें तो हलला नाही. मध्यंतरीं तुकोजीराव धारवाडच्या रोखें गेले, पण निष्पन्न कांहीं झालें नाहीं.

सन १७८६ नोव्हेंबरांत टिपूनें तहाचे बोलणें करण्याकरितां आपला वकील होळकरांकडे पाठविला आणि तिकडे निजामाकडेही पाठविला; पण दोन्हीकडेही कांहीं निष्पन्न झालें नाहीं.

ता. ३० नोव्हेंबर रोजीं टिपू सावनुराहून निघून इटग्याचे उत्तरेस दोन कोसांवर मुक्कामास आला. मराठे कलकेरीस होते. त्यांवर टिपूनें ता. ३० मिनहून छापा घातला. मराठ्यांच्या सावधगिरीपुढें त्याचे कांहीं चालेना. इ. स. १७८७ च्या जानेवारीत तहाचें बोलणें सुरू होऊन एप्रिलांत तो पूर्ण झाला. या तहानें मराठ्यांस नरगुंद त कित्तूर ही संस्थाने माघारीं मिळाली व पासष्ट लाख रुपये मिळाले. सालवीचा तह होळकरांच्या मार्फत घडून आला.

हैदर, टिपूचे स्वारीवर निघतांना तुकोजीराव होळकर व त्यांचे सरदार यांस बहुमान वस्त्रें पुणें दरबारांतून मिळालीं. त्याचा उतारा (सवाई माधवराव पेशवे यांचे रोजनिशीतील उतारा इ. स. १७८५) खालीलप्रमाणें.

तुकोजीराव होळकर यांस कर्नाटकचे स्वारीस पाठविलें. सबब निरोप समयीं विद्यमान राजश्री रावसाहेब रूबरू दिले. (रत्न शाळेपैकीं) जडाव वगैरे किंमत रु.६४४५-११-०.

१ खासा तुकोजी होळकर यांस किंमत रु. २३२७-४-१ शिरपेंच मिनेगार पांच फुलांचा, बाबत नानाजी शंकर दिमत नबाब यांनीं बाळाजी जनार्दन फडणीस यांस यादगीरचे स्वारीस दिला तो किंमत रु. ८००, हिरे व हिरकण्या मदनाईकसुद्धा रु. ९७ व लोलक रु. ३ व तुरा मोत्यांचा बाबत रासकर्दन नवा केला तो किंमत रु. १५१७-४-०, मोतीसर १९, दांडी रुपें, सोने किंमत रु. १०.

१ भीवजी लांबहाते यांस शिरपेंच रासकर्दन किंमत २०० माणकें, लोलक चुणी हिरकण्या, मोती लोलक दागिना १

१ कासीबा होळकर यांस शिरपेंच घाट साधा पंचगिरीचा किंमत रु. ७७७-८-० पांच माणकें, लोलक मणीसुद्धां दागिना १

१ बापूजी वाघमारे यांस शिरपेंच रासकर्दन किंमत रु. १५०

१ नारो गणेश दिवाण यांस चौकडा मोत्यांचा किंमत रु. २०१३-२-०

१ दादाजी गंगाधर फडणीस यांस जोडी मोत्यांची किंमत रु. ४०६-१४-०
पाराशर दादाजी (वाघ) यांस कडे सोन्याचे १ किंमत रु. ३४६-३-०

१ रामराव अप्पाजी पळसीकर यांस सोन्याचे कडें १ किंमत रु. २२४-१२-० जडाव, जवाहीर, शिरपेंच, तुरा, चौकडा, कडे वगैरे मिळोन किंमत रु. ६४४५-११-०

ह्या स्वारीसंबंधांत सरकारी रेकॉर्डात उपलब्ध झालेल्या कागदांपैकीं पांच पत्रें सारांश रूपानें खालीं देत आहोत. त्यावरून ध्यानास येण्यासारखे आहे.

***पत्रांक १.*** श्रीमंत मातोश्रीसाहेबांस यशवंत गंगाधर यांजकडून ता. १ जून १७८४ साहेबीं छ. ३० ची पत्रें सेवकांस व नाना व श्रीमंत सुभेदार व राजश्री नारो गणेश यांस ऐसी चार पत्रें व सुभेदारांस खर्चास पदमसी तिलोकसीचे दुकानची हुंडी १००००० फाल्गुन शुद्धची पावली. आज्ञा कीं बाळाजीपंत नानांचे विचारें हुंडी चिरंजीवांकडे लष्करांत रवाना करावी. आज्ञेप्रमाणें नानांस पत्र देऊन हुंडीविषयीं विनंती केली. त्यावरून त्यांनीं हरीपंताचे विचारें हुंडी व पत्र लष्करांत रवाना करून आपणास जाब दिला तो सेवेशीं पाठविला आहे. टिपूचे मसलतीस खर्च व पुढेंही दरमहा चालला पाहिजे. मसलतीचें ओझें सर्व सुभेदारांवर आहे. फौजेचा खर्चही भारी. त्यांत महागाई. श्रीमंत नानांची आज्ञा वारंवार ऐवजाविशीं होती व आपणही कमी न करितां यश घेतलें सांप्रतचा प्रसंग शेवटाखालीं आला होता. म्हणोन वगैरे.

***पत्रांक २.*** ता. ४-१२-१७८५ श्रीमंत मातोश्रीसाहेबांस रामराव अप्पाजीकडून मुक्काम मुर्डगी नजीक तुंगभद्रा. अलीकडे टिपूकडील संधान आपलेकडे आलें. कारकून वस्त्रें, जवाहीर घेऊन आले. इकडीलही गेले. असें असतां दहा कोसाचे तफावत टाकून दोन कोसांचे अंतर येऊन राहिला. आपलीं लष्करें दूर जाणोन, चारापाण्याची सोय पाहून तुंगभद्रेपार फौज रवाना करावी या विचारें ते जागा अडचणीची काटेवन भारी याजमुळें बुणगे मागे डोंगरापलीकडे सावधतेनें होते. पण पूर्वरात्रीसच छापा आला. प्रथम गांठ आपले फौजेशीं पडून एक घटका झटापट झाली. असावधानीमुळें गलबला झाला. जामदारखाना तळावरच टाकून निघणें प्राप्त झाले. श्रीमार्तंडाचे कृपे व साहेबांचे आशीर्वादेंकरून इकडील बचाव झाला म्हणोन वगैरे.

***पत्रांक ३.*** ता. १९ डिसेंबर इ. स. १७८६ (मालोजी लांबहात्याकडून मातोश्रीसाहेबांस पत्र) आपले पुण्यप्रतापें करून एक सुतळीचा तोडाही न जातां, सर्व स्वस्तिक्षेम राहिले. ईश्वरें आपले पुण्यसामर्थ्यें लज्जा राखली. आपले सेनेस कांहीं उपसर्ग न झाला. ज्या दौलतींत धर्मध्वज फडत्कार करतो तेथें ईश्वर अपेश देणार नाही. पण याजमुळें भोसले, मोंगल दूषण ठेवतात कीं यांचा फितूर आहे. आमचा नाश यांनीं करविला. परंतु तात्या सर्वांचें शांतवन करितात.

***पत्रांक*** ४. मार्च इ. स. १७८७ (मालोजी लांबहाते मु. कनकगिरीहून मातोश्रीसाहेबांस) पंधरा महिने झाले हिशेब दहामाहीचे देतात. कर्जाचे पेचांत फार झालों. राजकीय वर्तमान तर टिपूचा सल्ला झाला. एक-दोन दिवसांत येथून कूच करून मागें फिरतील. फौजांस निरोप झाला. मी देवाची जेजुरी यात्रा करून वाफगांवीं किंवा मांडवगणीं लवकरच जाणार.

***पत्रांक*** ५. ता. १४ मार्च इ. स. १७८७ (आनंदीबाई वाघमारे खिडकीहून मातोश्रीसाहेबांस लिहितात) चिरंजीवाचें पत्र आलें. सल्ल्याचा विचार ठरला. रा. मल्हारराव मांडवगणास आले. लष्करांत मरीचा उपद्रव झाला. तूर्त शत्रूच्या लष्करांत संहार होत आहे. चाळीस पन्नास हजार मनुष्य आपणाकडील जायबंदी झाले. आम्हांस सर्व आधार महाराजांचे पायांचा आहे.

ही वरील पांच पत्रें सरकारी दप्तरांतील उतरलीं आहेत. नंबर १ मध्यें सुभेदार तुकोजीरावांनीं मागितलेली रक्कम मातोश्रीसाहेबांनीं पाठविली आहे. सरकारी वकील जी सूचना करीत आहे ती बरीच महत्त्वाची आहे. ज्या मोहिमा होत त्यांत किती खर्च झाला त्यापैकीं प्रत्येक सरदाराच्या शिरावर शिरस्त्याप्रमाणें किती यावयाचा आणि त्यातून किती पोंच झाली, हे संबंध पुढें आल्याशिवाय देवी अहिल्याबाईंनीं पैसे पाठविण्यांत कुचराई केली असे मोहगम म्हणणें धाडसाचें आहे. तशांतही ज्या रकमा पोहचत त्यात जमाखर्च करताना कारकूनाची मखलासी कशी चाले हें स्पष्ट होतें. पत्रांक २ वरून टिपूचे वर्तन दिसून येतेच आणि मराठी फौजेची शिस्त किती होती याचें हें दर्शक आहे. पत्रांक ३ मध्यें स्पष्ट होत आहे कीं होळकरांकडे फारसा दगा न झाल्यामुळें आपल्याच मंडळींनीं सुभेदारांवर फितव्याचा आरोप केला. पण खरेशास्त्री ह्यांनीं या आरोपास पुरावा नाही असें आपल्या आठव्या भागांत सांगून, टिपूस होळकरांनीं जे उत्तर पाठविले ते होळकरांचा पाणीदारपणा दाखविणारें आहे. (ज्या समयीं सरकारांत वकीलाचे प्रयोजन लागेल त्या समयीं आणविले जातील.) तहाच्या वाटाघाटीविषयीं वकील व पत्रें जात-येत असतां, अशा स्थितीत सुभेदार तुकाजीरावांवर निजामास सामील असण्याचा आरोप आला होता. तो आरोप 'चंद्रचूड दप्तरात' रा. दत्तोपंत आपटे यांनीं खोडून काढला आहे. तसाच या वेळेही झालेला आरोप खरेशास्त्री यांनीं खोटा ठरविला आहे. पत्रांक ४, ५ वरून लष्करांत झालेली महागाई व तद्नंतर उद्भवलेला उपद्रव दर्शविला आहे. तहाचे बोलणें होळकरांमार्फत झाले. पण अखेरीस त्यांचे पदरांत काय पडलें, याचा उल्लेख कोठेंच दिसत नाही. फक्त एकच उल्लेख दिसता, 'राधीला एक गांव टिपूनें दिला.' असा उल्लेख वाचल्याचें कैलासवासी भागवत लिहितात. ही राधाबाई यशवंतराव व विठोजी होळकर यांची मातोश्री म्हणजे सुभेदार तुकोजीरावांची उपस्त्री होय. वकीलास जहागीर इनाम देण्याची चाल अठरावें शतकांत तर होतीच, पण पुढेंही पुढल्या शतकाच्या पहिल्या चरणापर्यंत

होती. टिपूकडून जे वकील वाटाघाटी करण्यास आले होते त्यांना पेशवे सरकाराकडून जहागीर देण्यांत आली असे स्माइल्स हा ग्रंथकार म्हणतो. तुकोजीराव आणि रास्ते यांस टिपूकडून कांहीं एक मिळालेलें नाहीं असें दिसतें. या मोहिमेचे वेळेस तुकोजीरावांनीं आपली स्त्री रखमाबाई व पुत्र मल्हारराव, यशवंतराव व विठूजीराव ह्या पुत्रांसही बरोबर घेतले होते. त्यांचबरोबर वीस बावीस हजार सरंजामी फौज असून, बापू होळकर, महतपूरचे वाघ, इंगळे, पाराशरदादाजी, लांबहाते हरीफभाई वगैरे वीर व पागेदार होते. तसेच दिवाण पळसीकर, नारो गणेश आणि कांहीं मुलकी कामगारही होते. प्रसंगीं सुभेदारांनीं रोजमुऱ्यांनीं दोन तीन हजार फौज ठेविली होती. तह होतांच या हंगामी लष्करास रजा मिळाली. इ. स. १७८० त सुभेदार महेश्वराहून निघून आल्यापासून त्यांची पैशाची ओढाताणच होती. या संबंधात अमूक एक व्यक्तीचाच दोष असें ठरविण्यापूर्वी जमाखर्चाचे कागद अधिक स्पष्टपणें बाहेर आले पाहिजेत हे आम्ही वर नमूद केलेंच आहे. एक गोष्ट मात्र स्पष्ट बाहेर येते ती ही कीं होळकरांस या मोहिमेपासून कांहीं फलप्राप्ती झालेली दिसत नाहीं. ही मोहीम संपून सुभेदार वाफगांवीं परततात तोंच उत्तर हिंदुस्थानची कामगिरी पुढें उभी राहिली आणि तिकडे ते आपखुशीनें आणि पेशव्यांच्या आज्ञेनें निघून गेले. ही उत्तर हिंदुस्थानची मोहीम पुढील प्रकरणांत घेऊं.

**आधार ग्रंथ**

होळकरशाहीच्या इतिहासाची साधनें भाग १, २
पुणें पेशवे दप्तर
श्री सवाई माधवरावांची रोजनिशी



**प्रकरण २८ वें**

# उत्तर हिंदुस्थानांतील मोहीम

इ. स. १७७३-७४ त रोहिलेखंडाच्या मोहिमेवरून तुकोजीराव जे दक्षिणेंत आले ते चौदा वर्षे दक्षिणेंत पेशवे सरकारांच्या कामगिऱ्यांवर राहिले. एवढ्या अवधींत उत्तरेस साम्राज्यासंबंधीनें काय काय गोष्टी घडल्या हें पाटीलबुवांच्या खालील पत्रावरून स्पष्ट होईल.

''गोहदचे मसलतीमुळें पेचांत येऊन कर्जदार झालों. पुढें पातशहाची मसलत पडली. इंग्रज पातशहास आपलेकडेस घेत असतां चमेल उतरून जाऊन, आमदानीचें पारिपत्य करून पातशहाचा बंदोबस्त केला. सारे दौलतीचा खर्च त्याचा चालून आपले फौजेसही सांभाळून राजेरजवाडे यांची पारिपत्यें केलीं. यामुळे इंग्रज वगैरे सर्वांस असह्य झालें. पुढें जयपूरचे मसलतीस दोन वर्षे लागली. त्यात घरचे फितुरामुळें लढाई फत्ते केलेली विलग झालें. याजकरितां माघारें येऊन कुटुंब ग्वाल्हेरीस पाठवून दिलें. पुढें जमाव करून रांगड्याचें पारिपत्य करावें हाच इरादा. परंतु फौजेखेरीज होत नाही, याविषयीं देशाहून फौज आणविली, त्यांस ऐवज रवाना करावा तर ओढीचा प्रसंग. दोन वर्षे या मुलुखांत आफत पर्जन्याची झाली. त्याकरितां मुलुखाचा पैसा आला नाही. साहुकारास ऐवजाकरितां म्हणावें तर साहुकार इतबार या समयास करीत नाही. पादशाहीत आमचा पाय शिरकला. याजकरितां वजीर, रांगडे व इंग्रज सारे एकच झाले आहेत. म्हणून ऐवजाची सरबरा व फौज व पेंढारी यांची तरतूद लवकर व्हावी. पूर्वापार वडिलांवडिलास मसलती पडल्या तेव्हां परस्परें साहित्य झालें आहे. फौजेविषयीं व ऐवजाकरितां देशीं कारभारी यांस लिहिले आहे. त्यांजकडून साहित्य होणें,

येणें, तें होईल; परंतु तूर्त तुम्हीं ऐवजाची व फौजेची रवानगी लवकर करावी.'' अशा अर्थाचीं पत्रें मातोश्रीसाहेबांस व पुणें दरबारास गेली. या पत्रावरून पाटीलबुवांची उत्तरेंतील कामगिरी त्यांच्याच शब्दांत स्पष्ट होत आहे.

हे वरील पत्र मातोश्री अहिल्याबाईसाहेबांस पाठविले. त्याप्रमाणें पुणें दरबारास व सुभेदार तुकोजीराव यांसही निरनिराळीं पत्रें पाठविली. आतां या पत्रांस मातोश्रीसाहेबांचे उत्तर गेलें तें असे : ''भाऊपणा पूर्वीपासून कसा चालत आला? पेंढारी, हजार स्वार बोलाविले हे काय? फौज दहापांच हजार म्हणाल तर पाठवून देऊं. पूर्वीप्रमाणें यथाविभागे चालावे.'' सुभेदार तुकोजीरावांनीं याच पत्रास अनुलक्षून पुणें दरबाराकडे मागणी केली, ''सोबती संकटात. आम्हास बिदा करावें.'' आतां एकाच पत्रास हीं दोन उत्तरें पाहिलीं म्हणजे मातोश्रीसाहेबांचे राजकारणपटुत्व आणि सुभेदारांची नुसती शिपाईगिरी हीं लक्षांत येतात. दोघांचे स्वभावांतील वैचित्र्य व मतभेदांचें कारण दिसून येतें.

मातोश्रीसाहेबांच्या पत्रांतील 'यथाविभागें चालावें' या शब्दांतील खोंच त्यांचे पूर्वापार पद्धतीच्या ज्ञानाचें दर्शक आहे.

ह्या वाटण्या इ. स. १७५१-५२, इ. स. १७५५-५६, इ. स. १७६४-६५ व इ. स. १७६९ याप्रमाणें स्थल, काल व व्यक्तीनुरूप घडत आल्या होत्या. ते विभाग मातोश्रीसाहेबांच्या लक्षांत होते आणि पाटीलबुवांस त्यांनीं त्याची जाणीव करून दिली. इ. स. १७५१-५२ त चौथाई सरकार व तीन हिस्से उभयतां सरदारांपैकीं दीड हिस्सा होळकर व दीड हिस्सा शिंदे. इ. स. १७५५-५६ त एक हिस्सा सरकार, एक हिस्सा होळकर व एक हिस्सा शिंदे. इ. स. १७६४-६५ त सरकार सतरा लक्ष, होळकर पांच लक्ष व शिंदे तीन लक्ष, याप्रमाणें थोडाबहुत फरक करून वहिवाट चालली होती. आतां इ. स. १७६९ त जो वाटणीचा कागद झाला **(पेशवे रेकॉर्डपैकीं)** तो आम्ही सविस्तर येथें खाली देत आहोत.

यादी हिंदुस्थान प्रांतीं खंडण्या जाहल्या त्यांचे वाटणीचा हिशेब सुरू सन सबैनमया व आलफ (१७६९).

१ सनतिसार्बेनात सुरजमल जाट यांजकडे खंडणी करार झाली. त्यांचे बाकीपैकीं वसूल मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे यांचे स्वारीत. त्यांचे वाटणीचा सामाईक खर्च वजा होऊन बाकी बेरजीची वाटणी चौथाई सरकारची वजा करून बाकी तीन-तीन हिस्से ऐवज राहिला त्याची वाटणी फौजेवर. सरकारची फौज व होळकर, शिंदे व यशवंतराव पवार व तुकोजी पवार, याप्रमाणें होती. फौजेची वाटणी फौजेचे दामाशाईप्रमाणें पावली असे. यशवंतराव पवारांची हजार फौज होती त्याप्रमाणें त्यांची वाटणी होळकरांकडे व तुकोजी पवार यांची फौज हजार होती त्यांची वाटणी शिंद्याकडे. याप्रमाणें कलम १ संस्थान उदेपूर येथील खंडण्या जाहल्या. बीतपशील. सनखमेसनात राजश्रीदादाचे स्वारींत खंडण्या जाहल्या व नजर करार जाहली. रु. २५४०००० पैकीं वजा सखाराम भगवंत यांचे नजरचे रु. ४०००० बाकी रु. २५००००० पैकीं उभयतां सरदारांस देवविले. होळकर ५०००००

व शिंदे ५००००० , एकूण १००००००. खमससितेनात मल्हारजी होळकर यांनीं करार केले रु. २५००००० पैकीं सरदारांस ऐवज देविला. होळकर पांच लक्ष ५००००० नेमिले त्यांस अदा जाहला तितका वजा करून द्यावा. महादजी शिंदे यांसी अदा जाहला तितकाच ऐवज नेमिला असे ३००००० बाकी सरकारांत रुपये १७०००००.

राजश्रीदादांची पहिली हिंदुस्थानची स्वारी इ. स. १७४३ ते १७४६, दुसरी स्वारी इ. स. १७५६ ते १७५८

वाटणीचा हिस्सा शिरस्तेप्रमाणें २५ चौथाई सरकार. ७५ तीन हिस्से सरदार रु. ३७-८-० होळकर व ३७-८-० शिंदे एकूण ७५ कुल रुपये १०० चे हिस्सेरसीप्रमाणें.

वरील उताऱ्यावरून 'यथा विभाग वाटणी'' या शब्दांची खोली स्पष्ट होईल. याचा खुलासा पाटीलबुवांकडून टाळण्यांत आला. त्यावर मातोश्रींचे उत्तर गेलें कीं, ''तुम्ही फौजेविषयीं व पेंढाऱ्यांविषयीं दोन तीन वेळां लिहिलें त्यास समय हाच आहे. या समयीं साहित्य घडावें हें लक्ष आमचें. परंतु दोन तीन जोड्या कासीदाच्या मुजरद देशीं रवाना केल्या. चिरंजीव तुकबांस पत्रें व सरकारांत पत्रें लिहिली आहेत. तिकडून मातब्बर फौज आणविली आहे. त्यांचीं उत्तरें हा कालवर येत नाहीत. तिकडील जाबसाल काय येतो त्यासरशी तजवीज केली जाईल. तूर्त दोन हजार पेंढारी व सरंजामी फौज हजार पाठविल्यानें तिकडे दाब पडतो असें नाही. देशीहून फौज मातब्बर येईल तोवर आपण आपले फौजेनिशीं डीगेचे आसपास असावें. तुम्ही लिहिलें कीं पादशहा व इंग्रज वगैरे रांगडे एक झाले. तर त्याचे कारण काय? तुम्हांकडून येथें बंदोबस्त आहेच. पातशहाची मसलत जैपूरकराशीं किंवा इंग्रजाशीं हें संधान वरचेवर राखीत जावें. रांगड्यांशीं मसलत ते करणार नाहींत.''

मातोश्रीसाहेबांची नानांस पत्रें पोहचली त्यावरून अलीबहादर यांस व तुकोजीरावांच्या विनंतीवरून त्यांस पाटीलबाबांच्या मदतीस उत्तर हिंदुस्थानांत रवाना केले. ह्या गोष्टी होईपर्यंत इ. स. १७८७ चा डिसेंबर उजाडला. या सुमारास रामपुऱ्याकडे चंद्रावतांनीं उचल खाल्ली व त्यांचा बंदोबस्त मातोश्रीसाहेबांनीं स्वत:च केला. हे आधीच्या प्रकरणांत आलेच आहे.

हे त्रिवर्ग म्हणजे शिंदे, होळकर अलीबहादर आलेल्या कामगिरीस लागण्यापूर्वी ते ज्या कामासाठीं आले तें कार्य कोणत्या स्वरूपांत होते हे प्रथम पाहू या आणि नंतर त्या कार्यास कसा व कोणता रंग चढला हें दिसून येईल. पाटीलबुवांचें जें पत्र मातोश्रीसाहेबांस आलेलें आपण वरती उतरलें आहे त्यात कार्याचे वास्तव स्वरूप प्रतिबिंबीत झालें आहेच. म्हणजे, पातशाहीचा बंदोबस्त पाटीलबुवांच्या हातांत आलेला, त्यास पठाण, रांगडे व इंग्रज यांचा अडथळा. पाटीलबुवांकडे जरूर तितका पैसा व जरूर तितकी फौजही नाही. इतक्या गोष्टी त्यांनीं पत्रांत मांडल्या आहेत. अडचणीतून त्यांनीं बाहेर पडावे इतकेंच नाहीं, पण पातशाही निरंकुश रीतीनें पादाक्रांत करावी हें ध्येय आणि तें ध्येय साधण्यासाठीं मदतगार म्हणून होळकर व अलीबहादर आले, इतकी वस्तुस्थिती डोळ्यापुढें ठेवून घडत गेलेल्या ऐतिहासिक गोष्टी निवेदन करावयाच्या आहेत. तेव्हां ही निरनिराळी पात्रें कशा तऱ्हेचीं

होतीं हें पाहूं या.

सन १७८७ चे आगस्टांत जयपूरवाले व पाटीलबुवांचें युद्ध झालें. पाटीलबुवांनीं तोफांचा मारा सुरू केला. मारा जोराचा झाल्यामुळें रांगडे परतले. लढाई दुसरी मातब्बर झाली. पाटीलबुवांचा मोड झाला. ते डीगेस जावयाचा रूख घेऊन निघाले. पाठीस फौजा लागल्या. लष्करांत महागाई फार. रसद येत नाहीं. सर्वांसह बदमामली केली. त्यामुळें कोणीकडून आसरा नाहीं. भेणे चोर यांस जयपूरवाल्यांनीं ताकीद केली कीं लष्करांत चोरीचा उपसर्ग लावणें. त्यावरून तो उपसर्ग उपद्रव भारी. चहूंकडून अडचणी हा हेत. यावर पाटीलबुवा येथून टाळा देऊन डिगेकडे गेले. या लढाईत पाटीलबुवांची पलटणें जैपूरवाल्याकडे फितूर झाली हें पराभवाचें मुख्य कारण होय. ही लढाई लालसोट मुक्कामीं झाली. या नंतर पाटीलबुवांनीं मातोश्रींस लिहिलेलें पत्र वर आलेंच आहे.

लालसोट येथें पाटीलबाबांचा पराभव झाल्यामुळें राजपुतान्यांतील राजे एकत्र होऊन त्यांनीं विचार केला कीं, 'दक्षिण्यांचा अंमल ज्यांच्या जिल्ह्यांत त्यानें उठवून द्यावा. ऐसीं पत्रें रामपुरा, सावेर, इंदूरचे जमीदारापर्यंत आली. या मसलतीस रुकार, बुंदी, कोटेकर यांचा मात्र पांच विश्वे.' यावर उदेपूरची दहा हजार फौज येऊन निंबाहेडा, जावद, वगैरे ठाणीं उठविली. तेव्हां बाईसाहेबांनीं अंबाजीपंत, राघो रणछोड वगैरे हुजरात सरंजाम मुकाबल्यास पाठविली. या लढाईंत अंबाजीपंत मारले गेले.

याउपर जयपूरवाले व जोधपूरवाले यांनीं पेशवे सरकारांस लिहिलें कीं, ''मामलतसंबंधीं पैका राजश्री पाटीलबाबांस देऊन शिवाय दोन चार लक्षांपर्यंत समाधान आपलेकडून आम्ही राखीत आलों असतां बाबांनीं खेचीवाड्याचा व गोहदेचा उच्छेद केला. पुढें जैपूरचे मुक्कामीं बाबा आले तेव्हां त्रेसष्ट लक्षांपैकीं तेरा बाकी देणें त्यांची तोडजोड होत असतां जयपूर घ्यावें असा प्रसंग प्राप्त झाला. तेव्हां येथून फौजेची रवानगी होऊन लाचार जाणून लढाई घेणें प्राप्त झाले. तमाम हिंदुस्थानांत अंमल केला असतां आम्ही हेंच विचारले जे – तुर्कापेक्षां हिंदु राज्य श्रीमंत राजश्री पेशवेसाहेबांचें ब्राह्मणी राज्य बहुतच उत्तम आहे. मामलत द्यावी यात गुंता तिळप्राय नाही. राज्य उच्छेद होऊं लागले सबब लढाई घेणें प्राप्त झालें. त्यास आपण त्यांजला धनी असतां पाटीलबाबांस लिहावे. मामलतीचा इरादा जो असेल तो उरकून अन्यत्र कार्यभागास जावें. आम्ही हिंदुस्थानांत जमीदार अनादी काळापासून आहोंत. पूर्वी पातशाही प्रबळ होती तेव्हांही आम्ही हरप्रयत्न करून आपली जमीन रक्षण केली आहे.'' आतां जयपूरवाल्यांचेंही म्हणणें पुण्यास जाऊन पोहोचले. ''आम्ही बावीस लक्षावर कबूल आहोत. पाटीलबाबा मानीत नाहीत. तीस लक्ष रुपये नक्त व होळकरांस परगणे पेशजी दिले त्याप्रमाणें आम्हास द्यावे.'' याप्रमाणें जैपूर आणि जोधपूर ही प्रमुख संस्थानें पाटीलबुवांवर रुष्ट झालीं.

आतां दिल्लीपती व त्यांचे मंडळ यासंबंधीं तत्कालीन मत काय होते तें पाहूं या. राजश्री हिंगणे इ. स. १७८८ च्या मार्चमध्यें लिहितात, ''गुलाम कादरखान यांनीं रामगडचा बंदोबस्त करून अंतरोली डभईकडे बंदोबस्तास गेले आहेत. पंचवीस तीस हजार प्यादा

समागमें आहे. हिंदुस्थानांत एक गुलाम कादरखान मात्र राजश्री पाटीलबाबांशीं बदआमली झाल्यावर बळावला आहे. इस्माईल बेग आगरियाचे आसपास महालवर अंमल करून पांच हजार प्याद्यानिशीं आहे. नजीब कुलीखान पांच सहा हजार प्याद्यानिशीं कानोडरेवाडी, पाटोदी, वगैरे महाल दाबून आहे. हे तिघेही पातशहाशी रुजू नाहीत. पातशहा एकादोरोजा पुसतात कीं तुकोजी होळकर व अलीबहाद्दर कोठपर्यंत आले. बोलून देखील दाखविलें पाटीलबुवांच्या फौजेने कांहीं होणार नाही. नवी फौज येईल तें काय करील ते करो.''

ह्यावेळीं पाटीलबाबांस रणजितसिंग जाट येऊन मिळाला ही गोष्ट खरी. ही फौज पन्नास साठ हजार आहे, परंतु रोहिले व बेग यांजवर शेर आहेत. मांड धरून झुंझ पावत नाहीत. तूर्त यवनांचे फौजेचा दाब जोराचा आहे असेंही हिंगणे यांनीं लिहिले.

पाटीलबुवांची याप्रमाणें फौजेची बाजू जरी लंगडी होती, तरी पण पादशहाची त्यांचे-संबंधीं आस्था विशेष होती. पाटीलबुवांनीं त्यांस वेळींअवेळीं पैका पुरवून राजी ठेविलें होते. यावेळीं बाबा व अलीबहादर पातशहापासीं येऊन दाखल झाले म्हणजे पातशहा पूर्ववत प्रमाणेंच हजर आहे. खुद्द जातीनें नेट देऊन एखादा कारभार करावे ऐशीं त्यांची प्रकृती नाहीं. आतां जागा रिकामी आहे. कोणी माणूस ऐसा नाहीं कीं, सलतनीस आळा घालील. जैसें साताऱ्यांचें संस्थान आपले हातीं आहे. तोच प्रकार येथीलही प्रस्तुत आहे. परंतु येऊन सत्वर सांभाळणें असा सल्ला आहे. पुणें व दिल्ली एक होऊन जाईल ऐसा समय आहे. मातब्बर फौज व शहाणे माणूस सरदार कीं, सर्वांस वरीस दोन वर्षे मायेंत घेऊन अवघ्या मुलुखांत आपला काबू करून घेतां येईल. असे 'हिंगण्यांनीं' पुण्यांस कळविलें.

ह्यावरून स्पष्ट दिसेल की संस्थानिक व खुद्द पातशहा हे तुकोजीरावांची व अलीबहादराची वाट किती आतुरतेनें पाहत होते. तसेच उत्तर हिंदुस्थानांत कायमचें वर्चस्व स्थापण्यास किती अमूल्य संधी चालून आली होती हेंही दिसून येईल.

आतां तुकोजीराव व अलीबहादर या संधीचा किती उपयोग करून घेतात हे पाहणें आहे. कैफियतकार म्हणतात, ''अगोदरचे दंश, त्याची सफाई पांच वर्षे संशयाची निवृत्ती तुकोजी होळकर सुभेदार यांचे लक्षांतील निदर्शनें फार भरारें झाली.'' तुकोजीराव फौजेसह इ. स. १७८८ च्या फेब्रुवारीत वाफगांवींहून निघाले. तत्पूर्वी मातोश्रीसाहेबांस पत्रें लिहून त्यांचे आशीर्वाद संपादिले होते. अलीबहादर पूर्वींच पुण्याहून निघाले होते ते वैशाख मासांत महेश्वरास येऊन पोंहचले. पांच सात दिवशीं तुकोजीरावही येऊन पोहचले. मातोश्रीसाहेबांनीं दोघांसही मेजवानी केली. पुढें तुकोजीरावांच्या नातीचें लग्न उभे राहिले. याउपर पाटीलबाबांचीं पत्रें आलीं कीं, 'माळव्याकडे रांगड्यांचा उपद्रव झाला आहे. आगऱ्याकडे इस्माईल बेग व गुलाम कादर यांनीं दंगा मांडला आहे. त्यास तोंडावर आम्हीच आहोत. दोन्ही तोंडें आम्हांस सांभाळणार नाहींत.' पुढें कांहीं दिवसांनीं माळव्याकडील गडबड थांबली. तेव्हां आगऱ्याचा उपराळा होऊन इस्माईल बेगाचें पारिपत्य व्हावें असे पुणें दरबारांतून हुकूम सुटले. अलीबहादरांनीं त्याप्रमाणें सुभेदारामागें टुमणें लावलें. पण तुकोजी हालत नाहींत असें पाहून अलीबहादर निघाले. थोड्या वेळांत पाराशर दादाजींस

अलीबहादरकडे पाठवून सुभेदारांनीं त्यांस माघारीं आणिलें आणि सप्टेंबरमध्यें दोघेही उदेपूरनजीक कस्बे अकोल येथें येऊन पोंहोचले. यावेळीं तुकोजीरावांबरोबर त्यांचे दिवाण नारो गणेश व वकील पाराजीपंत, शिंद्यांकडील सरदार इंगळे आणि काशीराव होळकर इत्यादि मंडळी होती.

राजश्री सुभेदार उदेपूराजवळ आले हे वर्तमान राणा भीमसिंगास कळतांच त्याने आपलेकडील मातब्बर माणूस जाबसालास पाठविला. त्याचप्रमाणें कृष्णगडकर, कोटेकर, जोधपुरकर, वगैरे लहानमोठ्या राजेरजवाड्यांचे वकील उभयतांस येऊन भेटले. प्रत्येकाचा हेतू पाटीलबाबांविरुद्ध तक्रार व आपआपल्या मतलबाचा होता.

याचवेळीं उत्तरेंत पाटीलबाबांची स्थिती सुधारत गेली हें खालील बाबींवरून लक्षांत येईल. इस्माईल बेग व गुलाम कादर ह्यांनीं आगऱ्यास वेढा घातला. त्यावेळीं किल्ल्यांत भक्षावयास कांहींच नव्हते. पाटीलबुवांच्या आज्ञेनें रणजितसिंग जाटानें तीनशें उंट गल्ला व हजार दोन हजार बैल भरून आपली फौज समागमें देऊन गल्ला आगऱ्याकडे रवाना केला. तेव्हां दोन गोल फौजेचे इस्माईल बेगाचे फौजेशीं झुंझास उभे राहिले. मराठ्यांनीं व जाटांनी मोठी छाती करून त्यांचे फौजेत घोडे घातले. दोन घटका तरवार चालली. इस्माईल बेगानें साता रावतानिशीं पळून यमुनेंत घोडे घातले. गुलाम कादरखान चौस्वारनिशीं याचे फौजेत दाखल झाले. इस्माईल बेग याजकडील शेसव्वाशें तोफा व पलटणें पेशजी जयपूरचे मुक्कामीं राजश्री पाटीलबाबांकडील फुटोन जैपूराकडे गेली होती. ते तमाम झुंझाचे समयीं मूळ ठिकाणावर आले. आगऱ्याचे किल्ल्याचा बंदोबस्त करून राणेखानभाई व रायाजी पाटील फौजेसह श्रीमथुरेस आले. पाटीलबुवाही तेथें येऊन पोहोचले. (ता. २० जुलाई इ. स. १७८८) याजमुळे सगळें पारडें फिरलें. मराठ्यांचा डाव मोगलांवर व रांगड्यांवर पुन: स्थापित झाला. पातशहांनीं हें वृत ऐकिल्ल्यावर राजश्री पाटीलबाबांस मुखत्यारीची वस्त्रें व खिल्लत श्रीमथुरेस पाठवून आनंद प्रदर्शित केला.

पराजित झालेले गुलाम कादरखान व इस्माईल बेग दिल्लीस गेले. तेथें पातशहाचे हुजूर पाटीलबुवांचे दोन हजार राऊत होते. लढाईचे तोंड लागतांच मोंगल दगा करून गुलामांशीं जाऊन भेटले. तेव्हां मराठी सैन्य फरीदाबादेस गेले. किल्ला मराठ्यांचे हातून सुटला. गुलाम कादर फरीदाबादकडे वळला. यावर पातशहा काकुळतीस येऊन पाटलास लिहूं लागलें कीं मातब्बर सैन्य व सरदार पाठवून द्याल तरी दिल्लीची स्थिती राहील आणि तशीच स्थिती घडली. गुलाम कादरानें पातशाही माणसें उठवून आपली बसविलीं. बादशहास व बेगमांस तसदी केली. उन्हांत गच्चीवर उभ्या करून मारविलें. ही त्यांची दुष्कृत्यें ऐकून त्याचा पाठलाग व पारिपत्य करण्याकरितां मराठी फौजा त्या सुमारांनी निघाल्या व यमुनापार झाल्या. सुभेदार तुकोजीराव मेवाडाकडे असतां त्यांस निघून येण्यासाठीं निकडीची पत्रें पाटीलबुवांनीं पाठविली. याच वेळीं गुलाम कादर व इस्माईल बेग यामध्यें फूट पडून बेग पाटीलबुवांस येऊन मिळाला. पूर्वी फुटून गेलेली फौजही पाटीलबुवांस येऊन मिळाली. अशा मजबुतीनें पाटीलबुवा कादरवर चालून गेले. कादर पळत सुटला आणि मराठी फौजा

त्याचा मागें लागल्या. सारांश, पाटीलबुवांत आतां नवा दम आला होता.

आतां राजपुतान्यांत असलेले सुभेदार व अलीबहादर यांजपुढें तक्रारीचे ढीग पडले होते. अलीबहादराचे मनांत कीं सुभेदारांस व राजेरजवाडे यांची अनुसंधानें आलीं आहेत हीं घेऊन पाटीलबाबांकडे जावें म्हणजे मोठा डौल पडेल. तुकोजीरावांचे सल्लागार, त्यांचे दिवाण नारो गणेश आणि वकील पाराशरदादाजी हे मुख्य होते. नारोपंत म्हणाले, ''एक वेळ पाऊल चुकले, त्याची सफाई करावयास सात-आठ वर्षे लागली. याउपर मसलत करणें ते बाईंस विचारून करावें कीं जेणें करून सरकाराचा शब्द न लागे आणि तुमचें कल्याण होय ऐसें करणें.'' पाराशरदादाजींचें मत पडलें कीं, 'ही जीं राजकारणें आली आहेत ती मान्य करावींत.' सुभेदारांस हा शेवटला शब्द जरी आवडला तरी मातोश्रीसाहेबांचा विचार घेण्यांचे त्यांनीं ठरविलें.

सन १७८८ च्या नोव्हेंबरांत भीमसिंगाचे कारभारी ह्याचे कबिले होळकरांचे जहागिरीत होते. पाटीलबुवांनीं दोन हजार फौज व गाडर हजार पाठवून निंबाहेड्याहून कबिले घेऊन गेले. पाटीलबुवांकडून यथाविभाग वाटणीबद्दल कांहीं एक उत्तर मातोश्रींस गेलें नव्हतें आणि हा वर उल्लेखिलेला निंबाहेड्याचा उद्विग्नकारक प्रकार. त्यामुळें बाईसाहेब मनांत उद्विग्न. येथें पुन्हां सुभेदार अस्थिर झाले. तिकडे इस्माईल बेग पाटीलबुवांस मिळाला. नजीब कुलीखान मृत्यु पावला. त्याची जहागीर पाटीलबुवांचे ताब्यांत आली. गुलाम कादर दिल्लीची लूट घेऊन यमुनेपार पळाला होता. त्याचा पराभव होऊन तो व त्याचा मुलूख पाटीलबुवांचे ताब्यांत आला. असा चारी बाजूनें विजय संपादून पाटीलबुवा पातशहाचे मर्जीत चढले. गुलाम कादर पाटीलबुवांचे कैदेंत मथुरेस असतां पाटीलबुवांकडून तुकोजीरावांस निकडीची पत्रें गेली. तुकोजीराव अनिश्चित होते. उगीच दिवस मात्र घालवीत होते. मोठ्या मोहिमेंत सामील होऊन एखादी मोठी सरकार कामगिरी करून दाखविण्याची संधी फुकट जात होती. लहानसहान लढाया चिरडण्यांतच त्यांचे दिवस जात होते. नारो गणेश कामांत होते, नव्हते असाच प्रकार चालला होता. तुकोजीरावांनीं पैशाची मागणी केली त्यावेळीं (मे इ. स. १७८९) मातोश्रीसाहेबांनीं जाब धाडिला तो येणेंप्रमाणें. 'मागितलेले स्वारी खर्चास-बारा लक्ष रुपये आणविलें त्यास महालाचा प्रकार तुमचे ध्यानांत आहे. देशीं महाल आहेत त्यांचा कारभार तुम्ही दहा वर्षे केला. इकडील महालाचा कारभार मी करीत होतें त्याचा झाडा साल दरसाल पाठवीत होते. देशीं महाल यांची माहितगारी मजला नाही. इस्तकबीलपासून मागील हिशेब पाहीन. नाहीतर तुमचे तुम्ही कमाविसदारास लिहून ऐवज घ्यावा. मजकडील महालांचा ऐवज देणें तो मास पक्षांत पाठवून देईन. जर तुम्ही म्हणतां तर देशीं महाल आहेत त्यांची घालमेल करीन. हिशेब मागील पाहीन. हें कबूल असेल तर लिहून पाठवावें त्याप्रमाणें बारा लक्षांची सरबराई करून पाठवीन.'

ह्या पत्रांनंतर सुभेदार कनास नदीवर भगवंतगड, इंद्रगड, लालसोट करीत करीत मथुरेच्या अलिकडे इ. स. १७८९ जून महिन्यांत आले. पाटीलबुवांची व त्यांची भेट मोठ्या रंगांत व प्रेमांत झाली. मेजवान्या झडल्या. अलीबहादरही भेटले. तोफखाने सुरूं होऊन

पूर्वरंग उत्पन्न झाला. सारांश, तुकोजीराव या हिंदुस्थानाचे मोहिमेवर पुण्याहून निघाल्यापासून सुमारें एकवीस महिन्यांनीं पाटीलबुवांस मथुरेस येऊन मिळाले. पहिल्या भेटीत पाटीलबुवांनीं निंबाहेडाच्या बाबीची गोष्ट काढून थोडेसें नमते घेतले. दोघांमधील रहस्य बहुतच चाललें आणि अलीबहादरांनीं पुण्यास लिहिलें, 'परिणाम लागेल तो खरा.' पाटीलबुवांनीं बाईसाहेबांसही पत्रें लिहिलीं कीं 'ज्याप्रमाणें सुभेदार आपणांस, त्याप्रमाणें मजला जाणावें. मागे जी गोष्ट झाली ती झाली; पुढें उभयपक्षीं एक विचारे चालावे.' पाटीलबुवा अलीबहादर यांस पहिल्या भेटींत बोललें कीं 'तुम्ही सरकारकडून आमचे कुमकेस आलां. तुम्हांजवळ चौघडा व जरीपटका नाही. आम्ही देतो.' अलीबहादरानें नाकारल्यावरही पाटीलबुवांनीं आग्रहाने दिला. पण हे रंग फार दिवस टिकले नाहीत. अलीबहादरासंबंधीं दोन प्रकरणें उपस्थित झालीं. पहिलें, वृंदावनास एक नागर ब्राह्मणीन पाटीलबुवांविरुद्ध कांहीं प्रयोग करीत होती. तिला पकडल्यावर तिने हिम्मतबहादर गोसाव्याचे नांव पुढें केलें. पाटीलबुवांनीं अलीबहादरास सल्ला पुसला. त्याने सांगितलें कीं, 'अन्याय लागू झाल्यास पारिपत्य लवकर करावे. दोष नसल्यास उगेच वैर पाडूं नये.' पाटीलबुवांनीं गोसाव्यास पकडून लगेच तोफेच्या तोंडी द्यावे असा निश्चय केला. हा गोसावी बादशाही अंमलातील चार-पांच हजार फौजेचा सरदार. चौकशी न करितां त्याला शिक्षा देणें लोकांस कसेसेच वाटू लागले. शिवाय हा गोसावी इतर बादशाही सरदारांप्रमाणें मराठी सैन्याला येऊन मिळला होता. त्याला इतरांप्रमाणें पाटीलबुवांनीं वचन देऊन व मुलूखही देऊन आपल्या कक्षेत घेऊन ठेविलें होते. पाटीलबुवांनीं हे सर्व विचार व सल्ला बाजूस ठेवून हिम्मतबहादरास पकडलें. येतांना अलीबहादराचे फौजेंतून आले. गोसाव्यानें जरीपटका शेंपन्नास हात पाहून, घोड्यावरून उडी टाकून, जरीपटक्याखाली जाऊन बसला. तेव्हां अलीबहादरास बहुत कठीण पडलें. अलीबहादरानें आपल्या मंडळीस खलबतास बोलविले. तेव्हां भिकाजीपंत पाळंदे बोलले कीं ''हिम्मतबहादरास द्यावयाचा नाहीं. याचेपायीं जें होणें असेल तें होवो इत्यादि.'' पुढें हे प्रकरण सुभेदारांकडे गेलें. सुभेदारांनीं उत्तर धाडिले. 'मूल खरें पण धन्याचें. यद्यपी अमार्गही असल्यास त्याची अमर्याद करणें आपल्यास अश्लाघ्य. ही गोष्ट तर मार्गाची दिसते तेव्हां याचा विचार होऊन व्हावें हे उचित.' येथें बेबनावाचा पहिला प्रसंग झाला.

अलीबहादर व पाटीलबुवा यांत दुसरें प्रकरण उद्‌भवलें तें अलीबहादराच्या खर्चाच्या संबंधातलें होय. इ. स. १७८९ च्या जानेवारीत अलीबहादर आणि पाटीलबुवा ह्यांच्या भेटी, मेजवान्या, वगैरे झाल्यावर खर्चाच्या देण्याबद्दल जेव्हां बोलणें सुरू झालें तेव्हां पाटीलबुवांनीं उत्तर केलें, 'आपण दिल्लीस जावें, तेथील बंदोबस्त करावा. सरकारी मुलूख आम्हांकडे चाळीस लक्षांचा आहे. पातशहाकडे चाळीस लक्षाचा व पातशाही सरदार यांजकडे जायदाद सहासष्ठ लक्षांची आहे. आम्हांकडे मुलूख आहे त्याची वाटणी आम्हांस नको. आम्ही घेत नाही; सरकारांत लावतों. आमचे भाऊ सुभेदार त्यांस वाटा सरकारांतून घ्यावयाचा असल्यास द्यावा. आमचा आग्रह नाहीं. बादशाही मुलूख आहे तो त्याचे खर्चास पाहिजे व जायदादवाल्याचा त्यांजकडेस राहील असें बोलले.'' ''त्यांस सरकारांतून मुलूख

देणार तो उजाड आहे. पाटीलबुवांचे म्हणणें कीं पुण्यास लिहून आणखी फौज आणवावी व खर्चाची तजवीज करावी आणि मुलूखाचा बंदोबस्त राखावा.'' अशा अर्थाचें पत्र अलीबहादरानें पाटीलबुवांचें म्हणणें म्हणून नानांस लिहिलें. पांच सहा महिने अशा वादांत गेले. शेवटीं धरणींपारणीं बसण्याची वेळ आली. बहादराने लिहिण्यावरून नानांनीं बुंदेलखंडावर वरात पाठविली आणि मोठा गवगवा मारला. हें प्रकरण निमटतें तोंच आणखी एक नवीन उभें राहिलें तें असें : बुंदेलखंडांतील राजे यांजकडून वकील आले. त्यांचे बोलणें आमचा कारभारी आमच्याशीं बदलला आहे, त्यांचे पारिपत्य करून बंदोबस्त करून द्यावा व वीस लाख रुपये द्यावे व पांच लक्षांचा मुलूख व दोन लाख दरबाराचा खर्च याप्रमाणें देतों. यावर नानांचे बहादरास पत्र आलें कीं 'बुंदेल्यांचा व सरकाराचा भाऊपणा व अगत्य यांचा बंदोबस्त तर जरूर करावयाचा; याजकरितां पाटीलबुवांस पुसून तिकडे जावें.' पाटीलबुवांनीं सहारणपूर वगैरे महाल बहादरास लावून दिले. परंतु ते महाल दंग्यामुळें ओस पडले. लावणी नाहीं असा प्रकार. शीख तर चैन पडू देईनात. ही हकीगत बहादरांनीं पाटीलबुवांस विदित केल्यावर पुढें दुसरें महाल लावून देऊं असे उत्तर मिळालें, अडचणींत आणखीं अडचणी येऊन मिळूं लागल्या, बुंदेलखंडांतील डंघई संस्थान व सरकार यांचा भाऊपणा पूर्वीपासून असें नाना बहादरास कळवितात, तर पाटीलबुवा म्हणतात आमचा त्या संस्थानांतील खंडणीपैकीं पैका येणें आहे आणि आम्ही फौज पाठविणार. याप्रमाणें गोसाव्यावे प्रकरण, बहादराच्या खर्चाचा बंदोबस्त आणि बुंदेलखंडातील राजकरण अशा त्रिविध अडचणी. या तीन सरदारांपुढें उभ्या राहून संबंध प्रकरण नानांपुढें गेले. त्याचे उत्तर सुभेदार तुकोजीरावांस आले. त्यातील मुद्दे येणेंप्रमाणें. 'गोसाव्याचा मजकूर तो किती. पहिल्यापासून पाटीलबाबा सांगत गेले तेच बहादर करीत गेले. पाटीलबुवांचें गृहस्थाचे समक्ष गोसावी यांस वचन द्यावें तें दिले नाहीं ही गोष्ट बहादराकडून चुकली. परंतु वचन देऊन गुंतले. आता दुसरा जाबसाल पडल्यास त्यांनीं तरी कैसें करावें. झांशीस ठेवावयाचे असे आपण सांगितलें तें योग्यच होय. त्याजकडील हत्ती, घोडे, तोफा वगैरे सरंजाम आहे त्याविशीं बहादरास लिहिलें आहे. आपण त्यांचे विचार पाटीलबुवांकडे द्यावे आणि समेट होत असल्यास करावा. बुंदेलखंड प्रकरण पूर्वी श्रीमंत कैलासवासी बाजीरावसाहेब व हिंदुपत राजे यांसी भाईपणा झाला व मुलखाच्या वाटण्या झाल्या याची माहितगारी आपणांस आहे. हिंदुस्थानांतील बंदोबस्त प्रकरणीं उभयतां सरदारांस पत्रें येत गेलीं. उभयतां थोर सरदार दौलतींतील जीं कामे पडत गेली ती उभयतांस लिहिण्यांत आली. एक हिंदुस्थानचाच दाखला कशास पाहिजे, परंतु बुंदेलखंडाची वाटणी सरकारांत आली त्यातील हिस्सा कोणास दिला नाहीं हें आपणांस माहीत आहे. बुंदेलखंडात अलीबहादर गेले म्हणजे हिंदुस्थानाचा बंदोबस्त उभयतांकडून केला जातो असें नाहीं. बुंदेलखंड एक संस्थान. आपण उभयतां पातशाही बंदोबस्तावर नमूद आहेत. आपण पाटीलबुवांशीं बोलून बहादराची रवानगी तिकडे करावी. तिकडे (बुंदेलखंडांत) कोणीतरी सरकारांतून गेलें पाहिजे आणि बहादर गेल्यास ठीक पडेल.'

या पत्रांनंतर कांहीं दिवसांनीं नानांचे जे पत्र सुभेदारांस आलें त्यांत 'देशी यावयाचा

प्रकार लिहिला त्या अशा गोष्टींसाठी देशीं यावयाचे करणार हे चांगलें कीं काय? व देशीं उभयतां आला असतां तिकडील बंदोबस्त राहील न राहील याचा विचार आपण उभयतांनीं करून करणें ते करावें.' नानांच्या या पत्रावरून ज्या गोष्टी निदर्शनास येतात त्या ह्या होत.

१ अलीबहादर व पाटीलबुवा यांच्यात तीन बाबींचा मतभेद जाहला होता. गोसाव्याचे प्रकरण, अलीबहादराच्या खर्चाची बेगमी आणि बुंदेलखंडाचें राजकारण.

२ ही तेढ सुटावी म्हणून सुभेदार तुकोजीरावांनीं मध्यस्थी करावी.

३ गोष्ट अधिक बिथरूं नये म्हणून अलीबहादराची बुंदेलखंडाकडे युक्तीनें रवानगी करणें. पण नानांच्या या धोरणास यश न येतां तुकोजीरावांचा रंग पाटीलबुवांच्या रंगांत मिळून गेला आणि दोघांनीं मिळून मुख्य कार्याकडे काणाडोळा करून देशीं जाण्याची दहशत घातली. येथें सुभेदारांस आपल्या दर्जाचा विसर पडला असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

ह्याप्रमाणें सुभेदार पाटीलबुवांच्या कच्छपीं पूर्णपणे गेल्यावर कांहीं दिवसांनीं खरी स्थिती त्यांस उमगूं लागली. ती याप्रमाणें : नवीन सुटलेल्या मुलखांत उभयतां सरदार आणि पेशवे सरकार अशा तीन वाटण्या होत असत. त्याप्रमाणें इस्माईल बेग, नजब कुली व गुलाम कादर ह्यांच्या मुलखाची जी वाटणी व्हावयाची त्या वेळीं पाटीलबुवांनीं जो मुलूख सुभेदारांस दिला त्या संबंधात सुभेदार मातोश्रींस लिहितात. 'राजश्री पाटीलबावांनीं वतनी व इनामीसुद्धां नऊ लक्ष एकवीस हजार रुपयांचा मुलूख ठरवून दिला. त्यापैकीं तूर्त दोन लक्ष दहा हजारांचे महाल गणमुक्तेश्वर व हपाड या दोन्ही महालांच्या सनदा करून दिल्या. सनदात सायर व इनामी गांव वजा करून पाठविले. त्यावरून आम्ही उत्तर दिले कीं आमचे महालांत दुसरा अंमल कसा चालेल? त्यास सायरसुद्धां महाल लावून द्यावे, नाहीं तर सनदा नकोत व सनदा परत पाठविल्या त्या पाटीलबुवांनीं ठेऊन घेतल्या.' बाईंचें उत्तर आलें कीं 'आधीच वाटणी वाजवीचे रूईनें केली नाही. त्यामध्येंही मामलतींत दुसरा अंमल राहून, नित्य उठून कज्जाच राहील. त्यास निस्तुक महाल लावून घेणें.' बाईंच्या या उत्तरानें पाटीलबुवा जे रुसले ते दोन लाखांच्या सनदा त्यांच्याकडेच राहिल्या. नऊ लाखांची जी वाणी निघाली होती ती हवेतच विरली. सारांश, इ. स. १७८९ त होळकरांची स्थिती कशी जाहली हे आता पाहूं या. पानिपतानंतर सर्व मराठी सत्ता उत्तर हिंदुस्थानांत नष्टप्राय जाहली. ती स्थिती सुभेदार मल्हाररावांनीं आमरणांत सुधारत आणली. पश्चात इ. स. १७७४ पर्यंत कानडे, बिनीवाले व हे उभयतां सरदार यांनीं सुधारून दिल्लीवर शह बसविला. रांगडे, पठाण व जाट नमून वागूं लागले. इंग्रजांसही मराठ्यांचा दरारा भासूं लागला. यानंतर तुकोजीराव जे दक्षिणेंत गेले ते बारभाईच्या कारभारांत व टिपूच्या स्वारींत इतके गुरफटून गेलें कीं त्यांस उत्तर हिंदुस्थानातील संपादित सत्तेकडे पाहण्याचें झालें नाहीं. याच पंधरा वर्षांचे अवधींत पाटीलबुवांनीं पातशाही काबीज केली. एक दोनदां पराभूत झाले, तरी पठाण, रोहिले व इंग्रज यांजवर त्यांचा वरचष्मा चढला. अडचणीच्या वेळीं होळकरांची

त्यांनीं याचना केली. होळकरांनीं संधीचे महत्त्व ओळखिलें नाहीं आणि शेवटीं ते इ. स. १७९० त उत्तर हिंदुस्थानांत हतप्रभ होऊन बसले.

या वेळची एकंदर स्थिती खालील सरकारी दप्तरांतील पत्रांवरून निदर्शनास येणारी आहे. पत्र ता. २० आगस्ट इ. स. १७८९ चें आहे.

श्रीमंत मातोश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेशी. आज्ञाधारक कृपाळसिंग कृतानेक राम राम विज्ञापना. श्रावण वद्य १४ मुकाम लष्करनजीक मथुरा वृंदावन. यानंतर इकडील मजकूर गुदस्ता मेवाड प्रांतीं श्रीमंत यजमानसाहेब होते. त्या काळीं हिंदुस्थान प्रांतीं फौजेची अवाई पडून राजेरजवाडे तुरुक भयभीत होते. तेथून हडोतींतून निघोन जयपूर प्रांतीं आले. त्या कालींही बहुतच भ्रम होता आणि राजश्री पाटीलबुवांकडूनही हरघडी पत्रें व कारकून येत होते कीं आपण जलदी यावें. आल्यानंतर सारें आपले मनोदयानुरुप घडून पुढें मसलत होणें ते आपले आमचे विचारें होईल. अशीं कित्येक एकपणाचे विचारें पत्रें येत होती. त्याकाळीं मथुरेस येण्याचा मजकूर करीत असतां कारभारी यांनीं संशय घेऊन दिक्कत घालावी. तेव्हां सहजच मसलत राहावी. त्या काळीं पाटीलबुवांची मर्जी याचे भेटीच्या अंतर्भूत होती. परंतु कारभारी यास वावडे होते. त्यातहीं यजमानसाहेबांचा जाण्याचा निश्चय पक्काच राहिला. तेव्हां पुढील अंदेहे बचावाचे बांधून कूच करून जाटाचे मुलखांत आलो. तेथून कूच करून जमेथगांव जाटाचे तेथें आलो. तेथें राजश्री पाटीलबुवांकडील आबा चिटणीस आले. भेटी यजमानसाहेबांच्या झाल्या. कारभारीसह तेथें तरी पाटीलबुवांनीं सामोरे यावे. मथुरा सोळा कोस. तेथेंही मसलत ठरली कीं, आबा व नाना यांनीं मथुरेस जाऊन खातरजमेची चिठ्ठी आली की कूच करावें. असें ठरून कूच करून उभयतां गेले. नानांची पाटीलांची भेट होऊन बोलणे होऊन यजमानसाहेबांस पत्र आलें. कूच केले, थेट मथुरेपर्यंत आले. कोणी सामोरें आले नाही. मथुरा वृंदावनाचे मध्यें मुकाम नेमून दिला. तेथें भेटी व्हावयाच्या असें ठरलें. पाटीलबाबांकडून तंबू वगैरे सामान येऊन कचेरींत भेट व्हावी. तेव्हां यजमानसाहेबांनीं असें पाहून, पाटीलबाबांची स्वारी तिकडून आली, यांची इकडून आली, तेव्हां जमिनीवरच पालख्या उतरून जमिनीवरच बसून अधिकारी भले लोकांच्या भेटी झाल्या. पाटीलबुवा आपले लष्करांत गेले. हे आपल्या लष्करांत आले. परंतु ज्या रीतीने पहिला बेत होता त्याच रीतीनें जाहला. श्रावण शुद्ध १० उजाडल्यानंतर आपलें बोलणे बोलोन मतलब साधून कूच करावे, तर पाटीलबाबा आहेत. आधींच विषम आले होते. तूर्त केवळ सन्निध आले त्यापक्षीं मायावी माया घालून अलीबहादराचे सरदार त्याप्रमाणें यांस राखावें असा त्यांचा मनोदय. पण पाटीलही त्याचप्रमाणें दिसत आहेत. हिंदुस्थान प्रांतींचे वगैरे वकील प्रांतांतील दहा फिर्यादी झाडून पाटीलबाबांकडे; इकडोन किमपी नाही. कांहीं काम लागले तर हे त्याजकडे जातात, परंतु त्यास येणें नाही. बरें कोणी मसलतदार तरी. चौघे मराठी मुत्सद्दी तेही नाहीत. एक ब्राह्मण आहे तो रंग पाहून वर्तन करितो. 'गंगा गये गंगादास मथुरा गये मथुरादास' असें नाहीं कीं छाती चालवून धन्याचा लौकिक राखून मसलत करावी हें किमपी नाही, केवळ धन्यांनींच छाती चालवावी तर मागें हाल

तरी पडतात कीं नाही. कारभारी अथवा पैका तेंही नाही. पूर्वी श्रीमंत कैलासवासी सुभेदारसाहेबांसच हिंदुस्थान प्रांतीं धनी जाणत होते. पेशवे आदिकरून कोणी पुसत नव्हता. हल्लीं या प्रकारचे वर्तन आहे. पूर्वी पाटीलबुवांची पत्रें येत होती, तेव्हांच कूच करून आले असते तरी आजपर्यंत मसलत सांभाळून पुढें अटकेपर्यंत जाऊन फत्ते केली असती आणि इकडील मुलूख यांस राजी होता. आतां हें चलन पाहून सर्वांसच संशय उत्पन्न झाला कीं येथें दैवत नाहीं, जे आहे ते पाटीलबुवाच. राजश्री अलीबहादर यांनीं तरी इकडून दोन कामें चांगली केली. गुलाम कादर धरिला व हिम्मतबहादर पाटीलबुवांचा चोर पाठीस घातला. पाटीलबाबांपासून त्यांचा चोर यांनीं पाठीसी घालावा हे आश्चर्य झाले. तेणें नक्ष होऊन सर्वांत लौकिक झाला की हेंही प्रस्थ आहे. सरकारांत अलीबहादर यांचें लिहिणें व पाटीलबाबांचे गेलें. परंतु ज्या गोष्टीची इरे धरली ती गोष्ट शेवटास नेईल असें वाटते. हिंदुस्थान प्रांतीं नावाजलें असें एखादें छाती करून काम करणें कोणतेही दौलतींत राहिलेंच नाही. हल्ली राजश्री आबाजी विनायक वानवळे यांस कारभारी मिळोन दहा लाख रुपये कर्ज द्यावेसे ठरवून त्यांस सिरपाव दिला. मोत्यांची माळा, शिरपेंच, हत्ती, पोशाख, वाटणीप्रमाणें मुलूख येईल, तो दहा लक्षांचे पोटीं लावून द्यावा. याप्रमाणें करार ठरवून वस्त्रें बहुमान दिला. तो सावकार पाटीलबुवांचा असोन, पाटीलबाबांनींच त्यांस पाठविलें असेल असें वाटते. अशी पहिली रीती पाहून हल्लींच्या रीतीनें बहुत चित्तास खेद होत आहे तो पत्रीं कोठवर लिहावा. ज्यापाशीं आहे त्याची बढती दौलत होऊन सर्वांत नक्षा राहून आनंदाचे दिवसांत शेवट लागावा असे चित्त आहे. रात्र आहे. मसलतीचें मानानें शेवट गोड दिसत नाहीं. आपले पुण्यप्रतापें करूनच यश येईल. हेतू हा पाहून आपल्या चरणापाशीं सर्व सोडून यावें असें वाटतें. यापूर्वीच लिहावें परंतु निवडलें नव्हतें, भ्रम होता, आतां पाऊल समजलें त्यावरून सूचनेस विनंती लिहिली आहे, सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पैवस्त छ. २१ जिल्हेज. फसली सन ११९९ मुक्काम महेश्वर.

या वरील पत्रावरून होळकरशाहींत प्रत्यक्ष वावरणाऱ्या व्यक्तीचे अनुभव व विचार आपणांस पाहण्यास मिळतात. त्यामुळें इ. स. १७८९ चे अखेरीस सुभेदार तुकोजीरावांची व त्यांजबरोबर होळकरशाहीची स्थिती काय झाली होती याचा कयास चांगला बांधता येतो. या स्थितीस येण्यास जी कारणें झाली ती जरी यावेळीं अंधुक व अस्पष्ट होती तरी पुढील काळानें ती स्पष्ट करून दाखविलेलीं आपणांस सहज दिसून येतील. पैशाचा पाठपुरवठा जाहला नाहीं हे विधान पूर्णपणें सिद्ध होण्यास लढाईचे खर्च, त्यांतील वाटणी, एकंदर उत्पन्नाची व खर्चाची मिळवणी, हीं सबंध डोळ्यासमोर आल्याशिवाय वरील विधान पूर्ण स्थिरता पाडूं शकत नाही येवढेंच सध्या आम्ही नमूद करून ठेवतों.

इ. स. १७९० उजाडले. तिघा सरदारांची जी विमनस्कता झाली होती तीत आणखी भर पडली. नारो गणेश रांझेकर यांचें प्रकरण उद्‌भवून तें इतके विकोपास गेलें कीं त्यांत त्यांची स्वत:ची आणि शरीफभाईची आहुती पडली.

नारो गणेश हे प्रथम कारकून होते. चंद्रचूडाच्या पश्चात् मातोश्रीसाहेबांच्या शिफारसीनें

ते कारभारी झाले. कारभारी झाल्यादिवसापासोन ते तुकोजीरावांच्या बरोबर असत. थोडक्यांच काळात तुकोजीरावांवर त्यांची छाप बसली. नाना फडणीसांच्या विरुद्ध मोरोबादादाकडे याच नारो गणेशांनीं तुकोजीरावांस वळविले. पुढें कारागृहांत पडले. तेथून पाटीलबुवांच्या मध्यस्थीनें ते सुटले. उत्तर हिंदुस्थानात तुकोजीराव आले त्यावेळीं नारो गणेश बरोबर होते. सुभेदारांची व पाटीलबुवांची भेट जुळविण्यासाठी नारो गणेश पुढें निघाले. त्यांस पाटीलबुवा तीन मजल सामोरें आले. यावरून नारो गणेश हें केवढें प्रस्थ होतें याची कल्पना बांधतां येईल. अलीबहाद्दर यांनीं म्हटल्याप्रमाणें नारो गणेशाचा व पाटीलबुवा यांचाही रंगात रंग मिळून गेला. नारो गणेश सेवक होळकरांचे आणि मुखत्यार शिंद्याचे असा प्रकार होऊं लागला. मुलखाच्या वाटणींत हा प्रकार जास्ती झळकूं लागला. सिबंदीची वाटणी हा घरगुती प्रश्न उद्‌भवतांच सेव्य सेवक गांवाची मर्यादा यांचेकडून उल्लंघिली गेली. प्रत्यक्ष यजमानावर यांनीं तोंडसुख घेतलें. यजमानांच्या अगदी अंतस्थ घरगुती गोष्टींत गडबड करूं लागले. यांनीं जयपुर प्रकरणांत आपला हात ओला करून घेतला अशी गुणगुण नानांच्या कानापर्यंत गेली. यापरी कारणांत कारण गुंतून एकदम मोठा स्फोट झाला. यजमानांच्या आज्ञेनें नारो गणेशांवर चौकी बसली. हत्तीच्या श्रृंखला नारोबांचे मानेवर पडल्या. राखेचे तोबरे तोंडास लाविले. शरीफभाईसारखे सत्वस्थ मध्यस्थीस आलेले हिरमुसले होऊन माघारीं गेले. नारो गणेशांनीं तीस लाख रुपये भरले. सुभेदार एक कोटीवरून हालेनात. शेवटीं नारो गणेश यांनीं आत्महत्या करून घेतली. हे प्रकरण जवळ जवळ सबंध वर्षभर चिघळत होतें. गवगवा मोठा जाहला. होळकरांच्या इभ्रतीस धक्का बसून पदरांतही कांहीं कायमचा लाभ पडला, असें नाहीं.

ज्या मुख्य कामासाठीं सुभेदार दक्षिणेंतून उत्तरेंस पुणें दरबारच्या संमतीनें आले होते त्या कार्याकडे आतां वळूं या. लालसोट येथें पाटीलबुवांचा पराभव झाला त्यामुळें एकंदर मराठी साम्राज्याला खालीं पहावे लागले. उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांच्या इभ्रतीस धक्का बसला. या गोष्टीचा पाटीलबुवांवर जितका परिणाम झाला तितकाच पुणें दरबारावरही झाला. अलीबहादर व सुभेदार तुकोजीराव यांची योजना या कार्यावर झाली. ते दक्षिणेतून उत्तरेंत आल्यावर उत्तरेतील आकाश बरेच निरभ्र झाले होते. पाटीलबुवा आगऱ्यास विजयी झाले. दिल्लीस त्यांचा शह बसून गुलाम कादर व इस्माईल बेग यांची फाटाफूट झाली. इस्माईल बेग शरण आल्यावर पाटीलबुवांनीं त्यास कांहीं मुलूख लावून दिला. इतके आपण वर पाहिलेंच आहे. आतां या पुढील सूत्र पहावयाचे.

इस्माईल बेग यांस जें कांहीं मिळाले त्यांत तो संतुष्टच होता असें नाही. अशा स्थितीत मराठ्यांनीं त्याच्या मुलुखांत थोडी बहूत धामधूम केली तेव्हां त्यास आयतीच संधी मिळाली. असंतुष्ट असलेल्या इतर व्यक्तीशीं संधान बांधण्याचें त्यानें सुरू केलें. प्रथम त्यानें अफगाण लोकांचा बादशहा तैमूरशहासीं संधान लाविले. ते जमेना म्हणून मग त्याने शीख व रजपूत लोकांशीं सख्य करून लढाईची तयारी चालविली. त्याचे जवळही मोठी फौज व तोफखाना होता. या फौजेसह जयपूर संस्थानांत पाटण म्हणून एक मोठी

बळकट जागा आहे तेथें आणखी फौज जमविली. याच सुमारास उत्तरेस शिखांनीही डोकें वर केलें. तेव्हां दोन्हीं बाजूस लक्ष देणें मराठ्यांस भाग पडलें. काशीराव होळकर व पाटीलबुवांकडील बाळोजी इंगळे वीस हजार फौजेनिशीं उत्तरेस गेले. इस्माईल बेगाच्या वर बापू होळकर आणि पाटीलबुवांकडून अंबाजी इंगळे असे दोघे गेले.

इस्माईल बेग यांस जोधपूरचा राजा बिजेसिंग यानें राठोड स्वार पाठविले. जयपूरचे कच्छवाहक लोकही येऊन मिळाले. यावेळीं दोघाही संस्थानिकांनीं खंडणीची टाळाटाळी चालविली होती. अशी ही एक बाजू तयार झाली होती. पाटीलबुवांनींही काळवेळ ओळखून आपल्या दोघां सोबत्यांशीं मिळतें घेतलें होतें आणि तिघांच्या सैन्याची वाटणी दोन दिशांस कशी करून दिली हें वर आलेंच आहे.

सन १७९० च्या मार्च महिन्यात डिबाईन, लखबादादा वगैरे सरदार मोठ्या जमावासह ग्वाल्हेरहून निघाले. शत्रूस जेरीस आणण्यासाठीं प्रथम मराठे यांच्या स्वारांनीं आसपासचा मुलूख उद्ध्वस्त करून टाकिला. बेगाच्या तोफा जोरानें चालू होत्या. शत्रूस मैदानांत ओढून लढाई करावी याबद्दल मराठ्यांचे प्रयत्न चालले होते. या मराठी फौजेचे अधिकारी बापू होळकर ह्यांनीं मातोश्रीसाहेबांस पत्र पाठविले त्यातील तात्पर्य येणेंप्रमाणें. 'शत्रूची रसद बंद करावी यास्तव जयपूरकरांचे मुलखांत उतरून शेखावटींत आलो. बागसिंग शेखावत भेटले. मुलूख चाळीस पन्नास कोस मारून ताराज करून दिला. शत्रू मोर्चेबंदी करून मजबूतीनें आहे. ज्येष्ठ शु. १०,११ ला लागोपाठ दोन लढाया झाल्या.' मराठ्यांची फौज तोफांच्या लढाईत थिजली. तेव्हां घोडे घातले. एका बाजूस बापूजी होळकर एका बाजूस इंगळे व पाठीचे बाजूस पेंढारी असे तीन रुखे शह घालून हल्ला केला. तेव्हां इस्माईल बेग कायल होऊन शिकस्त झाला. जिवंत धरून आणला. तोफखाना वगैरे दरोबस्त हस्तगत झाला. याप्रमाणें पाटणच्या लढाईत मराठे विजयी होऊन त्यांनीं शत्रूकडील सुमारे बारा हजार लोक कैद केले. त्यांची निशाणे, हत्ती, घोडे, उंट वगैरे पाडाव केले. या लढाईनंतर तीन दिवसांनीं पाटण शहर मराठ्यांनी काबीज करून जमीनदोस्त केलें. या पाटण शहराविषयीं माचेडीवाल्यांची व इंगळ्यांची जिद्द पडली. सबब दोघेही पाटीलबुवांकडे गेले. ह्यावेळीं पेशव्यांच्या वकीलाने नानांस कळविले कीं एक मातब्बर लढाईचें काम आहे म्हणजे निश्चिंतता होईल आणि तें पुढें खरेंही ठरलें.

यानंतर मराठी फौजेनें जयपूरकडे मोर्चा फिरविला. जयपूर हे संस्थान मुख्यत: होळकरांचे; पण यावेळीं लौकिकदृष्ट्या पुढारीपण पाटीलबुवांकडे. पाटणच्या लढाईनें जयपूरकरांचे डोळे उघडले होते आणि ते तहाची भाषा बोलूं लागले होते. जोधपूरवाल्यास हे कांहीं पटेना. त्याने बिकानेर, रुपनगर, किशनगड वगैरे संस्थानांशीं संगनमत केलें आणि लढाईचा बेत सुरू केला.

मराठ्यांच्या बाजूनें बळवंतराव सदाशिव अलीबहादराकडील तीन हजार स्वारनिशीं, पंचविसांनिशीं गोपाळ रघुनाथ पाटीलबुवांकडून व काशिराम व बापू होळकर अशी फौज जयपुरापासून पंधरा कोसांवर प्रयाग गांवावर तयार झाली. शिंद्यांचे फौजेनें अजमीरच्या

किल्ल्यास १५ आगस्ट १७९० त वेढा दिला. पण कांहीं केल्या किल्ला हातीं येईना. तीस हजार राठोड स्वार मेडते या गांवावर जमा झाले. पाटीलबुवांनीं अजमीरची कामगिरी आपल्यावर घेऊन होळकरांस मेडत्यावर पाठविलें. इस्माईल बेगची वाट रांगडे पहात राहिले. त्या संधीचा फायदा मराठ्यांनीं घेऊन ते ता. १० सप्टेंबर रोजीं शत्रूसमोर उभें राहिले. ता. २ नोव्हेंबरच्या पत्रांत जोधपूरचा वकील लिहितो, ''डिबाईनचा तोफखाना पिऊन खातरेंत न आणितां हजार स्वारांनीं तरवार अशी चालविली जे, दोन कोस माघारें फिरविले. काशीराव होळकर, बापूजी होळकर व अलीबहादरचे दिवाण मागाहून येऊन तलवार चालविली तेव्हां लढाई फत्ते झाली. रजपूत लोक गोळा, छरा, संगीन यांत निम्मे खपलेच होते. निम्मे राहिले त्यांनीं बापू होळकरांचा गोल उठला हे पाहून पलटणचा मुकाबला सोडून यांजवर आले. चार घटका समरांगणीं भाला, बंदूक यांचे काम पडलेंच नाहीं. एकमेकांचे गळा हात घालून घोड्याखालीं येऊन तलवार, कटार, दात अशानिशीं रजपूत जाऊं न दिला. डिबाईननें पाटीलबुवांना लिहिलें, ''तुमचे फौजेकडून कांहीं एक झालें नाही. होळकरांकडील सरंजाम नसता तर करोडो रुपयांचा कारखाना बरबाद होऊन बदनक्षा मुलूखभर होता.'' ही लढाई ता. १० सप्टेंबर इ. स. १७९० त झाली.

याप्रमाणें लागोपाठ दोन युद्धांमध्यें दोन तीन महिन्याचे अंतरांत रजपुतांचा पराभव पूर्णपणें झाला. पाटण व मेडते या दोन युद्धांनीं त्यांची पूर्ण खात्री झाली. यानंतर थोडेच दिवसांनीं अजमीर हें प्रसिद्ध व मजबूत ठाणें पाटीलबुवांच्या स्वाधीन झाले तेव्हां जोधपूरवाल्याचा व पाटीलबुवांचा नोव्हेंबरमध्यें सलूख झाला. अजमीर हातात आल्यामुळें शेजारचे पुष्करतीर्थही सहज मराठ्यांच्या हाती आले, शिंद्यांनीं तेथें देवालय बांधलें, होळकरांनीं अन्नछत्र सुरू केलें. पाटीलबुवांनीं असा विजय संपादिल्यावर आपल्या लष्करापैकीं कांहीं भाग दिल्लीचे रुखास पाठविला. दुसरा एक भाग आगरा व ग्वाल्हेर याचे बंदोबस्तास नेमिला आणि तिसरा भाग शिखांचे पारिपत्यास पाठवून दिला.

ह्या एकंदर घालमेलींत जोधपूर पूर्वींप्रमाणें शिंद्यांचे ताब्यांत आले. जयपूर व उदेपूर ही पूर्वापार शिंद्यांची नसतांही ती आता त्यांस अंकित झाली. सारांश, अलीबहादर खपले, होळकरांनीं शिकस्त केली, तरी पण शिंदे एकमेवाद्वितीय झाले. देवदर्शनास जावे म्हणून ते दक्षिणेंत गेले. पुनः त्यांनीं उत्तर कांहीं पाहिली नाहीं.

आता मातब्बर सरदार उत्तर हिंदुस्थानांत राहिले ते सुभेदार तुकोजीराव होळकर. त्यांचा जयपूर घराण्याशीं पूर्वापार संबध. पाटणचे लढाईत त्यांचा (जयपूरकरांचा) पक्का मोड झाला हे वर आलेंच आहे. जोधपूरकरांचा मेडत्याचे लढाईत तितकाच पूर्ण पराभव झाला होता. पाटीलबुवांनीं ती संधी दवडली नाही. जोधपूरचा वकील लिहितो, ''पाटीलबुवांचा व जोधपूरकरांचा सलूख झाला. साठ लक्षावर मामलत ठरली. पैकीं वीस लक्ष रुपये रोख व वीस लक्षात हत्ती, घोडे, जवाहीर, वगैरे जिन्नस. बाकी वीस लक्ष राहिले, त्यांत साडेतीन महाल लावून घेतले.'' याप्रमाणें जोधपूरकरांचे प्रकरण विल्हेस लावून, कारभाराची व्यवस्था सांगून, पाटीलबुवा दक्षिणेंत गेले.

जोधपूरवाले नम्र झालेले पाहून जयपुरवालेही त्याच मार्गास लागले. जयपूरकर यांनीं रामपुरा खाली करून दिला आणि म्हणू लागले कीं आमचे भाई बेटे आम्हांसीं बदलून आहेत त्यांचे पारिपत्य तुम्ही करावे. याप्रमाणें दिवसगतीवर घालून खराबा करतात. पेशव्यांचा महेश्वरचा वकील लिहितो, 'यांजपाशीं फौजेचा जमाव नाही. त्यामुळें श्रम पावतात, दबाव नाही.' इ. स. १७९१ ता. १५ मे रोजीं स्थिती घडली ती : 'जयपूराकडून रोडूखवास मामलत करावयास राजेश्री सुभेदारांकडेस आले आहेत. सतरा लक्ष रुपये मागील साले राहिली त्यांचा करार करून दिला.' पुढें हा रोडूखवास जयपूरकराकडून कैद झाला. त्याचे जागी दौलतराम नेमण्यांत आला. त्यानें ता. ६ आक्टोबर रोजीं जमेची पत्रें सुभेदारांस पाठविली. त्यानें नुसते मोघम अभयवचन दिलें. यानें सुभेदारांची मोठी कुचंबणा झाली. इ. स. १७९१ च्या डिसेंबरांत त्यांस जयपूर प्रांतींच रहावे लागले. शेवटीं जयपूरकरांच्या प्रांतात फिरून महालाची जप्ती जमेल त्या रीतीनें खंडणी वसूल करण्याचे सुभेदारांनीं ठरविले. त्याप्रमाणें ते टोकेकडे आले. एक दोन गढ्या घेतल्या. पुढें दोन गढ्या मातब्बर, त्यास मोर्चे लाविले. त्या फत्ते केल्यावर कोट्यावरून परतावे असें त्यांनीं ठरविले. तुकोजीरावांचे पुतणे बापूजी होळकर व जामनगरकर कुशलीराम उभयतां एकत्र होऊन माचेडीकडे जप्तीस गेले. मधे एक गढी चांगली, तेथें ठाणें रावराजे याजकडील होते. त्यास एक दिवस गोळागोळी होऊन, दुसरें दिवशीं हल्ला करून ते स्थळ घेतले. ह्या गोष्टी मार्च सन १७९२ पर्यंत घडून आल्या. बापूजी होळकरांनीं रावराजाकडील दोन तीन महाल जप्त करून गढ्यांस मोर्चे लाविले.

याच वेळीं शिंद्यांची माणसे आजूबाजूस होती. पाटीलबुवांनीं दक्षिणेंत जातेसमयीं सर्वाधिकार गोपाळराव रघुनाथ यांजवर सोपविला होता. हे गृहस्थ वयानें बेताबाताचेच होते. एकदोन कारणांनीं स्वामींची मर्जी यांनीं संपदिली होती. जिवबादादासारखे वयोवृद्ध व अनुभववृद्ध बाजूस सारून हे सर्वाधिकारी झाले होते. यांजकडे रावराजाचे पुत्रानें आपला वकील पाठवून बोलणें लाविलें कीं, 'एक लक्ष रुपये फौज खर्चाचे घ्यावे व आमची कुमक करावी. त्यावरून तीस हजार रुपये खर्चास वकिलासीं घेऊन गोपाळरावाने लगामी लावून ठेविले.' एप्रिल अखेरपर्यंत ह्या गोष्टी घडल्या. यावर जयपूरचे राजे यांनीं गोपाळरावांकडे बोलणें लाविलें कीं, 'बाकीचा फडशा करून देतों, परंतु रावराजाची (माचेडीवाल्याची) तुम्हीं मदत करावी.' याप्रमाणें जयपूरकरांनीं परभारें शिंदे आणि होळकर ह्यांच्यात कलागत लावून दिली.

याचवेळीं दुसरा एक प्रकार घडला आणि एकच हलकल्लोळ झाला. साधी एका कोपऱ्यातील गोष्ट ती येणेंप्रमाणें. कामाप्रांत ब्रीज येथें अंमल शिंद्यांचा. खुशालकुंवर हा होळकरांच्या फौजेतील हजार बाराशें स्वारांच्या पागेचा अधिकारी त्या जिल्ह्यांतील राहणारा, त्यास हुसकून द्यावें म्हणून गोपाळराव चिटणीसानें फौज रवाना केली आणि कुंवर यांस उठून जाण्याबद्दल जाब लाविला. त्यांनीं उत्तर केलें कीं, ''आमचे खटल्याचा एक गवत वेगळें करून कांहीं उपद्रव असलियास शोध घ्यावा.'' शिंद्यांकडील मोर्चे लागले.

सत्तावीस रोज लढाई झाली. तीन वेळां मोर्चे कुंवराने कापिले. शिपाई जवानमर्द, पण घरगुती भांडणांतच त्याचा प्राण गेला. धनी नाही म्हणून सुभेदार यांजकडे कुंवराची माणसें जयपूरचे मुलूखांत आली. गोपाळराव चिटणीस या कुरापतीत विजयी झाले. आतां त्यांची नजर जरा वरती जाऊन खुद्द सुभेदार तुकोजीरावांकडे वळली. तो प्रकार येणेंप्रमाणें. बापू होळकर माचेडीवाल्यावर तीन लक्ष रुपयांची वरात घेऊन सरंजामानिशीं वसुलीकरितां माचेहेडीस गेले. गोपाळरावांनीं बापूजीस प्रेष पाठविला कीं माचेहेडीवाल्याकडे आमचे दहा लक्ष रुपये घेणें आहे. आमचा ऐवज वसूल होईपावेतों तुम्हास तगादा करू देणार नाही. एवढेच सांगून ते थांबले नाहीत. लगेच कूच करून मुकाबल्यास आले. सुभेदारांचा मुक्काम जयपूर प्रांतांत बनास नदीचे काठीं होता. होळकरांकडील पेंढाऱ्यांनीं शिंद्यांकडील फौजेची लूट आणिली. तितकेच कारण पुरे झाले. सडाघोडा राऊत मुकाबला सांभाळीत सांभाळीत जयपूरचे मुखलांत जेथें सुभेदारांचा मुक्काम होता तेथपर्यंत शिंद्यांची माणसें येऊन थडकली. त्यांस आतून जयपूरवाल्यांची फूस होती. सुभेदारांनीं जयपूरचे कारभारी दौलतराम यांस बोलावून ते म्हणाले, ''ऐवजाचा इल्लाबिल्ला दाखवून आमचे आपसांत ( शिंदे-होळकरांत) कलह उत्पन्न केला.'' त्यावर कारभाऱ्याने उत्तर केले कीं, ''आम्ही त्यांचेही देवाळ व आपलेही देवाळ, जबरदस्त असेल तो अगोदर घेईल.'' शिंद्यांचा छापा बापू होळकरांस सोडून खुद्द सुभेदारांवर आला. पाराशर दादाजीनें सुभेदारांस घोड्यावर बसवून दोन हजार स्वार हुजरातीचे बरोबर देऊन पुढें काढून दिले. मागे शिलेदार कांहीं हुजरात घेऊन जातीने मुकाबल्यास राहिले. दोन घटका हरमठ फार मोठी जाहली. ह्या छाप्यांत माणिकचंद भंडारी व हिराजी वाघमारे व पांच पन्नास माणसें कामास आली. इतक्यांत बापू होळकर येऊन फौजेस मिळाले. तेव्हां होळकर फौज मुस्ताकीम होऊन मुकाबल्यास सडे उभे राहून मागें माला उभ्या केल्या. शिंद्यांचे फौजेने यांची बळकटी पाहून तीन कोसांचे छेटीनें मुक्काम केला. सुभेदार तसेच बावीस कोस गेले. त्यांनीं मौजे बावी, तालुके ब्राह्मणगांव, हडोतीचा अंमल, जहागीर होळकरांची, गढी मजबूत, पाणी चाऱ्याची सोय, असें पाहून तेथें मुक्काम केला. वरील छापा एप्रिल इ. स. १७९३ त झाला. इतिहासांत त्यास बनासचा छापा असे म्हणतात.

या छाप्यानंतर हडोती प्रांतांत मौजे बावी येथें तुकोजीरावांचा मुक्काम असतां झालेल्या प्रसंगाची हकीगत त्यांनीं मातोश्रीसाहेबांस कळविली. तेव्हां त्यांचे तोंडातून 'तुकोजीराव मारला गेला असता तरी चिंता नव्हती. परंतु म्हातारपणीं चाकराचे हातून बदनक्षीची गोष्ट.' मातोश्रींनीं पांच लक्ष रुपयांच्या हुंड्या सुभेदारांकडे पाठवून पत्र लिहिलें कीं 'हिंमत न सोडतां हरामखोराचे पारिपत्य करावें. खर्चाचा व फौजेचा सेतू बांधतें, म्हातारपणीं जरब खाल्लीं असल्यास लिहून पाठवावें. मी डेरेदाखल होते.' त्यांनीं अशा रवानग्या तुकोजीरावांकडे दोन-चार लगत करून, देशीं दहा कारकून नालबंदीबाबत ऐवज बरोबर देऊन खानदेशांत व स्वदेशीं पाठवून शिलेदार आणले. एकाच महिन्यांत दहा हजार स्वारांची हजेरी होऊन फडणीसांबरोबर रवाना केले. दुसरें महिन्यांत आठ हजार स्वारांची हजेरी झाली.

अशा फौजेच्या चुंगी, पांचशें हजार, पंधराशें, दोन हजार, जशी हजेरी होत गेली, तशी पाठवीत गेले. यावेळेपर्यंत होळकरी फौज फक्त शिलेदारी, तोफखाना, घोडेस्वार व शिबंदी इतकीच होती. सुभेदारांनीं गोसावी, बैरागी चाळीस हजार ठेविले. ह्या हिंदुस्थानच्या स्वारींत आल्यावर शिंद्यांचे युरोपिअन डिबाईन वगैरे लोकांनीं कवाईत शिकवून तयार केलेले सैन्य तुकोजीरावांनीं पाहिले. तेव्हां इ. स. १७९०-९१ त दुदरनेक फ्रांसिस यांस चाकर ठेवून कंपू तयार करविले. यावेळीं अशी ही पांच पलटणें तयार झाली होती.

उभयपक्षांच्या लोकांची रोज कांहींना कांहीं कारणांवरून कटकट पुन: सुरू झाली. एके दिवशीं तोफांचे माराखालीं होळकरी फौजेचा टिकाव लागेना. पाय उठले. विचार करून सुभेदार व बुणगे कोट्यास पोहचून बापू होळकर व पाराजीपंत राहिले. त्यांनीं जुन्या पद्धतीचें अवलंबन केलें. याप्रमाणें तीन महिने होळकर फौजेनें मजाखी केली. त्या योगानें शिंद्यांचे लष्करांत रुपयाचे शेर अन्न व रुपयाच्या पांच पेंड्या चाऱ्याच्या झाल्या. शिंद्यांची फौज कायल झाली. तहाचें बोलणें सुरू झालें. चिटणीसाचे म्हणणें ''आपण धनी, आम्ही सेवक. पूर्वीपासून मुलखाच्या वगैरे वाटण्याचे शिरस्ते, त्याप्रमाणें अंतरवेद वगैरे मुलखाची वाटणी घेऊन आम्ही ताबेदार. सुभेदारांनीं एखादी मोहीम करावी आम्ही चाकरीस हजर.'' सुभेदारांनीं संमती दिली. पाराजीपंत बाबा व बापू होळकर होळकरांकडील, गोपाळराव व जिवबा दादा शिंद्याकडील ह्यांच्या भेटीं होऊन यादी झाली. यांचा बेलभंडार व त्यांची उदी होऊन परस्परें सफाई झाली. याप्रमाणें नुकताच पेटलेला सोबत्यांमधील कलहाग्नि तूर्त तरी विझल्यासारखा दिसला.

मातोश्रीसाहेबांस हें तहाचे बोलणें कळलें तेव्हां त्यांचे उद्‌गार निघाले कीं, ''समेट झाला हा सर्वोपरी चांगला. परंतु झाल्या गोष्टीची उजळणी न जाहली. हे अंत:करणीं खटकनी राहिली.''

हे उद्‌गार निघाले त्याच सुमारास दुसरें मल्हारराव जवळ होते. हे मल्हारराव तरूण हूड पण शूर होते. ते बोलले, ''कंपूस एक दिवसांत मारून बरबाद करीन'' सैन्यासह स्थानावर पोहोचल्यावर ते म्हणाले, ''आमच्या मनांतून कोणत्याही प्रकारें सख्य करावयाचें नाही. त्याजला जमीनदोस्त करूं.'' यावर पाराशर दादाजी व बापू होळकर यांचा कांहीं इलाज चालेना. मल्हाररावांनीं चढाईचें धोरण स्वीकारिलें आणि त्याला तुकोजीरावांनीं मान्यता दिली.

लढाईला तोंड लागले. शिंद्यांचे कंपू आणि होळकरांची पांच पलटणे, त्यांच्या साठ तोफा व यांच्या पांच तोफा, ह्यांच्या पलटणीबरोबर गोसाव्यांच्या मोठ्या फौजा. सूर्योदयापासून चौदा घटका तोफांची लढाई झाली. त्यांच्या चौदा तोफा गैर उपयोगी करून छकड्याखालीं पडल्या. चौदा घटकेत पांचा तोफांनीं बरेच काम केले. दोन प्रहराचा समय; पाणी पाणी करूं लागले. त्यांचे कंपूत उंटाच्या पखाली भरून येऊं लागल्या. होळकर फौजेत पाण्याचा तोटा. गोसावी व बैरागी यांचे पाय उठले, स्वारांचेही पाय उठले. मल्हारराव परवश होऊन पाण्यांत पडले. ज्यांचे भरवशावर फेरपकडी करून लढाईला संमती दिली

त्यांची समयास ही दशा. याप्रमाणें होळकर फौजेचा पराजय होऊन पळ काढीत असतां मागाहून शिंद्यांकडील पेंढाऱ्यांनीं लगट करून खराबा बहुत केला. त्यांच्या लगटामुळें सुभेदारांस उठवून हत्तीवर बसवून काढलें. पळती फौज; पाणी पंधरा-वीस कोस नाबुंद. सुलतानपुराहून तीन कोसांवर तलाव होता. त्यात कर्दम शेष राहिला. वस्त्रांत घालून लोक पिळून प्याले. लढाईत हजार बाराशें लोक जखमी व ठार झाले. पाण्याच्या दिक्कतीनें बुणग्यांतील हजार आठशें माणसें मृत्यु पावली. सुभेदार व त्यांचे चिरंजीव लाखेरीचे घाटींत शिकस्त खाऊन दरकूच इंदूरचे रूखास गेले. शिंद्यांच्या सरदारांनीं पुढें जास्त नाश न करितां आपली फौज घेऊन उदेपुराकडे गेले. होळकर माळव्यांत परतले. ही लढाई इतिहासांत लाखेरीची म्हणून प्रसिद्ध आहे व ही ता. ५ जून इ. स. १७९३ त झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ही पराजयाची हकीगत मातोश्रीसाहेबांस कळली, तशीच पुण्यासही पाटीलबुवांस कळली. बाईसाहेबांनीं चौकशी केल्यावर चिंरजीवांची म्हणजे मल्हाररावांची चूक त्यास कळून आली. पाटीलबुवांनीं म्हटले, 'आपसांत कटकट करून जन्माचे भाऊपणांत पाणी घातलें. आतां सुभेदारांची माझी भेट होत नाहीं.' डोळ्यांस पाणी आलें. गोपाळराव यांस कैद करून भेलशास ठेविलें.

सारांश, या उत्तर हिंदुस्थानांचे स्वारीचा परिणाम काय झाला हे आतां पाहूं या. तिघे मातब्बर सरदारांपैकीं शिंदे पुण्यास जाऊन बसलें. वृद्ध माणसें जिबबादादासारखी बाजूस पडून तरूण व अनुभवरहित अशा चिटणिसासारख्या माणसाचे हातात अधिकार आला. होळकर जयपूर प्रकरणांत आणि अलीबहादर डंघई (बुंदेलखंड) प्रकरणांत अल्पश: स्वार्थाच्या कार्यांत गुरफटून राहिले. धनीपण कोठेंच उरलें नाहीं, यामुळें रजपूत लोकांवरील दाब नांवापुरताच राहिला आणि मोंगल सरदारही इकडे-तिकडे पाहून इंग्रजांचे कच्छपी लागले. हा झाला बाह्य प्रकार. अंतर्व्यवस्थेंतही चंचूप्रवेश होऊन मुसलप्रवेशापर्यंत जी बाब गेली ती मराठी लष्करांत परदेशीय कवायतीची सुरुवात. या उंटाच्या पिल्लानें हळूहळू मराठी शिलेदार फौजेला आणि तिच्या गनीमी काव्याच्या युद्धपद्धतीला अगदी बाजूस सारून दिले. शिंदेशाहीत डिबाईननें आणि होळकरशाहीत दुदरनेकनें प्रथम सरकारी नोकर म्हणून या शाहींत प्रवेश केला. ही नवी पद्धत जुन्या पद्धतीशी एकजीव होणें इष्ट होते. दोहोंचा संगम न होतां संग्राम झाला असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

राज्याचा आब आणि फौजेची अंतर्व्यवस्था या दृष्टीनें मराठी साम्राज्यावर काय परिणाम झाले हें आतांपर्यंत पाहिलें. याउपर या पांच वर्षात युद्धानें होळकरांच्या पदरांत काय पडले हे आतां पाहूंया. त्यांच्याकडे अंतर्वेद प्रांतांतील सुमारें सोळा लाखांचे प्रगणे इसवी इ. स. १७५८ पासून होते असे इ. स. १७७० च्या तैनात जाबत्यावरून दिसते. इ. स. १७८७ सालापर्यंत कनोज, देवळाली, फुफूंद, इटावा वगैरे परागणे हळूहळू दाबण्याचे काम रोहिल्यांनीं व मोगल सरदारांनीं चालविलें होतें. इसवी इ. स. १७७४ पासून सुभेदार तुकोजीराव हे बारभाई प्रकरण, टिपूचे युद्ध व इंग्रजांशीं युद्ध यात गुरफटल्यामुळें त्यांस उत्तरेकडे पाहण्यास जमलें

नाहीं आणि हे प्रांत हळूहळू गळून जाऊं लागले. पाटीलबुवांनीं गुलाम कादर व त्याचे मदतनीस यांचें शासन करून तो सर्व प्रदेश सोडविला. या प्रांतापैकीं ताल, बिठूर, पांचोल, गणमुक्तेश्वर वगैरे परगणे होळकरांस दिले. त्यांचें उत्पन्न बेरजी सुमारे नऊ लक्षांचे होते. त्याबद्दल पाटीलबुवांनीं होळकरांच्या नांवानें सनदांही करून दिल्या, परंतु त्या सनदांत त्या प्रदेशातील सायर व इनाम वगैरे बाबती आपल्याकडे ठेविल्या. तेव्हां त्या परगण्याच्या सनदा पाटीलबुवांकडे परत केल्या. हे वाटणीचे प्रांत याप्रमाणें कायमचेच होळकरांकडून गेले. सारांश, शिंद्यांचा जसा कायमचा फायदा झाला तसा होळकरांस प्रांतांसंबधीं काय किंवा इभ्रतीसंबंधीं काय, कांहीं एक फायदा न पडतां नुकसान मात्र कायमचे पदरांत पडलें. जयपुरकरांकडे सतरा लाखांची बाकी गुंतलेली. आतां ते देईनात आणि ती घेण्याची होळकरांची ताकत राहिली नाहीं. सारांश, पैक्याची स्थिती सुधारली नाही, यश नाहीं, खंडणी नाहीं, प्रवेश नाहीं व लौकिक नाहीं. अशा स्थितीत तुकोजीराव परतले आणि येतांना असहाय्य अशा उज्जैन शहरास रागानें लुटून इंदुरास परतले. बऱ्याच काळपर्यंत मातोश्रींस भेटण्याचें त्यांचेकडून झालें नाही. बाईंनीं लाखेरी संबंधात पाराशरदादाजी व दुदरनेकच्या निरनिराळे वेळीं भेटी घेतल्या. यानंतर पुण्याहून शिंदे व पुणें दरबार यांचा विचार होऊन उत्तरेतील या दोन मातब्बर सरदारांत समेट व्हावा असा प्रयत्न सुरू झाला. पण खालील अधिकारी वर्गात तशी वृत्ती होईना. रागाने सुभेदारांनीं उज्जैन लुटली. त्याचा वचपा काढण्यासाठी शिंद्यांचे अधिकारी तळमळूं लागले. दोन्ही पक्षांकडून तयारी चालली आहे असें पुण्यास कळतांच खुद्द श्रीमंतांकडून बळवंतराव काशी कात्रे, पाटीलबुवांकडून नारो कृष्ण आणि पाठपुरवणी करण्याकरिता देवराव हिंगणे पुण्याहून रवाना झाले. मातोश्रीसाहेबांनीं पुणें येथील आपले वकील दादाजी गंगाधर यांस पाटीलबुवांशीं समेटाचें बोलणें करण्यास पत्रें लिहिलीं, 'राजश्री दादाजी गंगाधर यांनीं पांच लक्ष अंतस्थ व दरबार खर्च दोन लक्ष, एकूण सात लक्ष रुपये करार करून, सफाई राजश्री पाटीलबुवांशीं आगस्ट १७९३ त केली.'

मुख्यांचे समेट झाले, तथापि स्थानिक अधिकाऱ्यांमध्यें चिरडाचिरडी अधूनमधून चालूच होती. त्यास उपाय म्हणून या सर्वांस गुंतवावे या हेतूनें सप्टेंबर १७९३ त पुण्याहून प्रेश आला कीं, 'होळकरांनीं पतियाळची मोहीम करावी अथवा गुजराथ प्रांतीं जावें, नाहींतर श्रीमंतांजवळ असावे.' यावर बाईसाहेबांनीं उत्तर केलें कीं, 'आम्ही पतियाळची मोहीम करू, परंतु आम्हास मागें मुलूख कोठें आहे? रसद येईल कशी? पाय ठेवावयास जागा नाहीं.' हिंगण्यांनीं बाईंस कळविलें कीं 'घरचा बंदोबस्त करावा. पागा व संरजामी इतकें ठेवून खर्च तोडावा. दहा पंधरा हजारांनिशीं राहून, कारभारी कोण करणें तो करावा. सोबत्यांशीं विरुद्ध दाखवूं नये, सरकार लक्ष असावे.' आणि पुढेंही म्हणाले, ''घरचा विचार पाहून, विरुध्द वाढविणें तर वाढवावें. तुमची जमियत किती सरदार कोण, हें घरीं शोधा; तशी वर्तणूक करा. सरकारचें लक्ष सोडून कराल तर कठीण पडेल. बहुतां दिवसांची दौलत आहे. हे बुडते ते तुमचे नाकर्तेपणें बुडत आहे तरी विचार करून दौलतीस अपाय न होय अशी प्रसंग पाहून वर्तणूक करावी.' याचवेळीं हिंगणे लिहितात, 'तुकोजी हे येवढे श्रमांत येऊन सर्वस्व गतश्री व्हावेसे जालें असतां जवळ दहा बारा लाखाचें वित्त आहे

ते न काढितां बाईंकडील मार्गप्रतीक्षा. सहस्त्र फजित्या सोसून दौलत बुडते हे ध्यानांत न आणित.' वरील हकीगत नानांस हिंगण्यांनीं मुंबईस कळविल्यावर नानांचे पत्र आले ते. 'पतियाळाकडील मसलत चांगली. पूर्ववत् चाल सुटत नाहीं. भाऊपणास चांगलें. परंतु ती मसलत निर्वेध शेवटास जाणार नाही. मुलुखाच्या वाटणीसंबंधानें उगाच खलश वाढतो, याजकरितां गुजराथची मसलत करावयास गुण बहुत येतात.' यावर बाईसाहेबांनीं कळविलें कीं, 'आपणांस सरकारांतून मदत मिळावी व मुलखांत वाटणी मिळावी.' नानांनीं यावर खुलासा केला की 'सरकारांतून थोडा पुस्तपन्हा होईल. सरंजाम थोडाबहुत द्यावयास येईल. पण गुजराथेंत वाटणी पूर्वीपासून सरदारांस नाही. जें सुटेल ते सरकारचे.' यावर सुभेदारांनीं पुसलें, 'या मसलतींत आम्हाला लाभ काय?' नानांचें उत्तर आले, 'वरकड पूर्व चाली बाईंनीं लिहिल्या व पराक्रम केले वगैरे गोष्टी खऱ्या आहेत. परंतु तेव्हां दुही नव्हती. जशी सरदारी तसें काम करावें यातच सरदारीचें स्वरूप, बोज, असें जाणून ही गुजराथची मोहीम योजिली आहे. याप्रमाणें घडल्यास चांगलें. यांत सर्व गोष्टी आहेत.' हा युक्तिवाद पर्यायानें सरकारी आज्ञाच होती. त्याप्रमाणें ता. २५ डिसेंबर इ. स. १७९३ त तुकोजीरावांनीं मोहिमेचा निश्चय केला. आघाडीची फौज काशीराव होळकर यांच्या हाताखालीं देऊन गुजराथचे रोखें कूच करविलें. परंतु हिला जे मोठें विघ्न आलें तें पाटीलबुवांचा मृत्यु होय. पाटीलबुवा माघ शुद्ध १२ रोजीं (ता. १२ फेब्रुवारी इ. स. १७९४) निवर्तल्याची बातमी आली, तेव्हां मातोश्रीसाहेबांनीं नौबतखाना बंद करून स्नान केलें. श्रम मानिले. पुण्याहून आलेल्या आज्ञेप्रमाणें इंदूराहून 'पाटीलबाबांकडील चौघे सरदार जिवाजी बल्लाळ, गोपाळ रघुनाथ, खंडेराव हरी, अंबोजी इंगळे यांस पत्रें खातरजमेचीं व फौजा येऊन पोहोंचतील, तुम्ही खातरजमा राखावी; व राजेरजवाडे यांसी दाबाची व पातशहास अर्जी व डिबाईनसाहेब इंग्रज यांस पत्र अशी जागांजागां पत्रें मुजरद काशीद जोड्यांबरोबर त्याच दिवशीं रवाना केली.' यावर नानांचेही पत्र आले, 'महादजी शिंदे यांस देवाज्ञा झाली. यास्तव गुजराथचा विचार राहिला. आतां तुकोजीरावांनीं देशीं पुण्यास यावें.' हा प्रकार एप्रिल इ. स. १७९४ पर्यंत चालू होता. पुण्यास जाण्यासाठीं निघणें हे पत्रीं लिहिणें सोपे होते. पण इकडे संस्थानांत ज्या एकामागून एक अडचणी उभ्या राहिल्या आणि उभ्या केल्या गेल्या त्या पाहिल्याशिवाय एकंदर घटना लक्षांत येणार नाही. म्हणोन आतां तिकडे वळूं या.

सुभेदार तुकोजीराव हे शरीराने खंगले होते, त्याहूनही अधिक असे मनाने खंगले होते. पैशाची ओढगस्त दिवसानुदिवस चक्रवाढव्याजानें वाढत होती. सैन्य वाढलें होतें. इंदूरास आणि महेश्वरास त्यांचीं धरणींपारणीं चाललीं होतीं. कुंटुंब सौभाग्यवती रखमाबाई याच सुमारास निवर्तल्या. लाखेरीचा प्रसंग ज्यानें ओढून आणिला तो सुभेदारांचा द्वितीय चिरंजीव मल्हारराव आपल्या हूड स्वभावानें सर्वत्र अप्रिय झाला होता. माळव्यांत आणि दक्षिणेत त्यानें प्रांताचा खराबा आरंभिला. त्याची कीर्ति पुण्यापर्यंत पोहोंचली होती. शेवटीं मातोश्रीसाहेबांनीं त्यास कैद करवून कुशलगडावर नजरकैदेंत ठेविलें. सुभेदारांच्यानें हें सोसवेना. एक दोनदां मातोश्रीसाहेबांनीं सुभेदारांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. 'मी

प्राण देईन' या थरावर जेव्हां सुभेदार येऊन बसले तेव्हां मातोश्रीसाहेबांनीं नाईलाजास्तव मल्हाररावांची मुक्तता केली. हा एक घरचा प्रकार झाला. राहिलें शिपायांचे देणें आणि कारभाऱ्याची नेमणूक हे दोन्ही प्रश्न एकमेकांत गुरफटले होते. साहजिकपणें जो कोणी कारभाऱ्याची वस्त्रें स्वीकारील त्यास देण्याचीं कांहीं तरी तजवीज करणे क्रमप्राप्त होते. नारो गणेश ह्यांच्या मृत्युनंतर हा कालपर्यंत वस्त्रें कोणास झाली नव्हती. पाराशरदादाजी काम पहात होते, पण ते अधिकृत नव्हते. अनुभवानें ते योग्य असले तरी पैशाची बाजू त्यांची सबळ नव्हती. फडणीसांपैकीं पैशाची जबाबदारी घेण्यास कोणी तयार होईना. तेव्हां अखेरीस नारो गणेशाचे चिरंजीवास पुढें करून बाळाजी लक्ष्मण ह्यांनीं सर्व जबाबदारी पत्करली व गणपतराव नारायण ह्यांस या प्रसंगीं दिवाणगिरीची वस्त्रें; बहुमान म्हणून 'साडेतीन वस्त्रें, पैठणी, लाल पोशाख, तिवट, शेला अष्टगोली, किनखाप अर्धे ठाण, महमुदी एक. एकूण साडेतीन. त्यांचे आप्त बाळाजी लक्ष्मण यांस मुतालकीची वस्त्रें जयनाबादी पोशाख, तिवट, शेला, याप्रमाणें शिरपाव होऊन बोलणें झाले. दिवाणाची चार कलमें होती. पंचपहाड महाल सोडावा, अंबाडची फडणीसी द्यावी, दरसालचा ऐवज आमचा आम्ही पूर्ववत्प्रमाणें घेऊं, पोतनिशीची असामी आमची आम्हांकडेस चालवावी. मागील लोकांचे देणें त्याचे फडशे करावे असें कबूल केलें. त्याबद्दल पांच-सात लक्ष रुपये ऐवज लागेल तो सध्या मोबदल्यास द्यावा. यांस ऐवज कोटे संस्थानचा व महाल बुंदी, कोंच वगैरे लावून द्यावा. पुढें स्वारी खर्चास व फौजेचे संचनीस ऐवज वीस लक्षपर्यंत खर्च करून श्रीमंतांजवळ जावे. मोहीम सांगतील ती मसलत मारावी.'' याप्रमाणें दिवाणाशीं करारांत आणले. ही सर्व योजना मातोश्रीसाहेबांनीं घडवून आणली.

दरबार भरला त्यावेळीं मातोश्रीसाहेब सुभेदारांस म्हणाल्या, ''यांसीं (दिवाणाशीं) दुसरी गोष्ट न करावी. माझे जीवांत जीव आहे तों एखादी गोष्ट चुकेल; तथापि मजला लिहावें. उपरांतिक मी सांगेन तसें करावे. बाकी परभारें तुम्ही एखादी दुसरी गोष्ट करूं नये.'' दिवाणास त्या म्हणाल्या, ''तुम्ही तुकबास विचारल्याखेरीज कोणताही कारभार न करावा.'' पारनेरकर मंडळीस बाई म्हणाल्या, ''तुम्ही आपले दप्तरचें काम करावे. कारभारांत बोलूं नये, दिवाणांनीं दप्तरीं दाखला झाडून द्यावा. तुम्ही कागदपत्र झाडून मागतील तो दिवाणास समजावीत जावा.''

या कामाची अंमलबजावणी करण्याकरितां बाईंनीं लगेच शकुनाकरितां एक शिलेदारांची यादी, दप्तरचे कारकूनाकडून लिहविली. त्याजवर 'एकुणांत दिवाणांनीं केली.' त्या यादीवर 'देवावें' असे राजश्री रामराव अप्पाजी पळसीकर यांनीं केले. तीवर 'देणें' असे तुकोजीरावांनीं केले. 'तारीख' यादीवर दिवाणांनीं करावी. तीवर राजश्री दादाजी गंगाधर यांजकडील कारकूनानें 'लिहिणें' असे चिन्ह करावे. याप्रमाणें पहिले चालत होते, त्याप्रमाणें बाईंनीं पुन: सर्व आपले समक्ष चालू केले. इतके केल्यानंतर बाईंनीं सर्वांस उद्देशून म्हटले. 'कोणी कोणाचा द्वेष करू नये. सर्वांनीं एकचित्ते राहून आपआपली कामे करून दौलत सांभाळवी. वाहिली गंगा, राहिले तीर्थ, अशी वागणूक असावी.' जुने कारभारी यांस सांगितलें कीं

'शिलेदार, वगैरे लोकांचे मागील देणें त्यांचे हिशेब सर्व समजावून द्यावे. ज्यांची कबजे होऊन, फडशे झाले ते व पुढें राहिले. त्याची कबजे आकारून दाखवावी व त्याची तोडजोड पाहून लोकांच्या समजुती काढतील.' यानंतर सरदारांस (तुकोजीरावांस) त्या दिवशीं बाईंनीं आपले रूबरू भोजनास घालून, दोन वस्त्रें शकुनाची देऊन दक्षिणेत स्वारीस जाण्याकरितां निरोप दिला. हा सर्व प्रकार इ. स. १७९४ च्या जुलाईच्या तिसरें आठवड्यांत घडून आला आणि तुकोजीराव पुण्याकडेस जाण्यास्तव वळले. रस्त्यांत मल्हारराव त्यास येऊन मिळाले. त्यांच्या मातोश्रींचे गयावर्जन रस्त्यांतच घडलें. ज्या शिलेदारांचे फडशे नव्हते त्यांनीं रस्त्यांतच सुभेदारांच्या डेऱ्याभोवतीं पाळा घातला. बामणद्याचे मुक्कामीं सुभेदार असतां पुण्याचे वकिलाने सरकारी पत्र सुभेदारांस वाचून दाखविलें.

'सुभेदार सरकार चाकरीस येत नसले तर, पंधरा हजार फौज देऊन पैक्याच्या वराता त्यांजवर करू. पैसा द्यावा लागेल. हें विचारून लिहून पाठविणें. त्याप्रमाणें केलें जाईल.' तेव्हां ब्राह्मणद्याहून निघून आगस्टअखेर घुगरी गांवीं सुभेदार जाऊन पोंहचले.

तेथून शेगांव, नागलवाडी, सेंधवा, थालनेर, चंदवासा करीत डिसेंबरात पुण्यांत येऊन पोहचले. पुण्यास आल्यावर ता. ११ डिसेंबर इ. स. १७९४ रोजीं त्यांची व श्रीमंतांची भेट झाली.

मागील प्रकरणांत टिपू सुलतानाचें व मराठ्यांचें युद्ध झालें त्याची हकीगत आलीच आहे. त्या संबंधात तेथेंही दाखविलें आहे कीं निजामांत आणि पेशवे सरकारांत खंडणीचा प्रश्न उद्‌भवला होता; तरी पण उत्तरेस निजाम आणि दक्षिणेत टिपू अशा दोघांसी एकाच वेळीं हातघाईवर येणें इष्ट नाही. निजामास आपले बाजूस वळवून पेशवे सरकारांनीं टिपूवर जोराचा हल्ला करून यश संपादिलें. याउपर निजामाचें प्रकरण हातीं घेणें अधिक सुलभ झाले आणि त्याप्रमाणें उत्तरेंतून होळकर व भोसले, दक्षिणेतून पटवर्धन, रास्ते, असे झाडून सर्व मराठे सरदार पुण्यास दाखल झाले आणि तेथून निजामावर चालून गेले. ती हकीगत आतां पुढील प्रकरणांत घेऊं.

**आधार ग्रंथ**

रा. ब. देसाईकृत मराठी रियासत
पुणें रेकॉर्ड सिलेक्शन ग्रंथमाला
खरेशास्त्रीकृत ऐतिहासिक ग्रंथसंग्रह
होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें
सरकारी रेकॉर्डपैकीं रोजकीर्द, ताळेबंद, दफाते वगैरे
सरकार जहागिरदार, दरखदार, कानगो जमीदार यांची दप्तरें
चंद्रचूड दप्तर
पेशवे दरबारपैकीं राजमंडळस्वारीचे हिशेब वगैरे
महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें
होळकरांची कैफियत



प्रकरण २९ वें

---

# खड्र्याची लढाई, देवी अहिल्याबाईंचा कैलासवास व उपसंहार

निजामाचा दिवाण मशरुलमुल्क यानें आपल्या धन्यास बोध केला कीं अजमासें तीन कोट रुपये चौथाईचे तुंबलेली बाकी व तीस लक्ष रुपये वार्षिक उत्पन्नाचा मुलूख मराठे मागतात त्यापेक्षां हाच पैसा फौजेच्या उभारणीकडे खर्चून लढाईची मसलत करून नशीबाची परीक्षा कां पाहूं नये? यजमानांस हा सल्ला पसंत पडला आणि फौजेची जंगी तयारी करून तो इ. स. १७९४ च्या नोव्हेंबरांत हैदराबादेहून निघून बेदरास आला. तेथून धारूर व परांड्यास आला. अंबेजोगाईचे व दुसरी कांहीं खेडी त्यानें रस्त्यांत लुटली. तेव्हां पेशव्यांनींही सर्व सरदारांसह त्यास तोंड देण्याचे निश्चित केले. स्वत: श्रीमंत पेशवे डेरेदाखल झाले. सर्व लष्कर कधी कूच, कधी मुक्काम, याप्रमाणें करीत नगरच्या रोखें वळले. निजाम मोहरीचा घाट उतरून खड्र्याच्या किल्ल्यानजीक खैरा नदीवर येऊन उतरला. मसलत लांबणीवर पडू नये म्हणून शिंदे व भोसले निजामास अडविण्यासाठी सडे होऊन चालून गेले. लढाईची मसलत परशरामभाऊ पटवर्धनाच्या आज्ञेनुसार चालू झाली. होळकर (सुभेदार तुकोजीराव, काशीराव, बापूजी) हेंही पुढें गेले. शिंद्यांच्या फौजेनें तोफांचा मारा केला. निजामाचे लष्कराभोवतीं अंतरावर मराठी फौजा रात्रंदिवस टेहळणीवर होत्या. दोन तीन दिवस लहान लहान चकमकी होत होत्या. ता. ७ मार्च स. १७९५ रोजीं मोंगल कूच

करून चालला असतां परशुरामभाऊंनीं त्यांसी गांठ घातलीं. भाऊंबरोबर फडके, होळकर, शिंदे, भोंसले ह्यांच्याही फौजा व कवायती पायदळ वगैरे सरंजाम होता. भाऊंस जखमा लागल्या, पुष्कळ लोक ठार व जखमी झाले. मोंगल सरदार भाऊंस टेकडीपासून अर्धा कोसपर्यंत मागें सारून त्या टेकडीवर जागा कायम करून उभे राहिले. शिंद्यांनीं तोफा चालविल्या. भोंसल्यांकडून बाणांची सरबत्ती सुरू झाली. शत्रूकडील पलटणें कच खाऊन मागे हटूं लागलीं. तें पाहून भाऊंनीं हुजरात, होळकरांची फौज वगैरे सर्व त्यांवर उठविली. सरकारची चाळीस हजार तलवार उठली. तरवारीशीं गांठ परशुरामभाऊ पटवर्धन व होळकरांशीच पडली. त्यांत श्रीमंतांच्या प्रतापें एकाच लढाईत मसलत खतम झाली. मोगलांच्या लष्करांत पराकाष्ठेची अव्यवस्था व तारांबळ होऊन लष्कर लुटले गेले. रात्रभर निजाम खर्ड्याचे गढीत शिरून राहिला. यावेळीं यशवंतराव गंगाधरांनीं मातोश्रींस कळविलें आहे कीं मी आज्ञेप्रमाणें यजमानसाहेबांपाशीं स्वारीत राहून ते सांगतात त्याप्रमाणें कामकाज करीत असतां कारभारियांचे मनात संतोष नाही. तहाच्या वाटाघाटी चालू आहेत असेंही त्यांनीं कळविले. यशवंत गंगाधर पुढें असेंही लिहितात कीं, आम्हांस श्रीमंतांनीं बोलावून नेऊन निजामाचे भेटीविषयीचे विचारले. आम्ही सांगितले कीं भेटी न झाल्या तितक्या बऱ्या. त्याचा आग्रहच असल्यास बदामीचे स्वारीत आमच्या नबाबाच्या भेटी झाल्या त्याप्रमाणें आम्ही भेटूं. पटवर्धनास भेट दिल्यानंतर पेशवे तुकोजीरावांकडेस येणार होते. पण रात्र झाली म्हणून दुसरें दिवशीं श्रीमंत व नाना वगैरे झाडून मंडळी सुभेदार तुकोजीरावांकडे मोठ्या समारंभानें आली. साहेबीं थाटाची बैठक बसवून पोशाख व हत्ती, घोडा व तरवार, कट्यार, शिरपेच, कंठी दिली. मर्जी बहत प्रसन्न होऊन डेरियास गेले. निजामाचा व पेशव्यांचा तह होऊन चार कलमें ठरली. चौथे कलम मान्य करणें निजामाच्या अगदी जिवावर आले. ते कलम दिवाण मशरूलमुल्कासंबंधीं होतें. अखेरीस तो आपण होऊनच पेशव्यांच्या लष्करांत येऊन दाखल झाला. पेशव्यांनींही त्याचा आदर सत्कार करून कराराप्रमाणें त्यास इतमामाने नजरकैदेंत ठेविले. करारमदार ठरून पेशव्यांची स्वारी इ. स. १७९५ च्या मे ता. १ रोजीं पुण्यास येऊन दाखल झाली. सुभेदार तुकोजीरावही पुण्यास आपल्या तळावर येऊन उतरले.

ही खर्ड्याची लढाई आटोपली आणि कांहीं दिवस शांततेंत जातात तोंच ह्या संस्थानावर व पर्यायानें अखिल भरतखंडावर मोठाच प्रसंग आला. 'श्रावण वद्यात चतुर्दशीस मातोश्री बाईसाहेबांचा काळ जाहला.' त्या समयीं सुभेदारांचे कनिष्ठ बंधू संताजी होळकर किल्ले सेंधवा त्यांचे जिम्मेस ते समयास येऊन हाजर झाले. उत्तरकार्य त्यांनीं केलें. प्राणोत्क्रमण बहुत सावधानीनें जाहलें. श्रावणमासाचा महिना. बारा तेरा हजार पात्र जेवण्याचें. त्यांचा संकल्प सोडून आसन्नकाळी मोक्षधेनु, उत्क्रांतधेनु इत्यादि धर्माची प्रवृत्ती होऊन नामस्मरणाचे घोषांत देहावसान झाले. त्याच समयीं प्रात:काळीं दर्शनी गाय होती तिनें हंबरडा मारून प्राण सोडला.

''बाईसाहेब होळकरांचे घरात आल्यापासून समजूं लागल्यावर खंडेराव होळकर यांचे

जहाल सरदारी चलन, त्यात घुटी प्राधान्य, खर्च वगैरे अव्यवस्थित, आचारही सदरहू अन्वयें. यामुळें वृत्ती उदार राहून सासू-सासऱ्यांचे सेवनीं तत्पर असून अंबादासबाबा पुराणिक (पाचे) यांजपासून परत्र साधनाची कांहीं व्यवस्था ग्रहण करून, सासुरवासी सबब चोरून जपून युक्तीनें त्या वस्तूचें दास्य करीत राहिल्या. महिन्यांतून दोन वेळ, तीन वेळ खंडेराव महारांजाकडील बोलावण्याचा प्रसंग येईल ते दिवशीं खाशांनीं सर्व गोष्टीविषयीं व्रतस्थ राहावें. थाळाही दुवक्तीं इकडूनच जावा. प्रहर रात्रीनंतर बाईसाहेबांनीं डेरियांत जाऊन सहा घटका रात्र राहतांना निघून (परत) यावें अशी रुढी. यांत ईश्वरी कृपेकरून एक पुत्र व एक कन्या, मालेरावबाबा व मुक्ताबाई जाहली. थोरले सुभेदार यांचा पूर्ण लोभ. कशीही तब्येत असल्यास बाईसाहेबांचा निरोप गेला असतां त्याप्रमाणें व्हावयाचें. दौलतींत उत्पन्नाविशीं सुभेदारांचे प्रारब्ध व पराक्रम. परंतु व्यवस्था करणें नफानुकसानी पाहाणें हे कारभारियानें बाईसाहेबांचे आज्ञेनें करीत असावे, असाच ओघ. याचप्रमाणें गौतमाबाईसाहेबांचा लोभ. कारण बाईसाहेबांचे करण्याची रीत प्रखर. धनीपणाचें वारें कांहींएक न ठेवितां कोणतेंही करणें ते करावें. दुसरें, खावंद या प्रकाराचा. परंतु स्नानसंध्यादि आचाराविषयीं सबाह्य एकरूप. येणेंकरून दिवसेंदिवस वजन जास्ती वाढून खंडेरावमहाराज कुंभेरीस कामास आले, ते समयीं सहगमनाचा निर्धार, परंतु सुभेदारांनीं बहुतच ग्लानी केली. दौलतीचे सांभाळण्याविषयीं खंडू हे नांव तुजला ठेवून मी उत्पन्नाचीच काळजी करून होतो. हे माझे सौभाग्य कायम ठेवणें असल्यास विचार करावा. तेव्हां बाईसाहेबांनीं सुरत सांभाळल्यावर इष्ट आराध्य सुभेदारच असें मोजून काळ काढला. तेव्हां संकोच प्राप्त होऊन मनेच्छा रहित केली. सुभेदारांची सर्वोपर जलाली; त्यांत दटावून आदिपश्चात् विचाराच्या गोष्टी बोलणें असे पुण्य व भीड अहिल्याबाईखेरीज दुसरें कोणाची नव्हती. अशा वर्तणुकीनें ईश्वर पुत्ररत्न नेऊन दौलत आपले हाते दुसऱ्याचे घरांत घालून स्वच्छ रेवातीरी वास करून स्नानसंध्या, दानधर्म, यातच निमग्न राहून दौलतीचे धोरण दक्षिण उत्तर महालची वहिवाट लावणी, उगवणी, दामदस्त बाईसाहेबांपाशीं. दरम्यान सुभेदारांची बैठक वाफगांवीं पडून अडचणीचा प्रसंग प्राप्त झाल्यावर खानदेश गंगातीर वगैरे महालाची वाफगांवीं करीत जावी, म्हणून सांगून पाठविलें. जातीने महालची वहिवाट केली. धर्माचा लौकिक, परंतु चोळीची पंधरा लक्षांची गांवखेडी होती. तेव्हां वाड्यांत पाहिजेल तें केलें. परंतु महालचे रुपयांपैकीं धर्माकडे एक कवडी न खर्चता तिसरें वर्षी, चवथें वर्षी हिशेब मामलेदारापेक्षां जुजरशीनें वाफगांवीं पाठवून द्यावे. त्यांत लाख दोन लाख आपले फाजील घरचे बंदोबस्त. याप्रमाणें राजकारणसंबंधीं दादासाहेब आनंदीबाईसह लहानमोठा सरदार विठ्ठल शिवदेव, राजेबहादुर आदिकरून कोणी विरामास आले नाहींत असे राहिले नाहीं. त्यांचे मनोदयानुरूप इतिकर्तव्य ते विषयीं नाना फडणीस यांस लिहून पुसून ऐक्य करून रवाना केलें. श्रीमंतांचे दौलतीचे बारीक मोठे विचार आपले हातें ठेवून वैराग्याचा प्रसार करून स्नानसंध्या, दानधर्माची वार्ता त्या पेठचे म्हातारीस देखील ठाऊक. दोन हजार तैलंग द्रविडांची कुटुंबे अक्षयीं राहून वंशावळीचे विस्तार होऊन सोयरिका येथेंच झाल्या. हिंडणारा, वागणारा मनुष्यास यातील

दर्ज माहित असावा या जोगेच. याप्रमाणें कैफियतकारांनीं मातोश्रींच्या चरित्रावर अभिप्राय दिला आहे. आता मातोश्रीसाहेबांच्या समकालीन प्रसिद्ध लोकांचे मत काय हें यथाशक्ती पाहूं या.

(१) अहिल्याकामधेनु या ग्रंथाचे कर्ते खुशालीराम म्हणतात :

*'वाङ्मनःकायसंशुद्धा बहुश्रुतपरायणा'*
*'जितेंद्रिया च सकलप्राणिनां हि हितैषिणी'*
*'सदाचारवती नित्यं विध्युक्तं कर्मकारिणी'*
*'व्यवसायात्मिका बुद्धिर्यस्याही नियमात्मिका'*
*'युक्ताहारविहारा च युक्तस्वप्नावबोधिका'*
*'सर्वभूतस्थमात्मानं सर्व भूतानिचात्मनि'*
*'दयार्द्रशुद्धभावेन सर्वत्र समदर्शना'*

**ह्या वरील उताऱ्यांचा अर्थ येणेंप्रमाणें :**

(१) देवी ह्यांची वाणी, मन व काया शुद्ध झालेली होतीं. श्रवणाकडे त्यांचा बहुत ओढा होता.

(२) त्यांनीं इंद्रियांवर ताबा संपादिला होता. सर्व प्राण्यांचें कल्याण व्हावें अशी त्यांना तळमळ लागली होती.

(३) सदाचार या नेहमी पाळत आणि कर्मे करावयाची ती विधीपूर्वक करीत.

(४) त्यांची बुद्धी अनेक व्यवसायांत पडे, तरी पण त्या बुद्धीवर नियमाचें प्रभुत्व असे. त्यांचा आहार-विहार, निजणें उठणें, ही नियमबद्ध असत.

(५) सर्व भूतांच्या ठिकाणीं आपणांस स्वतःस कल्पावयाचें अशी त्यांची मनोरचना असे. दयायुक्त शुद्ध भावनेनें सदासर्वदा सर्व प्राणीमात्राकडे समदृष्टीनें वर्तावयाचे असे त्यांचे ब्रीद होते.

२) कविवर्य मोरोपंत पराडकर हे बारामतीकरांचे आश्रित. श्रीमद्रामायण, महाभारत व श्रीमद्भागवत या प्रासादिक ग्रंथत्रयीनें यांनीं देशसेवा व देवसेवा ही दोन्हींही साधिली. पेशवे दुसरें बाजीरावसाहेब हे राजाश्रय देत असतांही त्यांनीं स्वीकारिला नाही. यावरून त्यांचा निःस्पृहपणा दिसून येतो. या कविवर्यांनीं मातोश्रीसंबंधानें 'न न्यायधर्म-निरता अन्या, कलिमाजी ऐकली कन्या' या ओळींत न्यायधर्म-निरता हें अति विरळ असें विशेषण त्यांनीं मातोश्रीसाहेबांस जोडिले आहे. याच कवींनीं श्रीगंगेपुढें वकिली करितांना खालील उद्गार काढिले आहेत.

*देवि अहिल्याबाई यावी भेटावयास सत्वर ती*
*तूं पुण्यकीर्ति हेही, गंगे, दोघीजणीहि सत्वरती*

ह्या दोन ओळींत त्या निःस्पृह कवीनें मातोश्रीसाहेबांचे श्रीगंगादेवीबरोबर 'पुण्यकीर्ति' व 'सत्वरती' या दोन विशेषणांनीं साम्य दाखविले आहे.

(३) नाना फडणीस म्हणाले, 'शापादपि शरादपि' असे बायकांत अहिल्याबाई दिसण्यांत आली. आजपावेतों (बाईची) स्नानसंध्या, धर्माची प्रवृत्ती ऐकण्यांत आली होती आज पराक्रमाचीही गोष्ट मोठीच केली. पुण्याचा दरवाजा म्हणजे माहिष्मती नर्मदातीरची, आम्हांस आज समजलें.' संपूर्ण मानकरी सरदार यांनीं माना डोलाविल्या. दुसरें एके प्रसंगीं नानांचे उद्‌गार निघाले, 'बाईसारखी सावध व दूरदर्शी बाईच.'

(४) पेशव्यांचे वकील हिंगणे यांनीं महेश्वराहून नानांस कळविलें कीं; 'दौलत तारावयाचे व वाचवावयाचे गुणक्रिया एक बाईचे पायाशी. येथें आश्रय पुढें चांगले चालीचा व धर्माचा व पतीचा व कायम मिजाशीचा सर्वांचे लक्ष रक्षावयाचा गुण जो कांहीं आहे, तो बाईंत.'

(५) निजाम म्हणाले (अहिल्याबाई ह्यांचा नातु धोंडिबा वारला ते वेळीं) ''अहिल्याबाई होळकर यांचे प्रतिमेस बायकात किंवा दौलतवंतांस कोणी योग्यतेस नाहीच नाही.'' कै. मल्हारराव होळकर यांची कमाई या बाईनीं नेक जागीं खर्च करून आपला देह ईश्वरार्पण केला. हे उपमा त्यांची त्यासच द्यावी. नबाबसाहेबांनीं श्रीमंत महाराज मातोश्रीसाहेब यांस जरीबादलीचा खलिता करून मोठी मोहर करून पाठविली आहे. या पत्रांत बाईसाहेबांस वडिलपणा योग्य जसे कोणी आपल्या मातोश्रीस किंवा वडील बहिणीस लिहितात, त्याप्रमाणें नबाबसाहेबांनीं या कागदांत अलकाब ठरावून लिहिला आहे.

(६) मालकमसाहेबांच्या लेखाचा कै. पुरुषोत्तम ह्या चरित्रकारांनीं जो मराठींत उतारा केला आहे तो येणेंप्रमाणें : 'हा विश्वकौटुंबिक कळवळा पाहून आपणाला हसूं येईल आणि तिनें आपल्या संपत्तीचा मुख्य भाग ब्राह्मणांस दानधर्मात दिला हे तिचे धर्मवेड पाहून आणि दूरदूरच्या देशीं इमारती बांधण्यात व त्यांचे उत्पन्न खर्च चालविण्यांत तिने आपला खजिना खाली केला हे पाहून आपणास तिला दोष द्यावासा वाटेल. अशा प्रकारचे भाषण मी एका ब्राह्मणापाशीं केलें, त्यावेळीं त्या विद्वान मनुष्यानें मला उलट रास्त सवाल केला कीं, 'अहिल्याबाईनें दानधर्मांत व सत्कृत्यांत जो पैसा खर्च केला, त्याच्या दुप्पट पैसा ती जर सैन्य वाढविण्यास खर्च करती, तर आज तीस वर्षे तिचा देश शांततेचा जो अनुभव घेत आहे व जे सुख उपभोगीत आहे, ते तिच्या प्रजेस मिळाले असते काय? व ती आहे जी पूजनीय वाटत आहे, ती तशी वाटली असती काय? तिच्या धार्मिकपणाबद्दल कोणीही संशय प्रकट करीत नाही, पण या दानधर्माऐवजीं तिच्यांत नुसताच व्यवहारातील शहाणपणा असता तर तिला आपला उद्देश इतक्या विलक्षण रीतीनें सिद्धीस न्यावयाचा दुसरा मार्ग सापडला नसता.' मी तिच्या कारकीर्दीच्या उत्तर भागांत शेवटली कांहीं वर्षे पुण्यांत मोठ्या हुद्याच्या जागी होतो. तेथें तिचा नुसता नामोच्चार केला असतां लोकांचे अंत:करण उचंबळून येत असे. ते अगदीं डोळ्यापुढें आहे. तो सारा भाग मी चांगल्या रीतीनें जाणतो. तिच्याशी वैर करणें अथवा परराष्ट्राकडून तिच्यावर

स्वारी होण्याचा प्रसंग आला असता तिला साह्य न करणें, ह्या गोष्टी ज्या आहेत त्या आमचे राजेरजवाड्यांत देवताभूषण केल्यासारख्या पापकारक समजतात: अशा प्रकारचा आदरभाव सर्व लोकांत होता व तिच्यासंबंधीं हीच सर्वांची दृष्टी होती; दक्षिणचा निजाम व टिपू सुलतान हेही तिला पेशव्यांप्रमाणें मान देत आणि तिला दीर्घायु प्राप्त होऊन तिची भरभराटी व्हावी अशाच प्रकारची देवाजवळ प्रार्थना करावयास हिंदूबरोबर मुसलमान लोकही सामील होत.'' मालकमसाहेबांसारख्या चौकस माणसास प्रथम मातोश्रीसाहेबांसंबंधानें ज्या शंका वाटत होत्या त्या शंका आजही आपणापैकीं अनेकांस व परकियांस वाटत आहेत. मालकमसाहेबांचे समाधान झाले. राज्यकारभाराचे ध्येय व धोरण हे निरनिराळ्या संस्कृतीच्या विचारसरणीवर अवलंबून राहणार आणि त्यामुळें प्रामणिक मतभेदांसही अवसर राहणें हे साहजिक आहे. हिंदू संस्कृती अभ्युदय व नि:श्रेयस या दोन निश्चित डोळ्यांनीं पाहणारी व चालणारी आहे. ह्या विचारसरणीनें जे उत्तर मालकमसाहेबांस मिळाले ते विचारणीय दिसेल असें आम्हाला वाटते. शंकेचे निरसन झाल्यावर मालकमसाहेब म्हणतात, ''ते पुरुषोत्तमांच्या शब्दांत आम्ही खाली देतो आणि या निकालास दुजोरा विद्वद्वर्य चिंतामणराव वैद्य यांनींही विविध ज्ञानविस्तारातून दिलेला आहे.

उतारा : ''हे चरित्र अत्यंत अलौकिक आहे. ती स्त्री असून तिच्यात अहंमन्यता मुळीच नव्हती. तिला धर्माचे वेड विलक्षण होतें. पण असें असूनही तिच्या ठायीं परधर्मसहिष्णुता तितकीच होती. तिच्या देवभोळेपणाची शिकस्त झाली होती. तथापि आपल्या हाताखालील लोकांस जेणेंकरून सुख होईल त्याशिवाय दुसरें विचार तिनें मनास शिवूं दिले नाहीत. तिनें अनियंत्रित अधिकाराचा उपयोग फारच दक्षतेने व काळजीपूर्वक केला. ह्या कामीं तिची नम्र वृत्ती कायम असून मनुष्यानें आपल्या सदसद्विवेकबुद्धीचे आदेश पाळणें जितके शक्य होते, तितके तिनें पाळले. तिचे स्वत:चे आचरण इतकें जाज्वल्य होतें, पण ते स्वत:पुरतेच असून ती दुसऱ्याच्या दोषांबद्दल, दुर्बलतेबद्दल क्षमावृत्तीच धारण करी.''

(७) सर जान मालकम ईस्ट इंडिया कंपनीच्या वतीने व विठ्ठल महादेव किबे (तात्या जोग) होळकर सरकारच्या वतीनें, असा तह इ. स. १८१८ त झाला. त्यानंतर विठ्ठलपंत तात्यांचा बोलबाला दोन्ही दरबारांत झाला. सर्व दृष्टीने ते भाग्यवंत झाले. अशा ह्या काळांत त्यांच्या आणि मालकमांच्या मैत्रीखातर अनेक भेटीं झाल्या. अशा भेटींत मालकमसाहेब सहज म्हणून विठ्ठलपंत तात्यांस म्हणाले, 'आतां आपली इच्छा काय उरली आहे?' तेव्हां तात्या गंभीर स्वरानें व मुद्रेनें म्हणाले, 'देवी अहिल्याबाईंच्या पावलावर पाऊल ठेवून राज्यकारभार चालावा.'

(८) पहिले अफगाण युद्ध झाल्यानंतर अफगाणिस्थानातून श्रीसोरटी सोमनाथाच्या चंदनी दरवाजास हिंदुस्थान परत दिसलें त्यावेळीं गव्हर्नर लार्ड एलिनबरो यांनीं ता. २७ नोव्हेंबर इ. स. १८८२ इ. रोजीं श्रीमंत महाराज हरीराव होळकर यांस पत्र लिहिले.

यांत मातोश्रीसाहेबांसंबंधीं उल्लेख केला आहे तो मोठा गौरवयुक्त आहे. ''थोर आणि भली अहिल्याबाई, लोकांनी वंदिलेली आणि राज्यकर्त्याच्या संबंधीं उत्तम आदर्श'' असा उल्लेख या पत्रात आहे. संबंध इंग्रजी पत्र परिशिष्ट दहामध्ये शेवटीं जोडलें आहे.

(९) महादेवभट खोचे (देवधर व्यंकटेश) हे अहिल्याबाईंस ता.२६ जुलाई इ. स. १७८९ च्या पत्रांत लिहितात कीं : आपले स्वर्गाचे धनी स्वर्गलोकपावेतों उभे राहिले. करोडो ब्राह्मण संतर्पणें झालीं आणि निरंतर होत आहेत. घाट देवालयें निरंतर कारखाने चालतात.

(१०) सुबराव घोरपडे मुक्काम जांबेहून ता. ३ आगस्ट इ. स. १७८९ रोजीं लिहितात, 'तुमचे पुण्याची सत्कीर्ती ऐकून देवगण संतुष्ट झाले. तेथें मनुष्याचा विचार तो काय? मराठ्यांत असे कोणी मागेंही झाले नाहीं व पुढेंही व्हावयाचें नाही.'

(११) हरीपंत फडके ह्यांचे ता. १४ जुलाई इ. स. १७९० चें अहिल्याबाईस पत्र, ''आपले घरचे रोजगार म्हणजे वतन असे लोकमत आहे.''

(१२) कृष्णाबाई मासाहेब होळकर ह्यांना देवी अहिल्याबाईसाहेब ह्यांच्यासंबंधात किती पूज्यभावना व आदर अंत:करणीं वसत होता हें त्यांचे शिक्क्यावरून कळून येते. (शिक्का गोल असून त्यांतील अक्षरें, ''श्रीम्हाळसाकांतचरणीं तत्पर अहिल्याबाई कारकीर्द. कृष्णाबाई होळकर.'')

मातोश्रीसाहेबांच्या संबंधात तत्कालीन लोकमत काय होते तसेच त्यांच्या पश्चात् लोकांस त्यांचे संबंधांत काय वाटत होते हे आतापर्यंत आपण यथाशक्ती उद्‌धृत केलें आहेच. यापुढें आम्हास काय दिसतें तें खाली नमूद करीत आहोंत. 'कार्लाइल या प्रसिद्ध तत्त्ववेत्त्याची एक उक्ती आहे ती येणेंप्रमाणें. The hisrory of a nation is the biography of it's great men. ह्यांचा अर्थ असा कीं कोणच्याही राष्ट्राचा इतिहास म्हणजे त्या राष्टांतील थोर व्यक्तीचा जीवनक्रम हाच होय. याचा अर्थ असा कीं थोर माणसें राष्ट्र घडवीत असतात किंवा पर्यायाने असेही म्हणता येईल कीं राष्ट्र घडविणारी माणसें थोर होत. राष्ट्राच्या अंगोपांगामध्यें जीवन घालणारी माणसें, राष्ट्रास जिवंत ठेवून त्याची संस्कृती वाढीस लावितात. तेव्हां ज्या मानानें ज्या व्यक्तीनें राष्ट्रांत चैतन्य आणून त्याचे संस्कृती हातभार लाविला असेल त्या मानानें ती व्यक्ती त्या राष्ट्राची उद्धारक होय आणि त्या मानानेंच त्या व्यक्तीचा थोरपणा कसास लागतो. व्यक्तीचे चरित्र, बाल्यावस्था, तारुण्यावस्था व वृद्धावस्था या बाह्यत: रूपांतर पावणाऱ्या स्थितीतून त्या राष्ट्राची संस्कृती आतून कशी वाढत असते, ते त्यांच्या कृतीवरून ताडावयाचें असतें. ह्याच मार्गानें आम्ही मातोश्रीसाहेबांचे चरित्र अवलोकनांत घेणार आहोंत.

मातोश्रीसाहेबांचे एकंदर आयुर्मान (इ. स. १७२५ ते १७९५) म्हणजे ७० सत्तर वर्षांचे पडते. इ. स. १७३३ त त्यांचा विवाह झाला, हें आतां कागदपत्रावरून स्पष्ट झाले आहे. म्हणजे बाल्यावस्थेची आठ वर्षें मातृगृहीं गेली. या कागदांतील हकीगत

पुराव्यानिशीं आज उपलब्ध नाही. या कालांत गृहशिक्षणानें मनावर काय संस्कार उमटले असतील ते तत्कालीन सामाजिक जीवनाच्या कल्पनेनेच कल्पावयाचे आहेत. सारांश, कन्या या रूपानें त्यांच्या जीवनाची वाढ येथें एवढी झाली. असे धरतां येईल कीं पुढील काळांत मिळालेल्या सुसंधीचा सदुपयोग करण्याची बुद्धी त्यांच्यांत जागृत झाली होती.

इसवी इ. स. १७३३ पासून इ. स. १७५४ पर्यंत पत्नी, माता व स्नुषा या नात्यांनीं त्यांची वाढ कशी झाली हे आतां पाहू या. त्यांचे पती खंडेराव होळकर 'यांचे जहाल सरदारी चलन, त्यात घुटी प्राधान्य. खर्च वगैरे अव्यवस्थित. आचारही सदरहू अन्वयें.' सारांश, पतीसुख यांस लाभले नाही. दोन अपत्ये झाली, पुत्र मालेराव व कन्या सौ. मुक्ताबाई. दोन्हीही अल्पायुषी झाली; म्हणजे अपत्यसुखही बेताबाताचेंच असें म्हणावयाचे. स्नुषा या नात्यानें घरातील शिस्त यांनीं उत्तम तऱ्हेनें पाळली असे त्यांच्या उत्तर आयुष्यक्रमावरून अजमावितां येते. राज्यकारभाराचा श्रीगणेशा सुभेदारांपासून त्यांस मिळाला, तर जीर्णोद्धाराचा ओनामा त्यास सौभाग्यवती गौतमाबाईंपासून (सासू) मिळाला.

इ. स. १७५४ ते १७६६ यांत केवळ ऐकीव किंवा लेखी माहितीवरच त्यांचें शिक्षण पोसलें गेलें नाही. राज्यकारभारच्या अनेक आंगोपांगांतून त्या प्रत्यक्ष वावरत होत्या हे या ग्रंथाच्या अनेक प्रकरणांवरून स्पष्ट होईल.

इ. स. १७६६ पासून तर अखेरच्या घटकेपर्यंत कारभारसूत्रें त्यांनीं हालविली. राज्यातील अंतर्व्यवस्था रामराज्याप्रमाणें होती हे स्वदेश व परदेशचे इतिहासकार एकरवानें गात आहेत. तेथें मतभेद नाहीच. आजूबाजूस सर्व भरतखंडभर लढाया व अशांततेचे वारे वाहत असतां आपल्या प्रजेस त्यांनीं सुखशांतीची छाया दिली. विद्वानांस आश्रय दिला, कलांवतांस पोशिलें, प्रजेस न्याय दिला व निश्‍िचत केलें, अधिकारी वर्गास दबावांत ठेविलें व वरचढ होऊं दिले नाही. शांततेमुळें व्यापारवृद्धि झाली व यांच्या तिजोरीस भरती येऊन वार्षिक उत्पन्न पाऊण कोटीचें जाऊन बसले. ही झाली गृहव्यवस्था. आतां बहिर्व्यवस्थेकडे लक्ष देऊं या.

ही व्यवस्था समजण्यास त्यांचे वकील परदेशांत कोठेकोठें होते त्याची यादी आम्हीं प्रकरण २४ मध्यें दिली आहे त्यावरून लक्षांत येईल.

वकिलांच्या पत्रव्यवहारापैकीं थोडाच पत्रव्यवहार आज उपलब्ध आहे. त्यातील जरूर तेवढा भाग निरनिराळ्या प्रकरणांत आम्ही उद्‌धृत केलाच आहे. त्यावरून सामदामादि मार्गानेंच जाण्याची आणि वळविण्याची मातोश्रीसाहेबांची प्रवृत्ती स्पष्ट दिसून येते.

''Live and let live'' म्हणजे स्वत: जिवंत राहावयाचें व इतरांसही जिवंत राहू द्यावयाचे, ही उदार नीति त्यांचा रोमरोमांत नांदत होती. बाजूच्या राजांनी आपआपले घरतंटे यांजकडे आणिले असतां ''Divide and rule'' ह्या भेदक राजनीतिचा त्यांनीं कधींही अंगीकार केला नाही. अनेक शेजारच्या राजांच्या भानगडी आपल्या शिबंदी सैन्याचे हजेरीनें त्यांनीं मिटविल्या आणि भानगडी मिटतांच शिबंदी काढून घेतली. ह्यामुळे त्यांचे प्रभुत्व

प्रेमाने प्रस्थापित होऊन गेले. R. Moffat Gantrey हे प्रसिद्ध लेखक लिहितात: ''Love'' says St. Paul, ''has nine ingredients.''

| | |
|---|---|
| Patience ........ | १ धीर, धैर्य |
| Kindness ....... | २ दयाळूपणा |
| Generocity...... | ३ औदार्य |
| Humility ........ | ४ लीनता |
| Courtesy......... | ५ सभ्यपणा |
| Unselfishness.... | ६ आप्पलपोटेपणाचा अभाव |
| Good-temper... | ७ सुस्वभाव |
| Guilelessness .. | ८ निष्कपटपणा |
| Sincerity ......... | ९ प्रांजळपणा |

या म्हणण्याचा अर्थ हा कीं प्रेम हा संपूर्ण सद्‌गुण वरील नऊ सद्‌वृत्तीचा बनलेला आहे. खुशालीरामानें वर म्हटलेच आहे कीं सर्व भूतमात्राचे ठायीं मातोश्रीसाहेबांचें प्रेम होते आणि तें जर प्रेम तसें होतें तर त्या प्रेमाच्या अंतभूत वरील नऊ गुण होते हें निराळें सांगणे नकोच आणि हे नऊ गुण ज्या ठिकाणीं वसतात त्या ठिकाणीं 'हे घरचे आणि दारचे' हा भेदभावही उरणार नाहीं. त्यांनीं जो दानधर्म केला त्यातही स्थळ, काळ, व्यक्ती हे भेद उल्लंघून केलेला आहे. सारांश, त्यांच्या वाणीतून निघालेला उद्‌गार 'संपत्तीच्या व सामर्थ्याच्या जोरावर जें जें मी करते आहे त्याचा जाब श्रीमार्तंडापाशीं मला द्यावा लागेल, ह्या भावनेनेंच वागणूक ठेवलेली आहे,' हा वस्तुस्थितीचा यथार्थदर्शक आहे.

संपत्ती व सत्ता यांनीं त्या युक्त होत्या म्हणून त्यांस 'राजा' असें म्हणता येईल. साधी राहणी व उच्च विचारसरणी पाळून श्रीमार्तंडाची त्यांनीं जाणीव ठेविली म्हणून त्यांस 'ऋषि' ही संज्ञा लागू पडते. ह्या दोहोंचाही (राजत्व व ऋषित्व) संगम आपले भरतखंड श्रीरामचंद्र, जनक, अशोक, हर्षवर्धन, विक्रमादित्य, अकबर व छत्रपती शिवाजी महाराज यांच्या मालिकेनें उज्ज्वल ठेविला आहे, त्याच मालिकेंत मातोश्रीसाहेबांचे नांव निरंतर राहील अशी आम्हांस खात्री वाटते. आर्यसंस्कृतीचा 'विनय' या मालिकेनें जगतास दाखविला म्हणून त्याच मालिकेंत झळकणाऱ्या मातोश्रीसाहेबांच्या या चरित्रास 'विनयकाल' असे नांव दिल्यास तें वाचकांस मान्य होईल, अशी उमेद आहे.



## परिशिष्ट : एक

## श्री सुभेदार मल्हारराव होळकर यांची जन्मपत्रिका (कुंडली)

११    ९
१२    श १० मं    ८ के
१    ७ शु
रा २    चं. ४ गु    र ६ बु
३    ५

**जन्म चैत्र शुद्ध ९ बारा घटकेस शके १६१५, संवत १७५०, इ. स. १६९३**

संशोधक : अनंत नारायण भागवत **(सरकारी रेकॉर्ड वरून)**

## मातोश्री अहिल्याबाई यांची जन्मपत्रिका (कुंडली)

४    २
५ रा.    ३ र बु शु    १
६ चं    १२ गु
७ श    ९ मं    ११ के
८    १०

**जन्म वैशाख कृष्ण ७, शके १६४७, दिनांक ३१ मे १७२५**

संशोधक : पंडित सुन्दरलाल दुबे (श्री गणेश ज्योतिषी)
इन्दूर.



परिशिष्ट : २

# परिशिष्ट : दोन

## होळकर राजघराण्याचा वंशवृक्ष : २२ पिढ्या (८ + १४)

**होळकर राजघराण्याचे मूळ गाव – होळ – वर्तमान जिल्हा – सातारा महाराष्ट्र**

**मालीबा – ''होळ'' गाव निवासी म्हणून होळकर आडनाव, मूळ आडनाव – वीरकर**




(२) मालेराव (राज्यकर्ते)
(१७६६-१७६७)
(५) काशीराव (राज्यकर्ते)
(१७९७ ते १७९९)
मल्हारराव
खंडेराव
विठोजी
(६) यशवंतराव प्रथम
(अ)
(१७९९ ते १८११)
बजाजी
बापूजी
(९) हरीराव (राज्यकर्ते)
(१८३४ ते १८४३)
मार्तण्डराव
(१०) खंडेराव
(दत्तक) राज्यकर्ते
(१८४३ ते १८४४)
रखमाबाई
(राजाभाऊ फणसे
यांच्याशी विवाह)
(७) मल्हारराव द्वितीय
राज्यकर्ते (दत्तक)
(१८११ ते १८३३)
(८) मार्तण्डराव द्वितीय
राज्यकर्ते(दत्तक)
(१८३३ ते १८३४)
भीमाबाई
(गोविंदराव बुळे
यांच्याशी विवाह)
चिमणाजी अप्पा बुळे
(बोलिया)
गोविंदराव बुळे
सीताबाईंशी विवाह
(नारायणराव बुळे (बोलिया)
सुंदरबाईंशी विवाह)
बहिरजी
तुकाराम
बापू
गंधारे (भाऊ होळकर)
मार्तंडराव
बापू
बुआजी
(मल्हारराव द्वितीयने दत्तक घेतले)
सर काशीराव
दादासाहेब
K.C.S.I.
गणपतराव (दत्तक)
मल्हारराव (दत्तक)
(११) तुकोजीराव
द्वितीय (राज्यकर्ते)
(१८४४-१८८६)
पाराजीराव
शंकरराव
भाऊसाहेब (दत्तक)
(१२) शिवाजीराव राज्यकर्ते
(१८८६-१९०३)
यशवंतराव
यादवराव भैयासाहेब
(हवेली वाले)
सीताबाई
(गोविंदराव बुळे यांच्याशी विवाह)




**अद्ययावत वंशावळी निर्माणकर्ते :**
**डॉ. गणेश मतकर (जानेवारी २०१२)**

